# BRIHATKATHÂSÂGARA,

## AN ANCIENT HISTORICAL ROMANCE.



### Vol. I.

REVISED EDITION, SECOND.



COMPOSED FROM ORIGINAL SANSKRIT IN MARATHI,

BY

PANDIT VAMAN SÂSTRI ISLÂMPURKAR.

योगस्थः कुरु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा फलानि च ।
सिद्ध्य-सिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥
(भगवान्)



BOMBAY

PRINTED AT THE EDUCATION SOCIETY'S PRESS, BYCULLA.



Price, Rs. 2-4.

# बृहत्कथासागर.

## प्राचीन ऐतिहासिक मराठी कादंबरी.



भाग १ ला.

( सुधारलेली आवृत्ति दुसरी ).



हें पुस्तक संस्कृत ग्रंथाच्या आधारानें महाराष्ट्रभाषेंत

**पंडित वामन शास्त्री इसलामपूरकर**

यांणीं तयार केलें.

योगस्थः कुरु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा फलानि च ।
सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥

( भगवान् )

मुंबईंत:

एज्युकेशन सोसैटीच्या छापखान्यांत छापिलें.

शके १८२१. सन १८९९.

किंमत २०४.

# प्रथमावृत्तीची प्रस्तावना.

सुमारें दोनहजार वर्षांपूर्वी पैठण शहरांत गुणाढ्य[1] नांवाचा मोठा पंडित व कवी झाला. हा गुणाढ्य त्याच नगरचा राजा सातवाहन याचा मुख्य प्रधान होता. गुणाढ्यानें प्रधानगिरीचें काम फार उत्तम रीतीनें पुष्कळ दिवस चालविलें; पण, पुढें कांहीं कारणामुळें तो राजा सातवाहन याच्या मनांतून उतरला. व त्याच कारणामुळें[2] त्यानें त्याची प्रधानगिरी सोडून शांत व निरुपद्रव अशा तपोवनाचा आश्रय केला. प्रधानगिरी सोडतेवेळीं गुणाढ्यानें संस्कृत, प्राकृत आणि देशी, ह्या तीन भाषेंतील एकही शब्द तोंडावाटे काढावयाचा नाहीं अशी प्रतिज्ञा केली होती. व त्याला ह्या तिहींवांचून दुसरी कोणतीच भाषा येत नव्हती. तेव्हां अर्थात् त्याला मौनच धारण करावें लागलें. त्याचे कांहीं दिवस अशा स्थितींत लोटले. नंतर तो तपोवनांत असतांना सहजरीतीनें त्याचा पिशाचांशीं सहवास झाला; तेव्हां त्याला त्यांची भाषा अवगत झाली. आणि तो त्या पिशाच-

1.—याचें चरित्र पुढें ( पृ० ८७ पासून ) सविस्तर सांगितलें आहे ह्मणून येथें देत नाहीं.

२ -हें कारण पुढें मूळांत विस्तारपूर्वक येईल.

३ -संस्कृत नाटकादि ग्रंथांत कमी प्रतीच्या पात्रांच्या मुखांत एक प्रकारची भाषा घालण्याचा कालिदासादि महाकवींचा संप्रदाय आहे. हिला सामान्यत: 'बालभाषा' असें ह्मणतात. तरी तींत निरनिराळे सहा भेद आहेत. प्राकृत, शूरसेनी, मागधी, पैशाची, महाराष्ट्री आणि अपभ्रंश, या नांवाच्या भाषा पूर्वकाळीं निरनिराळ्या देशांत चालू होत्या. याशिवाय पालीनांवाची एक भाषा असून, ती सिंहलद्वीप, ब्रह्मदेश इत्यादि स्थलीं कांहीं रूपांतरानें सांप्रत देखील प्रचारांत आहे; पण वरील सहा भाषांचा मुळींच कोठें प्रचार नसल्यामुळें त्या मृतप्राय झाल्या आहेत. व त्यांचा एकमेकींत इतका संकर झाला आहे कीं, त्यांचें स्वरूप ओळखणें मोठें कठिण झालें आहे. वर सांगितलेल्या हकीकतीवरून पैशाची नांवाची भाषा ही पिशाचांच्या प्रचारांत होती असें वाटतें. प्राचीन ग्रंथांत पिशाच नांवाची एक योनी असल्याचें पुष्कळ ठिकाणीं वर्णन केलें आहे. सत्कर्मी मनुष्य असून त्यानें कांहीं वाईट कर्म आचारण केलें तर त्याला पिशाचयोनी प्राप्त झाल्याचीं उदाहरणें पुराणादि ग्रंथांत पुष्कळ आढळतात. सांप्रत देखील पिशाच ह्मणून

भाषेंत आपला सर्व व्यवहार चालवूं लागला. तेथें असतांनाच त्यानें 'बृहत्कथा' नांवाचें सात लक्ष श्लोकाचें मोठें प्रचंड काव्य पिशाच भाषेंत रचून तयार

---

कोणी आहेत, व तें अनेकप्रकारचे चमत्कार करितात, असें बहुत लोक सांगतात; तथापि पिशाचाला प्रत्यक्ष पाहिलें, असें खात्रीपूर्वक कोणी सांगत नाहीं. व त्यांला कोणी प्रत्यक्ष दाखवूंही शकत नाहीं ! तेव्हां एकंदरींत पिशाचांच्या अस्तित्वाविषयीं ज्या शंका येतात त्यांचें समाधान होत नाहीं. तें कसेंही असो, सामान्यत:लोकांची ज्याप्रकारची समजूत आहे त्याप्रकारचीं तीं असतील, व त्यांची एखादी स्वतंत्र भाषा असेल; असें मानणें हें युक्ती आणि प्रमाण या दोहोंलाही प्रतिकूल आहे असें वाटतें. कदाचित् पिशाचांचें अस्तित्व मानलें तरी, तीं कोणत्या तरी एका नियमित देशांत अथवा लोकांत राहतात, असें प्राचीन अथवा अर्वाचीन कोणत्याही ग्रंथांत आढळत नाहीं. व तशाप्रकारच्या दंतकथा देखील ऐकण्यांत येत नाहींत. तीं बहुतकरून नदीतीर, स्मशान, ओसाड घरें, कांहीं जातीचीं झाडें यांवर अथवा ज्याची जेथें आशा गुंतली असेल त्या ठिकाणीं तीं राहतात असा लोकप्रवाद आहे. पण पैशाची नांवाची जी भाषा आहे, ती तर देशभाषाच असली पाहिजे. कारण तिच्या बहिणी शूरसेनी, मागधी, इत्यादि भाषा ह्या, त्या त्या देशाच्या भाषा आहेत. तेव्हां पैशाची हीही कोणत्या तरी एका विशिष्ट देशाची व लोकांची भाषा असण्याचा विषेश संभव आहे. व पिशाचांचा देश ह्मटला तर सांप्रत ज्याला भुताना ह्मणतात तो असावा. कारण पिशाच आणि भूत हे पर्यायशब्द असल्याचें प्राचीन ग्रंथांत आढळतें. व भूत किंवा पिशाच हे महादेवाचे गण होत. महादेवाचें स्थान कैलासपर्वत ह्मणजे हिमालयाचें एक शिखर. तेव्हां भूत अथवा पिशाच हे कैलासाच्या आसपास हिमालयाच्या दऱ्याखोऱ्यांत राहणारे जंगली लोक असावेत. पिशाच हें त्यांचेंच नांव; ह्मणून त्यांच्या नित्याच्या प्रचारांतलि जी भाषा तीच पैशाची भाषा असावी, असें सिद्ध होतें. गुणाढ्य विंध्याद्रीवर तप करण्यास गेला होता, व तेथेंच त्याला पिशाचलोकांचा सहवास होऊन त्यांची भाषा ह्मणजे पैशाची भाषा समजूं लागली असें मूलग्रंथांत सांगितलें आहे. तेव्हां वर सांगितलेल्या हिमालयाजळ पिशाच लोकांचा सहवास त्याला घडला नाहीं, हें उघड सिद्ध होतें तरी विंध्यपर्वतावरच्या जंगली लोकांस देखील त्यावेळीं पिशाच ह्मणत असतील व त्यांची भाषा ती देखील पैशाची या नांवानें मोडत असेल. कारण, विंध्यांत पुष्कळ शिवस्थानें असून जंगल फार होतें, व पिशाच अथवा रानटी लोकांची वस्ती विशेष होती. तें कसेंही असो. पिशाच नांवाचे कोणी तरी लोक असून त्यांची जी भाषा तीच पैशाची भाषा असें मानण्यास कांहीं बाध येत नाहीं. व प्राकृतादि सहा भाषांत जिची गणना केली आहे, ती हीच भाषा असावी असें सिद्ध होतें.

केलें. हा ग्रंथ फारच उत्तम झाला होता. त्याचा लोकांत प्रचार व्हावा, ह्मणून त्यानें तें पुस्तक आपल्या शिष्यांच्या हातीं देऊन सातवाहन राजाकडे पाठविलें. राजाला पैशाची भाषेचें थोडें देखील ज्ञान नव्हतें. अर्थात् त्या काव्याच्या रसाच्या आस्वादाचा लाभ त्याला मुळींच घेतां आला नाहीं. तथापि सातवाहनानें, त्या ग्रंथाचा तिरस्कार करून आपल्या अज्ञानावर पांघरूण घातलें ! यामुळें गुणाढ्याला अतिशय वाईट वाटलें. त्याणें त्यांतील सहा लक्ष ग्रंथ अगदीं नाहींसा करून टाकला. शेवटचा एक लक्ष ग्रंथ मात्र बाकी राहिला होता. पण इतक्यांत कांहीं चमत्कारिक रितीनें राजाला त्या ग्रंथाचें महत्व समजल्यावरून तो गुणाढ्याला शरण आला. तेव्हां जो भाग अवशिष्ट राहिला होता तो शिष्यांच्या व सातवाहनाच्या आग्रहास्तव कायम ठेवला. त्यालाच 'बृहत्कथा' असें ह्मणूं लागले. तो फारच उत्तम असल्यामुळें त्यावेळीं त्या ग्रंथाचा बराच प्रचार होता. पण दिवसेंदिवस पिशाचभाषेचा प्रचार फारच कमी झाल्याकारणानें त्या उत्तम काव्याचा परिचय अत्यंत विरल झाला. ही अडचण मनांत आणून काश्मीर देशांतील प्रसिद्ध कवी क्षेमेन्द्र याणें त्याचा सारांश घेऊन 'बृहत्कथामंजरी' नांवाचें संस्कृत भाषेंत एक काव्य रचलें. पण तें फारच संक्षिप्त झाल्यामुळें त्याचा विशेष प्रचार झाला नाहीं. नंतर सोमदेवभट्ट नांवाच्या कवीनें मूळ ग्रंथाचा आधार घेऊन कथासरित्सागर नांवाचें उत्तम काव्य रचलें. यांत गुणाढ्यानें केलेल्या बृहत्कथेंतला कोणताही भाग न गाळतां फक्त विस्ताराचा संक्षेप करून पैशाची भाषेच्या ठिकाणीं संस्कृत भाषेची योजना करण्यांत आली. सोमदेवभट्टाची कृती फार विस्तृत नसून क्षेमेंद्राप्रमाणें अतिशय संक्षिप्तही नाहीं. ह्मणून त्याच्या ग्रंथाचा सर्वत्र प्रचार झाला. या ग्रंथाचे निरनिराळे १८ लंबक अथवा भाग असून ग्रंथ फार सरस आहे.

१८८१ सालीं माझ्या एका विद्वान् मित्रानें जर्मन देशांत छापलेले या ग्रंथाचे पहिले पांच लंबक मला वाचण्याकरितां पाठविले. त्यापूर्वीं हा

ग्रंथ माझ्या पाहण्यांत आला नव्हता. ते पांचही लंबक मी लक्ष्यपूर्वक साद्यंत वाचून पाहिले, त्यावरून मला फार आनंद झाला. आणि ह्या उत्तम ग्रंथाचा महाराष्ट्रभाषेंत संग्रह करावा, असा निश्चय करून त्याच्या आधारें मराठींत लिहिण्यास प्रारंभ केला. त्यावेळीं माझ्याजवळ काय ते पांचच लंबक होते. व पुढचे लंबक मिळण्याची कांहीं विशेष आशाही नव्हती. तरी हातांत आहे तेवढ्याच भागांचा मराठी भाषासंग्रह करण्याचा संकल्प केला. इतक्यांत माझे स्नेही रा० रा० महादेव चिमणाजी आपटे, बी. ए. एल्. एल्. बी. येथील हाय कोर्टाचे वकील यांच्याकडे त्यांच्या एका मित्रानें या ग्रंथाची एक हस्तलिखित समग्र प्रत पाठविली. व आपटे यांणीं तें पुस्तक मला देण्याचें कबूल केल्यावरून आरंभिलेलें काम अपुरें राहण्याची काळजी दूर झाली. याप्रमाणें पुस्तकाची तयारी होऊन माझें, मराठींत तो ग्रंथ लिहून तयार करण्याचें काम झपाट्यानें चालू झालें, तरी तें फार दिवस चाललें नाहीं. ग्रंथाचें काम सुरू केल्यावर लौकरच, ह्मणजे १८८२ च्या जून महिन्याच्या दहाव्या तारखेस मी मुंबई सोडून उत्तर देशांत गेलों, तो सुमारें पांच वर्षांनीं ह्मणजे गेल्या एप्रीलच्या २७ व्या तारखेस परत मुंबईंत आलों. अर्थात् तोंपर्यंत हें काम तसेंच राहिलें. व तें पुनः हातीं घेण्याचा योग येऊन, आज त्याची प्रस्तावना लिहिण्याचा जो सुदिन आला आहे तो येईल, असें ध्यानींमनीं देखील नव्हतें! कारण येथून निघालों त्या-वेळीं इतका दीर्घ प्रवास करण्याचा माझा हेतू नव्हता तरी पुढें एका-मागून एक असे कांहीं उत्तम योग आले कीं, त्या योगानें सुमारें पांच वर्षें मोठ्या आनंदानें व सुखानें देशपर्यटण केलें. यावेळीं माझे विचा-रही कांहीं निराळ्याच प्रकारचे झाले होते. ह्मणून हेंचसें काय; पण दुसरींही जीं कामें आरंभलीं होतीं त्यांचें मला स्मरण देखील नव्हतें. यामुळें ईश्वरकृपेनें आज जो हा योग आला आहे याचें मला मोठें आ-श्चर्य वाटतें व अतिशय सन्तोषही होतो. आतां मी जी ही प्रस्तावना लिहित आहें, तींत या ग्रंथांतील विषयांच्या संबंधानें विशेष कांहीं

लिहावयाचें नसून या पुस्तकाचें काम माझ्या हातून कशा रितीनें झालें तें दाखवावयाचें आहे. त्याप्रमाणें याचा आरंभ कसा झाला तें येथवर सांगितलें. आतां त्याचा शेवट होण्याचा संभव नव्हता, हें नुक्तेंच वर सांगितलें आहे आणि तसें असून शेवटास गेलें, तेंव्हां तें कसें गेलें हें येथें अवश्य कळविलें पाहिजे. व तसें करावयाचें झाल्यास मध्यंतरीच्या पांच वर्षांतली थोडीशी हकीकत देणें इष्ट वाटल्यावरून येथून गेल्यापासून परत येथें येईपर्यंतचें संक्षिप्त वृत्त देतों.

मी उत्तर हिंदुस्थानांत फार दूरचा प्रवास केला. तसें करण्यांत माझे दोन तीन उद्देश होते. एका कवीनें प्रवासाचें वर्णन करतांना असें ह्मटलें आहे कीं, 'पवित्र तीर्थांचें स्नान होतें, निरनिराळ्या ठिकाणच्या चांगल्या चांगल्या लोकांशीं परिचय होतो. सर्वत्र द्रव्य संपादन करण्याची उत्तम संधी मिळते. नानाप्रकारचे सृष्टिचमत्कार पहावयास मिळतात व प्रवासाच्या योगानें बऱ्या वाईट अशा अनेक प्रकारच्या सुखदुःखमय प्रसंगांचा अनुभव येतो आणि त्यामुळें बुद्धीचा विकास होऊन तिच्या अंगीं प्रौढता येते. देशाटनांत हे व आणखी दुसरेही किती उत्तम उत्तम लाभ होतात, त्यांचें कोठवर वर्णन करावें ?' या कवीनें देशाटनाचे जे हे फायदे वर्णन केले आहेत, ते सर्व यथार्थ असून मला त्यांचा थोडासा अनुभव आला, हें सांगण्यास फार आनंद वाटतो. ह्या पांच वर्षांच्या प्रवासापासून मला इतके लाभ झाले कीं, ते होतील अशी माझ्या मनांत पूर्वीं कल्पना देखील आली नव्हती. मानवी स्वभाव कसा असतो, याचें येथें विशेष वर्णन करावयास नको. कारण, त्याचा प्रत्येकाला अनुभव आहेच. त्या स्वभावाला अनुसरून ज्या ज्या इच्छा व जे जे हेतु मनांत उत्पन्न होतात, ते पूर्ण झाले ह्मणजे चित्ताला जी एक प्रकारची शांती प्राप्त होते, ती प्रत्यक्ष अनुभवानेंच जाणली पाहिजे. आपले हेतू पूर्ण झाले ह्मणजे मनाची स्थिती फार उद्दाम होते व त्याला पुढें कमी जास्ती प्रकारचे कसलेही प्रसंग आले तरी व्याकुलता प्राप्त होत नाहीं. यावरून कोणी

ऽग्में ह्मणेल कीं, मी अगदीं आप्तकाम झालों, अथवा मोठा वीतराग तरी झालों असेल,—तर तसें मुळींच नाहीं. प्रापंचिक स्थितींत ज्या गरजा व अपेक्षा असतात, त्या सर्वही मला प्राप्त होतात व पुढेंही होणार आहेत. आणि त्यांसंबंधानें वेळोवेळ जी हालचाल केली पाहिजे, ती मी करीत आहें व पुढेंही करावी लागेल. तेव्हां त्यागोष्टींत प्रवासापासून कांहीं फरक पडला आहे असें नाहीं. तर पूर्वींच्या आणि आतांच्या स्थितींत साम्यच आहे; पण ज्यांत विशेष फरक पडला, त्या गोष्टी निराळ्याच आहेत.

मुख्यत्वें त्यावेळच्या आणि आतांच्या मानसिक स्थितींत फारच अंतर पडलें आहे. ह्या देशाटनाच्या अनुभवापासून मनाला विशेष प्रकारचें धैर्य आलें आहे. पांच वर्षांपूर्वी व्यवहारांतील प्रत्येक कामांत मनाचें जें कार्पण्य होतें, तें आतां समूळ नाहींसें झालें. 'कार्पण्य' या शब्दाचा प्रचारांत जो अर्थ घेतात, तो न घेतां 'दुर्बलता' इतकाच अर्थ घेतला पाहिजे. उदाहरणार्थ—एखाद्यानें आपलें काम करावें' अथवा तो करील, असा भरंवसा ठेवला, आणि त्यानें तें केलें नाहीं; तर त्यामुळें मनाला जी व्याकुलता प्राप्त होत होती, ती आतां तितकी प्राप्त होत नाहीं. भगवंतानें अर्जुनाला—"कोणतेंही कर्म, करण्याचा मात्र तुझा अधिकार आहे; अर्थात् करावयाचीं सर्व कर्में तूं करीत जा; पण त्यांच्या फलाचेठायीं मात्र तुझा अधिकार नाहीं; अर्थात् फलप्राप्तीविषयीं आसक्त होऊन राहूं नकोस," असें जें सांगितलें आहे, त्याचा पूर्ण अनुभव घेतला पाहिजे. इतकेंच नव्हे, तर त्याप्रमाणें वर्तनही ठेवतां आलें पाहिजे, व तें अगदीं आंगवळणीं पडलें पाहिजे. तसें झालें, हा देशाटनापासून एक मोठा लाभ झाला. दुसरा लाभ पुढील वर्तनक्रमाविषयींचा नियम हा होय. सामान्यतः—मग तो खरा असो किंवा खोटा असो—दैववादावर माझा पूर्ण भरंवसा आहे. त्यावरून प्रत्येक कामांत मनाची व्याकुलता बिलकुल होऊं द्यावयाची नाहीं, अशी स्थिती ठेवण्याविषयीं प्रयत्न कर-

ण्याची सुरवात झाली आहे. तिसरा लाभ कर्तव्याचा, म्हणजे एकंदरींत ऐहिक स्थितींत कसें वागावयाचें, याविषयींचा पक्का निश्चय हा होय. मानवी प्राण्याचें जिणें किती पराधीन आहे, हें सर्वांला विदितच आहे; तेव्हां आयुष्यांतला पुढचा काळ कोणत्या रितीनें घालवावयाचा, याचा मुळींच निश्चय करतां येत नाहीं. व कदाचित् कोणी केला तर त्याप्रमाणें तो सिद्धीस जाईल किंवा काय, याचा भरंवसा नाहीं, हें मला माहित आहे. व यामुळें पुढील वर्तनक्रमाविषयीं निश्चय झाला, असें जें मी वर म्हटलें आहे, तें कोणालाही हास्यास्पद आहे असें वाटेल. पण माझा लिहिण्याचा हेतू फार निराळा आहे. ईश्वरसत्तेनें पुढें जें काय होणार असेल तें होईलच. सत्यसंकल्प परमेश्वराची इच्छा, कोणाच्यानेंही अतिक्रमण करवली जाणार नाहीं, हें अगदीं खरें आहे. तरी प्रत्येक मनुष्य पुढें काय करायचें सवरायचें त्याचा पूर्वीं निश्चय करून ठेवीत असतो. पुढें जें व्हावयाचें असेल, तें तर होतेंच. पण त्याविषयीं पूर्वीं नीट विचार करून ठेवला असला, म्हणजे आयतेवेळीं मनाचा गोंधळ होत नाहीं. पुढें सुख अथवा दुःख किंवा बरीवाईट जी कांहीं स्थिती प्राप्त होणार असेल, ती होईलच; पण आज त्याविषयीं पूर्ण निश्चय करून ठेवणाराला एवढाच फायदा होणार आहे कीं, त्या त्या वेळीं त्याच्यावर जे जे प्रसंग येणार त्यांपासून त्याला उद्विग्नता वाटणार नाहीं. बरे वाईट प्रसंग येणें हें त्याच्या हातीं नाहीं; तरीपण त्या त्या वेळीं मनाची स्थिरता राखणें, हें पुष्कळ अंशानें त्याच्या हातचें आहे, असें मला वाटतें. तात्पर्य इतकेंच कीं, पुढच्या वर्तनक्रमाविषयींही आपला एकप्रकारचा दृढ निश्चय करून ठेवण्याची अत्यंत आवश्यकता आहे. हा या देशाटनापासून झालेला तिसरा लाभ होय.

चवथा लाभ विद्येच्या संबंधानें. या लाभाचें स्वतः माझ्यानेंच विशेष वर्णन करवत नाहीं. परंतु पांच वर्षांपूर्वीं विद्येच्या संबंधानें माझें जें ज्ञान होतें, त्यापेक्षां आतां कांहीं अधिक झालें आहे, असें मला वाटतें. निरनि-

राज्या ठिकाणच्या मोठमोठाल्या विद्वान् लोकांचा सहवास व त्यांच्याशीं केलेला वादविवाद आणि अनेक ग्रंथांचें अवलोकन यांपासून मला फार मोठा लाभ झाला आहे. लाभ ईश्वराच्या अस्तित्वाविषयीं दृढ-विश्वास हा होय. सामान्यतः इतर शास्त्रांपेक्षां वेदांतशास्त्रावर मुळा-पासून माझी विशेष निष्ठा होती. व त्याप्रमाणें बरेच वेदांतग्रंथ चांगले लक्षपूर्वक मी प्रथम वाचले; नंतर आस्तिक आणि नास्तिक मतवाद्यांचे ग्रंथ वाचून त्यांचीं मतें काय आहेत, हें समजून घेण्याकडे माझें विशेष लक्ष्य लागलें. व त्याप्रमाणें मी निरनिराळ्या मतवाद्यांच्या मतांचा सारांश आपल्या समजुतीप्रमाणें समजून घेऊन त्याविषयीं बराच विचारही केला. त्यापासून जो लाभ होईल, असें मला पूर्वीं वाटलें होतें, तो तर झाला नाहींच; पण दुसरा एक मोठा तोटा झाला. तो कोणता ह्मणाल तर मी पुरा संशयी बनलों. वेदांतशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें सच्चिदानंद-स्वरूप जगाचा अधिपती कोणी आहे, असें जें पूर्वीं वाटत होतें, त्यावि-षयीं आतां अनेक आक्षेप व संशय येऊं लागले. मी अशा एक प्रकारचा संशयी आहें, असें कधीं कोठें प्रतिपादन केलें नाहीं, अथवा कोणाला सांगितलें देखील नाहीं. तथापि एकंदरींत कशावरच माझा निश्चय बसेनासा झाला. पण ती संशयिता ह्या प्रवासांत समूळ नाहींशी झाली. असें होण्याचें कारण निरनिराळ्या वेळीं माझ्यावर जे बिकट प्रसंग आले, ते होत. इतर बारिकसारिक प्रसंगांविषयीं मला विशे-षसें कांहीं वाटत नाहीं. पण तीन मोठ्या प्रसंगांची आठवण आजन्म-पर्यंत विसरणार नाहीं. यांतील पहिला मोठा प्रसंग सिमल्याच्या नजिकच्या जंगलांत आला. ईश्वराच्या आस्तित्वाविषयीं माझ्या मनांत संशय आल्यादिवसापासून प्रत्येक लहान मोठ्या गोष्टींत त्याचें अ-स्तित्व कां मानावें ? याचा मीं विचार करित होतों. पण प्रत्येकवेळीं मनावर ठसण्यासारखें योग्य कारण कांहीं दिसण्यांत आलें नाहीं. सि-मल्याच्या जंगलांत हा जो पहिला प्रसंग आला, त्यांत एकाएकीं माझ्या

मनाची अशी खात्री होऊन गेली कीं, जगाचा कोणी अधिपती ह्मणून आहे, व तो सर्वांचें रक्षण करतो. या संबंधानें माझ्या ज्या कुत्सित कल्पना होत्या, त्या त्यावेळीं एका क्षणांत नाहींशा झाल्या. आणि त्या दीन-दयाळू प्रभूच्या दयेविषयीं मला इतकें प्रेम उत्पन्न झालें कीं, त्या भयंकर अरण्यांत एकटा मी पुष्कळ वेळ अगदीं शून्य होऊन बसलों होतों. यानंतर जे दोन प्रसंग आले, त्यांणीं प्रथम झालेल्या विश्वासाला अधिकच बळकटी आणली. तात्पर्य ईश्वरावर दृढ विश्वास हा एक या प्रवासांत मोठा लाभ झाला.

एकाएकीं हा जो विपर्यास झाला त्याच्या संबंधानें कोणालाही आश्चर्य वाटेल ह्मणून त्याचें थोडेंसें विवेचन करतों. तत्त्वविचार आणि श्रद्धा ह्या दोन गोष्टी निरनिराळ्या असून परस्पर विरुद्ध आहेत. तत्त्वविचारानें पुष्कळ अज्ञात गोष्टी समजतात व त्यामुळें मनाचें समाधान होतें हें खरें आहे. तथापि ईश्वरी कृती इतकी अगाध आहे कीं, तिच्याविषयीं कितीही विचार केला तरी अज्ञात अशा पुष्कळ गोष्टी राहतातच. आणि त्या समजून घेण्याची विलक्षण तळमळ लागते. पण श्रद्धावानाला तसें होत नाहीं. एकदां विवक्षित ठिकाणीं त्याची श्रद्धा बसली ह्मणजे त्याला विलक्षण प्रकारचा आनंद होतो. आतां हें खरें आहे कीं, श्रद्धेच्या मुळाशीं थोडेंसें अज्ञान असतें. व त्याबद्दल तत्त्वविचाराची घमंड बाळगणारे लोक त्याची निंदा करतात ! तथापि अज्ञान किंवा निंदा ही पुरवेल परंतु ती तळमळ नको !

हे वर सांगितलेले लाभ केवळ मानसिक आहेत. बाह्य लाभ कोणकोणते झाले, यांचें पूर्वी विवेचन केलेंच आहे. याप्रमाणें बाह्य व आभ्यंतर असे उभयप्रकारचे लाभ या प्रवासांत झाले. सुमारें ४॥ वर्षें पर्यटन करून परत स्वदेशीं जावें असें मनांत आलें. व त्याप्रमाणें इकडच्या वाटेला लागून माळव्यांत येऊन पोंहचलों. तेथें आल्यावर दुसरीच एक गोष्ट मनांत शिरली. पूर्वींच्या प्रवासांत एक दोन ठि-

ण्याणीं मला तशाप्रकारचा थोडा बहुत प्रसंग आला होता. सत्व, रज, आणि तम असे जे वेदांत्यांनीं तीन गुण मानले आहेत, त्यांचा पदोपदीं अनुभव येतो. निरनिराळ्या वेळीं मनाची जी स्थिती होते, तिच्या योगानें वरील तीनही गुणांचा अनुभव येतो. माळव्यांत आल्यावर मनावर एकदम रजोगुणाचा विशेष पगडा बसला. त्यामुळें अतःकरणांत एकाप्रकारचा विशेष लोभ सुटला. आणि त्याची पूर्तता करण्याविषयीं प्रयत्नही करूं लागलों. या कामीं माझ्या दोघां सन्मान्य मित्रांनीं विशेष अगत्य दाखविलें, याबद्दल मीं त्यांचा फार आभारी आहें. पण बिचारे ते तरी करतील काय? मला जशा प्रकारची व जी स्थिती पाहिजे होती, ती देण्याविषयीं ते असमर्थ झाले. व भिडेनें, आपली अशी स्थिती आहे असें त्यांच्यानेंही स्पष्ट सांगवलें नाहीं. लोभाला गुंतलेल्या मनुष्याची स्थिती कांहीं निराळ्या तऱ्हेची होते. यामुळें मी थोडे दिवस मनोरथसमुद्रांत, त्याच्या लाटा जिकडे हेलकावा देतील, तिकडे हेलकावत होतों. पण लौकरच हा सारा भ्रम निवृत्त होऊन मन स्थीर झालें. आणि पूर्वीच्या प्रयत्नाविषयीं इतका पश्चात्ताप झाला कीं, त्या संबंधानें ज्यांच्या ज्यांच्या कडे बोललों होतों, त्यांचें त्यांचें समाधान करून तो नाद पूर्णपणें सोडला. हा मध्यंतरीं एक भ्रम होऊन त्याची लवकरच निवृत्ती झाली, हें फार चांगलें झालें. कारण त्याच्या योगानें पुढील वर्तनक्रमाला पुष्कळ बळकटी आली.

येथें येऊन विद्याव्यसनांत कालक्रमण करावयाचें, असा माझा निश्चय झाला होता. तरी येथें आल्यावर कोणतें काम हातीं घ्यावें याचा विचार करित होतों. इतक्यांत वंगदेशीय रायबाहदुर राजा राजेन्द्रलाल मित्र एल्. एल्.; डी. सी. आय्. ई. यांणीं पत्रद्वारा मला जें पाहिजे होतें तेंच काम दिल्याबद्दलचें वर्तमान कळविल्यावरून फार आनंद झाला. प्रपंचाची विशेषशी यातायात न करितां सारावेळ विद्यादेवीच्या सेवेंत घालविण्याचा मनोदय होता त्याला वर सांगितलेलें काम मिळाल्यावरून

फार मदत झाली. जिवाच्या विश्रांतिकारितां चांगल्या मित्राचा समागम असणें अत्यंत आवश्यक आहे. व त्याप्रमाणें कोणाचा विशेष सहवास करावा ? याविषयीं येथें येण्यापूर्वींच विचार करित होतों. इतक्यांत जबलपुराहून खांडव्यास येत असतां वाटेंत येथील एका स्नेहिकाची अकस्मात् भेट झाली. १८८२ सालीं येथून गेल्यापासून माझ्या परिचितांपैकीं कोणत्याही मनुष्याबरोबर माझा पत्रव्यवहार देखील झाला नाहीं. त्यामुळें कोणाविषयींच मला कांहीं वाटत नव्हतें. तरी हा स्नेही गृहस्थ अकस्मात् भेटला, त्यावेळीं त्यानें थोडक्याच वेळांत जें अगत्य दाखविलें,—तितकें तो दाखवील असें माझ्या ध्यानांत देखील नव्हतें—त्यावरून तेथेंच माझा निश्चय झाला कीं, हाच आपल्याला योग्य मित्र आहे; व साधेल तर याचाच सहवास करावा. असा निश्चय झाल्यावर येथें आल्यावर मी त्याप्रमाणेंच व्यवस्था केली. मला जो मित्र पाहिजे होता तो केवळ माझ्याशीं प्रेमानें वागणारा असला ह्मणजे तेवढ्यानेंच तो माझ्या सहवासाला पात्र झाला असता असें नाहीं, तर मुख्यत्वें तो विद्याव्यसनी असला पाहिजे असा माझा हेतू होता. त्याप्रमाणें विद्याव्यसनी व विवेकी अशा मित्राचा समागम झाल्यामुळें त्यापासून मला फारच संतोष होत आहे. त्यानें हरएक गोष्टींत जें साह्य केलें, त्याबद्दल मी कृतज्ञ आहेंच; पण माझ्याशीं त्याच्या निष्कपट व सत्य वर्तनाबद्दल जें मला समाधान वाटतें, त्याचा विसर कधींही होणार नाहीं. व यासंबंधानें मी त्याचा अतिशय ऋणी आहें.

येथवर जी हकीकत सांगितली, ती कोणाला अगत्याची वाटल्यास त्यांनीं वाचावी, नाहीं तर तितकीं पत्रें उलटून मंडूकप्लुती करण्याचा कायतो त्यांना श्रम पडणार आहे, तेवढा त्यांणीं घ्यावा, अशी माझी विनंती आहे. व तिला ते मान देतील अशी आशाही आहे. ही हकीकत अप्रासंगिक आहे, असें कोणाला वाटेल, तर तसें मात्र नाहीं. कारण ज्या मोठ्या ग्रंथाचें पूर्ववृत्त मी देत आहें, त्याची रचना कसकशी झाली, त्याचा

संबंध कळण्यास या हकीकतीची फार आवश्यकता आहे. या ग्रंथाची प्रस्तावना फारच मोठी व महत्वाची होणार आहे. कारण यांत पुष्कळ ऐतिहासिक व मोठमोठ्या पुरुषांचीं चरित्रें आलीं आहेत. महाकवींला दृश्य अथवा श्रव्य काव्यें रचण्याला भारत व रामायण हे ग्रंथ जसे आधारभूत झाले आहेत, तसाच बृहत्कथा हा ग्रंथही विशेष आधारभूत आहे. मुद्राराक्षस, प्रियदर्शिका, रत्नावली, नागानंद इत्यादि नाटकांला आधार काय तो बृहत्कथेचाच. तेव्हां अशा मोठ्या ग्रंथाची प्रस्तावना लिहिणें, ती कशी लिहिली पाहिजे व केवढी मोठी होईल याचें अनुमान करतां येईल. हें महत्वाचें काम आह्मी सुरू केलें आहें; पण तें एव्हांशींच वाचकांच्या दृष्टीसमोर येण्याचा संभव नाहीं. कारण या ग्रंथाचे ह्या पहिल्या भागाएवढेच आणखीं सुमारें ९ भाग होतील, असा अंदाज आहे. तेव्हां शेवटच्या भागाबरोबर उपोद्घात द्यावा असा विचार आहे. आतां हें समग्र पुस्तक छापून प्रसिद्ध होणें, हें मोठ्या खर्चाचें व श्रमाचें काम आहे. तें कसें होईल तें पाहावें. या कृत्याची सिद्धी सर्वथा लोकाश्रयावर अवलंबून आहे. आमचें कर्तव्य होतें तें आह्मी बजाविलें. ह्मणजे हा पहिला भाग छापून लोकांचे सेवेंत सादर केला. आतां ही अल्प सेवा कशी झाली आहे हें सांगण्याचें काम आमचें नाहीं. ती जर पसंत पडली आणि लोकांनीं तिचा स्वीकार केला, तर पुढचा क्रम अव्याहत चालण्यास कांहींच अडचण नाहीं. अनुक्रमानें पुढचे सर्वही भाग सादर करण्यांत येतील.

हें पुस्तक ह्मणजे एक स्वतंत्र ग्रंथ आहे. मूळ संस्कृत ग्रंथाचें भाषांतर आहे असें मुळींच ह्मणतां येणार नाहीं; त्याचा फक्त आधार मात्र घेतला. बाकीची याची रचना अगदीं स्वतंत्र आहे. यांत दोष अथवा गुण काय काय आहेत, ते माझ्यानें सांगवत नाहींत, व त्याबद्दल लोकांची प्रार्थनाही करवत नाहीं. किंवा एखादी अडचणीची ढाल पुढें करून तिच्या आड दडून बसण्याचाही प्रयत्न मी करीत नाहीं. कारण मी

कसलेंही अभेद्य कवच धारण केलें तरी प्रहार करणारांचें हस्तलाघव इतकें विलक्षण आहे कीं, त्यांचे तीक्ष्ण बाण तसल्याही कवचाचा भेद करून लक्ष्यवेध केल्याशिवाय राहणार नाहींत. मग उगीच तसला प्रयत्न करण्यांत अर्थ काय? मला जसें करतां आलें, व वेळेनुसार जसें सिद्ध झालें, तसें करून हें सर्वांस सादर केलें आहे. तें बरें अथवा वाईट मानून, मान्य किंवा अमान्य करण्यास ते समर्थ आहेत, तेव्हां—

प्रेम्णा सद्भिर्ग्रंथः सेव्यः शब्दार्थतः सदोषोऽपि ।
संशोध्य वापि हरिणा सुदाममुनिसतुषपृथुकमुष्टिरिव ॥.

हा प्रथमभाग तयार करतेवेळीं माझे मुंबईतील प्रथम मित्र रा. रा- विष्णु दाजी गद्रे हेडक्लार्क गव्हर्मेंट सेन्ट्रल बुक. डेपो यांणीं आरंभीं जें साह्य केलें व वेळोवेळ ज्या सूचना केल्या त्यांबद्दल मी मनापासून त्यांचा फार आभारी आहें.

**विशेष सूचना.**—ह्या पुस्तकांत कोण कोणते विषय आले आहेत. त्यांची अनुक्रमणिका दिली आहे. ती लक्ष्यपूर्वक वाचावी. यांतील पात्रांच्या नांवाचीही टिप्पणी देण्याचा विचार होता; पण ग्रंथविस्तार फार झाल्याकारणानें यावेळीं तसें करतां आलें नाहीं. तथापि पुढें अनुक्र- मानें सर्व पात्रांचीं नांवें देण्यांत येतील, इति शिवं वितनुयादीशः॥श्रीः॥

मुंबई, गिरगांव,

तारीख २३ डिसेंबर सन १८८७. **सर्वांचा नम्रसेवक,**

**वामनशर्मा.**

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.

ह्या पहिल्या भागाची प्रथम आवृत्ती छापावयाला दिली त्यावेळीं ह्या अजस्र पुस्तकाचा शेवट कसा काय होईल यावियीं निश्चित असें कांहींच ठरलें नव्हतें. पहिल्या भागाची पहिली आवृत्ती लोकांपुढें मांडावयाची व या कामीं त्यांची जशी पसंती पडेल तदनुसार पुढला उद्योग चालवावयाचा इतकेंच मनांत आणलें आहे. पण लिहिण्यास फार आनंद वाटतो कीं आज दिवसपर्यंत एकामागून एक असे पांच भाग प्रसिद्ध झाले. इतकेंच नव्हे तर तिसरा भाग छापून तयार होण्याच्या संधीस पहिल्या भागाची दुसरी आवृत्ती काढावी लागेल असें दिसून आलें: व सुमारें तीन वर्षांपूर्वी पहिल्या भागाच्या सर्व प्रती आमच्याकडून खलास झाल्या.

या पुस्तकाची एक आवृत्ती कशी तरी पुरी करावी ह्मणजे दहाही भाग एकदां छापून काढावेत. पुनः तेच ते छापूं नयेत असा आमचा संकल्प होता; पण तो बदलावा लागला. कारण पहिल्या भागाबद्दल वरचेवर मागण्या येऊं लागल्या व तो नसल्यामुळें पुढचे भाग घेणारे लोक फार कुरकुर करूं लागले. तरी आह्मीं सुमारें चाल ढकल केली, पण फारच हांकाटी झाल्यामुळें पहिल्या भागाची ही सुधारलेली दुसरी आवृत्ती काढून लोकांस सादर केली आहे.

या भागाची प्रथमावृत्ती छापण्यांत आली त्यावेळीं आमच्याकडून महाराष्ट्रभाषेंत प्रसिद्ध झालेलीं काय तीं दोनच पुस्तकें होतीं. अगदीं प्रारंभींचें "**मेघदूत काव्यार्थदीपिका**" नामक मराठी टीका हें, व दुसरें "**शूद्रधर्मतत्त्वप्रकाश**"[1] हें होय. पण त्यानंतर मराठी व संस्कृत

---

१. हें पुस्तक निर्णयसागर छापखान्याच्या मालकांनीं प्रसिद्ध केलें असून सांप्रत त्याची दुसरी आवृत्ती प्रसिद्ध करण्यांत आली आहे.

ग्रंथ बरेच तयार झाले. त्यांचीं नांवें "करुणराघव", "ललितव-त्सराज" (पूर्वार्ध व उत्तरार्ध), "चारुदत्त आणि वसंतसेना", "प्रणयिमाधव", "आर्यचाणक्य", "विदग्धपुरूरवा", "राजा अग्निमित्र", "सुंदरी आणि वसंतसेन", (याचे तीन भाग आहेत), "कविताशास्त्र[२]", "आदिराजचरित्र", "कर्पूरमंजरी", आणि "कर्णसुंदरी", याशिवाय नांव न घालतां प्रसिद्ध झालेले कित्येक निबंध व चरित्रें वगैरे.

याच अवधींत बरींच संस्कृत पुस्तकेंही तयार करण्यांत आलीं. "अद्वैत-ब्रह्मसिद्धि", "गणपतिअथर्वशीर्ष" (सभाष्य), "रुद्राध्याय" (सभाष्य), "तैत्तिरीयोपनिषद्" (सभाष्य) "ईशावास्योपनिषदाची भूमिका" हीं पुस्तकें पुणें येथील आनंदाश्रम ग्रंथमालेंत प्रसिद्ध झालीं आहेत. "पराशरधर्मसंहिता" व "नवसाहसांकचरित्र", याशिवाय कित्येक लहान लहान संस्कृत ग्रंथ नांव न घालितां प्रसिद्ध झाले आहेत.

याशिवाय "सुरस कविचरित्र" (यांत सुमारें ३००० वर लहान मोठ्या कवींचीं चरित्रें दिलेली आहेत.) "काश्मीरचा इतिहास" व "बुद्धचरित्र" हीं तीन मराठी पुस्तकें फार मोठीं असून तयार झालीं आहेत. सवडीप्रमाणें प्रसिद्ध होतील. तसेच संस्कृत ग्रंथ "सांख्यदर्शन," "अपरार्क," "सरस्वतीकंठाभरण" व स्मृतिसंग्रह (यांत सर्व स्मृतींचा समावेश केला आहे) हीं संस्कृत पुस्तकें तयार होत आहेत.

---

१. हीं पुस्तकें वासुदेव मोरेश्वर पोतदार यांणीं प्रसिद्ध केलीं आहेत. २. हीं, पुस्तकें (२) बडोद्याच्या दरबारानें प्रसिद्ध कलीं आहेत. ३. हें पुस्तक एशियाटिक सोसायटी बेंगाल ह्या विद्वत्सभेनें बिब्लिओथिका इंडिया नांवाच्या ग्रंथमालेंत प्रसिद्ध केलें आहे. ४. हे दोन्हीं ग्रंथ मुंबई सरकाराकरितां तयार करण्यांत आले असून बॉबे संस्कृत सेरिज नांवाच्या ग्रंथमालेंतून प्रसिद्ध होतात. ५. पुस्तक काशी येथें प्रसिद्ध होणाऱ्या विजयानगरम संस्कृत सेरीज नावाच्या ग्रंथमालेकरितां तयार केलें असून हल्लीं छापत आहे.

येणेंप्रमाणें आमच्या हातून वेडीवांकडी वाङ्मयाची सेवा घडली व रसिक लोकांनीं, राजेरजवाड्यांनीं व सार्वभौम सरकारांनीं वेळोवेळ आश्रय देऊन आह्मांस अधिकाधिक उमेद येईल असें केलें, त्याबद्दल मनापासून आभार मानून ही आनंदकारक द्वितीयावृत्तीची लहानशी प्रस्तावना पुरी करतों.

सर्वांचा नम्रसेवक,

३० सप्तंबर १८९६
२० गिरगांव, मुंबई.

वामनशास्त्री इसलामपुरकर.

---

॥ ओं नमः श्रीगणेशाय ॥

# बृहत्कथासागर.



श्रियं दिशतु वः शम्भोः श्यामः कण्ठो मनोभुवा ॥
अङ्कस्थपार्वतीदृष्टिपातैरिव विवेष्टितः ॥ १ ॥

आपल्या ह्या भरत खंडाच्या उत्तरेकडील सीमेवर सर्व पर्वतांमध्यें परम श्रेष्ठ असा **हिमालय** नांवाचा एक पर्वत आहे. त्यावर यक्ष, किन्नर, गंधर्व, विद्याधर इत्यादि उपदेव वास करितात. साक्षात् त्रैलोक्याची माता जी **भवानी** तिनें त्याचे उदरीं जन्म घेतल्यामुळें या पर्वताचें माहात्म्य फारच वाढलें आहे. त्याचें वर्णन विस्तृतरितीनें करण्याचें एथें विशेषसें कारण नाहीं. कांकीं, आर्यदेशनिवासि लोकांस त्याची निदान ऐकीव तरी थोडी–बहुत माहिती नसेल असें वाटत नाहीं. त्या पर्वताच्या उत्तरेकडील शिखरास **धवलगिरि** अथवा **कैलासपर्वत** ह्मणतात. तें फारच उंच व अत्यंत शुभ्र असून वर असलेल्या अनेक धातूंच्या कांतीनें लखलखीत दिसतें. व त्यामुळें–पूर्वीं देवदैत्यांनीं मंदराचलाची रवी करून समुद्रमथन केलें, त्यावेळीं मंदरानें इतका त्रास सोसला, तथापि तो अमृताप्रमाणें शुभ्रत्व पावला नाहीं, आणि मी यत्नावांचून शुभ्र झालों ह्मणून त्या मंदिराला आपल्या प्रकाशाच्या किरणांनीं जणूं काय हसतेंच आहे असें प्रेक्षकांस वाटतें.

त्या **कैलासावर** सर्व जगाचा स्वामी भगवान् **शंकर** पार्वतीसह वास्तव्य करितो. व त्याच्या सेवेंत स्वकीय गण, विद्याधर, सिद्ध इत्यादि नेहमीं तत्पर असतात. अशा त्या शशिशेखराच्या भुऱ्या रंगाच्या उंच जटामुकुटावर लटकणारा चंद्र सायंकालीं पिंगट दिसणाऱ्या पूर्वाद्रीवर जणूं काय

नुकताच उदय पावल्यासारखा दिसतो. त्यानें **अंधक** नांवाच्या एकाच दैत्याच्या हृदयावर आपल्या शूलाचा प्रहार केला; पण तेणेंकरून त्रैलोक्याच्या हृदयांतील जणूं काय मूळच उपटून काढला. आणि त्याच्या अग्रभागीं उभे राहिलेले देव, दैत्य, आपआपल्या मस्तकावरील रत्नखचित मुकुटांत, नमनसमयीं प्रतिबिंबित झालेल्या त्याच्या पादनखांहीं अंकित झाल्यामुळें असे शोभतात कीं, **महादेवानें** आपला प्रसाद ह्मणून मस्तकींचा अर्धचंद्रच त्यांस दिला आहे !

या प्रकारच्या त्या **शंकराचें**, कोणे एके समयीं **पार्वती** अत्यंत लडिवाळपणानें अनेक प्रकारच्या स्तुतींनीं स्तवन करिती झाली. तेव्हां **शंकर** फार संतुष्ट होऊन तत्काळ तिला आपल्या मांडीवर बसवून, "मी तुझें काय प्रिय करूं तें सांग," असें विचारूं लागला. मग पार्वती ह्मणाली, "हे नाथ, जर आपण प्रसन्न झालां असाल तर अत्यंत रम्य, पूर्वीं मी कधींही न ऐकलेली अशी एकादी कथा मला सांगावी." हें एकून **शंकर** ह्मणाला, "ह्या जगांत भूत, भविष्य आणि वर्तमान यांपैकीं तुला माहित नाहीं असें काय आहे? कांहींच नाहीं. कोणतीही कथा सांगितली तरी ती तुला विदितच असणार. मग अपूर्व कथा कोठून आणावी." याप्रमाणें स्तुति करून कथा न सांगतां **शंकर** तिचें समाधान होण्याकरितां पुष्कळ युक्ति लढवूं लागला, तथापि ती अपूर्व गोष्ट ऐकण्याचा हेका कांहीं केल्यानें सोडीना. तेव्हां **शिवानें** त्या मानिनीच्या प्रेमनिबंधनास्तव तिच्याच प्रभावाचें जींत वर्णन होईल अशी एक लहानशी कथा सांगण्यास प्रारंभ केला. ती अशी.— °

पूर्वीं कोणे एके समयीं **ब्रह्मदेव** आणि **विष्णु** यांच्यामध्यें श्रेष्ठ कोण ह्याविषयीं वाद उत्पन्न झाला. **ब्रह्मदेव** म्हणाला मी श्रेष्ठ; आणि **विष्णु**

१ शिवपुराणांत ही कथा कांहीं भिन्न रीतीनें वर्णिली आहे. लिंगाचा अंत लावण्याकरितां शिवाच्या सांगण्यावरून ब्रह्मदेव व विष्णु गेल्या-नंतर दोघांनाही जेव्हां अंत लागेना, तेव्हां ब्रह्मदेवानें, केतकी आणि गाय यांस खोटे साक्षीदार करून, 'मी अंत लाविला' असें येऊन सांगितलें. त्यावरून शिवानें त्यास तूं अपूज्य होशील असा शाप दिला

म्हणाला मी श्रेष्ठ. तेव्हां त्या वादाच्या निर्णयार्थ मला मध्यस्थ करावें या हेतूनें ते मजकडे यावयास निघाले. ते फिरतां फिरतां हिमालयाच्या पायथ्यापाशीं आले. तेथें मोठें दैदीप्यमान असें माझें ज्वालालिंग होतें. तें पाहतांच उभयतांमध्यें असें ठरलें कीं, जो ह्या लिंगाचा अंत लावील तो श्रेष्ठ. याप्रमाणें ठराव करून ब्रह्मदेव वरच्या भागांत व विष्णु खालच्या भागांत, त्या लिंगाचा अंत लावण्याकरितां गेले. नंतर त्या उभयतांनीं आपल्याकडून होईल तितका प्रयत्न केला; पण दोघांसही त्या लिंगाचा अंत मुळींच लागला नाहीं. तेव्हां दिव्य तप करून त्यांनीं मला संतुष्ट केलें. मी तेथें प्रकट होऊन—" तुह्माला इष्ट असेल तो वर मागा, " असें म्हटलें. तेव्हां ब्रह्मदेवानें " देवा, जर वर देत असशील तर, तूं माझा पुत्र हो. " असें मागितलें. ह्या अतिक्रमामुळें तो अपूज्य झाला. नंतर विष्णूनें प्रार्थना करून—" देवा, जर तूं प्रसन्न झाला असशील तर, निरंतर मी तुझ्या सेवेंत तत्पर राहीन अशी माझी योजना कर, " असें मागितलें. हें त्याचें मागणें मीं मान्य केल्यामुळें तो तुझ्या रूपानें सतत माझी सेवा करीत आहे. जो साक्षात् नारायण तीच तूं माझी शक्ति आहेस. आणखी तूं केवळ आतांच माझी प्रिया आहेस असें नाहीं; तर पूर्वजन्मींही होतीस. "

ही कथा श्रवण करून पार्वतीला फार आश्चर्य वाटलें. आणि " मी तुमची पूर्वजन्मांतही स्त्री होतें हें कसें तें सांगा, " असें ती ह्मणाली. मग महादेवानें सांगितलें, " हे प्रिये! तूं व तुझ्या दुसऱ्या पंधरा बहिणी ह्या सर्वजणी तुह्मी दक्षप्रजापतीच्या कन्या होतां. त्यावेळीं दक्षानें तुझें माझ्याशीं लग्न लाविलें, व इतर तुझ्या बहिणी धर्मादिक देवांस अर्पण केल्या. पुढें एके समयीं त्यानें मोठा यज्ञ केला. त्या समारंभास आपल्या इतर सर्व जांवयांस त्यानें बोलाविलें; पण मला मात्र बोलाविलें नाहीं. तेव्हां तूं त्यास विचारलेंस कीं, "बाबा त्वां इतर सर्व जांवयांस बोलाविलें आणि माझ्याच पतीला वगळलें याचें कारण काय तें सांग?" या तुझ्या प्रश्नाला त्यानें तुझ्या कानाला केवळ विषाच्या सुईसारखें लागणारें, " कपाले

धारण करणारा व चिताभस्म अंगाला चर्चिणारा असल्या अमंगल तुझ्या नवऱ्याला ह्या पवित्र यज्ञसमारंभांत कसें बोलवावें ? " असें उत्तर दिलें. आणि गर्वमदांध होऊन त्यानें फारच माझी निंदा केली. ती तुला सहन झाली नाहीं. आणि त्वां—" हा थोरांची निंदा करितो अतएव पापी आहे. याच्यापासून उत्पन्न झालेलें हें शरीर मला ठेवून तरी काय करायाचें आहे ? " असें मनांत आणून तत्काल त्या शरीराचा त्याग केलास. हें वर्तमान समजतांच मला अतिशय क्रोध येऊन मी त्याचा व त्याच्या यज्ञाचा विध्वंस करून टाकला. नंतर क्षीरसमुद्रापासून चंद्रकला उत्पन्न व्हावी त्याप्रमाणें तूं हिमालयापासून झालीस. त्यानंतर मीही त्या तुषाराद्रीवर तपश्चर्या करण्याकरितां गेलों. आपल्या घरीं आलेल्या अतिथीचा सत्कार करावा एतदर्थ तुझ्या पित्यानें माझ्या सेवेकडे तुझी योजना केली. इतक्यांत, तारकासुराला मारणारा मजपासून पुत्र उत्पन्न व्हावा एतदर्थ देवांनीं मथवून पाठविलेल्या मदनानें संधी पाहून आपले पांचही बाण एकदम मजवर सोडले. ह्या अपराधामुळें मी तत्काल त्याला भस्म केलें. नंतर मोठ्या धैर्यानें तीव्र तप करून त्वां मला केवळ आपलेंसें करून घेतल्यावर मी तुला वरिलें. याप्रमाणें तूं माझी पूर्वजन्मींही सहचारिणी होतीस व आतां तर आहेसच."

याप्रमाणें बोलून शंकर स्तब्ध झाल्यावर पार्वती प्रणयकोपयुक्त होत्साती—" धूर्ता! मी पुनःपुनः प्रार्थना करीत असून तूं अपूर्व कथा मुळींच सांगत नाहींस. मी आपली वेडी आहें, म्हणून वरचेवर तुझीं आर्जवें करतें. त्या सवती गंगेला डोकीवर घेतली आहेस, व संध्येलाही नमस्कार

१—तारकासुर नांवाचा दैत्य उन्मत्त होऊन देवांस फार त्रास देऊं लागला, तेव्हां सर्व देवांनीं शंकराची प्रार्थना केली, व त्याचा मृत्यु शंकराच्या पुत्राच्या हातून होणारा असल्यामुळें शंकरानीं स्वामिकार्तिक हा पुत्र निर्माण केला व त्याजकडून तारकासुराचा वध करविला. ही कथा महाभारतांत व कुमारसंभव काव्यांत विस्तृत वर्णिली आहे.

२—गंगा आणि संध्या ह्या शंकराच्या स्त्रिया मानिल्या आहेत; ह्मणून त्यांच्याविषयीं सवतीमत्सर उत्पन्न होऊन पार्वतीनें हें भाषण केलें आहे.

करतोस, यावरून तुझी मला माहिती नाहीं कीं काय? " असें बोलली. नंतर तिचें समाधान करून दिव्य कथा सांगण्याचें महादेवानें कबूल केलें. आणि--" कोणाला आंत येऊं देऊं नको " असें नंदीला सांगून त्याला दार धरून बसवून मग कथा सांगण्यास प्रारंभ केला.

शंकर म्हणाला, " देव नेहमीं सुखी व मनुष्य नेहमीं दुःखी असतात; याकरितां त्या दोघांचींही चरित्रें श्रोत्यांना मनोहर होत नाहींत. कारण, देवांचें चरित्र वर्णन केलें तर तें मुळापासून शेवटपर्यंत आनंदकारकच असतें व मनुष्यांचें आरंभापासून अखेरपर्यंत दुःखकारकच असतें. अतएव ज्यांच्यामध्यें दिव्य आणि मानुष हे दोन्ही गुण मिश्रित आहेत अशांची कथा विशेषेंकरून आनंदप्रद होते. कारण, त्यांत प्रसंगविशेषीं सुख व दुःख यांचें मिश्रण असतें. उघडच आहे कीं, एकाद्याला आरंभापासून शेवटपर्यंत साखरेचें जेवण घातलें किंवा सर्व कडू पदार्थांचें भोजन घातलें तर, त्याला तीं दोन्हींही प्रिय होणार नाहींत; पण तेंच चांगला भात, गोड पक्वान्नें, त्यांतच एकादी कारल्याची कडू भाजी, चटण्या, कोशिंबिरी, असें निरनिराळ्या रसांनीं युक्त अशा पदार्थांचें भोजन रसिकाला फार प्रिय होतें, आणि तो यथेष्ट भोजन करतो. त्याचप्रमाणें सुखदुःखात्मक चरित्रें रसिकांला मनोहर होतात. ह्मणून दिव्यादिव्य असे जे विद्याधर त्यांचें चरित्र तुला सांगतों. "

याप्रमाणें शंकर पार्वतीला सांगत आहे, इतक्यांत त्याचा अत्यंत आवडता पुष्पदन्त नांवाचा गण दारांत आला. तेव्हां दारांत पाहरा करणाऱ्या नंदीनें त्याला आंत जाण्याची मनाई केली. हें पाहून पुष्पदन्ताला फारच अचंबा वाटला. कारण, ह्या भोळ्या दरबारांत कधींच कोणाला आडकाठी व्हावयाची नाहीं. तशांत पुष्पदन्तासारख्याला तर मज्जावाचें श्रवण देखील व्हावयाचें नाहीं. तेव्हां पुष्पदन्तानें आपल्या मनांत ताडलें कीं, आंत कांहीं तरी गुप्त संवाद चालला असावा. मग त्यानें तो गौरीहरांचा संवाद ऐकण्याच्या हेतूनें तत्काल योगमार्गानें आंत प्रवेश

केला. आणि सात विद्याधरांचें अपूर्व चरित शंकर पार्वतीला सांगत असतां त्यानें तें श्रवण केलें. नंतर आपल्या घरीं जाऊन त्यानें आपल्या आवडत्या भार्येला तें सर्व यथावत् कथन केलें. उघडच आहे कीं, जवळ असलेलें द्रव्य आणि एकादी गुह्य गोष्ट शहाणी आणि तशांत लाडकी अशा स्त्रीजवळ सांगितल्यावांचून कोण राहील? प्रिय पतीपासून ती अपूर्व कथा श्रवण करून हृष्ट होत्साती आपल्या यजमानिनीला ती सांगावी ह्मणून, पुष्पदन्ताची स्त्री जया मोठ्या उत्कंठेनें—"आज मी एक अपूर्व कथा ऐकली आहे," असें पार्वतीजवळ बोलली. पार्वतीनें—"काय ती सांग," असें ह्मणतांच, हंसत हंसत, शंकरानें तिला जी कथा सांगितली होती तीच कथा तिनें पार्वतीला सांगितली. उघडच आहे, स्त्रियांना वाक्संयम कोठून असणार? जयेनें साहजिक वृत्तीनें सांगितलेली ती कथा पार्वतीनें स्वस्थपणें ऐकून घेतली; पण अंतर्यामीं तिला मोठा राग आला. तिनें डोळे लाल करून शिवाला ह्मटलें, "आपण मला सांगितलेली कथा अपूर्व आहे काय? ती त्या जयेला देखील माहीत आहे." हें ऐकून महादेव चकित झाला. आणि जयेला ही कथा कशी समजली? याचा एकाग्र अंतःकरणानें विचार करूं लागला. तेव्हां पुष्पदन्ताचें कृत्य त्याच्या लक्ष्यांत आलें; आणि पार्वतीस ह्मणाला, "पुष्पदन्तानें योगमार्गानें आंत प्रवेश करून कथा ऐकली, आणि जयेला सांगितली." हें ऐकतांच तिच्या अंगाची लाही झाली. आणि "कोठें आहे तो चोर? आणा त्याला माझ्या समोर," असें ती ह्मणत आहे, इतक्यांत नंदीश्वरानें त्याला आणून पुढें उभें केलें. तो आधींच गर्भगळित झाला होता. अंगांत कांपरें भरलें होतें. त्याला पार्वती ह्मणाली, "दुष्टा! दांडग्या मेल्या असें कपट करतोस काय? बरें जा. तुला ह्या अपराधाबद्दल मनुष्यत्व प्राप्त होवो." तेव्हां जवळ माल्यवान् नांवाचा एक गण होता, तो त्याला क्षमा करण्याविषयीं पार्वतीची प्रार्थना करूं लागला. त्यालाही पुष्पदन्ताला दिलेलेंच बक्षीस

मिळालें. मग ते दोघे जयेसहवर्तमान पार्वतीच्या पायांपडून उश्शाप मागूं लागले. तेव्हां त्यांची दया येऊन पार्वती हळूच ह्मणाली. "असो आतां पुष्पदन्ता जा. विंध्याटवींत कुबेराच्या शापानें पिशाचत्व पावलेला सुप्रतीक नांवाचा यक्ष, काणभूति हें नांव धारण करून राहिला आहे. त्याला भेटून व पूर्वजातीचें स्मरण करून जेव्हां ही कथा त्याला सांगशील तेव्हां माझ्या शापापासून मुक्त होशील, आणि हा माल्यवान् त्या काणभूतीपासून ही कथा ऐकून भूतलावर सर्वत्र प्रसिद्ध करील तेव्हां शापमुक्त होईल." याप्रमाणें बोलून पार्वती शांत झाली व ते दोघेही तत्काळ दिसतनासे झाले.

नंतर कांहीं काळ 'लोटल्यावर एकेसमयीं गौरीला त्यांची आठवण झाली, तेव्हां तिनें महादेवाला त्यांचें वर्तमान विचारलें. शिवानें सांगितलें " पुष्पदन्त, कौशांबीनामक सर्व भूमंडलावर अति प्रख्यात अशी जी एक नगरी आहे तींत वररुचिनामक ब्राह्मण झाला आहे व माल्यवान् प्रतिष्ठान नामक नगरींत गुणाढ्यनामक पंडित झाला आहे." याप्रमाणें त्यांचें वर्तमान सांगून, नेहमीं सेवातत्पर असणाऱ्या भृत्यांनीं अवज्ञा केल्यामुळें रागाच्या भरांत त्यांना शाप घोर दिला याबद्दल जिच्या मनाला किंचित् अनुताप झाला आहे, अशा गौरीचें समाधान करीत होत्साता भगवान् शंकर सुखानें कैलासपर्वतावर रममाण होता झाला.

याप्रमाणें पार्वतीच्या शापानें मनुष्यदेह धारण करून पुष्पदन्त कौशांबीनगरींत वररुचिनामक ब्राह्मण झाला. त्यालाच कात्यायन असेंही ह्मणत. त्यानें सर्व विद्यांचा अभ्यास केला. तो मोठा चतुर, विद्वान् व शूर आहे अशी त्याची सर्वत्र ख्याति झाली. त्यामुळें नंदराजानें त्याला आपली मुख्यप्रधानगिरी दिली. हें एवढें जोखमाचें काम त्यानें इतकें चांगलें बजावलें कीं, तेणेंकरून सर्व पृथ्वीवर त्याच्या कीर्तीचा शुभ्र ध्वज फडकूं लागला. वररुचीला प्रधानाचीं वस्त्रें मिळण्यापूर्वीं नंद हा एक सामान्य राजा होता. नंतर वररुचीच्या चातुर्यानें त्याला सार्वभौमत्व प्राप्त झालें, अस्तु.

एके दिवशीं **वररुचीच्या** मनाला कांहीं कारणामुळें मोठा पश्चात्ताप झाला. तेव्हां त्यानें राज्यकारभार सोडून तप करण्याचा निश्चय केला, आणि तो विन्ध्यवासिनी देवीची आराधना करूं लागला. कांहीं दिवसांनीं देवी प्रसन्न झाली. आणि स्वप्नांत येऊन—" तूं ह्याच पर्वतावरच्या अरण्यांत फिरणाऱ्या **काणभूति**नामक पिशाचाचें दर्शन घे, ह्मणजे तुझें कार्य होईल." असें तिनें सांगितलें. नंतर तप करण्याचें सोडून **वररुचि** त्या पिशाचाचा शोध करूं लागला. वाघ, सिंह, लांडगे, वानर इत्यादि जनावरांचें व सर्प, वृश्चिक इत्यादि दुष्ट प्राण्यांचें केवळ विहारस्थान अशा त्या भयंकर अरण्यांत फिरत असतां **वररुचीची** जी अवस्था झाली तिचें काय वर्णन करावें! नंदराजाची प्रधानगिरी सोडून तप करीत असतां त्याला हाल, उपोषणें वगैरे करण्याचा प्रसंग आला असल्यामुळें राजसुखाचें बरेंच विस्मरण झालें होतें. तथापि अशा वेळेस एकादा अल्पविचारी पुरुष असता तर त्यानें तो देवीचा दृष्टांत वगैरे एका बाजूला ठेवून नीट घराची वाट धरली असती; पण **कात्यायन** मुळापासून दृढनिश्चयी होता. त्यानें धैर्य धरून त्या पिशाचाचा पत्ता लावण्याचा निश्चय केला.

एके दिवशीं **कात्यायन** वनामध्यें फिरत असतां अगदीं दमून गेल्यामुळें कोठें तरी पाणी मिळेल ह्मणून शोध करीत होता, इतक्यांत एक गगनचुंबित वडाचें झाड दुरून त्याच्या दृष्टीस पडलें. तेथें क्षणभर विश्रांति घ्यावी व मिळालें तर पाणीही प्यावें, ह्मणून त्यानें त्या झाडाकडची वाट धरली. जवळ जाऊन पहातो तों तेथें कोणी एक धिप्पाड **भूत** बसला आहे व त्याच्या सभोंवती शेकडों पिशाच बसले आहेत, असें त्याच्या दृष्टीस पडलें. तेव्हां आपण ज्याला शोधितों तोच **काणभूति** हा असेल असें जाणून **कात्यायन** त्याच्याजवळ गेला. त्या पिशाचानें **कात्यायनाला** पाहतांच तत्काल उठून त्याच्या पायांला घट्ट मिठी मारली. आणि मोठ्या आदरानें त्याला एका शिलातलावर [illegible]

प्रार्थना केली. कात्यायनाला त्याच्या दर्शनानें परमानंद झाला. क्षुधा, तृषा आणि श्रम यांचें स्मरण देखील राहिलें नाहीं. कांहींवेळ स्तब्ध राहून कात्यायनानें–" तूं मोठा विचारी व सदाचारी असून तुला ही वाईट स्थिति प्राप्त होण्याचें कारण काय? " असा प्रश्न केला. हें त्याचें प्रेमयुक्त भाषण श्रवण करून काणभूति ह्मणाला, " मला स्वतः याचें मुळींच ज्ञान नाहीं; पण मी उज्जयिनींत होतों त्यावेळीं तेथल्या श्मशानांत एकेदिवशीं महादेवानें मला एक गोष्टी सांगितली ती तुला सांगतों."

त्या भयाण स्मशानांत संचार करीत असतां, एकेसमयीं पार्वतीनें शंकराला–"तुह्मी स्मशानांत फिरतां, कपालमाला धारण करतां, चिताभस्म अंगाला लावतां, व्याघ्रचर्म, सर्पमाला, इत्यादि सर्व अमंगळ व भयंकर अशा वस्तूंवर तुमची प्रीति अधिक असते. तर हें असें असण्याचें कारण काय ?" असें विचारलें. याप्रमाणें तिचा प्रश्न श्रवण करून महादेव ह्मणाला, "ऐक, याचें कारण सांगतों. पूर्वीं कल्पक्षय झाला त्यावेळीं हें सर्व दृश्य जग जलमय झालें. तेव्हां म्यां आपली मांडी चिरून त्यांतून एक रक्ताचा थेंब त्या प्रलयोदकांत पाडला. त्यापासून एक अंड उत्पन्न झालें आणि त्यांत ब्रह्मदेव उत्पन्न झाला. नंतर सृष्टि होण्याकारितां मीं प्रकृति उत्पन्न केली. मग ती प्रकृति आणि ब्रह्मदेव यांनीं दक्षादि प्रजापति उत्पन्न केले. पुढें त्यांनीं [illegible]प्रकारच्या प्रजा उत्पन्न केल्या. याकारितां सर्व जगांत ब्रह्मदेवाला [illegible] असें म्हणतात. याप्रमाणें चराचर जग उत्पन्न केल्यामुळें ब्रह्म[illegible] आपल्या कृत्याचा मोठा गर्व झाला, आणि तो माझी अवज्ञा क[illegible]लागला; म्हणून मीं त्याचा मस्तक तोडला. कांहींवेळानें माझाही [illegible]ांत झाला आणि त्याचा मस्तक तोडल्याबद्दल मला मोठा पश्चात्ताप झाला. त्या वेळापासून मीं असा नेम धरिला आहे कीं, आजपासून नेहमीं स्मशानांत राहून हातांत कपाल धारण करावयाचें. याकरितां मला क[illegible]पाणि व स्मशानप्रिय असें म्हणतात. आणखीं असें

आहे कीं, हें माझे हातांतलें कपाल सामान्य नव्हे. तर, *तदात्मक हें जगतच माझ्या हातांत आहे." ही कथा ऐकल्यानंतर आणखीं कांहीं तरी यांचा संवाद होईल, तो ऐकावा म्हणून मी तेथेंच उभा राहिलों. इतक्यांत पुनः, पार्वतीनें—'तो पुष्पदन्त किती दिवसांनीं परत आमच्याजवळ येईल? म्हणून विचारलें. तेव्हां मजकडे पाहून महादेवानें सांगितलें कीं, हा जो आपल्यापुढें उभा आहे, हा पूर्वी यक्ष होता. कुबेराची सेवा करून त्याच्याजवळ राहत होता. त्यावेळीं याची स्थूलशिरानामक राक्षसाशीं मैत्री जडली. हें वर्तमान कुबेराला समजलें. नंतर एकेदिवशीं त्यानें या दोघांस एके ठिकाणीं एकमेकांच्या खांद्यावर हात टाकून गुह्य गोष्टी करीत असतां पाहिलें. तेव्हां 'पापाचारी राक्षसाची आणि याची इतकी मैत्री कशी जमली' याचें त्याला मोठें आश्चर्य वाटलें. उघडच आहे, "समानशीलव्यसनेषु सख्यम्." विरुद्धाचारी पुरुषांचें कधींही सख्य व्हावयाचें नाहीं. यावरून हा यक्षही दुराचारी असेल असें वाटल्यामुळें तत्काळ कुबेरानें—'विन्ध्याटवींत पिशाच होऊन राहशील!' असा याला शाप दिला. त्यावेळीं याच्या भावानें कुबेराच्या पायांपडून—'या शापाचा अंत कधीं होईल? तें सांगा' म्हणून प्रार्थना केली. तेव्हां कुबेरानें सांगितलें. "पार्वतीच्या शापानें मनुष्य झालेल्या पुष्पदन्तापासून, शिवानें तिला सांगितलेली विद्याधरकथा ऐकून ती जेव्हां हा माल्यवानाला समग्र सांगेल तेव्हां त्या दोघांगणांसह हा शापापासून मुक्त होईल." याप्रमाणें कुबेरानें याच्या शापाचा अंत नेमला आहे. व पुष्पदन्ताचाही शापान्त तूं तोंच ठरविला आहेस, त्याचें स्मरण कर. "याप्रमाणें मला अशी स्थिति प्राप्त होण्याचें कारण महादेवापासून मीं ऐकलें" असें बोलून तो काणभूति उगा राहिला. हें ऐकून तत्क्षणींच कात्यायनाला पूर्वजन्माचें स्मरण झालें. आणि निजलेला मनुष्य एकाएकीं जागा होतो त्याप्रमाणें होऊन—

* ब्रह्मांडरूप गोलाच्या स्वर्गलोक आणि मृत्युलोक ह्या दोन कवच्या ह्मणजे कपालें मानलीं आहेत, आणि शंकराच्या हातांत असलेलें कपाल त्यांपैकींच असून त्यांत जगाचा समावेश झाला आहे अशी एथें कल्पना केली आहे.

" तोच मी पुष्पदन्त. मजपासून ती कथा ऐक " असें बोलून सप्त-कथात्मक असा सात लक्ष ग्रंथ त्यानें त्याला सांगितला. त्या कथा ऐकून **काणभूति** अगदीं थक्क होऊन म्हणाला, " देवा! तूं साक्षात् रुद्रावतार आहेस. नाहीं तर ह्या दिव्य कथा तुजवांचून अन्य कोणाला माहित असणार ? आज तुझ्या प्रसादानें मी शापमुक्त झालों आहें. तर आतां कृपा करून तुला हा देह प्राप्त झाल्यापासून जो कांहीं वृत्तांत झाला असेल तो, जर मजसारख्यापासून गुप्त ठेवण्यासारखा नसेल तर, मला सांगून पवित्र कर." नंतर **वररुचि** त्याच्या प्रेमपाशांनीं बद्ध होत्साता आपला जन्मवृत्तान्त सांगता झाला. तो असा—

**कात्यायन** म्हणतो. " **कौशांबी** नगरींत **सोमदत्त**नामक एक विद्वान् ब्राह्मण राहत होता. त्यालाच **अग्निशिख** असेंही म्हणत असत. त्याची **वसुदत्ता**नामक सुशील स्त्री होती. ती पूर्वजन्मीं एका ऋषीची कन्या होती. तिला शापानें तें जन्म प्राप्त झालें होतें. मी **पार्वती**च्या शापानें त्या **वसुदत्ते**च्या उदरीं उत्पन्न झालों. मी अगदीं लहान असतां माझा बाप परलोकवासी झाला. जणूं काय पितरांचें ऋण फेडण्याकरितांच तो देहरक्षण करीत होता. तो मी पोटीं उत्पन्न होतांच ऋणमुक्त होऊन, ह्या दुःखद संसाराचा त्याग करून गेला. नंतर मोठ्या संकटानें माझें पालन करीत होत्साती माझी आई दिवस काढीत होती. पतिवियोगामुळें नेहमी ती अत्यंत दुःखी असे. एकंदरीनें आमच्या घरीं संपत्तीच्या बदला अठरा विश्वे दरिद्र होतें. खरेंच आहे. " उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मीः " माझा बाप शांत, उदासीन, व निर्लोभ असा होता. त्याची मला विशेषशी माहिती नव्हती; तथापि आईच्या सांगण्यावरून त्याचें वर्तन मला समजलें. जेवढें सांसारिक काम केल्यावांचून सुटका नाहीं तेवढेंच तो निरुपायास्तव करीत असे. बाकी सर्व काळ तो आत्मानात्म विचारांत निमग्न असे. त्याला द्रव्याचा अथवा इतर कसल्याच ऐहिक वस्तूचा लोभ बिलकूल नव्हता. अशाच्या

घरीं ऐश्वर्य तें कसें असेल? असें असल्यामुळें, ज्यांच्याजवळ द्रव्य नाहीं त्यांना संसारांत सुख तें कसलें मिळणार? तेव्हां हें दरिद्राचें दुसरें दुःख तिच्या पाठीस नेहमीं लागलेलेंच असे. तशांत घरीं संसार चालविणारा कोणी पुरुष नसल्यामुळें घरची व्यवस्था तिलाच पहावी लागे. त्यांतच माझीं लहानपणींचीं दुखणींबहाणीं काढतां काढतां तिला पुरे पुरे होत होतें.

अशीं एक कीं दोन, किती तिचीं दुःखें सांगूं? असें जरी होतें तरी जसजसा मी थोर होत चाललों तसतशीं तिचीं दुःखें कमी कमी होऊं लागलीं. मी लहानपणापासून तिच्या आज्ञेबाहेर कधींच वागलों नाहीं. उनाड पोरांचे खेळ मला स्वप्नांत देखील आवडत नसत. ती मला नेहमीं सदुपदेश करीत असे. मी लहानपणापासूनच एक-पाठी होतों. फार काय सांगूं? आपलें आपण वर्णन करूं नये; पण मी सांगितलें नाहीं तर तुला समजणार नाहीं, म्हणून सांगतों. माझ्या आईवर जरी दुःखांचे पर्वत कोसळले होते, तरी माझ्या गुणांनीं तिला त्यांचें ओझें वाटलें नाहीं. वरचेवर मला मांडीवर घेऊन—" बाळा! तूं नकोरे असे गुण करूं. माझी पापिणीची एखादे वेळीं तुला दृष्टभिष्ट लागेल." असें ह्मणून माझें तोंड कुरवाळून डोळ्यांत आसवें आणून— " तान्ह्या! मी मोठी हतभाग्य आहें. तुझे हे गुण माझ्या एकटीच्याच दैवीं पाहण्याचें आलें आहे," असें ह्मणून ती वरचेवर रडत असे. असो. असें होतां होतां मी सुमारें आठ वर्षांचा झालों.

इतक्यांत एकेदिवशीं दोन फिरस्ते ब्राह्मण आमच्या घरीं रात्रीं उतरावयास आले. फार दुरून आल्यामुळें त्यांचीं वस्त्रें वगैरे अत्यंत मळिण झालीं होतीं. त्यांणीं आमच्या आईजवळ रात्रीची रात्र राहण्याला जागा मागितली. आईनें परमादरपूर्वक त्यांना उतरावयास जागा दिली. त्यांचा फराळ वगैरे झाल्यावर ते आपापल्या बिछान्या-वर बसले होते. त्यांच्या प्रवासाची हकीकत विचारल्यावरून ते आईला सांगत असतां मीही तिच्याजवळ बसलों होतों. इतक्यांत

आमच्या घराशेजारीं एक नट राहात होता. त्याच्या घरीं मृदंग वाजूं लागला. तेव्हां आई मला ह्मणाली, "मुला हा तुझ्या पित्याचा बालमित्र भवनन्द नट नाचतो आहे पहा." तेव्हां मीं तिला ह्मटलें "आई तूं सांगशील तर मी पहायला जातों, आणि त्याची सर्व कृति तुला येथें करून दाखवितों." हें माझें बोलणें ऐकून त्या दोघां पांथस्थांना मोठेंच आश्चर्य वाटलें. ते ह्मणाले, "अहो! हा एवढासा लहान मुलगा असून असें अनुकरण करील तरी कसें? न जाणों करील, कोणास ठाऊक! कदाचित् हें मूल लडिवाळपणानें आईजवळ बोलत असेल; पण खरोखर याच्यानें तें काम होणें कठिण आहे." असें आपापल्यांत कुजबुजून आईला ह्मणाले, "खरेंच का हो बाई. हा तुमचा मुलगा एकपाठी का आहे?" ती ह्मणाली, "बाबानों! खोटें कशाला बोलूं? हा मुलगा तसाच आहे हो. एकवेळ कांहीं ऐकलें कीं पुरे. लगेच तें पाठ होतें याला." हें ऐकून त्यांना फारच कौतुक वाटलें. त्यांणीं आपापल्यांत बोलून माझी परीक्षा पहावी ह्मणून मजपुढें प्रातिशाख्य ह्मटलें. मी तें सर्व ऐकून घेऊन तसेंच बिनचूक ह्मणून दाखविलें. तेव्हां त्यांच्या मनाची कांहींशी खात्री झाली. नंतर आईची आज्ञा घेऊन मी व ते दोघे नाट्य पहायास गेलों. घरीं आल्यावर आईपुढें, जसें त्या भवनन्दानें केलें तसेंच हुबेहुब मीं करून दाखविलें. मग मात्र त्यांची पुरी खात्री झाली. आणि आपापल्यांत माझी फारच तारीफ करूं लागले. त्यांतल्या एकानें—"गड्या! देव करील तर आमचें एथेंच काम होईलसें वाटतें," असें ह्मणून दुसऱ्याच्या हातावर टाळी दिली. त्यावर आईनें त्यांना—"कसलें तुमचें काम? आमच्या हातून का तें व्हावयाचें आहे? गुप्त नसेल तर बाबांनो सांगा. माझ्याकडून होण्यासारखें असेल तर मी कांहीं आळस करणार नाहीं," असें ह्मटलें. तेव्हां त्यांतला व्याडी नांवाचा एक ब्राह्मण माझ्या आईला ह्मणाला, "बाई! आमची एथें येण्याची सर्व हकीकत तुह्माला सांगतों ह्मणजे सर्व कांहीं तुह्माला कळेल."

“ बाई ! वेतसनांवाच्या नगरींत **देवस्वामी** आणि **करम्भक** या नांवाचे दोघे बंधु राहत होते. त्यांची एकमेकांवर अतिशय प्रीति असे. त्यांपैकीं एकाचा पुत्र हा **इन्द्रदत्त** आणि दुसऱ्याचा मी. माझें नांव **व्याडी**. माझा बाप लहानपणींच वारला. त्याच्या शोकानें ह्या इन्द्रदत्ताचाही पिता त्याच्या भेटीस गेला. आह्मा उभयतांच्या माता, त्या दुःखानें झुरणीस लागून फारच क्षीण झाल्या. यद्यपि आमच्या घरीं द्रव्य विपुल होतें तथापि कोणी कर्ता नसल्यामुळें घरांत बरीच अनवस्था झाली. आमच्या आयांनीं आह्मास साधारण शिक्षण दिलें होतें ; पण तेवढ्यानें काय होणार ; दिवसानुदिवस आमचें वय फुकट जाऊं लागलें. तेथें आसपास कोठेंही आमच्या मनाप्रमाणें विद्याभ्यासाची सोय नव्हती. तेव्हां आमच्या मातुश्रींना आमच्या अभ्यासाची फारच काळजी लागली. एकेदिवशीं आह्मीं उभयतांनीं एका वृद्धाच्या मुखानें असें ऐकलें कीं, **कार्तिकस्वामी**ची आराधना केली तर तो विद्या देतो. त्यावरून आमचा अगदीं कृतनिश्चय झाला कीं, आतां **कार्तिकस्वामी**चें दर्शन घेऊन त्याची आराधना करावयाची. नंतर तिकडे जाण्याचा संकेत करून, आमच्या मातुश्रींकडून जरी आह्मास निरोप मिळणार नाहीं असें माहित होतें, तरी आह्मी ही गोष्ट त्यांना कळविली. त्यांणीं अनेक आढेवेढे घेतले. शेवटीं आमचा कृतसंकल्प पाहून जशी तशी एकदाची त्यांनीं परवानगी दिली. इकडे आह्मी जाण्याची तयारी अगोदरच करून ठेविली होती. त्यांचा निरोप मिळतांच ‘ पडत्या फळाची आज्ञा ’ ह्मणून तत्काल प्रस्थान केलें. घरांतून निघतेवेळीं आह्मीं उभयतांनीं आपापल्या मातेला नमस्कार केले. त्यावेळीं त्यांचे गळे दाटून आले व डोळ्यांतून खळखळां प्रेमाश्रूंचे प्रवाह सारखे वाहूं लागले. आमचीही तशीच अवस्था झाली होती. बराच वेळ झाला तरी त्या कांहीं बोलत ना व आमचेंही पाऊल पुढें पडेना. इतक्यांत लवकरच आपले डोळे पुसून—“ बाबानों ! तुह्मी जातांच काय रे आह्माला सोडून ?” असें बोलून दोघी जणी मोठ्यानें

रडूं लागल्या. तेव्हां आह्मीं आपलें मन अंमळ घट्ट करून ह्मटलें, "आई! तुह्मी रडूं नका. आह्मी जे आतां जातों आहों ते भलत्यासलत्या कामाला कांहीं जात नाहीं. विद्याभ्यासाला जात आहों. या वयांत विद्या प्राप्त झाली नाहीं तर पुढें कधींही व्हावयाची नाहीं. तुह्मीच त्या दिवशीं ह्मटलें होतें ना? "विशीं विद्या आणि तिशीं धन." तर मग आतां असें राहून काय करावें बरें? तुह्मी ह्मणाल कीं, आमच्या घरीं ईश्वरकृपेनें द्रव्याला काय कमी आहे? हें खरें आहे; पण नुसतें द्रव्य असून काय उपयोग? ज्याच्या अंगीं विद्या नाहीं तो पशूच होय. असेच आम्ही निरक्षर वाढलों तर आम्हाला अनेक वाईट छंद लागतील. जरी आतां आम्ही तुमच्या वचनाबाहेर एक पाऊल देखील टाकीत नाहीं, तरी मोठे झाल्यावर कदाचित् तुमचें ऐकणार नाहीं. इतकेंच नव्हे, तुम्हाला अगदीं ब्र काढूं देणार नाहीं. आणि मग आह्मी छंदीफंदी झालों तर घरचें द्रव्य किती दिवस पुरेल? तुह्मी अन्नाला महाग व्हाल. मग तुह्माला पश्चात्ताप होईल. बरें, कदाचित् तसें नाहीं झालें तरी आमचे वडील कसे विद्वान् होते, त्यांची लोकांत किती प्रतिष्ठा होती, आणि आह्मी असे निरक्षर राहिलों तर लोक आह्माला काय ह्मणतील! व तुह्माला तरी आमच्यामुळें कितीसा मान मिळेल! उलट तुह्माला खालींच पहावें लागेल, तर आतां आह्माला जाऊंद्या. विद्वान् होऊन परत लवकरच तुमच्या सेवेला हाजर होऊं." हें आमचें बोलणें ऐकून त्यांचें तत्काल थोडेसें समाधान झालें. आणि— "बरें तर, यावेळीं रडून तुह्माला अपशकुन तरी कां करावा? या बरें. वाटेनें जपून जा. देव तुमचे मनोरथ पूर्ण करो, आणि तुह्माला उदंड विद्या येवो; पण बाळांनो! आह्मी दोघी ह्या उदासवाण्या घरांत घटका, पळें मोजीत तुमच्या येण्याची वाट पाहत राहणार आहों याचें मात्र स्मरण असूं द्या." असें बोलून त्यांणीं आह्मास बरेंच दूरपर्यंत पोहोंचविलें, आणि मोठ्या संकटानें त्या परत गेल्या.

आह्मी आमच्या घरांतून निघालों ते थेट दक्षिणदिशेची वाट धरली. ताहान नाहीं, भूक नाहीं; ऊन नाहीं, थंडी नाहीं, आपले एकसारखे चालत होतों. विद्वान् होण्याची पोटांत मोठी उमेद होती, त्यामुळें श्रम वगैरे कांहींच वाटलें नाहीं. थोडक्याच दिवसांनीं कार्तिकस्वामीस जाऊन पोहोंचलों. तें स्थान फारच रमणीय होतें. तेथली शोभा पाहून व देवाचें दर्शन घेऊन आह्मास जणूं काय, त्यावेळींच विद्या प्राप्त झाली असें वाटलें. नंतर संकल्प करून दोघेही अनुष्ठानास बसलों. तो क्रम निर्विघ्नपणें सतत चालल्यावर थोड्याच दिवसांनीं दृष्टांत झाला कीं, "पोटलिक नांवाचें नन्दराजाचें नगर आहे. तेथें वर्ष नांवाचा ब्राह्मण आहे. त्यापासून सर्व विद्या तुह्माला प्राप्त होतील. तुह्मी तेथें चला." याप्रमाणें दृष्टांत होतांच परमानंदानें आह्मी देवाला प्रदक्षिणा घालून नमस्कार करून तडक पाटलिक[1] शहरची वाट धरली. लवकरच त्या नगराजवळ पोहोंचलों. वेशीच्या आंत जाऊन, येथें कोणी वर्षनामक पंडित राहतात काय ? ह्मणून लोकांना विचारलें. कित्येकांनीं तर 'आम्हास मुळींच माहीत नाहीं!' म्हणून सांगितलें. दुसरे म्हणाले, "होय होय, कोण, तो वर्ष का ? हँ आहे ठाऊक. तो एक वेडा आहे तोचना ? त्यालाचका वर्षपंडित म्हणतात! पण तुमचें त्याच्याजवळ काय काम आहे ?" हें ऐकून आमच्या तोंडावरचें पाणी झर्‌दिशीं उतरलें. हातपाय गळल्यासारखे झाले. आम्हीं म्हटलें, "होय. आमचें त्यांच्याच-जवळ काम आहे. आम्ही त्यांच्यापाशीं विद्याभ्यास करण्याकरितां आलों आहों." हें ऐकून मोठ्यानें हंसून ते म्हणाले, "ठीक, तुम्हाला कोणी हा उपदेश केला ? त्या वेड्याशिवाय ह्या पृथ्वीवर दुसरा कोणी गुरु तुह्माला मिळतच नाहीं काय ? बरें आहे बुवा. चला, ह्या उत्तरेकडील रस्त्यानें नीट चला म्हणजे उजव्या हाताला एक मोठें शिवाचें मंदिर लागेल त्याच्या मागच्या बाजूस एक पडकें घर आहे, त्याच्या दिवाणखान्यांत ते तुमचे

१–येथें 'पाटलिक' असें आहे तरी पुढें 'पाटलिपुत्र' या नांवानेंही या नगराचा उल्लेख येईल. दोनही एकाचींच नांवें असें समजावें.

भावी गुरूजी हवा खात बसले असतील." याप्रमाणें बोलून ते चालते झाले. इकडे आमचा अगदीं हिरमोड झाला होता. तरी—'इतके दूर आलों त्यापक्षीं आतां थोडक्याकरितां परत जाणें ठीक नाहीं. कदाचित् त्याची बाह्यात्कारें अशी वर्तणूक असेल; पण तो विद्वान् नसेल कशावरून ? कदाचित् लोक हे आमची थट्टा करीत नसतील कशावरून ? महात्मे पुरुषांची स्थिति लोकविरुद्ध असते, याविषयीं आह्मी अनेक जुन्या कथा ऐकल्या आहेत. आणि **स्वामिकार्तिक** आम्हा सेवकांना असत्य सांगेल कसें ?' याप्रकारें मनाचें समाधान करून शोध करीत करीत आह्मी त्याच्या घरीं पोहोंचलों. घर पाहिलें तों त्याचें काय वर्णन करावें ? ठिकठिकाणीं भिंती पडक्या असून, चौकट मुळींच नाहीं असा एक दरवाजा. अंगणांत पाहिलें तों मोठमोठे उकिर्डे सांचलेले जागचेजागीं पडले आहेत, त्यांवर कुतऱ्यांचीं दंपत्यें यथेच्छ क्रीडा करीत आहेत. घरांत ठिकठिकाणीं उंदरांनीं बिळें केलीं आहेत व कांहीं उभ्या असलेल्या भिंतींच्या भागांना जिकडे तिकडे मोठमोठ्या भेगा पडल्या आहेत, अशा त्या घरांत आह्मी एकदांचे प्रविष्ट झालों. आम्ही गेलों त्या वेळीं सायंकाळ झाला होता त्यामुळें घरांत जिकडे तिकडे स्वच्छ चंद्रकिरण पडलें होतें. अशा त्या चंद्रमौळी घरांत एका कोंपऱ्यामध्यें एकाग्र अंतःकरणानें ध्यान करीत बसलेले ते गुरूजी आमच्या दृष्टीस पडले. तेव्हां त्यांची ती स्थिति पाहून त्यांच्या ध्यानाला व्यत्यय न यावा म्हणून दुरूनच त्यांना नमस्कार करून उभे आहों, तों आह्मी कोणी अतिथि आला आहों असें समजून आमचा सत्कार करण्याकरितां बाहेर आलेल्या त्यांच्या पत्नीला आम्ही पाहिलें. तिकडे काय विचारतां ? आमच्या डोळ्यांचें पारणेंच फिटलें ! तें मळकटलेलें अंग. केसांला तैलादिसंस्कार नसल्यामुळें त्यांच्या जटा झालेल्या. नेसलेलें वस्त्र जणूं काय जाळीदारच आहे असें दिसणारें ! शरीरानें अत्यंत कृश. त्या वर्षगुरूच्या गुणांला लुब्ध झालेल्या केवळ दुर्गतीचाच अवतार अशी ती गुरुपत्नी आह्मी अवलोकन केली.

याप्रमाणें एकेक गोष्ट पाहून आमचें मन अगदीं उदासीन होत चाललें होतें, तरी कार्तिकस्वामीच्या वचनावर दृढ विश्वास ठेवून पुरा अनुभव घेण्याचा आम्हीं दृढ संकल्प केला होता. नंतर आम्हीं तिला नमस्कार करून आपला सर्व वृत्तांत व येण्याचा मुख्य उद्देश तिला कळविला. आणि तिची क्षमा मागून वर्षगुरूंच्या वेडेपणाच्या त्या नगरांतल्या लोकांनीं ज्या गोष्टी आह्मास सांगितल्या होत्या त्या तिला सांगितल्या आणि खरोखरच अशी स्थिति आहे काय? ह्मणून प्रश्न केला. आमचें सर्व भाषण ऐकून घेऊन गुरुपत्नी म्हणाली, "बाबांनों, तुम्हाला फार श्रम झाले असतील, आधीं हें पाणी घ्या. येथें बसून क्षणभर विश्रांति घ्या. आणि मग मी तुम्हाला सर्व सांगेन." याप्रमाणें बोलून ती आंत गेली. आम्हीही पाणी घेऊन हातपाय धुतले. अंमळ विश्रांति घेतली. इतक्यांत ती बाहेर आली, आणि आम्हास म्हणाली, "बाळांनों, तुम्ही कोणही असा. विद्यार्थी आहों असें म्हणतां तेव्हां तुह्मी माझ्या पुत्रासारखे आहां. तुमच्याजवळ सांगण्याला मला कांहीं लाज वाटत नाहीं. मी इत्थंभूत कथा सांगतें ती ऐका. ह्मणजे तुमची शंका फिटेल.

ह्या नगरांत पूर्वीं शंकरस्वामीनामक एक मोठा विद्वान् ब्राह्मण होता. त्याला माझा भर्ता आणि उपवर्ष असे दोन पुत्र झाले. हा माझा भर्ता मूर्ख आणि दरिद्रि व याचा भाऊ याच्या अगदीं उलट ह्मणजे शाहणा आणि श्रीमान् असा होता. त्यानें आपल्या घरची संसारसंबंधी सर्व व्यवस्था आपल्या बायकोवर ह्मणजे माझ्या जावेवर सोंपविली होती. एके दिवशीं एक मोठा चमत्कार झाला, तो असा,—या नगरांतील स्त्रियांची अशी एक चमत्कारिक व निंद्य चाल आहे कीं, पिठांत गूळ घालून त्याचे कांहीं विचित्र आकाराचे पदार्थ करून ते एखाद्या मूर्ख ब्राह्मणाला दान द्यावयाचे. हें दान पावसाळा, हिंवाळा आणि उन्हाळा यांत दिलें तर अनुक्रमें—क्लेश, श्रम आणि पीडा, यांचा परिहार होतो, असा त्यांचा समज आहे. तेंच दान आमच्या जाऊबाईनीं यांना ( वर्षाचार्याला ) दिलें. हीं स्वारी

तें घेऊन मोठ्या आनंदानें घरीं येऊन मला दाखवूं लागली. तें पाहून माझ्या पायांची तिडीक कपाळाला गेली. यांचें नेहमींचेंच वर्तन वेडगळ होतें; तरी पण त्याविषयीं मी कधीं खेद मानिला नाहीं. कारण आमचें पूर्वदत्तच तसें होतें. आतां त्याबद्दल खेद करून उपयोग काय? 'पदरीं पडलें आणि पवित्र झालें' असें समजून मी अगदीं चकार शब्द काढीत नव्हतें; पण त्या दिवशीं हा सगळा विचार एकीकडेसच राहिला. माझें तोंड सुटलें. त्या रागांच्या भरांत मी त्या जावेला शिव्यांची एक लाखोली वाहिली असेल. आणि यांनां काय बोललें त्यांचें तर आतां उच्चारण देखील करूं नये. दुसऱ्या एखादीनें तें दान दिलें असतें आणि यांणीं घेतलें असतें तर मला इतकें वाईट वाटलें नसतें; पण माझ्या प्रत्यक्ष जावेनें तें दिलें ह्मणून माझ्या नाकाला चुनाच लावल्यासारखें झालें. तें दान मूर्खालाच द्यावयाचें, ह्मणून तें देऊन—माझा नवरा मूर्ख, असें शिक्यामोर्तबानिशींच जणूं काय तिनें ठरविलें. आमच्या घरांत तर कधींही राग यायचा नाहीं. पण त्या दिवशीं मात्र यांनां अतिशय संताप आला, आणि आपल्या मूर्खपणाबद्दल पश्चात्ताप होऊन त्यासरसें स्वारीनें तडक **स्वामिकार्तिकाचा** रस्ता धरला. मी त्यावेळीं, कुठें जातां? वगैरे कांहींच विचारलें नाहीं. नंतर तेथें जाऊन उग्र तप केल्यावर तो **भगवान्** प्रसन्न झाला, आणि त्यानें यांना सर्व विद्या दिल्या, आणि सांगितलें कीं, एकवार ऐकून धारण करणाऱ्या शिष्याला ह्या पढीव. नंतर परत येऊन हा सर्व वृत्तांत यांणीं मला सांगितला. मला मोठाच आनंद झाला. आणि मीं ह्मटलें, जाऊबाईनें हा आह्मावर उपकारच केला. त्या दिवसापासून स्वारी (वर्ष) नित्य जपध्यानांत निमग्न असते. याकरितां तुह्मी अध्ययन करावयाला आलां हें फार चांगलें झालें. तुम्हाला विद्याभ्यास कर्तव्य असेल तर, कोणी तरी एकपाठी सहाध्यायी शोधून आणा, ह्मणजे तुमचें सर्व कार्य होईल. याविषयीं तिळमात्र संशय धरूं नका."

याप्रमाणें तिचें भाषण श्रवण करून आह्माला बरेंच समाधान वाटलें. आणि कोणी तरी एकपाठी सहाध्यायी मिळवून आणण्याचा आम्हीं निश्चय केला. त्यावेळीं आम्हास क्षुधा फार लागली होती. त्यांच्या घरांत तर आनंदच होता, पण आमच्या कंबरेला मोहरांच्या पिशव्या होत्या, त्यांतून शंभर मोहरा आह्मी तिला दिल्या. तिला आजन्मांत कधीं इतकें द्रव्य मिळालें नव्हतें. यामुळें तें पाहतांच तिला जो आनंद झाला तो तिच्या पोटांत मावेना. मग त्यांतली एक मोहोर मोडून तिनें सर्व शिधासामग्री आणविली आणि आम्हांस यथेच्छ भोजन दिलें. इतक्या गोष्टी झाल्या; पण गुरूजींनीं नुस्ते डोळे उघडून देखील आह्माकडे पाहिलें नाहीं. आह्मी आंवशीसच तिचा निरोप घेतला होता, म्हणून पहाट होतांच उठून बाहेर चालते झालों. कोणी तरी एकपाठी सहाध्यायी मिळेल या आशेनें सर्व देश धुंडाळतां धुंडाळतां आज एथें आलों. आज आमच्या श्रमाचें फळ मिळण्याची आशा आहे; पण ती पूर्ण करणें सर्वथा तुमचे हातीं आहे. तुमचा हा मुलगा एकपाठी आहे याविषयीं आम्ही आपल्या मनाची पूर्ण खात्री करून घेतली आहे. यासाठीं जर कृपा करून याला आमच्या बरोबर पाठवाल तर आमचें कार्य होईल, आणि तुमचाही मुलगा विद्वान् होईल."

याप्रकारें व्याडीनें सांगितलेलें वर्तमान ऐकून माझी आई आदरपूर्वक त्यांना म्हणाली, " हें सर्व ठीक आहे. तुमच्या बोलण्याचा मला यापर्वींच प्रत्यय आला आहे. हा अगदीं लहान असतां याचा बाप वारला, त्यामुळें मला मोठी काळजी लागली होती. एके दिवशीं रात्रीं मी चिंता करीत अंथरुणावर पडलें होतें, इतक्यांत कोठें अंमळ डोळा लागला, आणि एक घटका लोटली न लोटली तों मला स्वप्न पडलें. एक वृद्ध ब्राह्मण येऊन त्याणें " बाई, तूं काळजी करूं नको. हा तुझा मुलगा एकपाठी होईल. वर्षनामक ब्राह्मणापासून याला विद्या प्राप्त होईल, आणखीं हा व्याकरणशास्त्राची लोकांत स्थापना करील. याला जें ह्मणून

सर्वांत उत्तम असेल तेंच आवडेल, याकरितां लोक याला **वररुचि** म्हणतील. खरोखर हा तुझें दैव काढील," असें सांगून तो नाहींसा झाला, आणि मीही जागी झालें. दुसरे दिवशीं सकाळीं मी **ईश्वरदत्त**-नामक एक ज्योतिषी आमच्या गांवांत होता, तो शकुन-प्रश्न सांगत असे, व त्याचा बहुतकरून ठोकताळा येत असे; ह्मणून त्याच्या घरीं जाऊन त्याला हें स्वप्न सांगितलें. त्याणें "याचें उत्तम फळ आहे, व तुह्मी कांहीं काळजी करूं नका," असें सांगितलें. त्याचा मला बराच प्रत्यय यापूर्वी आला आहे. आतां तर पुर्ताच आला. हा मुलगा जसजसा वाढूं लागला तसतसें माझें दुःख कमी होत गेलें; पण **वर्षब्राह्मणाची** गांठ कशी पडेल ही मला मोठी काळजी लागली होती. आज तुमच्या मुखांतून ही कथा ऐकून मला फार संतोष झाला. याकरितां मी मोठ्या आनंदानें सांगतें कीं, हा **वररुची** तुमचा एक बंधूच आहे असें समजा, आणि याला खुशाल बरोबर घेऊन चला. मात्र याला नीट जपा म्हणजे झालें."

हें माझ्या आईचें भाषण ऐकून त्या दोघांच्या पोटांत हर्ष मावेनासा झाला. आणि त्यामुळें त्यांना ती रात्र एका क्षणासारखी वाटली. सूर्योदय होतांच, व्याडीनें आमच्या घरची ती दरिद्रावस्था पूर्वी पाहिलीच होती, ह्मणून आमच्या आईच्या संतोषार्थ आपल्या जवळचें बरेंच द्रव्य तिला दिलें. त्याचवेळीं आमचा निघण्याचा बेत होता; पण आमच्या आई-च्या आग्रहास्तव त्या दिवशीं त्यांनीं मुक्काम केला. कसा तरी तो दिवस घालवून रात्रीं पुनः इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्या. त्या दिवसरात्रींत सुमारें शंभर वेळां तरी आमच्या आईनें—"बाबांनो ! याला नीट जपा हो. तुमच्या हवालीं केला आहे. याच्यावर काय तो माझा टकळा. हा नसता तर दुःखाग्नीनें माझें शरीर केव्हांच जळून गेलें असतें," असें सांगितलें असेल. मला तर वरचेवर पोटाशीं धरून—"बाळा ! आतां उद्यां तूं जाणार. तुला मी नको ह्मणत नाहीं, आणि तुला विशेष सांगितलें पाहिजे असेंही नाहीं; पण जळलें आईचें आंतडें उगीच राहायचें नाहीं.

इकडे बघ. तूं यांच्या सल्ल्यानें वाग. गुरूची प्रेमानें सेवा कर. मला मानतोस त्याहीपेक्षां गुरुपत्नीला अधिक मान. कोणाशीं वाद करूं नको. कोणाचा पाडाव करूं नको. विद्यासमुद्राच्या परपाराला जा, आणि मी तुझी आई रात्रंदिवस तुझें चिंतन करीत येथें आहें इचें स्मरण ठेव. गुरूची आज्ञा होतांच मला भेट दे, आणि मग कोठें दिग्विजयाला जाणार तर जा," याप्रमाणें वरचेवर तिनें बोध केला. नंतर अरुणोदय होतांच व्याडि आणि इंद्रदत्त दोघेही उठून सर्व प्रातःकृत्य आटपून जाण्याला तयार झाले. माझीही पूर्वीं तयारी झालीच होती. आम्ही तिघेही निघण्याला तयार झालों. मी आईला नमस्कार केला. आईचा गळा दाटून आला. डोळ्यांतन प्रेमाश्रु वाहूं लागले. परंतु जसे तसे ते सांवरून धरून—"बाळा, येतोस? ये बरें. देव तुझे मनोरथ पूर्ण करो!" असें बोलून तिनें आम्हाला निरोप दिला. तिघेही आम्ही मोठ्या आनंदानें मार्ग क्रमीत क्रमीत वर्षोपाध्यायाच्या घरीं येऊन पोहोंचलों. तेव्हांही गुरुजी ध्यानस्थच होते. त्यांना नमस्कार करून आम्ही उभे आहों, इतक्यांत गुरुपत्नी बाहेर आली. तिलाही आम्ही नमस्कार केला. तेव्हां तिनें व्याडी आणि इन्द्रदत्त यांना म्हटलें, "बाबानों, आलां तुम्ही. तुह्मां दोघांला मी ओळखलें. आणि हा अनोळखी दिसतो आहे हाच का तो एकपाठी?" तेव्हां व्याडीनें माझी सर्व हकीकत तिला सांगितली. नंतर तिनें आपल्या पतीला आम्हा तिघांचा हेतु कळविला. तेव्हां मला पाहून वर्षमुनीला परम संतोष झाला. त्यानें मला साक्षात् स्कंदाचा मूर्तिमान् प्रसादच आहे असें मानलें.

नंतर दुसऱ्या दिवशीं आमचे गुरूजी प्रातःकृत्य आटपून शुद्धभूमीवर आह्मास पुढें घेऊन बसले, आणि दिव्य वाणीनें प्रथम त्यांनीं ओंकाराचा उच्चार केला. तो करतांच तत्काल सर्व सांग वेद त्यांना उपस्थित झाले. नंतर आह्माला पढविण्यास त्यांनीं आरंभ केला. ते जो पाठ सांगत तो एकदा ऐकल्यानें मला, दोन वेळां ऐकल्यानें व्याडीला आणि तीन वेळां ऐकल्यानें इंद्रदत्ताला पाठ होऊं लागला. याप्रमाणें आह्मी एकपाठी,

दुपाठी आणि तिपाठी असे होतों. वर्ष हा अगदीं वेडा आहे असें सर्व लोक समजत असत. त्याला कांहीं तरी येतें असें त्या नगरांतल्या एकाही मनुष्याला माहीत नव्हतें, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. तेव्हां आमच्या अध्ययनाचा तो ध्वनि श्रवण करून आसपासचे ब्राह्मण विस्मयाविष्ट होत्साते वर्ष ब्राह्मणाच्या घरीं येऊन पाहूं लागले, तों हा आह्मा तिघांना अध्ययन सांगत आहे, व ते एक वेळ, दोन वेळ आणि तीन वेळ ऐकून पाठ करीत आहेत असें त्यांच्या दृष्टीस पडलें! तेव्हां मग काय विचारतां ते त्याची फारच स्तुति करूं लागले. कित्येक तर—"याची योग्यता आह्मास आजपर्यंत कळली नाहीं, आह्मी याला वेडा समजून विनाकारण याची थट्टा करीत होतों, ही मोठी चूक झाली. हा तर साक्षात् वेदोनारायणच आहे." असें बोलून वारंवार त्याला नमस्कार करून क्षमा मागूं लागले. तसाच वर्षगुरूचा कनिष्ठ बंधु उपवर्ष याला हें वर्तमान समजलें, तेव्हां तो प्रत्यक्ष तेथें येऊन त्याची ती विद्वत्ता पाहून फार चकित झाला. फार काय सांगावें? त्या नगरांतल्या सर्व लोकांस तो मोठा उत्सवच झाला. हें वर्तमान त्या नगरचा राजा नन्द याला समजलें. वर्ष हा वेडा आहे हें पूर्वींच त्याला ऐकून माहित होतें. सांप्रत हा चमत्कार ऐकून त्यानें तो प्रत्यक्ष पाहिला तेव्हां, कार्तिकस्वामीच्या प्रसादाचें हें फळ आहे, असें समजून त्याला फार आनंद झाला. आजपर्यंत वर्षमुनीचें स्वरूप आपणाला समजलें नाहीं, व त्याचा आपल्याकडून कांहीं सत्कार झाला नाहीं याबद्दल त्याला फार खेद झाला आणि त्यानें त्याची क्षमा मागितली. नंतर आपल्या खजान्चीला हुकूम करून वर्षोपाध्यायाचें घर द्रव्यानें भरून टाकलें.

एके दिवशीं आमचा स्वाध्याय आटपला आणि वर्षोपाध्याय आपलें आह्निक सर्व आटपून बसले होते. त्यावेळीं आह्मीं त्यांना हें नगर सरस्वती आणि लक्ष्मी या दोघींचेंही माहेरघर कसें झालें, तें आह्माला सांगा असा प्रश्न केला. तेव्हां त्यांणीं त्याविषयीं एक चमत्कारिक कथा आह्माला सांगितली ती सांगतों. ती कथा अशी.—

गंगाद्वारीं कनखल या नांवाचें एक पवित्र तीर्थ आहे. तेथें ऐरावतानें उशीनरनामक पर्वताचें शिखर फोडून त्यापासून गंगादेवीचा प्रवाह कांचनेपातमार्गानें खालीं आणिला. तेथें दक्षिण देशांतला कोणी एक ब्राह्मण आपल्या स्त्रीसह तप करीत होता. त्याला त्याच क्षेत्रांत राहत असतां तीन पुत्र झाले. कांहीं कालानें तो ब्राह्मण तप करून थकला, आणि आतां त्याचें फल उपभोगावें असा संकल्प करून स्त्रियेसह परलोकास गेला. त्याच्या पुत्रांनीं यथाविधि मातापितरांचें और्ध्वदेहिक करून व्यर्थ कालक्षेप न करतां कांहीं विद्याभ्यास करावा, असा निश्चय केला; पण त्या क्षेत्रांत त्यांना कोणी गुरु भेटला नाहीं; ह्मणून राजगृहनामक नगरास जाऊन तेथें त्यांनीं मोठी विद्या संपादन केली. लहानपणींच बाप मेल्यामुळें त्यांचें पालन-पोषण करणारें काळजीचें कोणी नव्हतें. घरदार, वृत्ती वगैरे कांहीं नसल्यामुळें निर्वाहाचें साधनही कांहीं नव्हतें. ह्मणून स्वामिकार्तिकाची आराधना करून कोणी तरी यजमान मिळवावा ह्मणजे चरितार्थाची दगदग चुकेल, असा हेतु धरून त्यांणीं तडक दक्षिणदिशेचा मार्ग धरला. जातां जातां वाटेंत समुद्रकांठीं चंचिनी नांवाची नगरी होती, तेथें जाऊन भोजिकनांवाच्या एका ब्राह्मणाच्या घरीं ते उतरले. यांचें शील, विद्या, वगैरे पाहून भोजिकाला यांच्याविषयीं थोडें प्रेम उत्पन्न झालें. तो घरचा मोठा सधन होता; पण

१—कांचनपात—हें गंगेचा प्रवाह जेथून लोकांनां दिसतो त्या प्रदेशाचें नांव आहे.

२—बौद्ध व जैन लोकांच्या ग्रंथांवरून मगधदेशाची ( सांप्रतच्या बहार प्रांताची) प्राचीन राजधानी जी पाटलिपुत्रनगरी तिलाच पूर्वी 'राजगृह' असें ह्मणत असत असें कित्येक ठिकाणीं आढळतें. हरिवंशांत जरासंधाला राजगृहेश्वर ह्मटलें आहे. पांचाल (पंजाब) देशांत कपूरथळयाच्या जवळ 'राजघर' नांवाचें एक गांव आहे. तें प्राचीनकाळीं राजधानीचें शहर होतें असें इतिहासावरून दिसतें. याशिवाय कल्हणाच्या राजतरंगिणींत राजगृह या नांवाच्या शहराचा पुष्कळ ठिकाणीं उल्लेख झाला आहे. वरील तीनही ठिकाणें राजधानीचीं शहरें असल्यामुळें तेथें विद्वान् लोक असण्याचा संभव आहे; पण मूळांत ज्याचा उल्लेख आला आहे तें राजगृह वरील तिहींपैकीं कोणतें? किंवा त्याहून निराळेंच आहे याचा निर्णय करण्यास साधन नाहीं.

त्याला एकावर एक तीन मुलीच झाल्या होत्या. आपणास पुत्र व्हावा ह्मणून त्यानें पुष्कळ दान, धर्म, देव-देवसकी केली. तथापि पुत्रसंतान होईना; त्यामुळें तो फार खिन्न होता. या मुलांचा जन्मवृत्तांत त्यानें विचारिल्यावरून त्यांणीं सांगितलें कीं, "आमच्याही बापाला पुत्रसंतान नव्हतें, ह्मणून कनखल[1]नामक क्षेत्रांत जाऊन त्यानें तप केलें. तेव्हां आह्मी तिघे पुत्र त्याला झालों." हें वर्तमान ऐकून भोजिकानें विचार केला कीं, 'आपल्या ह्या मुली विवाहाला योग्य झाल्या आहेत. आणि हे तिघेही मुलगे सुशील, सत्कुलीन व गुणवान् असे आहेत. तेव्हां यांना ह्या मुली द्याव्या, ह्मणजे हे घरजांवई होऊन राहतील.' याप्रमाणें विचार करून त्यानें त्या तिघांना तीन मुली देऊन बरेंच द्रव्यही दिलें, आणि त्यांना आपल्या घरीं राहण्यास सांगून आपण गंगाद्वारीं[2] तपश्चर्या करण्याकरितां गेला.

हा अकल्पित मोठा लाभ झाल्यामुळें त्या तिघांना विलक्षण आनंद झाला. 'स्वामिकार्तिकाला दया येऊन त्याणें मार्गांतच आमचें काम केलें. आम्ही प्रथम केवळ द्रव्यच इच्छीत होतों; पण त्या दयाळु परमेश्वरानें द्रव्य, स्त्रिया, घर हीं सर्वच एकदम दिलीं. काय त्याचा हा प्रसाद!' असें नेहेमीं त्यांच्या मनांत येत असे. याप्रमाणें आनंदानें ते तिघेही आपल्या सासऱ्याच्या घरीं राहत असतां त्यांच्यावर एक मोठें संकट ओढवलें. तें कोणचें ह्मणशील तर दुष्काळ, हें होय. त्या देशांत फार दिवस पर्जन्य पडला नाहीं. सर्व देशांत जिकडे तिकडे हाहाकार झाला. अन्नपाणी मिळेना, यामुळें लोक पटापट मरूं लागले. त्या देशाच्या राजानें दुष्काळनिवारणार्थ अनेक उपाय केले; पण कांहीं इलाज चालेना. एकसारखा १२ वर्षें तो दुष्काळ होता. अशा समयीं राजानें तरी काय करावें? माणसाला

---

१—कनखल हें हिमालयाच्या [illegible] उतरणीवर आहे. धर्मशास्त्रांत या क्षेत्राला फार पवित्र मानलें आहे.

२—हें ठिकाण हिमाद्रीच्या चढणीवर आहे. बर्फानें आच्छादित असलेला प्रवाह येथें उदकरूपानें स्पष्ट दिसतो, ह्मणून याला गंगाद्वार, गंगेचें बर्फांतून बाहेर पडण्याचें दार, असें ह्मणतात.

माणसानें खाण्याचा प्रसंग आला. स्वतः राजालादेखील केव्हां केव्हां थंडा फराळ करावा लागत असे! अस्तु. अशा त्या भयंकर प्रसंगीं त्या तिघांनीं होईल तोंवर आंपल्या कुटुंबाचें पोषण केलें; पण शेवटीं त्यांचा अगदीं निरुपाय झाला. त्यांच्या घरीं द्रव्य विपुल होतें; पण त्याचा उपयोग काय? धान्य मिळेल तर सगळ्या गोष्टी. साठविलेलें धान्य सरत आलें. 'लवकरच आपली व घरच्या माणसांची उपासमार होऊं लागणार; तेव्हां आतां घरीं राहून त्यांचे हाल पहात बसावें त्यापेक्षां देशांतरास जावें हें बरें. आह्मी गेलों ह्मणजे आमच्याकरतां खर्च होत असलेलें धान्य बचेल व त्यानें घरच्या माणसांचा अधिक दिवस गुजारा होईल,' असा विचार करून ते घरदार टाकून देशांतरास निघून गेले. त्यांच्या जाण्याचा हेतु वरकांतीं वाईट दिसण्यासारखा नव्हता तरी मनांतून ते कुटुंबाविषयीं स्नेहशून्य होते. अशा भयंकर प्रसंगीं त्यांणीं बायकांला अनाथ करावयाचें नव्हतें. जातेवेळीं त्यांनीं आपल्या स्त्रियांना समागमें घेतलें नाहीं तर नाहीं; पण निदान त्यांनां सांगून तरी जायचें होतें; पण तसें कांहीं न करतां कोणास नकळत ते चालते झाले. खरेंच आहे, क्रूर मनुष्याला आप्तांची काळजी कोठून असणार? ते गेल्यावर त्यांच्या बायकांनीं बहुत शोध केला; पण कोठें थांग लागला नाहीं. ते गेले त्यावेळीं तिघींतून मधली बहीण गरोदर होती. तिची बाळंत होण्याची संधी अगदीं जवळ आली. सुबत्तेच्यावेळीं हा प्रसंग आला असता तर त्यांनीं मोठा उत्सव केला असता; पण यावेळीं त्यांना त्याचें उलट दुःख मात्र झालें. "सर्वारम्भास्तण्डुलाः प्रस्थमूलाः" हें सर्वांस सारखेंच लागू आहे.

याप्रमाणें त्या अनाथ झालेल्या स्त्रिया मोठ्याच संकटांत पडल्या. इतक्यांत त्या गांवांत त्यांच्या बापाचा परम मित्र **यज्ञदत्त**नांवाचा एक ब्राह्मण होता, त्याला तें वर्तमान समजल्यावरून तो त्यांच्या समाचाराला आला. त्याला पाहून या तिघींनां परम आनंद झाला. त्याणें आपल्या घरीं त्यांस राहण्यास नेलें. तेथें मोठ्या संकटानें दिवस काढीत

असतां रात्रंदिवस आपल्या पतींचा शोध कसा लागेल ही त्यांस काळजी लागली होती. खरेंच आहे, आपत्काल प्राप्त झाला तरी कुलस्त्रिया पातिव्रत्याचा त्याग करीत नाहींत. थोड्याच दिवसांनीं त्या गर्भिणीला ९ महिने पूर्ण होऊन पुत्र झाला. तशा दुःखद स्थितींतही त्या पुत्राचें जन्म, त्यांना पतिवियोगदुःखाचा विसर पडण्यास साधन झालें. तिघींचेंही त्या बालकार अतिशय प्रेम जडत चाललें. एकेदिवशीं आकाशमार्गानें महादेव विहार करीत असतां त्याच्या मांडीवर बसलेली पार्वती त्या अर्भकाला पाहून महादेवाला म्हणाली, "देवा! पहा. ह्या तिघीही स्त्रिया तें लहान बालक आपला योगक्षेम चालवील अशी आशा धरून कसातरी जीव धारण करून बसल्या आहेत, तर आपण त्या दीनांची आशा सफल होण्याकरितां ह्या मुलावर अनुग्रह करा." हें पार्वतीचें भाषण ऐकून महादेव ह्मणाले, "होय, मी याच्यावर अनुग्रह करतों. यानें पूर्वजन्मीं स्त्रीसहवर्तमान माझी फार आराधना केली आहे. त्या सेवेच्या फलाचा उपभोग घेण्याकरितांच सांप्रत याला हें जन्म दिलें आहे. आणि याची पत्नी पाटली यानांवानें महेन्द्रवर्मानामक राजाची कन्या झाली आहे. तिचा योग्यकालीं याच्याशीं विवाह होईल." असें सांगून त्या तिघी पतिव्रतांना स्वप्नांत दृष्टांत दिला कीं, "हे साध्वींनो, हा तुमचा मुलगा तुमच्या सर्व दुःखांचा परिहार करील. याला "पुत्रक" हेंच प्रसिद्ध नांव होईल. प्रतिदिवशीं हा निजून उठतांच याच्या उशाकडे एक लक्ष रुपयांचें सुवर्ण मिळत जाईल. आणि कांहीं दिवसांनीं हा राजा होईल." दुसरे दिवशीं सकाळीं त्या स्त्रिया निजून उठून पहातात तों मुलाच्या उशागतीं सोन्याचा गोळा दृष्टीस पडला! तो पहातांच त्यांच्या आनंदास पारावार नाहींसा झाला. त्यांना आपली आशा फलद्रुप झाली असें वाटलें. मग लवकरच देशांत वृष्टी होऊन सुबत्ता झाली व तो मुलगाही लहानाचा थोर होऊन महादेवाच्या प्रसादानें प्राप्त झालेल्या त्या अपरिमित द्रव्याच्या मदतीनें तो पुत्रक, तेथील राजा झाला

एकेदिवशीं एकांतीं यज्ञदत्त पुत्रकाला म्हणाला, "राजा! दुर्भिक्ष पडल्यामुळें त्रासानें तुझे पितर कोठें तरी पोट भरण्याकरितां निघून गेले आहेत. त्यांचा अद्यापि कांहींच पत्ता नाहीं. तर तूं अन्नछत्र, पाणपोई, इत्यादि धर्मकृत्यें सुरू कर, ह्मणजे तुझी कीर्ति ऐकून कदाचित् ते तेथें आले तर येतील. याविषयीं तुला ब्रह्मदत्त राजाची कथा सांगतों तिकडे लक्ष्य दे.

वाराणसीनगरींत पूर्वी ब्रह्मदत्तनांवाचा राजा राज्य करीत होता. त्यानें एकेदिवशीं रात्रौ आकाशमार्गानें जाणारे दोन राजहंस पक्षी पाहिले. सोन्यासारखे त्यांचे पंख झळकत होते आणि शेकडों राजहंस त्यांच्या आसमंतात् भागीं फिरत होते. त्यांच्या पंखांची कांती विद्युल्लतेप्रमाणें आकाशांत चमकत होती. एकवेळ झालेल्या दर्शनानें तृप्ति न होतां, ब्रह्मदत्ताला पुनः त्यांचें दर्शन व्हावें अशी फारच उत्कंठा लागली. तो इतर सर्व सौख्यांचा त्याग करून रात्रंदिवस त्यांना पाहण्याचा ध्यास घेऊन बसला. मग प्रधानादिकांसह विचार करून त्यानें एक सरोवर तयार केलें आणि तेथें सर्व प्राण्यांना कोणत्याही प्रकारचा उपद्रव होऊं नये अशी व्यवस्था केली. कांहीं कालानें ते हंसही सहज तेथें आले. त्यांना पाहून राजाचा हेतु पूर्ण झाला. नंतर त्यांनां विश्वास उत्पन्न करून राजानें त्यांचीं शरीरें सोन्याचीं कशीं झालीं म्हणून प्रश्न केला. तेव्हां स्पष्टवाणीनें ते राजास म्हणाले, "हे राजा, पूर्वजन्मीं आम्ही उभयतांही कावळे होतों. एकेदिवशीं भक्ष्याकरितां आम्ही दोघे भांडत असतां एका पवित्र शिवालयावर पडून मरण पावलों. त्या योगानें आम्हास हंसकुलांत जन्म मिळाले. आणि आमचे देह सुवर्णमय होऊन पूर्वजन्माचें स्मरणही आह्मास राहिलें आहे." हें ऐकून राजाला फार आनंद झाला. ह्मणून मीं म्हणतों कीं, तूं दानधर्म करण्याचें सुरू कर, ह्मणजे कदाचित् तुझे पितर तुला भेटतील." याप्रमाणें यज्ञदत्ताचें भाषण ऐकून पुत्रकानें अन्नछत्रें, पाणपोया, इत्यादि अनेक धर्मकृत्यें आरंभिलीं. ती वार्ता ऐकून देशदेशांतरचे याचक लोक

तेथें येऊं लागले. त्यांबरोबर ते ब्राह्मण ह्मणजे, पुत्रकाचा बाप व चुलते हे कांहीं कालानें तेथें आले. छत्रांत वगैरे येणाऱ्या प्रत्येक मनुष्याची, राजा पुत्रक स्वतः चवकशी करीत असे. यामुळें जेव्हां ते ब्राह्मण आले तेव्हां त्यांची आणि पुत्रक राजाची ओळख पटून उभयतांचें नातें परस्परांला कळलें. कांहीं ध्यानीं मनीं नसतां आपणास मोठें ऐश्वर्य व पुत्र आणि स्त्रिया यांचा लाभ झाल्यामुळें त्या ब्राह्मणांस फार आनंद झाला.

अविवेकी पुरुषांस अनेक अपत्ति येऊन कितीही अनुभव आला असला तथापि त्यांचा मूळचा दुष्ट स्वभाव जात नाहीं. हीच स्थिति त्या ब्राह्मणांची झाली. ईश्वरकृपेनें उत्तम राजोपभोग त्यांना मिळूं लागले. फक्त राज्यकारभार मात्र त्यांच्या हातीं नव्हता. बाकी ते प्रतिराजेच बनले होते. पण तितक्यानें तृप्ती कशी होणार? पुत्रवध करण्याचा प्रयत्न करून दुष्टपणाची कमाल करून दाखविण्याचें व राज्यभ्रष्ट होऊन पूर्ववत् भिक्षा मागावयाचें त्यांच्या नशीबीं होतें तें कसें चुकणार! शेवटीं पुत्रकराजास मारून आपण राज्य करावें असा दुष्ट हेतु मनांत धरून ते पुत्रकाला विंध्यनिवासिनी देवीच्या दर्शनाकरितां घेऊन गेले. देवीच्या गाभाऱ्यांत मारेकऱ्यांस पूर्वींच बसविलें होतें. बाप व चुलते पुत्रकाला ह्मणाले, "प्रथम तूं एकटाच जाऊन देवीचें दर्शन घे." राजाच्या मनांत कांहीं पाप आलें नव्हतें. तो निःशंकपणें गाभाऱ्यांत गेला. त्याला पाहतांच मारेकऱ्यांनीं त्याच्यावर एकदम हल्ला केला. तेव्हां "मला कां मारतां?" असें पुत्रकानें त्यांस विचारिलें. ते ह्मणाले, "द्रव्य देऊन तुझ्या पितरांनीं, तुला मारावें असें आह्मास सांगितलें आहे." पुत्रकानें विचार केला कीं, 'यांना आपणही जर पुष्कळ द्रव्य दिलें तर यांची बुद्धि फिरेल.' नंतर तो त्यांस ह्मणाला, "मला मारूं नका. हे घ्या मी येथें तुह्माला अमूल्य रत्नांचे अलंकार देतों. तुह्माला भिण्याचें कांहीं कारण नाहीं; कारण मी येथें मुळींच राहत नाहीं. गुप्तरूपानें दूरदेशीं निघून जातों. मला माराल तर तुह्माला विशेष कांहीं लाभ व्हायचा नाहीं; यासाठीं मजवर दया करा आणि मला

सोडून द्या." हें ऐकून त्यांनीं आपसांत विचार केला आणि पुत्रकाला मुका-ट्यानें निघून जाण्यास सांगितलें. तो गेल्यावर मारेकऱ्यांनीं त्याच्या पितरां-जवळ जाऊन पुत्रकाला मारिलें असें खोटेंच वर्तमान सांगितलें. याप्रमाणें त्या दुष्ट ब्राह्मणांनीं पुत्रकाचें राज्य हिसकावून घेतलें; परंतु प्रधान मंडळीला संशय आल्यावरून त्यांणीं त्या पुत्रद्रोही ब्राह्मणांस पदच्युत करून तेथून हांकून लाविलें. उघडच आहे, कृतघ्नांचें कल्याण कदापि व्हायचें नाहीं!

इकडे मारेकऱ्यांच्या हातून सुटलेला पुत्रकराजा निःस्पृह होऊन विंध्य-पर्वताच्या भयंकर अरण्यांत गेला. त्याला आपले आप्त, इष्ट, मित्र, बंधु व राज्य इत्यादिकांची अगदी विस्मृति पडली. विरक्त होऊन त्या अरण्यांत यथेच्छ संचार करीत असतां एकेसमयीं, बाहुयुद्ध करण्यास सिद्ध झालेले असे दोघे पुरुष त्याच्या दृष्टीस पडले. त्यांच्याजवळ जाऊन "आपण कोण अहां?" ह्मणून त्याणें त्यांस विचारिलें. ते ह्मणाले, "बाबा, आम्ही मया-सुराचे पुत्र आहों. आमच्या पित्यानें संपादन केलेल्या मालमत्तेबद्दल आमचें भांडण चाललें आहे. ती मालमत्ता काय म्हणशील तर, हा तांब्या, ही काठी, आणि ह्या पादुका. या पितृसंपादित वस्तूंचे समान विभाग करतां येत नाहींत ह्मणून जो जिंतल त्याणें ह्या घ्याव्या, असा संकेत करून आह्मी बाहुयुद्ध करीत आहों." हें त्यांचें वचन ऐकून पुत्रकाला हसूं आलें. तो ह्मणाला, "अंः, ही कितीशी मालमत्ता आहे? एवढ्याकरितां लढण्यांत काय हांशील आहे?" तेव्हां ते ह्मणाले, "अरे भल्या गृहस्था, तुला या वस्तूंची खरी योग्यता माहीत नाहीं, ह्मणून तूं असें ह्मणतोस. या पादुका पायांत घातल्या तर आकाशांत अथवा पाहिजे तिकडे फिरण्याचें अंगीं सामर्थ्य येतें. ह्या काठीनें जें कांहीं लिहावें तें खरें होतें. तसेंच जो जो पदार्थ आपणास पाहिजे असेल, तो तो या तांब्यापासून प्राप्त होतो. यावरून या तिन्ही वस्तूंची केवढी योग्यता आहे हें तुझ्या लक्षांत येईल." हें ऐकून पुत्रक ह्मणाला, "असें जर आहे तर बाहुयुद्ध करण्यापेक्षां दुसरा कांहीं पण करावा हें बरें. ह्या वस्तु कोठें तरी दूर ठिकाणीं ठेवा; अथवा इतकें तरी

कशाला ? ह्या येथेंच असूं द्या, आणि तुह्मी दोघेही दूर अंतरावर जाऊन तेथून धांवत या. जो प्रथम येईल, त्याणें ह्या वस्तु घ्याव्या, असा पण केला तर काय वाईट आहे? पहा बुवा, तुमच्या विचारास आलें तर मान्य करा. मला जें सुचलें तें सांगितलें." ही युक्ति त्या दोघांसही मान्य होऊन ते कांहीं अंतरावर गेले, इतक्यांत पुत्रकानें तांब्या आणि काठी हातांत घेऊन पादुका पायांत घातल्या आणि तत्काल आकाशांत उड्डाण केलें. पुत्रकाचें हें कृत्य ह्मणजे विश्वासघात, असें कोणासही वाटेल व त्याबद्दल ते त्याला दोष देतील; पण वस्तुतः त्याचा विचार फार निराळा होता. मयासुराचे दोघे पुत्र हे दैत्य, अर्थात् मोठे क्रूरकर्मे होते. त्यांच्या हातीं त्या वस्तु राहिल्या तर त्यांपासून लोकांवर उपकार न होतां अपकारच व्हायचा. तो न व्हावा ह्मणूनच पुत्रकानें मुद्दाम त्या दैत्यांना दूर जाण्याची मसलत देऊन त्या दिव्य वस्तू हरण केल्या. त्यांत केवळ स्वार्थबुद्धीच होती असें नाहीं.

पादुकांच्या साह्यानें एका क्षणांत तो शेंकडों कोस दूर गेला, आणि सहज खालीं पाहतो तों, आकर्षिकानांवाची एक दिव्य नगरी त्याच्या दृष्टीस पडली. तिची शोभा पाहून तेथें कांहींवेळ विश्रांति घ्यावी असा विचार करून तो खालीं उतरला. नगराच्या वेशींत प्रवेश करून मनांत ह्मणतो, " येथें कोणाच्या घरीं उतरावें बरें? प्रवाशांना वेश्येच्या अथवा वाण्याच्या घरीं जागा मिळण्याचा संभव असतो. पण त्यांच्या घरीं उतरावें हें मला ठीक वाटत नाहीं. कारण वेश्या नेहमीं दुसऱ्यास फसविण्याचा प्रयत्न करीत असतात आणि वैश्य माझ्या पितरांप्रमाणें द्रव्यलोभी असतात. तेव्हां कोणाच्या घरीं जावें!" असा विचार करीत करीत चालला असतां, एक जुनें घर त्याच्या दृष्टीस पडलें. आंत जाऊन पाहतो तों एक अति वृद्ध स्त्री माजघराच्या दाराजवळ बसलेली त्याला दिसली. तिला नमस्कार करून कांहीं द्रव्य देऊन त्यानें संतुष्ट केलें आणि तिच्या आज्ञेनें त्या पडक्या घरांत गुप्तरूपानें तो राहिला. कांहीं दिवस लोटल्यावर ती ह्मातारी एके दिवशीं पुत्रकाला ह्मणाली, " बाळा, पहिल्या पहिल्यानें तूं मला परकीसा वाटत

होतास; पण जसजसें संघट्टन विशेष होऊं लागलें, तसतसें तुझ्यावर माझें प्रमही विशेष बसत चाललें. आतां तूं मला अगदीं आपल्या मुलासारखा वाटतोस; पण काय उपयोग ? माझ्या लाडक्या, तुझ्या योग्य एखादी स्त्री मिळेल तर माझे मनोरथ पूर्ण होतील. मी पुष्कळ विचार करून पाहिला; पण तुझ्या अनुरूप अशी कोणीच माझ्या लक्षांत येत नाहीं. या नगरीच्या राजाची पाटलीनांवाची एक कन्या आहे, ती मात्र सर्वप्रकारें तुझ्या अनुरूप आहे. ईश्वरकृपेनें योग जमून येईल तर उभयतांचें जोडपें रतिमन्मथासारखें शोभेल. परंतु हें केवळ मनोराज्य आहे. तिची प्राप्ती कशी होणार ? रात्रंदिवस तिच्यावर पाहरा आहे. ती मुलगी नव्हे, तर ती एक अमूल्य रत्नांची खाणच आहे, असें समजून आमचा राजा तिचें विशेषप्रकारें रक्षण करीत असतो. तेव्हां दुर्मिळ वस्तूची आशा धरून उपयोग काय ?" हें त्या म्हातारीचें भाषण लक्षपूर्वक ऐकत असतां, हेंच प्रवेश करण्यास चांगलें द्वार आहे, असें पाहून मदनानें पुत्रक राजाच्या हृदयांत प्रवेश केला. तेव्हां त्याची स्थिति कांहीं चमत्कारिक झाली. एका प्रकारच्या अवर्णनीय विकारानें तो अगदीं व्याकुळ झाला. कांहींवेळानें, त्या सुंदरीला आजच पहावी असा त्याणें निश्चय केला. मग रात्र होतांच पादुका पायांत घालून आकाशमार्गानें तो राजवाड्याजवळ गेला. राजकन्येच्या महालाची एक खिडकी उघडी होती, तींतून आंत प्रवेश करून पाहतो तों रत्नखचित पलंगावर सुखानें निजलेली ती पाटली त्याच्या दृष्टीस पडली. चंद्रिकेचे कोमल किरण तिच्या मुखकमलावर पडले होते. पुत्रकराजानें हळूच तिच्याजवळ जाऊन तिच्या लावण्यामृताचें यथेच्छ प्राशन करून आपल्या डोळ्यांचें पारणें फेडलें. त्याला वाटलें कीं, सर्व जगाला जिंकून कामराजाची मूर्तिमती शक्ति जणुं कांय येथें विश्रांति घेत आहे ! अशा त्या राजकन्येला कसें जागें करावें म्हणून पुत्रकराजा आपल्या मनांत विचार करीत आहे, इतक्यांत पाहऱ्यावरच्या शिपायानें म्हटलेला पुढील श्लोक त्याच्या कानीं पडला—

"प्रसुप्ता एकांतीं बघुनि दयिता, ऊठ ह्मणतां
उठेना, सुस्तीनें उघडुं न शके नेत्र कण्हतां।
अशीतें आलिंगी तरुण नर जो प्रेमनिकरें
तयाचें या लोकीं सफलचि असे जीवित खरें" ॥

तो ऐकतांच उत्कंठित झालेल्या पुत्रकानें एकदम त्या राजकन्येला कडकडून आलिंगन दिलें. यावेळीं मदनाच्या आवेशानें त्याचीं अंगें कांपत असून गलितही झालीं होतीं. अकस्मात् पुरुषाच्या अंगाचा स्पर्श होतांच ती राजकन्या दचकून जागी होऊन पाहते तों ही मदनमूर्ति तिच्या दृष्टीस पडली. तेव्हां लगबगीनें त्याच्या भुजबंधनापासून मुक्त होऊन, ती लज्जेनें आणि कौतुकानें एकसारखी टक लावून त्याच्याकडे पहात उभी राहिली. पुत्रकराजाचीही कांहींवेळ अशीच अवस्था झाली होती; पण त्यानें हळूच बोलण्यास आरंभ केला. तो ह्मणाला, "सुंदरि! मी मोठा अपराधी आहें. कारण, एकाएकीं अपरात्रीं या मंदिरांत प्रवेश करून तुझ्या सुखनिद्रेचा म्यां भंग केला. तथापि तुझ्या सारख्या उदार मनाच्या राजकन्येकडून मी क्षमेला पात्र होईन. तुझ्या लावण्यादि गुणांची कीर्ति ऐकून मदनाच्या स्वाधीन झाल्यामुळें माझ्याकडून हा अतिक्रम झाला.". हें ऐकून पाटली किंचित् गालांतल्यागालांत हांसून ह्मणाली, "भ्रमराला पुष्पमंजरीचा परिचय नसला ह्मणून काय झालें? त्यानें तिचा उपभोग घेतला तरच तिचें सार्थक होणार आहे. पूर्वजन्मांतील सुकृताचें जें हें फल मला प्राप्त झालें आहे त्याचा अनादर मी कधींही करणार नाहीं; परंतु गुरुजनांची अवज्ञा न होतां व शास्त्रमर्यादेचें उल्लंघन न करतां जें व्हायचें तें झालें ह्मणजे उभतांसही श्रेयस्कर होईल. ही माझी विनंति मात्र मान्य व्हावी;" याप्रमाणें थोडावेळ उभयतांचा संवाद झाला. पुत्रकराजानें शास्त्राज्ञेचा अतिक्रम न व्हावा ह्मणून गांधर्वविधीनें पाटलीचें पाणिग्रहण केलें. आधींच उभयतां परस्परांस अनुरूप; त्यांतून कामदेवानें दोघांवरही आपल्या अस्त्रांचा एकसारखा प्रयोग चालविला होता, मग त्या स्त्रीपुरुषांचा समागम किती आनंदकारक झाला असेल याचें वर्णन करतां येत नाहीं. त्यांच्या

प्रेमलीला वाढत चालल्या त्याप्रमाणें रात्र मोठी झाली असती तर किती बहार झाली असती! पण काळाला उगीच कोठें बसवतें आहे. तो आपला पुढें जावयाचाच. पहाटेचा समय होतांच, आपला विरह सहन करण्यास असमर्थ अशा आपल्या प्रियेचा मोठ्या संकटानें निरोप घेऊन, मनांत त्या लावण्यवतीचें चिंतन करीत पुत्रकराजा पुनः त्या म्हातारीच्या घरीं आला.

रात्रीं घडलेल्या पाटलीच्या समागमाचा वृत्तांत जेव्हां त्यानें म्हातारीला सांगितला तेव्हां तिला फार आनंद झाला. ती ह्मणाली, " पुत्रा! परमेश्वर तुह्मा उभयतांचें कल्याण करो! व तुह्मी दोघेंही उदंड वर्षे आनंदाचा अनुभव घ्या! " याप्रमाणें प्रतिदिवशीं रात्रौ पुत्रकराजा पाटलीच्या महालांत जात असे. बरेच दिवस असा क्रम चालत असतां एकेसमयीं महालाचें रक्षण करणाऱ्या लोकांच्या मनांत कांहीं संशय आला. राजकन्येला पुरुषसंभोग झाल्याचीं चिन्हें त्यांच्या पाहण्यांत आलीं. तेव्हां भयभीत होऊन त्यांणीं तत्काल तें वर्तमान राजाला कळविलें. राजानें गुप्तरूपानें एका स्त्रीस कन्येच्या अंतःपुरांत शोध करण्याकरितां बसवून ठेविलें. तिणें त्या रात्रीं पुत्रक आणि पाटली यांच्या समागमाचा प्रकार सर्व प्रत्यक्ष पाहिला; पण कांहीं तरी खूण करावी ह्मणून ती उभयतांना झोंप लागण्याची वाट पाहत होती. शेवटीं बहुतवेळ क्रीडा करून श्रांत झालेल्या त्या स्त्रीपुरुषांला गाढ निद्रा लागली. ही संधी पाहून त्या स्त्रीनें आळत्याचा पंजा पुत्रकाच्या शेल्यावर मारला आणि ती मुकाट्यानें तेथून निघून गेली.

प्रातःकाल होतांच रात्रीं झालेलें सर्व वर्तमान तिणें राजाला कळविलें. राजानें कोतवालास हुकूम केला कीं, "ज्याच्या शेल्यावर आळत्याचा पंजा उठलेला असेल त्याला बांधून माझ्या समोर घेऊन या." कोतवालानें नगरांत शोध करतां करतां म्हातारीच्या पडक्या घरांत असलेला पुत्रक त्याच्या हातीं सांपडला. त्याणें तत्काल त्याच्या मुसक्या बांधून पुत्रकाला राजासमोर नेलें. तेव्हां आळत्याचें चिन्ह पाहून राजाची खात्री झाली. राजा त्याच्या मुसक्या सोडवून त्याला कांहीं तरी शिक्षा सांगणार, इतक्यांत पुत्रक आकाशांत

उडाला. त्याच्या पायांत पादुका होत्याच, त्यांच्या योगानें तो तत्काळ आकाशमार्गानें पाटलीच्या मंदिरांत जाऊन तिला ह्मणाला, "प्रिये! चल ऊठ. आतां येथें राहतां कामानये. आपल्या गुप्त समागमाचें इत्थंभूत वर्तमान तुझ्या बापाला कळलें. आणि तो संतप्त होऊन मला मारण्यास प्रवृत्त झाला आहे; पण त्याची कांहीं परवा नाहीं. ह्या माझ्या पादुका पायांत असल्या ह्मणजे झालें. आपणां उभयतांला पाहिजे तेथें जाण्यास कांहीं हरकत नाहीं." राजकन्येनें—"फार चांगलें," असें ह्मणून आपल्या प्रियाच्या गळ्याला मिठी मारिली. मग पुत्रक तिला मांडीवर घेऊन आकाशमार्गानें गंगेच्या तिराजवळ जाऊन उतरला. यावेळीं पाटली अगदीं थकून गेली होती. तिला गंगोदकाचें स्नान घालून त्या तांब्यांतून काढलेले अनेक पदार्थ उभयतांनीं भक्षण करून कांहीं काल विश्रांति घेतली. पाटलीला पुत्रकाचा तो अलौकिक प्रभाव पाहून फारच आश्चर्य वाटलें. ती ह्मणाली, "असें ज्याच्या अंगीं सामर्थ्य आहे त्याला अशक्य तें काय? तो सर्व पृथ्वीचेंही राज्य करील." मग तिचा अभिप्राय जाणून पुत्रकानें ती आपली काठी घेऊन ज्या ठिकाणीं तो बसला होता तेथेंच चतुरंग सैन्ययुक्त व पौरजानपदांनीं गजबजलेलें असें एक दिव्य नगर भूमीदर काढलें. वस्तुतः तें एक चित्र होतें; पण सुदैवानें तत्काल खरोखरीचें नगर झालेलें पाटलीच्या दृष्टीस पडलें. मग काय विचारावें उभयतांच्या आनंदाला पारावार नाहींसा झाला. त्या नगरींत पुत्रकराजानें पाटलीसहवर्तमान मोठ्या समारंभानें आपणास राज्याभिषेक करून घेतला. आणि प्रधानादिकांच्या साह्यानें मोठ्या थाटानें राज्य चालविलें. नंतर लवकरच आपल्या सासऱ्याला युद्धांत जिंकून त्यानें त्याला आपला मांडलिक केलें. पुढें अल्पकाळांत इतर लहान मोठ्या राजांस जिंकून समुद्रवलयांकित पृथ्वीचा तो एकटाच अधिपति झाला. जी नगरी त्यानें उत्पन्न केली ती पाटली आणि पुत्रक या उभयतांच्याही नांवांनीं प्रसिद्ध व्हावी ह्मणून तिला पाटलिपुत्र असें नांव ठेविलें." इतका वृत्तांत सांगून वररुचि ह्मणाला, "ही आश्चर्यकारक

अपूर्व कथा वर्षगुरूंच्या मुखानें श्रवण करून आह्मास फार आनंद व विस्मय वाटला.''

याप्रमामाणें काणभूतीला कथा सांगून वररुचि स्वतः आपली गोष्ट पुढें सांगूं लागला. तो ह्मणाला, "मित्रा काणभूते! व्याडी आणि इंद्रदत्त यांसहवर्तमान आह्मी गुरुगृहांत राहून सर्व विद्या संपादन केल्या. त्यावेळीं मी आपल्या तारुण्याच्या ऐन भरांत आलों होतों. एकेदिवशीं व्याडी आणि इंद्रदत्त यांना बरोबर घेऊन, इंद्रोत्सव नांवाची एक यात्रा तेथें भरली होती, ती पाहण्यास गेलों. तेथें फिरतां फिरतां, सौंदर्याची केवळ खाणच अशी एक कन्या आमच्या दृष्टीस पडली. खरोखर ती केवळ कामाचें बाणहीन अस्त्रच होय, असें आह्मास वाटलें. इंद्रदत्ताला ती कोण ह्मणून मीं विचारिलें. तो ह्मणाला, "गड्या, ही उपवर्ष नामक ब्राह्मणाची कन्या आहे. हिचें नांव उपकोशा." हें ऐकून माझें मन फारच व्याकुळ झालें. कारण उपवर्ष हा आमच्या गुरुजींचा बंधु असून त्या उभयतांचें फार वांकडें होतें हें पूर्वीं सांगितलेंच आहे. अर्थात् माझी आशा सफळ होण्यासारखी नव्हती. ह्मणून माझें मन अस्वस्थ झालें होतें तरी व्याडी अथवा इंद्रदत्त यांना मीं आपली स्थिति मुळींच कळविली नाहीं. ती कन्या आपल्या सख्यांसहवर्तमान माझ्या आसपास बराच वेळ संचार करून प्रीतियुक्त दृष्टीनें वारंवार माझ्याकडे अवलोकन करून, माझ्या मनाला आकर्षण करीत होत्साती मोठ्या संकटानें आपल्या बापाच्या घराकडे गेली. इकडे मी निराश होऊन मित्रांसहवर्तमान गुरुगृहास गेलों. त्या दिवशीं मला जेवण-खाण वगैरे कांहींच सुचलें नाहीं. व्याडी आणि इंद्रदत्त वरचेवर कसल्यातरी गोष्टी सांगत; पण माझें लक्ष तिकडे अगदींच गेलें नाहीं. मी आपल्या बिछान्यावर तळमळत होतों; निद्रा कशी ती मुळींच येईना. नीलकमलाप्रमाणें जिचे नेत्र, पूर्ण चंद्राप्रमाणें जिचें मुख, कमलाच्या कोमल देठांप्रमाणें जिचे भुज, कनककलशांप्रमाणें शोभणारे जिचे स्तन, शंखाप्रमाणें भरगच्च जिचा कंठ, पोंवळ्याप्रमाणें आरक्त जिचे ओंठ, अशी

ती सुंदरी; मदनराजाचें केवळ विहारस्थान, किंवा दुसरी लक्ष्मीच कीं काय अशी शोभणारी ती हृदयहारिणी, माझ्यापुढें मूर्तिमंत उभी होती. मी तिच्या अधरामृताचें प्राशन करण्याविषयीं अगदीं लुब्ध झालों असून त्याचा लाभ मुळींच होत नव्हता. इकडे निर्दय मदन तर वारंवार माझ्यावर तीक्ष्ण बाणांचा प्रहार करीत होता. अशा स्थितींत तळमळत असतां पहाटेच्या समयीं जरासा डोळा लागला.

इतक्यांत पांढरीं सफेत वस्त्रें परिधान केलेली एक स्त्री स्वप्नांत येऊन मला ह्मणाली, " पुत्रा ! तूं काळजी करूं नको; जिच्यावर तुझें मन गेलें आहे ती पूर्वजन्मीं तुझीच स्त्री होती. ती गुणज्ञ आहे. ती तुझ्यासारख्या गुणी पुरुषाला सोडून दुसऱ्याला कधींही वरणार नाहीं. मी तुझ्या शरीरांत नेहमीं राहणारी **सरस्वती** आहें. तुला होत असलेलें दुःख माझ्यानें पाहवेना ह्मणून तुला हें सांगण्याकरितां प्रकट झालें," असें सांगून ती देवी गुप्त झाली. तत्काल मी जागा झालों. यावेळीं मला पहिल्यापेक्षां विशेष आशा उत्पन्न झाली. मीं मनांत विचार केला कीं, ' देवतेचें भाषण कधींही असत्य व्हायचें नाहीं. मला पडलें हें स्वप्नच असावें, हा कांहीं भ्रम नव्हे. असें सांगतात कीं, स्वप्नही कदाचित् खरें होतें; पण याला स्वप्न तरी कां ह्मणावें ? खरोखरच तो **सरस्वती** देवीचा साक्षात्कार कां मानूं नये ? आणि तो कधींही खोटा व्हायचा नाहीं. तर हे माझ्या मना ! तूं अंमळ धीर धर. आतांच आपण एक यत्न करून पाहूं. जर दृष्टांत खरा असेल तर कांहीं तरी तुझा हेतु पूर्ण होण्याचीं चिन्हें दिसतील. नाहीं तर तुझी पुर्ती निराशा तरी होईल.' असें ह्मणून मी त्या दयितेच्या मंदिराजवळच्या आंब्याच्या झाडाखालीं जाऊन उभा राहिलों. कांहीं वेळानें तिची एक सखी मंदिरांत जात होती, तिनें मला पाहून, उपकोशेला मी तेथें उभा राहिल्याचें वर्तमान निवेदन केलें. जशी तिच्या दर्शनानें माझी अवस्था झाली होती तशीच तिचीही माझ्या दर्शनानें झाली होती. तिनें त्याच सखीला परत माझ्याकडे पाठविलें. ती मोठ्या नम्रतेनें आणि कांहींशी साशंकित मुद्रेनें मला

ह्मणाली, "महाभाग, आपल्याशीं कधीं भाषण करण्याचा मला प्रसंग नसतांही मी कांहीं गोष्ट बोलतें याची क्षमा असावी. काय करावें ? माझ्या सखीच्या स्नेहानें मला अगदीं परवश केलें आहे. स्त्रियांनीं, अपरिचित, त्यांतूनही आपल्यासारख्या मोठ्या प्रतिष्ठित मनुष्याजवळ गुह्य गोष्ट बोलावी हें मोठेंच साहस आहे. पण तें न केलें तर त्या सखीची (उपकोशेची) आशा सोडावी लागेल. महाराज! मुग्ध स्त्रीजनाला पुरें दर्शनदेखील न देतां दुःखांत घालावें हें आपल्यासारख्या उदार पुरुषाला कधींही शोभणार नाहीं. काल यात्रेंत आपलें ओझरतें दर्शन झाल्यापासून त्या दुर्दैवी—छेः सुदैवी असेंच ह्मटलें पाहिजे. कारण योग्य पुरुषावर जिचें मन आसक्त झालें तिला दुर्दैवी कोण ह्मणेल?—प्रियसखीला मदनानें अगदीं व्याकुळ केलें आहे. तेव्हां तिची अशी अवस्था होण्याचें काय कारण असेल, त्याचा आपणच विचार करावा." हें तिचें भाषण ऐकून मीं पहिल्यापेक्षां दुप्पट व्याकुळ झालों. माझ्यानें उभेंदेखील राहवेना, ह्मणून एकाएकीं खालीं बसलों. मग कांहीं वेळानें दीर्घ श्वास सोडून तिला ह्मणालों, "सखे, तूं मोठी चतुर आहेस. तुझ्या सखीची जशी अवस्था तूं सांगतेस तशीच ती असेल यांत संशय नाहीं; पण त्या तुझ्या मैत्रिणीला अवलोकन केल्यापासून माझी अवस्था कशी झाली आहे हें तुझ्या लक्ष्यांत आलें काय ? तरी माझ्याकरितां ती व्याकुळ झाली आहे हें ऐकून मी, मला होत असलेल्या दुःखाची कांहींच पर्वा करीत नाहीं. आपणावर आसक्त झालेली स्त्री आपल्यासाठीं दुःख करीत आहे हें ऐकून तरुण पुरुषास एका प्रकारें मोठें समाधान वाटत असतें. मीं आतांच तिच्या दुःखाचा परिहार केला असता; पण करावें काय ? तिच्या वडिलांनीं यथाविधि दान केल्यावांचून तिचा मी कसा बरें स्वीकार करावा? खरोखर तिची प्राप्ति झाली नाहीं तर निर्दय मदन मलाही जाळून भस्म करील! असें आहे तरी मी भलत्याच मार्गाचें अवलंबन करणार नाहीं. अपकीर्तीनें यांचण्यापेक्षां मरण मला बरें वाटतें. तर जशी तुझ्या सखीची तुला काळजी आहे, तशीच माझीही कर. आणि तिच्या मनांतील अभिप्राय

तिच्या वडिलांच्या कानावर घाल; ह्मणजे कदाचित् तिचा हेतु पूर्ण होईल. पुनः तुझी प्रार्थना करून सांगतों कीं, तूं तुझ्या प्रियेला आणि मला दोघांलाही वांचविण्याचा यत्न कर." हें माझें भाषण ऐकून तिच्या मनाची माझ्याविषयीं पूर्ण खातरी झाली. 'आई जगदंबे ! या उभयतांचें कल्याण कर.' असें म्हणून ती परत मंदिरांत गेली. समय पाहून तिणें उपकोशेच्या आईला तें आम्हा उभयतांचें प्रेमबंधन कळविलें. तिनें तें आपला भर्ता म्हणजे उपवर्ष याला सांगितलें. तें ऐकून तो फारच संतुष्ट होऊन ह्मणाला, "मुलगी उपवर झाली आहे. तिचा आतां लवकर विवाह केलाच पाहिजे. तिणें आपणहोऊन वराची योजना केली हें मला फार आवडलें. ज्याच्यावर तिचें मन जडलें आहे ह्मणून तूं सांगतेस त्याचें नांव वररुचि. तो आमच्या दादांचा प्रियशिष्य आहे. विद्यादि गुणांनीं अलंकृत असून सर्वथा तुला जांवई होण्यास योग्य आहे. दादाशीं आमचें वांकडें आहे तरी तें यावेळीं विसरलें पाहिजे. कारण असा उत्तम जांवई आपणास दुसरा कोण मिळणार आहे. ह्मणून मी आतांच त्यांच्याकडे जाऊन त्यांची संमति घेऊन विवाहाचा निश्चय करतों. तूं बाकीची सर्व तयारी कर." असें बोलून उपवर्षमुनि आपले वडील बंधु वर्षाचार्य यांच्याकडे गेले, आणि त्यांना ही सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून आमच्या गुरूंला फारच आनंद झाला. त्यांणीं सांगितलें. "माझा प्रिय शिष्य वररुचि याचें अध्ययन संपूर्ण झालें आहे. आतां समावर्तनें करून गृहस्थाश्रम स्वीकारण्याविषयीं, त्याला माझी पूर्ण संमति आहे. उपकोशेला हा अनुरूप वर मिळाला असतां उभयतांचेंही कल्याण होणार आहे." असें बोलून विवाहाची तयारी करण्याविषयीं त्यांनीं आज्ञा केली. मुहूर्त पाहून तिथिनिश्चय झाल्यावर वर्षाचार्यांनीं व्याडीला पाठवून कौशांबीनगरीहून माझ्या आईला आणविलें. नंतर ठरविलेल्या मुहूर्तावर उपवर्षमुनीनें आपली कन्या उपकोशा

---

१–हा एक संस्कार असून, अध्ययन पुरें झाल्यावर तो करावा लागतो. सम्यक् आवर्तन—ह्मणजे गुरुगृहांतून परत घरीं येणें, असा याचा अर्थ होईल.

यथाविधि मला अर्पण केली. मग आह्मा उभयतांच्या आनंदास पारावार नाहींसा झाला. सुशील आणि गुणवती स्त्रीच्या समागमानें किती सौख्य होतें हें अनुभवावांचून कळावयाचें नाहीं. माझ्या आईला आह्मा उभयतांचें अनुरूप जोडपें पाहून फारच संतोष झाला. मग वर्षाचार्यांच्या आज्ञेनें, मातुश्री आणि स्त्री यांसहवर्तमान मी मोठ्या सुखानें तेथें राहिलों.

इकडे आमच्या गुरुजींचा लौकिक देशांतरावर पसरला होता. व्याडी, मी आणि इंद्रदत्त असे आह्मी तिघे त्यांचे पट्टशिष्य होतों. आह्मी त्यांच्याजवळ अध्ययन करण्यास राहण्यापूर्वी—वेडा आहे असें समजून—कोणी शिष्य त्याच्याकडे अध्ययनासाठीं येत नसत. आह्मी विद्वान् झालों असें ऐकून चहूंकडून शिष्यांच्या झुंडीच्या झुंडी येऊं लागल्या. कांहीं दिवसांनीं शिष्यसमूह फारच मोठा झाला. त्या सर्वांस आमचे गरु वर्षाचार्य यथायोग्य पढवीत असत. त्यांत कित्येक बुद्धिमान् होते. कोणी मध्यम बुद्धीचे होते, कोणी जड होते; पण त्या सर्वांत पाणिनि नांवाचा एक शिष्य फारच जडबुद्धीचा होता. त्याला कितीही सांगितलें तरी कांहींच येत नाहीं, असें पाहून गुरुपत्नीनें त्याला घरचें काम करावयास लाविलें. तें करतां करतां तो बिचारा कंटाळला. शेवटीं एकेदिवशीं गुरुपत्नीनें त्याला घरांतून निघून जा ह्मणून सांगितलें. तेव्हां तो अत्यंत खिन्न होत्साता तेथून निघून गेला. आणि तप करून विद्या संपादन करावी असा निश्चय करून हिमाचलावर गेला. तेथें भगवान् शंकराला तीव्र तपानें संतुष्ट करून त्याच्यापासून सर्व विद्यांचें मुख जें व्याकरणशास्त्र तें त्याणें संपादन केलें, आणि पुनः वर्षाचार्याजवळ आला. मी मोठा विद्वान् झालों आहें अशी त्याला फार घमंड होती. पूर्वी गुरुगृहांत असतांना तो जडबुद्धीचा होता. त्याला कांहींच येत नव्हतें, ह्मणून आह्मी त्याची थट्टा करीत असूं, त्याचा त्याला राग येई; पण करतो काय ? निरुपायास्तव उगीच बसावें लागे; तथापि त्याच्या मनांत दंश होता.

महादेवापासून व्याकरणशास्त्र मिळालें, तेव्हां आमचा सूड उगवावा

म्हणून तो यावेळीं आला होता. त्याणें प्रथम मलाच वादास बोलविलें. वर्षाचार्यांच्या आज्ञेनें आह्मा उभयतांचा वाद जुंपला. तो सात दिवस एकसारखा चालला होता. सर्व शिष्यमंडल चित्रवत् बसलें होतें. आठवा दिवस उगवला तेव्हां—निराश झालेल्या सर्व शिष्यवर्गास आनंद होण्यासारखा—मीं त्याचा पराभव केला. जिकडे तिकडे आनंदाच्या टाळ्या वाजूं लागल्या. गुरुगृहांत एकसारखा माझा जयजयकार चालला. इतक्यांत, आपण दिलेल्या व्याकरणशास्त्राचा अपमान झाला, हें सहन न होऊन आकाशांत वादचमत्कार पाहण्यासाठीं आलेल्या महादेवानें मोठी गर्जना केली. तीबरोबर आमचें पूर्वीचें ऐंद्रनांवाचें जें व्याकरणशास्त्र होतें त्याचा तत्काळ नाश झाला. सर्व पृथ्वीवर बहुत दिवस प्रचारांत असलेलें ऐंद्र व्याकरण नष्ट होऊन त्याचें कोणास स्मरण देखील नाहींसें झालें. हा चमत्कार पाहून पाणिनीचा हर्ष गगनांत मावेनासा झाला. तो मोठ्यानें गर्जना करून ह्मणाला, “ हं ! या आतां कोण ते माझ्याशीं वाद करायला. पाहतों बरें आतां कसें काय होतें तें. ” आह्मी सगळेही शिष्य त्याच्याशीं वाद करूं लागलों; पण उपयोग काय ? त्यानें सहज आह्मास जिंकलें. उघडच आहे, मोठा वीर असला आणि त्याचें शस्त्र जर त्याच्या हातांत नसलें तर त्याचा पराभव झाल्यावांचून कसा राहणार ? वादाचीही तशीच गोष्ट आहे. ज्या शास्त्रावर वाद करावयाचा तेंच जर चांगलें अवगत नसेल किंवा आठवत नसेल तर काय उपयोग ? असो.

पाणिनी आम्हा सर्वांस हरवून मोठा दिग्विजयी पंडित झाला. इतर शिष्यवर्गाला त्याचें फारसें कांहीं वाटलें नसेल; पण मला मात्र अतिशय खेद झाला. ज्या महादेवाच्या कृपेनें अगदीं जडबुद्धि असा, जो पाणिनी तो विद्वान् होऊन विजयी झाला आणि आह्मी पराभूत झालों, त्याच शंकराची आराधना करून त्याच्या कृपेनें आपला मनोरथ पूर्ण करावा, असा मी दृढसंकल्प केला. माझी प्रिया उपकोशा आणि वृद्ध मातुश्री यांना आपला हेतु कळवून त्यांच्या संमतीनें हिरण्यगुप्तनांवाच्या माझ्या

एका विश्वासु मित्रावर घरची सर्व व्यवस्था सोंपवून व गुरूच्या चरणावर मस्तक ठेवून मी हिमाचलावर गेलों. आणि तेथें निराहार होऊन तीव्र तप करण्यास आरंभ केला.

इकडे माझी प्रिया उपकोशा आपल्या सासूची सेवा करीत घरीं राहिली होती. ती माझें कल्याण व्हावें आणि मनोरथ पूर्ण होऊन मी लौकर परत घरीं यावें, ह्मणून अनेक व्रतवैकल्यें करीत होती. प्रतिदिवशीं गंगेचें स्नान करून पार्वतीचें आराधन करण्याचा तिनें नियम केला होता. याप्रमाणें बरेच दिवस तिचें व्रत अखंडित चाललें असतां एके दिवशीं वसंतऋतूंत गंगेवर स्नानास जातांना त्या नगरीच्या राजाचा पुरोहित, कोतवाल आणि कुमारसचिव या तिघांची सहज तिच्याकडे दृष्टि गेली. वस्तुतः यावेळीं माझ्या वियोगानें ती फार कृश झाली होती. तिच्या सर्वांगावर पांडुरवर्णाची छाया पडली होती. मीं गेल्यापासून तिनें उत्तम वस्त्रें व अलंकार यांचा मुळींच त्याग केला होता. तथापि तिचें नैसर्गिक लावण्य पाहाणाराच्या मनाचें तत्काळ हरण करण्याजोगें होतें. प्रतिपदेच्या चंद्रकलेप्रमाणें कृश असूनही मनोरम अशी ती तिची मूर्ति पाहून ते तिघेही तत्क्षणींच कामबाणाच्या तडाक्यांत सांपडले.

इकडे उपकोशा गंगेवर जाऊन स्नानादिक सर्व नियम आटपून सायंकाळीं परत घराकडे येत होती. त्यावेळीं प्रथम कुमारसचिवानें बलात्कारानें तिला अडविलें. वस्तुतः हा तिच्यावर फारच वाईट प्रसंग आला होता. मी घरीं असतांना त्या माझ्या प्रियेकडे वाऱ्याची देखील ढुंकून पाहण्याची छाती नव्हती, मग क्षुद्र कुमारसचिवासारख्यांची कोठून होणार ? पण मी जवळ नसल्यामुळें सिंहिणीवर ससानें झडप घालावी त्याप्रमाणें तिची स्थिति झाली. तरी ती मोठी बुद्धिमति असून प्रसंगीं काय करावें तें तिला सुचत असे. तिला त्यावेळीं दुःखाचा उमाळा[1] आला होता तरी तो मोठ्या धैर्यानें सांवरून तिनें आपलें मन घट्ट केलें आणि शांतपणानें

१—'कुमारसचिव' ह्मणजे युवराजाचा प्रधान अथवा त्याचा जोडीदार मित्र.

कुमारसचिवाला त्याच्या इच्छेस अनुकूल झाल्यासारखें दाखवून सांगितलें, " भल्या गृहस्था, जी गोष्ट व्हावी अशी तुझी इच्छा आहे ती जशी तुला इष्ट आहे तशी मलाही असलीच पाहिजे. परंतु मी सत्कुलांत उत्पन्न झालें आहें, माझा पती प्रवासास गेला आहे, मी येथें उघड रस्त्यावर तुझ्याशीं गोष्टी बोलत कशी बरें उभी राहूं? कदाचित् कोणी पाहिलें तर माझी अपकीर्ति होईल आणि त्याबरोबर तुझीही होईल. तूंही मोठा कुलीन असून लोकांत फार प्रसिद्ध आहेस. संभावित गृहस्थाला मरणापेक्षांही अपकीर्ति दुःसह होते, हें तुला माहीत असेलच. तर मग मी सांगतें अशी युक्ति कर. उद्यांपासून येथें वसंतोत्सव सुरू होणार आहे. नगरांतील सर्व लोक तिकडे जातील, तेव्हां रात्रीच्या पहिल्या प्रहरांत तूं माझ्या घरीं ये म्हणजे निःशंकपणें आपला उभयतांचा हेतु पूर्ण होईल. "

ही तजवीज कुमारसचिवालाही मान्य झाली. त्याचा तिच्यावर पूर्ण विश्वास बसला, आणि प्रेमपूर्वक तिचे उपकार मानून तो तेथून निघून गेला. याप्रमाणें उपकोशा मोठ्या युक्तीनें एका दुष्टाच्या हातांतून सुटून कांहीं पावलें पुढें जाते तों संधि साधून राजपुरोहितानें तिला अडविलें. तेव्हां गोड भाषणानें त्याचेंही समाधान करून कुमारसचिवाप्रमाणेंच, त्यालाही त्याच दिवशीं रात्रीं दुसऱ्या प्रहरीं आपल्या घरीं येण्यास सांगितलें. याप्रमाणें संकेत करून कशीतरी त्याच्या हातांतून सुटून आणखी थोडी पुढें जाते तों, समय पाहून कोतवालानें गाठलें. त्यालाही मोठ्या आर्जवानें पूर्वींच्या दोघांप्रमाणेंच त्या रात्रीच्या तिसऱ्या प्रहरीं येण्यास सांगितलें, आणि घाबऱ्या घाबऱ्या ती पुढें चालती झाली. घरीं पोंहचल्यावर तिची वृत्ति अस्वस्थ पाहून दासींनीं पुष्कळ प्रकारें तिला विचारिलें. परंतु तिणें वाटेंत घडलेल्या गोष्टींपैकीं कांहींच त्यांस सांगितलें नाहीं. दुःखानें मोठा सुस्कारा सोडून— "पति जर प्रवासास गेला तर कुलस्त्रियांनीं वांचण्यापेक्षां मरून जावें हें फार चांगलें. परंतु, मनाच्या स्थितीचा विचार न करतां केवळ रूपाकडे पाहून भुलणाऱ्या लोकांच्या दृष्टीला विषय होणें हें मात्र चांगलें

नव्हे !"— इतकें मात्र ती बोलली. त्या रात्रीं माझी आठवण करून ती एकसारखी रडत होती. ती आपल्या लावण्याविषयींच फार दुःखित होऊन ह्मणे कीं,— "पति परत येईपर्यंत देवानें माकडासारखें मला अगदीं कुरूप केलें तर फार बरें होईल." त्या रात्रीं तिणें आहार वगैरे कांहीं केला नाहीं.

याप्रमाणें कशी तरी मोठ्या दुःखानें रात्र घालवून प्रातःकालीं शौच मुखमार्जनादिक सर्व आटपून दासीला म्हणाली, "अग, आज मी ब्राह्मणांची पूजा करणार आहें, तर हिरण्यगुप्ताच्या घरीं जा आणि त्याला सांगून खर्चाला कांहीं रुपये घेऊन ये." दासी त्याच्या घरीं गेली आणि तिनें माझ्या प्रियेचा निरोप त्याला सांगितला. तेव्हां— "रुपये घेऊन मीच तिकडे येतों," असें सांगून तो माझ्या घरीं गेला, आणि उपकोशा एकटीच चिंताक्रांत बसली आहे असें पाहून हिरण्यगुप्त तिला म्हणाला, "बाई, आज तुम्ही अशा दुःखी कां दिसतां ? तुह्माला कांहीं द्रव्य पाहिजे आहे काय ? माझ्याजवळ पुष्कळ पैसे आहेत. तुम्हाला हवे तितके देईन." हें ऐकून माझी बायको म्हणाली, "मला तुमचें द्रव्य नको. तुमच्याजवळ पुष्कळ पैसे आहेत ही ईश्वराची तुम्हावर कृपा आहे; पण मला त्यांतल्या कवडीची देखील गरज नाहीं. माझ्या पतीनें तुमच्याजवळ जें कांहीं ठेवलें असेल त्यांतलें थोडेसें मला खर्चाला द्या म्हणजे झालें." हिरण्यगुप्त ह्मणाला, "होय, तुमच्या यजमानांनीं माझ्याजवळ कांहीं ठेवलें आहे; पण तें देणें किंवा न देणें हें माझ्या खुषीवर आहे. कदाचित् मी नाहीं म्हटलें तर तुमचा कांहीं इलाज चालणार नाहीं. तुह्माला खर्चाची अडचण आहे आणि पैशावांचून तर चालायचें नाहीं, तेव्हां मला संतुष्ट कराल तरच तुमचें कार्य होईल. तुमचे पतिराज तप करावयास गेले आहेत, ते तिकडून परत येतात किंवा तिकडेच समाधिस्थ होतात, याचा तरी काय नेम ? उगीच दुःखांत दिवस घालविण्यापेक्षां माझा हेतु पूर्ण कराल तर कांहींच उणें पडावयाचें नाहीं. माझ्या बोलण्याचा नीट विचार करून पहा." हें त्याचें दुष्ट भाषण

श्रवण करून आधींच दुःखित झालेल्या त्या साध्वीला फारच संताप आला. तरी तिणें आपली स्थिति त्याच्या मुळींच लक्षांत येऊं दिली नाहीं. कागद-पत्र अथवा साक्षी वगैरे कांहीं न ठेवतां हिरण्यगुप्ताजवळ मी ठेव ठेवली आहे, हें तिला माहित होतें. तेव्हां तिणें विचार केला कीं, ' द्रव्य तर आपणाला खर्चास पाहिजे आहे व तें ह्या वाण्यावांचून दुसऱ्या कोणाकडून मिळावयाचें नाहीं आणि त्याच्या मनांत तर पाप आलें आहे. तेव्हां त्याच्याशीं भांडून काय उपयोग ? युक्तीनें कार्यभाग साधेल तर साधावा,' असा विचार करून, बाह्यात्कारें आपली अनुकूलता आहे असें दाखविण्या-करितां ती त्याला म्हणाली, "असें आहे काय! तर मग इतके आढेवेढे घेऊन बोलायला नलगे. मी कांहीं फारशी तुमच्या इच्छेबाहेर आहें असें नाहीं. उद्यां रात्रीं चवथ्या प्रहरीं यावें म्हणजे तुमचे मनोरथ पूर्ण होतील. " याप्रमाणें संकेत करून पाहिजे तितकें द्रव्य त्याच्यापासून घेऊन त्याला तिणें जाण्यास सांगितलें.

नंतर आपलीं नित्य-नैमित्तिक सर्व कृत्यें यथासांग करून दासींकडून कस्तुरी इत्यादि सुगंधिक द्रव्यें व तेल वगैरे घालून एक मोठ्या कुंडीभर काजळ तयार करविलें. चार लहान लहान फडकीं त्या काजळांत भिजवून तयार केलीं. एक मोठी पेटी व इतर कांहीं सामान तिला पाहिजे होतें, तें सर्व तयार केलें. नंतर आपल्या दासींनां पुढें काय काय करावयाचें तें सांगून त्या चौघा अधमांची वाट पहात बसली. नंतर रात्र होतांच संकेताप्रमाणें पहिल्या प्रहरीं, उत्तम पोषाख करून मोठ्या आनंदित मुद्रेनें कुमारसचिव आला. तो कोणाच्या दृष्टीस न पडतां हळूच घरांत शिरला. त्याला पाहून उपकोशा म्हणाली, " हां, मी व्रतस्थ आहें, अस्नात पुरुषाला स्पर्श करणार नाहीं. तर आपण प्रथम स्नान करावें. हें येथें स्नानगृह आहे, यांत सर्व तयारी करून ठेवली आहे. " तेव्हां कुमारसचिवानें तें तिचें ह्मणणें मान्य केलें. कामी पुरुष स्त्रियांची मर्जी प्रसन्न राखण्याकरितां त्या सांगतील तें मान्य करितच असतात! लगेच त्यानें आपला पोषाख

वगैरे सर्व उतरून ठेवून दासींनीं दाखविलेल्या स्नानगृहांत प्रवेश केला. वस्तुतः तें स्नानगृह मूळींच नसून, ती एक अंधार कोठडी होती. तींत दासींनीं त्याला ओढून नेला आणि त्याचें नेसलेलें धोतर त्याच्या करवीं सोडवून पूर्वी तयार केलेलें काजळाचें फडकें त्याला नेसावयास दिलें ! नंतर 'आज तुम्हाला अभ्यंग करतों,' असें सांगून दासींनीं, पूर्वीं तयार केलेलें काजळाचें तेल [illegible] त्याच्या अंगाला लावलें. त्या त्याच्या अंगाला तैलमर्दन करीत आहेत तों दुसरा प्रहर होण्याचा समय आला. तेव्हां मोठ्या थाटानें पुरोहितबुवांची स्वारी प्रविष्ट झाली. त्याला पाहून दासी कुमारसचिवाला ह्मणाल्या, "अरे देवा ! आतां काय करावें. मोठेंच विघ्न आलें. हे पहा पुरोहितबुवा आले आहेत. हे आमच्या बाईसाहेबांच्या यजमानांचे परम मित्र आहेत. जर कां त्यांणीं तुम्हाला पाहिलें तर सर्वस्वीं घात होईल. तुह्मी आतां दडून बसाल तर चांगलें. ही पहा येथें एक पेटी आहे. हिच्यांत जाऊन बसा. पुरोहितबुवा लौकरच जातील. ते गेले म्हणजे बाहेर या." असें सांगून त्यांणीं पूर्वी तयार करून ठेविलेल्या मोठ्या पेटींत त्याला घातलें. बिचारा कुमारसचिव करतो काय ? निरुपायास्तव त्या पेटींत लपून बसला. खरेंच आहे, दुष्कर्म करण्याविषयीं प्रवृत्त झालेल्या नीच पुरुषांला येथेंच अनेक दुःखें भोगावीं लागतात ! इकडे पुरोहितबुवांनाही कुमारसचिवाप्रमाणेंच "स्नान करून या" असें उपकोशेनें सांगितलें. त्यांनींही ती गोष्ट मान्य केली. ते दासींकडून अभ्यंग सुखाचा सोहळा अनुभवीत असतां तिसऱ्या प्रहराचा समय झाला; तों कोतवालसाहेबांची स्वारी येऊन थडकली. त्यांला पाहून भ्याल्यासारखें करून दासींनीं पुरोहितबुवांना कुमारसचिव होता त्याच पेटींत घातलें. आणि दार बंद करून कोतवालसाहेबांचा समाचार घेण्यासाठीं बाहेर आल्या. उपकोशेनें पूर्वीप्रमाणें त्याला स्नान करण्यास सांगून दासींकरवीं तें काजळाचें उटणें कोतवालसाहेबांच्या अंगास लावण्याचें काम चालविलें आहे, इतक्यांत चौथा प्रहर होण्याची वेळ आल्यामुळें हिरण्यगुप्त

शेटजींची स्वारी आली. त्यांनां पाहून पूर्वींच्या दोघांप्रमाणेंच काजळाचें फडकें नेसलेली कोतवालसाहेबांची स्वारी दासींनीं पेटींत प्रविष्ट केली आणि पेटीच्या दाराचा नीट बंदोबस्त करून दासी बाहेर आल्या. इकडे हे तिघेही अंधार कोठडींतल्या त्या पेटींत चांचपत चांचपत फिरत होते. परस्परांचा धक्का लागला तरी एकमेकांशीं बोलत नव्हते. कारण आपणाला दुसऱ्यानें ओळखूं नये असें प्रत्येकास वाटत होतें. '**यमलोकांत अंधतामिस्र**नांवाचा एक नरक आहे; आणि जो परस्त्रीवर इच्छा ठेवतो त्याला तो नरक भोगावा लागतो,' असें शास्त्रांत सांगितलें आहे. तेव्हां त्यांत कसें काय दुःख भोगलें पाहिजे याचा अनुभव घेण्याकरितांच कीं काय ? त्या तिघांना इहलोकींच तशी स्थिति प्राप्त झाली !

इकडे शेटजींचा आदर-सत्कार करून त्यांच्या हातांत एक दिवा दिला आणि त्यांला "महालांत चला" असें सांगून **उपकोशा हिरण्यगुप्ता**ला त्या पेटीजवळ घेऊन आली आणि थोड्याशा आवेशानें ह्मणाली, "काय हिरण्यगुप्त शेटजी ! आमच्या यजमानांनीं तुमच्याजवळ ठेवलेलें द्रव्य तुम्ही आणलें काय ? मला त्याची फार गरज आहे. तुह्मी लवकर कां बरें तें आणून देत नाहीं ? सांगा केव्हां आणाल तें." हें तिचें भाषण ऐकून **हिरण्यगुप्तानें** चहूंकडे निरखून पाहिलें. कारण यावेळीं—**उपकोशा** प्रसन्न व्हावी म्हणून—तो ठेवणी कबूल करणार होता व या प्रसंगीं तेथें जवळ कोणी असले तर कदाचित् ते साक्षीदार होतील अशी त्याला भीति होती. म्हणून तेथें आसपास कोणी मनुष्य नाहीं असें समजून तो म्हणाला, "होय बाई, तुमच्या नवऱ्यानें माझ्याजवळ द्रव्य ठेवलें आहे. आणि तें तुह्माला पाहिजेत्यावेळीं मी देईन; पण"— हे शब्द त्याच्या तोंडांतून निघतांच, **उपकोशा** पेटीकडे

---

१—दक्षिणदिशेला—पृथ्वीच्या वर आणि आकाशाच्या खालीं—यमलोक आहे. तेथें संयमिनी नांवाची नगरी असून तींत यमधर्म राज्य करीत आहे. तो प्राण्यांच्या पापपुण्याचा इन्साफ् करून त्यांना चांगली अथवा वाईट गती देतो. पाप्यांला नरकांत टाकतो. ते नरक असंख्य आहेत. तरी त्यांतील मुख्य नरक एकवीस असून त्यांचीं निरनिराळीं नांवें सांगितलीं आहेत. 'अंधतामिस्र' त्यांपैकीं एक होय.

पाहून मोठ्यानें म्हणाली, "हे गृहदेवतांनों ! या हिरण्यगुप्ताचें हें भाषण तुम्ही ऐका. माझ्या नवऱ्यानें याच्याजवळ ठेव ठेवली आहे. आणि ती कबूल करून 'पाहिजे तेव्हां देईन,' असें हा ह्मणत आहे हें तुम्हाला माहित असूं द्या म्हणजे झालें." असें बोलून ती तेथून निघून गेली. इतक्यांत दिवा घालविला आणि पूर्वसंकेताप्रमाणें त्याचीं वस्त्रें वगैरे सर्व काढून ठेवून दासींनीं त्याला पूर्ववत् अभ्यंग करण्याची सुरवात केली. इतक्यांत अगदीं पहाटेची वेळ झाली; तेव्हां दासी म्हणाल्या,. "अहो शेटजी महाराज ! हें पहा, उजाडलें ! आतां कृपा करून चलावें आपण. आज आपला हेतू पूर्ण होण्यास आतां वेळ राहिली नाहीं. उगीच आमची आणि आपली अब्रू घालविण्यांत कांहीं अर्थ नाहीं." हिरण्यगुप्त जाण्याला कांकूं करूं लागला. तेव्हां दासींनीं अर्धचंद्राचा प्रयोग करून त्याला घराबाहेर घालवून दरवाजाला कडी लावली. नंतर, काजळाचें फडकें नेसलेला, नख-शिखांत काजळाच्या तेलानें माखलेला, पदोपदीं रस्त्यावरील कुत्रीं तेलाच्या वासाला लुब्ध होऊन ज्याच्या अंगाचा चावा घेऊं पाहत आहेत, अशा थाटानें लाजत लाजत मोठ्या संकटानें तो दुष्ट वाणी आपल्या घरीं येऊन पोहोंचला. घरच्या सेवकांच्या समोरही जाण्यास त्याला फार लाज वाटली; परंतु करतो काय? त्यांच्याकडून त्यानें आपलें आंग धुववून स्वच्छ करविलें. परंतु स्त्रीला तोंड देखील दाखविण्यास त्याला धीर होईना. खरोखर अनीतीचें आचरण, केवढाही मोठा मनुष्य असला तरी त्याला लज्जा उत्पन्न करतें !

इकडे उपकोशा प्रातःकालचें सर्व नित्यकृत्य आटपून सासूला न विचारतां दासींसहवर्तमान त्या नगरीचा राजा जो नंद त्याच्या सभेंत गेली. आणि विनंति करून म्हणाली कीं, "महाराज ! वररुचिनामक प्रसिद्ध विद्वान् ब्राह्मणाची मी धर्मपत्नी आहें. माझा पती हिमाचलावर तप करण्याकरितां गेला आहे. जाण्यापूर्वीं घरच्या खर्चाकरितां म्हणून, हिरण्यगुप्तनांवाच्या सावकाराजवळ त्यानें कांहीं द्रव्य ठेवलें आहे. तें मी वारंवार मागत असतां तो सावकार देत नाहीं. आपण न्यायाधिकारी असून

धर्मांचे प्रभु आहां. तर खऱ्या खोट्याचा निर्णय करून माझें द्रव्य मला मिळण्याविषयीं आज्ञा व्हावी." नंदराजानें ही तिची विनंति ऐकून हिरण्यगुप्ताला तेथें बोलावून आणिलें. आणि उपकोशेचें काय मागणें आहे तें त्यांला सांगितलें. त्यावर हिरण्यगुप्त ह्मणाला, "महाराज! माझ्याजवळ हिचें कांहींच नाहीं. स्त्रिया लबाड असतात. त्या पाहिजे त्यावर पाहिजे तसें बालंट घेतात. हिला पैशाची अडचण असेल ह्मणून हिनें मुद्दाम हें माझ्यावर कुभांड रचलें आहे. सरकार न्यायमूर्ति आहे; तर ही मजवरील तोहमत काढून टाकावी." हें त्याचें बोलणें ऐकून राजा मनांत ह्मणाला, 'हें मोठेंच गूढ आहे. ही स्त्री तर खरी साध्वी दिसते. द्रव्याकरितां ही खोटें बोलेल असें वाटत नाहीं. बरें, हिरण्यगुप्तही चांगला प्रसिद्ध सावकार आहे, हा खोटें बोलेल हेंही संभवत नाहीं. तेव्हां आतां येथें न्याय तो कसा करावा?' असा विचार करून उपकोशेला ह्मणाला, "बाई, तुझ्या नवऱ्यानें याच्याजवळ द्रव्य ठेवलें त्याला कोणी साक्षीदार आहे काय?" ती म्हणाली, "होय, माझा भर्ता प्रवासाला जाऊं लागला, तेव्हां त्याणें घरचे देव साक्षीस ठेवून द्रव्य याच्या हवालीं केलें. ते सारे देव एका पेटींत बंद करून ठेवलेले आहेत. पाहिजे तर ते साक्ष देतील."

हें ऐकून राजा नंदाला फारच आश्चर्य वाटलें. तत्काल त्याणें सेवकांला आज्ञा करून ती पेटी सभेंत आणविली. नंतर उपकोशा तिच्याजवळ जाऊन मोठ्यानें म्हणाली, "देवतांनों, तुम्हाला फार वेळ बंधनांत रहावें लागलें; पण मी आतां तुमची लवकरच सुटका करतें बरं. हें पहा, ही राजसभा आहे, हिरण्यगुप्त शेटजीनें घरीं माझ्याजवळ जें भाषण केलें तें खरें खरें सांगा, म्हणजे मी तुम्हाला आतांच सोडून देईन." हें ऐकून पेटींत असलेले कुमारसचिव, कोतवाल, आणि राजपुरोहित तिघेही भ्याले आणि मोठ्यानें— "होय. आमच्या समक्ष त्यानें कबूल केलें आहे कीं, तुझ्या नवऱ्यानें ठेवलेलें द्रव्य माझ्याकडे आहे आणि तें मी पाहिजे तेव्हां परत देईन," असें म्हणाले. देवतांचें हें भाषण ऐकून राजा व सभेंतील सर्व लोक अगदीं चकित झाले.

हिरण्यगुप्ताचें तोंड खरकन् उतरलें. तो घाबरून म्हणाला, " महाराज, मी चुकलों मला आठवण नव्हती म्हणून मी आधीं नाहीं म्हटलें. पण आतां मला स्मरण झालें. हिच्या नवऱ्यानें माझ्याजवळ द्रव्य ठेवलें आहे खरें. आणि तें मी देण्यासही कबूल आहें, मात्र अपराधाची क्षमा असावी." याप्रमाणें हिरण्यगुप्त कबूल झाला असें पाहून नंदराजानें त्याला सांगितलें, " तूं प्रथम साफ नाकबूल झालास हा मोठाच अपराध केलास, त्याबद्दल तुला अवश्य दंड केला पाहिजे; परंतु तुझ्या घराण्याकडे पाहून व हा तुझा पहिलाच अपराध आहे ह्मणून आह्मी क्षमा करतों. आतां जा, आणि या साध्वीचें जें कांहीं द्रव्य तुझ्याजवळ आहे तें त्वरित घेऊन ये." अशी राजाची आज्ञा होतांच हिरण्यगुप्तानें घरीं जाऊन त्याच्याजवळ ठेवलेलें सर्व द्रव्य सभेंत आणलें. नंतर राजानें सर्वांसमक्ष तें उपकोशेच्या हवालीं केलें, आणि तिला म्हणाला, " बाई, तुझ्या भर्त्यानें ठेवलेलें द्रव्य तुला मिळालें ना? आतां खुशाल आपल्या घरीं जा, आणि सुखानें रहा. पण जाण्यापूर्वीं तुला एका गोष्टीचा उलगडा करावयास सांगावें अशी आमची फार इच्छा आहे. या तुझ्या साक्षीदारांचा आम्हास मोठाच चमत्कार वाटतो. लोकांच्या घरोघर गृहदेवता आहेत; पण त्या कधीं कोणाशीं बोलत नाहींत व त्यांला कधीं कोणी पेटींत कोंडूनही ठेवीत नाहीं! तुझ्या ह्या गृहदेवता कांहीं चमत्कारिक आहेत. त्या साक्ष देखील देतात! तेव्हां हें आहे तरी काय? याचा थोडा खुलासा करशील तर आम्हावर उपकार होतील." हें ऐकून तिला अंमळ कठीण तर वाटलेंच; पण त्यांतच हसुंही आलें. तिनें, " आतां सर्वांची शंका निवृत्त करतें," असें म्हणून एकदम पेटी उघडली. तेव्हां आंतून, नखशिखांत काजळानें माखलेल्या तीन मूर्ती प्रकट झाल्या! मग काय विचारतां? प्रथम, हीं कोणी भुतें असावीं असेंच सर्वांस वाटलें. आणि त्यांच्याकडे पाहून कित्येक भयभीतही झाले; पण बराच वेळ गेल्यावर राजा व प्रधान इत्यादिकांनीं त्या तिघांलाही बराबर ओळखलें. तेव्हां मोठाच हशा पिकला. अहो पुरोहितबुवा, असे इकडे

या. अहो कोतवालसाहेब, आपण हें कसलें उटणें अंगाला लावलें आहे ? अहो कुमारसचिव, आज हा कसला खेळ आहे ? " याप्रमाणें प्रत्येकांचीं नांवें घेऊन घेऊन सर्व लोक त्यांची थट्टा करूं लागले. मग राजानें विचारल्यावरून उपकोशेनें मूळापासून इत्थंभूत सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून उपकोशेची वाहवा करून सभासद म्हणाले, " उत्तम शीलानें ज्यांचें रक्षण केलें आहे अशा पतिव्रतांचें चारित्र मोठें अचिंत्य आहे. " नंतर मृतप्राय झालेल्या त्या तिघांना धिक्कारशब्दांनीं ताडण करून व त्यांचें सर्वस्व हरण करून त्यांस हद्दपार करण्याचा राजानें हुकूम केला. वाईट वर्तनापासून कोणाचें कधींच कल्याण व्हावयाचें नाहीं. नंदराजाचा उपकोशेविषयीं पूर्वींच चांगला ग्रह झाला होता. त्यांतून हा सर्व प्रकार पाहून तर तो फारच संतुष्ट झाला. त्याणें तिची अतिशय तारीफ करून तिला आपली बहीण असें म्हणून बहुत द्रव्य दिलें. आणि मोठ्या सत्कारानें घरीं पोंचविलें. तिकडे आमचे गुरु वर्षाचार्य आणि श्वशुर उपवर्षमुनी यांना हें वर्तमान समजल्यावरून त्यांना फारच आनंद झाला. जिकडे तिकडे उपकोशेच्या चातुर्याची आणि पातिव्रत्याची लोक विशेषच स्तुति करूं लागले.

इकडे मी हिमाचलावर तीव्र तप करून भगवान् पार्वतीपतीची आराधना केली, तेव्हां तो प्रसन्न झाला, आणि पाणिनीला त्यानें जें व्याकरणशास्त्र दिलें होतें तेंच मला देऊन त्यांतील न्यूनांश पूर्ण करण्यास आज्ञा केली. त्याप्रमाणें मी तें पूर्ण केलें. आपला मनोरथ सिद्ध झाल्यामुळें

१–प्रचारांत जिला 'संस्कृतभाषा' असें ह्मणतात, ती मुख्यत्वें देवांची भाषा अशी फार प्राचीन काळापासून समजूत आहे. हिला प्रथम व्याकरण नव्हतें. नंतर देवांनीं इंद्राची प्रार्थना केली, तेव्हां प्रथम इंद्रानें या भाषेचें व्याकरण केलें. त्याला 'ऐन्द्र व्याकरण' असें ह्मणत. नंतर चंद्रानें केलें, त्याला 'चान्द्र व्याकरण' असें ह्मणत. याशिवाय शाकटायन, गार्ग्य, स्फोटायन इत्यादि दुसरेही अनेक व्याकरणकार पूर्वीं होते व आतां सारस्वत, मुग्धबोध, कातत्र, हैम इत्यादि दुसरीं बरींच व्याकरणें आहेत परंतु पाणिनीयाचाच सर्वत्र प्रचार असून तेंच मुख्य आहे. पाणिनीच्या पूर्वीं ऐंद्र व्याकरणाचा विशेष प्रचार होता. महादेवानें त्याचा नाश केला. तेव्हांपासून पाणिनीच्या

मला फार आनंद झाला. आणि त्याच्या बहारांत इतके दिवस केलेल्या तपाचे व वाटेच्या श्रमांचें कांहींच कठीण न वाटतां शंकराच्या प्रसाद-रूप अमृतसेवनानें तृप्त होत्साता मी लवकर घरीं येऊन पोंहचलों. गांवांत येतांच प्रथम मातुश्रीला आणि गुरूंला नमस्कार करून बरोबरीच्यांला आलिंगन दिलें, लहानांनीं मला नमस्कार केला व वडिलांना मी केला. नंतर सर्वांची अनुज्ञा घेऊन मी आपल्या प्रियेच्या भेटीस गेलों. ती त्या-वेळीं दुःखाकष्टांनीं फारच कृश झाली होती. तरी कडक उन्हाळ्यांत सुकलेली जाईची कोमल वेल, मेघोदक प्राप्त होतांच जशी टवटवीत होते तशी ती माझ्या दर्शनानें हुषार झाली. तिचा आनंद गगनांत मावेनासा झाला. तिणें मी घरांतून निघून गेल्यापासून हावेळपर्यंत झालेली सर्व हकीकत सांगण्यास आरंभ केला. त्यांतच वर सांगितलेली कथाही मला सांगितली; ती ऐकून माझ्या मनांत अतिशय आनंद आणि विस्मय यांणीं एकाच वेळीं वास्तव्य केलें. आधींच तिच्यावर माझी अत्यंत प्रीति होती, ती यावेळीं फारच दृढ झाली. तिची तारीफ करून त्या तिच्या कामगिरीबद्दल मी तिला प्रेमालिंगनरूप बक्षिस दिलें. मग परस्परांच्या सुखदुःखाच्या गोष्टी बोलत मोठ्या आनंदानें आम्ही आपल्या घरीं राहिलों. इकडे वर्षाचार्य माझ्या मुखानें व्याकरण ऐकण्याविषयीं फारच

व्याकरणाचा सर्वत्र प्रचार झाला. याच्याविषयीं असें सांगतात कीं, पाणिनी व्याकरण मागूं लागला तेव्हां महादेवानें,—"ननाद ढक्कां नवपञ्चवारम्" ह्मणजे १४ वेळ आपला डमरू वाजविला, त्यापासून १४ सूत्रें झालीं. यांलाच 'शिवसूत्रें' ह्मणतात. यांच्या आधारानें पाणिनीनें सर्व सूत्रपाठ रचला. त्यांत बराच न्यूनांश होता. पाणिनीचे सर्वच नियम सर्वव्यापक झाले नाहींत. ह्मणून कात्यायनानें वार्तिकें करून त्यांची पूर्णता केली. विद्वान् लोकांत परंपरेनें अशी आख्यायिका चालू आहे कीं, कात्यायनानें आपल्या वार्तिकांत पाणिनीच्या सर्व सूत्रांचें अगदीं खंडन केलें होतें. ह्मणून तो पुनः ईश्वराला शरण गेला. तेव्हां शेषाचा अवतार पतंजली, यानें भाष्य करून त्यांत, आवश्यक होतीं तितकींच वार्तिकें घेऊन पाणिनीच्या सूत्रांवर व्याख्या केली. तेव्हां अर्थात् बाकीचीं वार्तिकें गुप्त होऊन पाणिनीचें व्याकरण सर्वमान्य झालें.

उत्सुक झाले होते. म्हणून तें स्वामिकार्तिकानें वर्षाचार्याला निवेदन केलें. व्याडी आणि इंद्रदत्त, अध्ययन पूर्ण झाल्यामुळें स्वगृहाला जावें अशी इच्छा फारदिवसांपासून करीत होते. तरी मी परत आल्यावर जावें असा त्यांणीं निश्चय केला होता. त्याप्रमाणें मी घरीं आलों. तेव्हां वर्षाचार्यांजवळ गुरुदक्षणा मागण्याविषयीं त्यांणीं विनंती केली. आमचे गुरुजी अगदीं निःस्पृह होते. त्यांणीं— "तुमच्या सेवेनेंच मी संतुष्ट झालों. आतां गुरुदक्षिणा दुसरी कांहीं नको. तुम्ही खुशाल आपापल्या घरीं जाऊन प्रपंच करा." असें वारंवार सांगितलें; तरी त्या दोघांनीं फारच आग्रह केला. तेव्हां राग येऊन गुरुजीनीं त्यांला एक कोट रुपये दक्षिणा देण्यास सांगितलें! पण इतके रुपये त्यांच्याकडे कोठून असणार? त्यांच्यावर हें एक मोठेंच संकट आल्यासारखें झालें. तथापि गुरूची आज्ञा मान्य करून, ते दोघेही माझ्याकडे आले. आणि मला म्हणाले "मित्रा! एक कोट रुपये गुरूला दक्षिणा द्यावयाची आहे. आमच्या जवळ तर त्यांतला दशांश देखील नाहीं. पण गुरूच्या आज्ञेप्रमाणें त्यांला दक्षिणा दिलीच पाहिजे. या नगरीचा राजा नंद मोठा द्रव्यवान् असून धर्मात्मा आहे. असें सांगतात कीं, त्याच्याजवळ नव्वद कोटी द्रव्य आहे. त्याच्यापाशीं गुरुदक्षिणेकरितां एक कोट रुपये मागावे असा आमचा विचार आहे. तर चल आम्हाबरोबर, त्याच्याकडे जाऊं या. तुझी स्त्री उपकोशा हिला त्याणें सर्वांसमक्ष आपली बहीण असें म्हटलें आहे. म्हणून तूं आतां त्याचा शालक झाला आहेस. नंदराजा आपल्या मेव्हण्याचें वचन अमान्य करील असें वाटत नाहीं?"

व्याडी आणि इंद्रदत्त हे दोघेही माझे गुरुबंधु होते, इतकेंच नव्हे तर जिवलग मित्र होते. त्यांच्या कामाकरितां मला गेलेंच पाहिजे होतें. या-

१—वर्षमुनीनें स्वामिकार्तिकाचें आराधन करून त्याला प्रसन्न करून घेतला होता, हें पूर्वी आलेंच आहे, कार्तिकस्वामीनें त्याला असा वर दिला होता, कीं "तूं माझें स्मरण करून जी विद्या आपणास यावी अशी इच्छा करशील, ती प्रत्यक्ष मीच येऊन तुला सांगत जाईन." त्याप्रमाणें वर्षाचार्यांनीं प्रार्थना केल्यावरून, स्वामिकार्तिकानें स्वतः येऊन कात्यायनाचें व्याकरण त्याला सांगितलें.

शेवाय त्या गुरुदक्षिणेंत माझाही संबंध होताच. गुरूला दक्षिणा दिल्या-शेवाय अध्ययनाची सांगता होत नाहीं. माझी बायको उपकोशा ही त्यक्ष गुरूच्या बंधूची, अर्थात् गुरूंचीच कन्या असल्यामुळें वर्षाचार्यांचा ी जामात झालों होतों. व समावर्तनाच्या वेळीं गुरुदक्षिणा माफ करून यांणीं मला विवाह करण्याविषयीं अनुज्ञा दिली होती; तरी त्या परम ज्य गुरूच्या इच्छेप्रमाणें दक्षिणा देऊन त्यांला संतुष्ट करावें आणि लोकांत न्यता मिळवावी अशी माझ्या मनांत इच्छा होतीच. यद्यपि यावेळीं याडी आणि इंद्रदत्त या दोघांलाच गुरूजींची आज्ञा झाली होती तथापि ी त्यांच्यापैकींच एक शिष्य असून प्रमुख होतों, अर्थात् त्या आज्ञेचा भार माझ्या शिरावर अधीक होता, ह्मणून त्या दोघांच्या बरोबर मीही राजाकडे जाण्याचा निश्चय केला. नंतर आह्मी तिघेही गुरुबंधू, त्यावेळीं अयोध्यानगरींत राजा नंदाची छावणी होती ह्मणून तेथें त्याला भेटण्या-करितां गेलों. आह्मी तेथें जाऊन पोहोंचलों त्याच वेळीं नंदराजाला अकस्मात् मृत्यु आला! नगरांत जिकडे तिकडे हाहाकार चालला होता. नंदराजा यथाधर्म, यथान्याय राज्य करीत होता; ह्मणून सर्व प्रजा त्याच्यावर फार प्रीति करीत असे. आह्मी, राजा परलोकास गेला असें पाहून फार खिन्न झालों आहों व आतां पुढें काय करावें याचा विचार करीत आहों, इतक्यांत इंद्रदत्त ह्मणाला, "वाः हें तर फारच चांगलें झालें! राजा मेला तरी कांहीं चिंता नाहीं. मीं परकायाप्रवेशविद्येनें राजाच्या देहांत प्रवेश करतों. व्याडीनें माझ्या कलेवराचें, मी परत येईपर्यंत रक्षण करावें. आणि मी गादीवर बसलों असेन अशावेळीं, वररुचीनें माझ्याजवळ दक्षिणा मागा-वयास यावें, ह्मणजे आपलें काम झालें. वररुची मागेल तितकें द्रव्य तत्काल त्याच्या पदरांत टाकून मी पुनः पूर्वकलेवरांत येतों ह्मणजे झालें." इंद्रदत्ताची ही युक्ती आह्मा दोघांलाही मान्य झाली. व लगेच तसें करायचें, असा आमचा संकेत ठरला.

याप्रमाणें आपसांत निश्चय करून नंदराजाच्या देहांत इंद्रदत्तानें प्रवेश

केला. तत्काल राजा जीवंत होऊन उठून बसला. त्याला पाहून सर्व लोकांस मोठें आश्चर्य वाटलें. "राजा परलोकाला जाऊन पुनः आला," असें सर्व लोक ह्मणूं लागले. तदनंतर शहरभर जिकडे तिकडे एकच आनंद आणि जयजयकार सुरू झाला. इकडे एका ओसाड देवालयांत व्याडीला इंद्रदत्ताचें कलेवर राखण्याला बसवून, मी राजवाड्याकडे गेलों. दोन चौक वलांडून तिसऱ्या चौकांत सुवर्णाच्या सिंहासनावर राजकार्यें करित बसलेल्या, नंदराजाच्या शरीरांत प्रवेश केलेल्या इंद्रदत्ताजवळ जाऊन गुरुदक्षणेकरितां एक कोट रुपये मागितले. तत्काल तो मला ओळखून, शकटाल नांवाच्या प्रधानाला कोट रुपये देण्यास आज्ञा करिता झाला. शकटाल जातीचा कायस्थ असून मोठा बुद्धिमान् होता. राजा मरून पुन्हा जीवंत झाला व लगेच मी दक्षिणा मागावयास गेलों, मला पाहून हां नाहीं, कांहीं न ह्मणतां एकदम इतके रुपये देण्याची त्यानें आज्ञा केली; हें पाहून त्या धूर्ताच्या मनांत कांहीं संशय आला. खरेंच आहे, बुद्धिमानाला अगम्य असें काय आहे ? असो, त्या चतुर प्रधानाच्या मनांत या सर्व गोष्टींचें तत्व तेव्हांच आलें. आणि "होय महाराज, देतों." असें राजाला सांगून, तो मनांत विचार करूं लागला कीं, 'नंदराजाचा मुलगा अगदीं लहान आहे. राज्याला मोठे मोठे अनेक शत्रु आहेत. तर ईश्वर कृपेनें कोणी तरी योग्यानें नंदाच्या कलेवरांत प्रवेश केला हें फार चांगलें झालें. ह्या ब्राह्मणाला ( वररुचीला ) द्रव्य द्यावें इतकेंच राजकलेवरांत प्रवेश करणाऱ्या योग्याचें कार्य असावें असें वाटतें. हें पुरें होतांच तो योगी कदाचित् पूर्वशरीरांत जाईल. तेव्हां याचा कांहीं तरी बंदोबस्त प्रथमच आपण केला पाहिजे.' असें मनांत आणून शकटालानें—"नगरांत अथवा आसपास शोध करून जितकीं ह्मणून प्रेतें मिळतील तितकीं त्वरित जाळून टाकावीं," असा सर्व सेवकांस एकसा हुकूम केला. तत्काल त्याणीं चहूंकडे शोध करून प्रेतें जाळावयाची सुरवात केली. या सपाट्यांत तिकडे त्या पडक्या देवळांत इंद्रदत्ताचें कलेवर होतें तेंही त्यांच्या हातीं मिळालें. तेव्हां

व्याडीला हुसकून देऊन त्यांणीं तें शरीर जाळून टाकलें. इकडे योगनंद, मला लौकर द्रव्य देण्याविषयीं शकटाल प्रधानाला वरचेवर सांगत होता. त्याणें सांगितलें, "महाराज आपण पुनः जीवंत झाल्यावरून नगरांत जिकडे तिकडे उत्सव चालला आहे. सर्व सेवकजन तिकडे गुंतले आहेत. याकरितां क्षणभर अवकाश मिळाला पाहिजे. मी इतक्यांत ब्राह्मणाच्या पदरीं रुपये घालतों." असें सांगून त्यानें राजाचें (इंद्रदत्ताचें) समाधान केलें. इतक्यांत व्याडीही तेथें आला.

तो (व्याडी) मोठा दुःखित होत्साता राजाजवळ येऊन मोठ्यानें म्हणाला "अब्रह्मण्यं! अब्रह्मण्यं! राजन्, काय अधर्म हा! अनुत्क्रांतजीव अशा एका योग्याचें शरीर तुझ्या सेवकांनीं, अनाथप्रेत असें समजून मी नको, नको म्हणत असतां बळेंच दहन करून टाकलें. काय अन्याय हा!" हें व्याडीचें भाषण ऐकून योगनंदाची अवस्था कांहीं चमत्कारिक झाली. पूर्व शरीर जळल्यामुळें मृत्यु येईपर्यंत याच (नंदराजाच्याच) शरीरांत आपणास राहिलें पाहिजे, म्हणून त्याला फार दुःख झालें. इकडे, व्याडीचें भाषण ऐकून आपल्या हेतूप्रमाणें झालें असें समजून शकटालाला फार आनंद झाला. त्यानें लगेच कोट रुपये माझ्या पदरांत घातले.

नंतर योगनंद व्याडीला एकांतीं नेऊन शोकाविष्ट होऊन म्हणाला, "वेड्या, काय अनर्थ झाला हा! मी ब्राह्मण असून सांप्रत शूद्र झालों आहें! ऐश्वर्य पुष्कळ आहे; पण त्याला घेऊन काय करायचें आहे? मी

---

१—नंदराजा मरून पुनः जीवंत झाला, या संबंधानें लोकांच्या दोन प्रकारच्या समजुती झाल्या. कोणी असें समजले कीं, राजा तर खरोखरच मेला; पण त्याच्या शरीरांत कोणी योग्यानें प्रवेश केला आहे. आणि कांहीं लोक असें समजले कीं, नंदराजानेंच योगसाधनानें कांहींवेळ आपले प्राण दुसरीकडे कोठें नेले होते ते त्याणें परत आणले. सारांश हा सर्व योगाचा चमत्कार आहे, असें मानून त्या दिशाभागानून सर्व लोक राजाला योगनंद ह्मणूं लागले असावे असें दिसतें.

२—हा एक पारिभाषिक शब्द आहे. अन्यायानें अथवा जुलमानें कोणतें कृत्य झालें असतां दुःखप्रदर्शन करण्याच्या कामीं या शब्दाचा संस्कृत भाषेंत उपयोग करीत असतात.

कसें तरी करून आतां प्राणत्याग करण्याचा यत्न करतों." हें ऐकून त्याच्या बोलण्याचा निषेध करून, व्याडीनें सांगितलें, " छेः असें करूं नको. जें झालें तें झालें. शूद्राचा देह असला म्हणून काय झालें ? तुझें ब्राह्मण्य कांहीं नष्ट व्हायचें नाहीं. यथाधर्म, यथान्याय प्रजेचें रक्षण करून ईश्वराचें आराधन कर म्हणजे सार्थक होईल. पण दुसरी एक महत्वाची गोष्ट तुला सांगतों. हा **शकटाल** प्रधान मोठा धूर्त आहे. त्याला ही सगळी गोष्ट समजली आहे. त्यानेंच तुझें शरीर मुद्दाम जाळविलें. तर याच्याविषयीं मात्र पुर्ता सावध रहा. हा कधीं तरी— तूं त्याच्या मर्जीप्रमाणें न वागशील तर— तुला दगा देऊन खऱ्या **नंदराजाच्या** पुत्राला राज्यावर बसवील. **शकटाल** मोठा मसलती आहे. तो **नंदाचा** मुलगा **चंद्रगुप्त** प्रौढ होण्याची वाट पाहत बसेल. तर तूं त्याला अधिकारावरून दूर करून **वररुचीलाच** प्रधान कर, म्हणजे हें तुझें राज्य यथास्थित चालेल. **वररुचीचा** बुद्धिप्रभाव तुला माहितच आहे." असें बोलून व इंद्रदत्ताचें समाधान करून **व्याडी** तेथून निघाला तो थेट त्या पडक्या देवळांत, मी त्याची वाट पहात बसलों होतों तेथें आला. त्याणें मला तेथेंच राहण्यास सांगितलें आणि माझ्यापासून द्रव्य घेऊन गुरूला देण्याकरितां तो निघून गेला. इकडे **व्याडीनें** सांगितल्याप्रमाणें **योगनंदानें** मला बोलवून प्रधानकीचीं वस्त्रें दिलीं. थोडे दिवस मीं **शकटालाबरोबर** कारभार चालवून अनुभव घेऊन पाहिला. त्यावरून माझी खातरी झाली कीं, **शकटाल** जोंपर्यंत तेथें असेल तोंपर्यंत राज्यकारभार सुयंत्र चालावयाचा नाहीं; असें पाहून एके दिवशीं एकांतीं मी **नंदराजाला** सांगितलें "ब्राह्मण्य हारवून बसलास आणि हें राज्य संपादन केलेंस, परंतु जोंपर्यंत **शकटाल** अधिकारावर असेल तोंपर्यंत तुझ्याकडे हें स्थिर राहील असें मला वाटत नाहीं. याकरितां— चिरकाल राज्य करावयाचें मनां असेल तर,— युक्तिप्रयुक्तीनें या **शकटालाचा** नाश कर. म्हणजे तुझें कल्याण होईल !" राजाला हें माझें म्हणणें मान्य झालें. त्यां

युक्तीनें शकटालाच्या हातचीं सर्व कामें काढून त्याला आपल्या घरीं अगदीं रिकामा बसविला, तरी तो मोठा बुद्धिमान्, अनुभवी व राज्यांतला पुरता माहितगार असून फार खटपटी असल्यामुळें, बसल्या ठिकाणाहून कांहींतरी घोटाळे उत्पन्न करूं लागला. तेव्हां योगनंदाला त्याचा फारच राग आला आणि त्याणें एक मोठी विहीर तयार करून — ' शकटालानें जीवंत असलेला योगी जाळला म्हणून त्याला ही जिवंत गाडण्याची शिक्षा करतों ' असा सर्वत्र पुकारा करून त्याच्या शंभर पुत्रांसहवर्तमान, शकटालाला त्या विहिरींत ढकलून दिला. प्रतिदिवशीं एक गाडगें भरून सत्तू आणि एक गाडगेंभर पाणी त्या शुष्क विहिरींत शकटाल आणि त्याच्या मुलांच्या निर्वाहाकरितां सोडण्यांत येत असे.

अशा अंधकूपांत पडलेल्या कोणत्याही मनुष्याला वांचण्याची आशा कोठून असणार ! पण त्या कायस्थाच्या मनाची स्थिति फार निराळ्याच प्रकारची होती. त्याच्या ईर्ष्येनें इतका जोर खाल्ला होता कीं, आपल्याला नाश करणाऱ्या नंदराजाचा सूड घेतल्यावांचून राहावयाचें नाहीं. तो आपल्या सर्व पुत्रांला ह्मणाला, " मुलांनों, हे सत्तू आणि हें पाणी इतकें एकाच मनुष्याच्या निर्वाहास पुरेसें होईल. यांत आह्मा सर्वांचा गुजारा व्हावयाचा नाहीं. अर्थात् हें वांटून घेतलें तर एकाचेंही पोट न भरतां सर्वच आह्मी उपाशीं राहूं. तर माझी अशी इच्छा आहे कीं, कोणीतरी एकानें हे सत्तू खाऊन आपला शत्रू योगनंद याचा सूड उगविण्याकारितां जीवंत रहावें. ह्मणून मी ह्मणतों कीं, तुह्मांपैकीं ज्याची मर्जी असेल त्याणें हें काम पत्करावें !" हें ऐकून सर्व मुलांनीं सांगितलें कीं, " बाबा, योगनंदाचा सूड उगाविण्याला तुम्हीच समर्थ आहां. आमच्यानें तें काम व्हावयाचें नाहीं; याकरितां हे सत्तू आणि पाणी तुम्हींच घ्या. आणि जिवंत राहून राजाचा सूड घ्या. ते

१—उत्तरहिंदुस्थानांत 'सत्तू' खाण्याचा विशेष प्रचार आहे. जव (सातु,) अथवा गहूं. हरभरे मिसळून भाजून त्याचें पीठ करितात, त्यालाच सत्तू ह्मणतात. हे गुळा बरोबर पाण्यांत कालवून खातात.

आह्माला नकोत. आम्ही मेलों तरी चिंता नाहीं." याप्रकारें मोठ्या धैर्यशाली पुरुषांना उचित असें शकटालाच्या पुत्रांनीं भाषण केलें. खरोखर मानीपुरुषाला आपल्या प्राणापेक्षांही शत्रूचा प्रतीकार करणें फार प्रिय असतें !

तदनंतर **शकटाल** एकटाच सत्तू आणि पाणी यांचा उपभोग करूं लागला. जे लोक केवळ आपलेच प्राण वांचविण्याविषयीं इच्छा करितात, ते प्रसंगीं स्वभावानें फार क्रूर देखील होतात. नाहीं तर प्रत्यक्ष आपले पुत्र अन्नावांचून पटापट मरत असलेले आपण पाहत असतां, बापाच्यानें यथेच्छ सत्तूवर ताव मारवला असता काय? विहिरींत दुःखकारक स्थितींत असलेल्या **शकटालाला** पूर्वींच्या आपल्या अनेक गोष्टी स्मरून, तो मनांत म्हणत होता, " राजाजवळ सेवा करणारांनीं त्याचें मन पुर्तेपणीं जाणल्यावांचून, —ज्याला आपलें कल्याण करून घ्यावयाचें असेल त्याणें—यथेच्छ रीतीनें त्याच्याजवळ वागूं नये. जो मनुष्य असावधपणानें राजाजवळ वागतो, त्याचा कदाचित् नाश न झाला तरी तो स्वार्थाला मुकल्यावांचून राहणार नाहीं. जो राजाला आपला मित्र असें समजून, त्याच्याशीं सलगी करितो तो सर्पाशींच खेळतो." याप्रकारच्या अनेक गोष्टी त्याच्या मनांत येत असत. आपण राजाची परवा ठेवली नाहीं, याचा त्याला मोठा पश्चात्ताप होत असे. अन्न न मिळाल्यामुळें क्षुधेनें पीडित होऊन त्याचे शंभरही पुत्र त्याच्या देखत टांचा घांसून मेले. पुत्रांचें मरण पाहून अतिशय दुःखित झालेल्या **शकटालानें** केवळ वैर फेडण्याच्या उमेदीवरच कसे तरी प्राण धारण केले. **शकटाल** याप्रमाणें प्रतिबंधांत पडल्यामुळें राज्यकारभारांत गडबड नाहींशी झाली. **योगनंद** स्वतः साम्राज्यपदवी चालवूं लागला. त्याच्या राज्यरूप भव्य इमारतीचा पाया आतां नीट बसत चालला होता.

इकडे गुरूला दक्षिणा देऊन, **व्याडी** पुन्हः **योगनंदराजाला** भेटण्याकरितां आला. रितीप्रमाणें आशीर्वाद देऊन एकांतीं तो **योगनंदाला** म्हणाला, " मित्रा! तूं बहुत दिवस राज्य कर. मी यावेळीं केवळ तुझा

निरोप घेण्याकरतांच आलों आहें. मला संसारसुखाची आतां विशेष आशा नाहीं. कोठें तरी तप करावयास जाण्याचा माझा निश्चय झाला आहे. तर मला तुझा निरोप असावा." हें ऐकून **योगनंदाला** मोठें दुःख झालें. प्रेमानें त्याचा गळा दाटून आला. कांहीं वेळानें **व्याडीच्या** गळ्याला मिठी घालून **योगनंद** म्हणाला, "गड्या, तुला मी खरेंच सांगतों, मला सोडून तूं कोठें जाऊं नको. मला मिळालेलें हें सगळें राज्य तुझें आहे. अद्याप तुझें वय फार झालेलें नाहीं. कांहीं काळ माझ्याबरोबर विषयसुखाचा उपभोग करून मग म्हातारपणीं तप करण्याला जा. एवढें माझें ऐक." हें ऐकून **व्याडी** म्हणाला, "होय, तुझें वचन अमान्य करावें असें नाहीं. जसा मित्रवियोग तुला असह्य वाटतो तसाच मलाही असह्य आहे. आणि विषयोपभोग कोणाला नकोसे आहेत? हें सर्व खरें आहे; पण एक मोठी अडचण आहे. ती इतकीच कीं, माझें आयुष्य किती आहे तें मला अद्याप कळलें नाहीं! तें जर माहीत झालें असतें तर तुझें सांगणें खुशाल मी ऐकलें असतें. या देहाला क्षणभंगुर ह्मणतात. आणि आयुष्य किती आहे हें तर माहीत नाहीं अशा स्थितींत तुच्छ विषयांवर कोण बुद्धिमान् पुरुष आसक्त होईल? मृगजलाप्रमाणें अस्थिर राहणारी लक्ष्मी बुद्धिमान् पुरुषाला मोहित करीत नाहीं. तूं बुद्धिमान् आहेस, तेव्हां याहून कांहीं विशेष सांगितलें पाहिजे असें नाहीं. माझा निश्चय झाला तो झाला. परमेश्वर तुझें कल्याण करो. तूं या विषयसमुद्रांत यथेच्छ डुंबत रहा; पण प्रमत्त मात्र होऊं नको. प्रमत्त होशील तर आपला घात करून घेशील, आणि शेवटीं या सर्वांचा त्याग करून मुक्तसंग होऊन आत्मसाधन कर. खरेंच, याहून अधिक मला कांहीं सांगावयाचें नाहीं. आतां मी येतों." असें बोलून **व्याडी** तत्काल तप करण्यास निघून गेला. मग निरुपायामुळें मित्रवियोगाचें दुःख कसें तरी सहन करून **योगनंद पाटलिपुत्र**नांवाच्या स्वकीय राजधानीला माझ्यासहवर्तमान जाण्यास निघाला. बरोबर हजारों घोडे हत्ती इत्यादि सैन्य घेऊन आह्मी राज-

धानींत प्रवेश केला. सर्व कार्यांची नीट व्यवस्था लावून मी **योगनंदाच्या** राज्याची धुरा आपल्या मानेवर धारण करून, माझी प्रियपत्नी **उपकोशा,** वृद्ध मातुश्री, गुरु इत्यादिकांसहवर्तमान सुखानें ऐश्वर्याचा उपभोग करीत राहिलों. **गंगेच्या** कृपेनें मला प्रतिदिवशीं सुवर्ण मिळत होतें. माझ्या भक्तीनें प्रसन्न झालेल्या **लक्ष्मी** आणि **सरस्वती** प्रत्यक्ष दर्शन देऊन माझीं कामें करीत असत."

याप्रमाणें कथा सांगून **वररुची** ह्मणाला, " काणभूते, येथवर सांगितलेली कथा हें माझ्या चरित्राचें पूर्वार्द्ध झालें. कारण, साधारणतः प्रत्येक मनुष्याला त्याचें 'बाळपण संपून विद्याभ्यास करून तो कांहीं प्रापंचिक धंद्याला लागेपर्यंतचें त्याचें वय सरासरी निम्म्यावर येतें. आतां तुला पुढचा वृत्तांत सांगतों. पूर्वीं सांगितल्याप्रमाणें मी अकंटक राज्य चालवीत असतां बरेच दिवस आनंदानें लोटले. सर्व प्रजा परम संतोषानें राजा **योगनंद** याचें अभीष्टचिंतन करीत होत्या. पण ही स्थिति शेवटपर्यंत टिकली नाहीं. आतां आपल्याला कोणी शत्रु नाहीं, असें वाटून **योगनंद** निष्काळजी झाला. तेव्हां हळूच कामादिक विषयांवर त्याचें मन आसक्त झालें. असें होतां होतां कांहीं दिवसांनीं विषयसेवनावांचून त्याला दुसरें कांहींच सुचेनासें झालें. तो गजेंद्राप्रमाणें उन्मत्त होऊन रात्रंदिवस विषयांच्या धुंदींत राहूं लागला. खरेंच आहे, अकस्मात् आणि प्रयत्नावांचून जर मोठी लक्ष्मी प्राप्त झाली तर कोणाचे डोळे फिरणार नाहींत? राजाची तशी स्थिति पाहून मी विचार केला कीं,– 'हा (राजा) तर विशृंखल झाला आहे. राजकार्यांची चिंता करतां करतां माझा सारा वेळ जातो. स्वधर्माचें आचरण करण्याला मला मुळींच अवकाश मिळत नाहीं. याकरितां त्या **शकटालाला** वर काढून आपल्याबरोबर राज्यकारभारांत घ्यावा. म्हणजे अंमळ भार तरी कमी होईल. **शकटाल** हा मोठा चतुर असून अनुभवी आहे, राज्यकारभारांत त्याचा आपल्याला फार उपयोग होईल तथापि राजा **योगनंदाचा** तो हाडवैरी आहे. तो कधींना

कधीं तरी सूड उगविणार असें जरी आहे तरी तो करणार तें काय ? मी जीवंत आहें तोंपर्यंत त्यानें पाहिजे त्या मसलती केल्या तरी मी त्या मोडून टाकून, त्याचा नाश करीन. **योगनंदाचें** त्याच्या हातून काय वाकडें व्हायचें आहे ? ' असा विचार करून राजाला सांगून **शकटालाला** कूपांतून बाहेर काढविला. आणि त्याचा सत्कार करून, मी राज्य-कारभार त्याच्या स्वाधीन केला. तोही मनांत म्हणाला, '**योगनंद** तर स्वतः असावध आहे. त्याचा सूड सहज उगवितां येईल; पण **वररुची** जवळ असेल तर माझ्यानें त्याचें कांहीं वाकडें व्हायचें नाहीं. याकरितां मी आतां वेतासारखी वृत्ती धारण करून समयाची वाट पहात राहावें हेंच योग्य आहे.' असा विचार करून तो माझ्या इच्छेप्रमाणें सर्व कारभार चालवूं लागला. खरोखर— ' ब्राह्मण हे बोलतांना मात्र कठोरसे दिसतात; पण त्यांचें हृदय अतिशय कोमल असतें,' असें जें म्हणतात तें अगदीं खरें आहे. **शकटा-लाची** ती नम्रता पाहून माझ्या मनांत त्याच्याविषयीं अगदीं शंका येईनाशी झाली. **योगनंदाचें** तर त्याच्याशीं हाडवैर होतें. परंतु त्यालाही त्याचें विस्मरण झालें. कसें झालें तरी त्याचें जड शरीर मात्र शूद्राचें होतें; परंतु आत्मा ब्राह्मणाचाच असल्यामुळें राजाच्या मनाचा कोमलपणा कायम होता. आम्हा उभयतांची मात्र अशी स्थिति झाली होती. परंतु **शकटालाची** स्थिति याहून फार निराळी होती. साखरेंत घोळलेल्या सुरीप्रमाणें तो वर गोड होता; तरी त्याच्या मनांत वैराग्नी धुमसत होता. इतकेंच कीं, तो मोठा बुद्धिमान् व दक्ष असल्यामुळें त्याच्या मनाची खरी स्थिती कोणत्याही प्रसंगीं व्यक्त होत नसे. असो, याप्रमाणें बरेच दिवस लोटले.

एकेदिवशीं **योगनंद** नगराबाहेर फिरत फिरत गंगेच्या काठीं गेला होता. तेथें नदीच्या मध्यभागीं, पांचही बोटें एकमेकांला चिकटलीं आहेत असा एकच हाताचा पंजा पाण्यावर एकाएकीं दिसूं लागला. तो चमत्कार पाहून जवळच मी उभा होतों, तेव्हां राजानें " हें काय ? " ह्मणून मला

विचारलें. मी तत्काल ज्या दिशेला तो पंजा दिसत होता त्या दिशेकडे आपल्या हाताचीं दोन बोटें दाखविलीं. तेव्हां तत्क्षणीं तो पंजा दिसेनासा झाला. तें पाहून राजाला फारच आश्चर्य वाटलें. तो वरचेवर, "हा काय चमत्कार झाला तो मला सांग," ह्मणून माझ्या पाठीस लागला. मी म्हटलें, राजा त्यांत कांहीं विशेष चमत्कार नाहीं. त्या पंजानें आपलीं पांच बोटें एकमेकांला लावून दाखविलीं. यावरून तो असें सुचवीत होता कीं, पांच असामी एक विचारें चालतील तर या जगांत काय सिद्ध होणार नाहीं? त्याला मी दोनच बोटें दाखवून सांगितलें कीं, पांचांची काय गरज आहे? दोघेच जर एकविचारानें चालतलि तर पाहिजे तें कार्य सिद्ध करतां येईल! हें माझें उत्तर योग्य वाटल्यावरून तो पंजा दिसेनासा झाला." याप्रमाणें मी गुप्त गोष्टीचा खुलासा करून सांगितल्यावरून राजाला फार संतोष झाला. परंतु आह्माबरोबर असलेल्या **शकटालाला** फारच खेद वाटला. तो मनांत ह्मणाला, 'ह्या **वररुचीची** बुद्धी अगाध आहे. याच्या पुढें माझें कांहीं चालायचें नाहीं. तथापि दैवावर भरंवसा ठेवून समयानुसार यत्न करण्याचें सोडतां कामा नये.'

एकेसमयीं **योगनंदाची** पट्टराणी पांचवे दिवशीं न्हालेली असून खिडकींत उभी राहून बाहेर पाहात होती. यावेळीं समोरच्या मार्गानें एक परस्थ ब्राह्मण येत होता, त्याची सहज खिडकीकडे दृष्टी गेली. तेव्हां तो शुद्धभावानेंच; पण कांहींसा उन्मुख होऊन तिच्याकडे पहात पहात पुढें आला. राणीच्या जवळच **योगनंद** उभा होता, त्याला ब्राह्मणाचें तें वर्तन पाहून फार राग आला. त्यानें तत्काल त्याला ठार मारून टाकण्याविषयीं आज्ञा केली! खरोखर हें कृत्य फारच अयोग्य होतें; पण ईर्ष्या ही विवेकाचा शत्रू आहे. राजाला ब्राह्मणाविषयीं ईर्ष्या उत्पन्न झाल्या कारणानें योग्यायोग्य विचार नाहींसा झाला.

पण उपाय काय? सेवक ब्राह्मणाच्या मुसक्या बांधून त्याला वध्यस्थानाकडे नेऊं लागले. जात असतां, वाटेंत एका खाटकाच्या दुकानांत

मेलेला मासा पडला होता तो मोठ्यानें हंसला. हा चमत्कार पाहून दूतांनीं राजाला तें वर्तमान सांगितलें. राजानें ब्राह्मणाला मारण्याचें तहकूब केलें आणि मला, माशानें हसण्याचें कारण काय? ह्मणून विचारलें. मी, "विचार करून मग सांगेन," असें बोलून तेंथून निघून एकांतीं बसून सरस्वतीचें ध्यान केलें. ती तत्काल उपस्थित होऊन म्हणाली, "तुला माशाच्या हसण्याचें कारण समजलें पाहिजे आहे काय? आज रात्रीं ह्या समोरच्या ताडाच्या झाडावर गुप्तपणें बैस. ह्मणजे मासा कां हंसला त्याचें खरें कारण निःसंशय तुझ्या कानीं पडेल." सरस्वतीचें वचन ऐकून मी फारच उत्सुक झालों. आणि तिच्या आज्ञेप्रमाणें रात्रीं ताड वृक्षावर चढून मी त्याच्या झावळ्यांत दडून बसलों. मध्य रात्रीच्या सुमारास पोरांबाळांसहवर्तमान एक भयंकर राक्षसी त्या ताडाच्या जवळच्या दुसऱ्या ताडावर आली. तिच्या पोरांनीं—"आई, कांहीं तरी खायाला दे." असें म्हटल्यावरून ती म्हणाली, "बाळांनों! तुम्हाला ब्राह्मणाचें मांस फार आवडतेंना? पण काय करूं? आज तो मेला नाहीं, उद्यां मरेल. तेव्हां मी तुम्हाला गोडसा खाऊ देईन बरें बाळानों!" यावर मुलांनीं विचारलें, "तो आज कां मेला नाहीं?" तेव्हां ती पुन्हा म्हणाली, "अरे, त्याला मारायास नेत होते, पण वाटेंत एक मेलेला मासा त्याला पाहून हंसला म्हणून राजानें मारायचें तहकूब केलें." पुनरपि मुलांनीं विचारिलें "मासा कां हसला?" राक्षसी म्हणाली, "पोरानों, याचें कारण फार गूढ आहे; तथापि मी तुम्हाला सांगतें. हें बघा, हा राजा कि नाहीं, अगदीं असावध आहे. त्याच्या जनानखान्यांतल्या सर्व बायका मोहित करून स्त्रियांचें रूप धारण करणारे पुरुष जिकडे तिकडे भरले आहेत. ते विशेष प्रसंगीं मात्र खऱ्या बायकांला पुढें आणतात. बाकी सारावेळ वेषधारी पुरुष त्याच्या भोंवतीं असतात. ज्या राणीला दृष्ट लावून पाहिलें म्हणून राजानें ब्राह्मणाला शिक्षा दिली, ती खरोखर स्त्री नसून तो वेषधारी पुरुष होता. तेव्हां अपराध नसतां ब्राह्मण मारला जात आहे ह्मणून मासा हंसला. आतां राजाला हें कसें समजलें नाहीं?

म्हणाल तर, अविवेकी राजा असला म्हणजे कपटी पुरुषांचे पाहिजे ते कावे चालतात!" असें बोलून मुलांचें समाधान करून राक्षसी कांहीं वेळानें तेथून निघून गेली. मग मींही वृक्षावरून हळूच खालीं उतरून आपल्या घरीं जाऊन स्वस्थ निजलों. दुसऱ्या दिवशीं राजाला मी रात्रीचें तें सर्व वर्तमान सांगितलें. त्यानें तत्काल अंतःपुरांतील सर्व स्त्रीरूपी पुरुषांस आणवून आपल्या समक्ष त्यांचा वध केला आणि त्या ब्राह्मणाचा सत्कार करून त्याला सोडून दिला. यावेळीं माझ्यावर तर राजा फारच प्रसन्न झाला होता. हें सर्व कृत्य कोणीं केलें व त्याचा हेतु काय? हें माझ्या मात्र लक्ष्यांत आलें होतें. **शकटा-लावांचून** दुसऱ्या कोणाचेंही हें काम नव्हे, अशी माझी पक्की खात्री झाली होती. तथापि मी त्याला कांहीं बोललों नाहीं. राजा **योगनंद** नेहमीं, वर सांगितल्याप्रकारचीं अनेक उद्दामपणाचीं कृत्यें करीत असे त्याचा मला फार कंटाळा आला होता; तथापि स्नेहपाशानें बद्ध होऊन मी त्याच्या जवळ राहिलों होतों. तरी कांहीं निमित्तानें त्याची संगती सुटेल तर बरें, असें वरचेवर माझ्या मनांत येत होतें. तो योग लवकरच आला.

एकेदिवशीं चित्रपट तयार करणारा एक कुशल चितारी तेथें आला. त्याणें **योगनंद** आणि त्याची पट्टराणी या उभयतांचीं चित्रें इतकीं हुबेहुब काढलीं कीं, त्यांत वाणी आणि चलन वलन असतें तर खरोखर तींच हीं, असें कोणीही ह्मणता. राजाला तसबिरी पाहून फार आनंद झाला. त्यानें चिताऱ्याला बहुत द्रव्य देऊन त्यापासून दोनीही तसबिरी घेऊन आपल्या महालांत ठेविल्या.

नंतर एकेदिवशीं कांहीं कामाकारितां मीं महालांत गेलों होतों, तेथें समोर असलेलें राणीचें चित्र पाहून खरोखर तीच आहे असें प्रथम मला वाटलें; पण विचार करून पाहतां त्यांत एक लक्षण कमी होतें त्यावरून, राणी नसून हें तिचें चित्र आहे अशी माझी खात्री झाली. आणि कंबरेच्या भागांत एक तीळ कमी होता तो काढून मी त्या चित्राची पूर्णता करून तेथून निघून गेलों. मागाहून **योगनंद** तेथें गेला.

त्यानें पूर्वी नसलेला तीळ पाहून,— "हा कोणी काढला?" म्हणून सेवकांकडे चौकशी केली. त्यांणीं माझें नांव सांगितलें. तेव्हां,—'राणीच्या गुप्त अवयवावर असलेला तीळ माझ्यावांचून दुसऱ्या कोणासही समजूं नये; असें असून तो वररुचीला कसा समजला? खरोखर त्यानें गुप्त-रूपानें माझ्या अंतःपुरांत कांहीं तरी घोटाळा केला असावा. नाहीं तर हा तीळ त्याच्या पाहण्यांत आला नसता. याशिवाय, मागें स्त्रीरूपी पुरुष अंतःपुरांत शिरले होते, तें तरी त्याला कसें समजलें असतें? एकंदरींत त्यानें अधमपणाचें कांहीं तरीं कृत्य केलें असावें यांत संशय नाहीं;' असा समज झाल्यावरून तो क्रोधानें लाल झाला. खरोखर अविचारी पुरुषाचें सर्वच वर्तन भयंकर असतें! त्यानें कांहीं विचार न करितां, शकटालाला बोलावून आणून,— "कांकूं न करितां माझ्या आज्ञेनें वररुचीला आतांचे आतां मारून टाक. त्यानें माझ्या राणीला भ्रष्ट केली आहे, तो मेला हें वर्तमान ऐकल्यावांचून माझ्या क्रोधाची शांती होणार नाहीं. तर जा त्वरा कर." असा हुकूम केला. शकटालानें— "जशी सरकारची आज्ञा," असें म्हणून मला मारून टाकण्याचें कबूल केलें. तो बाहेर येऊन विचार करूं लागला कीं, 'राजानें सांगितलें आहे; पण वररुचीला मारण्याचें माझें सामर्थ्य नाहीं. त्याच्या बुद्धीचा प्रभाव कांहीं विलक्षण आहे. त्यांतून माझा तर तो पूर्ण हितकर्ता आहे. तो नसता तर मी त्या अंधकूपांतच मेलों असतों. तेव्हां आपल्या प्राणदात्याला मारावें हें चांगलें नाहीं. याशिवाय तो ब्राह्मण आहे, विद्वान् ब्राह्म-णाचा वध कोणी करावा बरें? तें कांहीं असो. वररुचीला तर मारूं नयेच. तर त्याला गुप्तरूपानें आपल्या घरीं ठेवून त्याचें रक्षण करावें हेंच योग्य आहे,' असा निश्चय करून तो माझ्या घरीं आला; आणि निष्कारण राग येऊन राजानें मला मारण्याची आज्ञा केल्याचें वर्तमान त्यानें सांगितलें. तेव्हां,—"तुला जशी राजाची आज्ञा झाली असेल तसें कर. माझ्या कडून त्याला कांहीं हरकत नाहीं," असें म्हणून मी

त्याला आग्रहपूर्वक मारण्यास सांगितलें तरी त्यानें तें मान्य केलें नाहीं. तो ह्मणाला, " तुम्हाला मारण्यास मला धैर्य होत नाहीं. कृपा करून आपण माझी विनंती मान्य करून गुप्तरूपानें माझ्या घरीं राहण्याचें वचन द्या म्हणजे झालें. मी दुसऱ्या कोणाला तरी मारून तुह्माला मारल्याचा गांवांत पुकारा करतों. तुम्ही माझ्या हातून अथवा महाराजांच्या हातून देखील सुटून जाल. या नगरींत तुमचा पराभव करणारा एकही मनुष्य नाहीं. असें असून हा कंटाळवाणा अज्ञातवास स्वीकारण्याचें तुम्हाला कांहीं कारण नाहीं; हें मला माहीत आहे. तथापि केवळ माझ्यावर अनुग्रह करण्याकरितांच आपण अज्ञातवासाचा स्वीकार करावा. महाराजांचा स्वभाव किती उग्र आहे हें आपणांस माहीतच आहे! त्याच्या आज्ञेप्रमाणें तुमचा वध केला नाहीं असें त्यास समजेल, तर मला तो काय शिक्षा करील याचें अनुमानदेखील करतां येत नाहीं." अशी अनेक रीतीनें प्रार्थना करून **शकटालानें** माझे पाय धरले. मला त्याची फार दया आली. प्रथम, राजाला खडसून चांगला उपदेश करून त्याच्या देखत तपोवनास जावें असा विचार माझ्या मनांत आला होता. व मी तसें केलें असतें तर मला कोणी अडथळा करूं शकला नसता; पण गरीब बिचारा **शकटाल**मात्र बळी गेला असता! तेव्हां त्याच्यावर दया करावी ह्मणूनच मी त्याचें म्हणणें मान्य करून अत्यंत अयोग्य असा अज्ञातवास स्वीकारला. मीं **शकटालाच्या** गृहांत एका गुप्त प्रदेशांत राहिलों. त्याणें, दुसऱ्या कोणा एका मनुष्याला मारून—" **वररुचीला** मारला," असें राजास सांगितलें. व गांवांतही तशीच अफवा उठविली.

याप्रमाणें युक्ती चालवून पूर्ववत् सर्व कारभार **शकटाल** एकटाच चालवूं लागला, तरी प्रतिदिवशीं रात्रीं तो मला सर्व हकीकत कळवीत होता. एकेदिवशीं मी त्याला म्हटलें,—"तूंच एक राजाचा प्रधान म्हणवून घेण्यास योग्य पुरुष आहेस. वस्तुतः राज्यकारभार चालविणारे मंत्री, आपल्या बरोबरीचा अथवा अधिक बुद्धीचा दुसरा कोणी प्रधान असेल

तर त्याला मारून अथवा नाहींसा करून सर्व कारभार आपल्या हातीं घेण्याविषयीं नेहमीं प्रयत्न करीत असतात. तशी संधी तुला आयतीच प्राप्त झाली होती. परंतु तूं मला मारण्याचा प्रयत्न केला नाहींस. याबद्दल मी तुझी तारीफ करतों. खरोखर म्हणशील तर तूं मला मारण्याला समर्थ झाला नसतास. माझ्या बुद्धीचा प्रभाव घटकाभर एकीकडे ठेवला तरी एक बलाढ्य राक्षस माझा मित्र आहे. ज्यावेळीं मी त्याचें ध्यान करीन त्यावेळीं तो माझ्याजवळ प्राप्त होतो. त्याला सांगेन तर सर्व विश्व देखील तो खाऊन टाकील. हा राजा **योगनंद**, हा खरोखरीचा नंदराजा नव्हे. इंद्रदत्तनांवाचा एक ब्राह्मण माझा गुरुबंधु आहे, तोच सांप्रत तुझा राजा झाला आहे. ह्मणून कोणत्याही रीतीनें मी त्याचा नाश होऊं देणार नाहीं." हें ऐकून **शकटालाला** मोठें आश्चर्य वाटलें. तो माझ्या बोलण्यावर विश्वास ठेवीत होता; तरी राक्षसाच्या गोष्टीविषयीं त्याला कांहीं संशय आला असावा, असें त्याच्या मुद्रेवरून मला वाटलें. **शकटाल** म्हणाला, " तुमचा तो राक्षस एकवेळ मला दाखवाल तर माझ्यावर मोठा अनुग्रह होईल!" मला त्याची खात्री करायचीच होती. "आतांच दाखवितों," असें ह्मणून मीं अंमळ ध्यान करितांच तो राक्षस माझ्यापुढें येऊन उभा राहिला. त्याचें तें भयंकर रूप पाहून **शकटाल** अत्यंत भयभीत झाला व त्याला मूर्च्छादेखील आली. राक्षसाला मी जा ह्मणून सांगतांच तो तेथेंच गुप्त झाला. नंतर **शकटाल** सावध होऊन विस्मित होत्साता मला विचारूं लागला कीं, "या असल्या भयंकर राक्षसाशीं आपली मैत्री झाली तरी कशी ? तें कृपा करून सांगा."

असा त्याचा आग्रह पाहून मीं सांगितलें,—"पूर्वीं, ह्मणजे तूं विहिरींत होतास त्यावेळीं, या नगराचें रक्षण करण्याकरितां जो कोतवाल रात्रीं शहरांत फिरेल तो मरत असे. **योगनंदानें** पुष्कळ चौकशी केली; परंतु त्याचा कांहीं पत्ता लागला नाहीं. शेवटीं राजानें मलाच कोतवाल नेमून रात्रीं गस्तीवर जाण्यास सांगितलें. तेव्हां मी शहरांत रात्रीं फिरत

असतां, एक राक्षस माझ्या दृष्टीस पडला. त्यानें मला विचारलें, " या नगरांत सुरूप स्त्री कोण आहे तें मला सांगशील काय? " हें ऐकून हंसून मीं त्याला म्हटलें, " गड्या, विचारतोस काय ? जी ज्याला प्रिय असेल तीच त्याला सुरूप अशी वाटते." तें ऐकून राक्षस मला ह्मणाला, " तूं एकट्यानेंच मात्र मला जिंकलें. खरोखर, आजपर्यंत या नगराच्या रक्षणार्थ जो कोणी येई, त्याला मी हाच प्रश्न करीत होतों; पण त्याला उत्तर मुळींच देतां येत नसे, म्हणून त्याला मी मारीत असें. प्रतिदिवशीं असाच क्रम चालला होता; पण आजपासून तो मी सोडून देतों. तुझ्यावर मी प्रसन्न झालों आहें. तुझी आमची चिरकाल मैत्री असो. यानंतर ज्यावेळीं तूं माझें स्मरण करशील त्यावेळीं येऊन मी तुझें कार्य करीन." असें सांगून तो राक्षस गुप्त झाला. मींही गस्त पुरी करून घरीं आलों. ही राक्षसाची हकीकत तुला कदाचित् चमत्कारीक वाटेल. शाहण्या मनुष्याला त्याच्या प्रश्नाचें फारसें महत्व वाटणार नाहीं व त्याला पाहिजे तें उत्तर ज्याच्याकडून न मिळेल त्याला खाणें हा क्रूरपणा आणि मी मनासारखें उत्तर दिलें एवढ्याच कारणानें माझ्या हाकेला हाजर होण्याचें कबूल करणें हेंही फाजील औदार्य, असें वाटेल; पण त्याचें कारण फार निराळें होतें असें त्याच्याचकडून मला समजलें. त्या राक्षसाचें एक प्रीतिपात्र होतें. तीही राक्षसीच असून उभयतांचें अनुरूप जोडें होतें. राक्षस आपल्या पात्राला सौंदर्याची खाण समजून आपल्या समाजांत तिची फार तारीफ करीत असे. ती गोष्ट असह्य वाटून एकदां दुसऱ्या एका राक्षसानें त्याचा उपहास केला. व " सुंदर कोणाला ह्मणावें तें तुला ठाउकच नाहीं," असें ह्मटलें. यावरून हा आमचा राक्षस घोटाळ्यांत पडला. त्याला आपली राक्षसी मोठी सुंदर वाटत होती. कोणातरी शाहण्याला विचारून याचा खुलासा करावा ह्मणून तो या नगरींत येऊन त्याला जो मनुष्य, अर्थात् कोतवाल, भेटे त्याला प्रश्न करी. आणि योग्य उत्तर न मिळालें ह्मणजे संतापून आपल्या तामसी स्वभावाप्रमाणें त्याला खाऊन टाकी. असें बरेच दिवस

चाललें होतें. शेवटीं माझ्या उत्तरानें खुष होऊन त्यानें मला मोठी देणगी दिली, ह्मणजे तो एक प्रकारचा माझा चाकर झाला. याप्रमाणें आपत्कालीं साह्य करणाऱ्या राक्षसाची माझी मैत्री झाली," असें मी शकटालास सांगितलें. पुन्हः त्यानें माझी प्रार्थना केल्यावरून मी भगवती गंगेचें ध्यान केलें, तेव्हां साक्षात् मूर्तिमती स्वयमेव भागीरथीच तेथें प्राप्त झाली. शकटालाला तिचें अपूर्व दर्शन झाल्यामुळें फारच आनंद झाला. तिची स्तुति पूजा अर्चा इत्यादि करून, तिला संतुष्ट केल्यावर ती तेथल्या तेथेंच गुप्त झाली.

इकडे शकटालाचा माझ्यावर खरा विश्वास बसला. ह्या अलौलिक गोष्टी पाहून तो ह्मणाला, "खरोखर, आपण देव, गंधर्व, सिद्ध किंवा दुसरे कोण अहां हें मला कांहीं समजत नाहीं ! मनुष्याच्या अंगीं असें सामर्थ्य मुळींच असावयाचें नाहीं. आपण कोणीही असा, परंतु या दासावर कृपा असूंद्या ह्मणजे झालें." असें बोलून त्याणें माझ्या पायांवर मस्तक ठेवून राजवाड्यांत गमन केलें. एकेदिवशीं माझें मन कांहीं कारणानें उदास झालेलें पाहून शकटाल ह्मणाला, "आपण सर्वज्ञ असून व्यर्थ कां खेद करतां? बहुतकरून राजांच्या बुद्धि अविचारानें ग्रासलेल्या असतात, हें आपणास माहीत नाहीं काय? ते रागाच्या आवेशांत आले ह्मणजे भलतेंच कांहीं तरी कृत्य करून; मग लौकरच पश्चात्ताप पावतात! योगनंदराजाचीही अशीच स्थिती आहे. याविषयीं आपल्याला एक पूर्वीची कथा सांगतों ती ऐकावी."

असें बोलून तो ह्मणाला, "ह्याच नगरींत पूर्वी आदित्यवर्मानांवाचा एक राजा होता. त्याचा शिववर्मानामक मोठा बुद्धिमान् प्रधान होता. एकेसमयीं राजाची एक राणी गरोदर आहे असें समजल्यावरून, राजानें जनानखान्याचें रक्षण करणाऱ्या लोकांस विचारलें कीं, "ह्या राणीच्या महालांत जाऊन मला सुमारें दोन वर्षे होत आलीं. असें असून ही गर्भिणी कशी झाली? तिला कोणापासून गर्भ राहिला? हें सांगा, नाहीं तर

तुम्हाला भयंकर शिक्षा करीन." हें ऐकलें तेव्हां भयभीत होऊन सेवक ह्मणाले, " महाराज! सरकारच्या हुकुमाप्रमाणें आह्मी रात्रंदिवस येथें एकसारखा पाहरा करीत आहों. दुसऱ्या कोणत्याही पुरुषाचा आंत प्रवेश झाला नाहीं; फक्त शिववर्मप्रधानजी मात्र नेहमी जनानखान्यांत जातात. त्यांच्यावांचून दुसरा कोणीही गेला नाहीं, हें आह्मी अगदीं खात्रीपूर्वक सांगतों." हें ऐकून राजा ह्मणाला, " खरोखर, तो दुष्ट शिववर्माच माझा शत्रु आहे. त्या चांडाळाला जिवंत ठेवणें योग्य नाहीं. कशा तरी रितीनें त्याचा घात केलाच पाहिजे. पण उघडपणें त्याला येथें मारतां कामानये. तसें केलें तर लोकांत कदाचित् बभ्रा होईल." असा विचार करून आदित्यवर्मराजानें युक्तीनें शिववर्म्याचा नाश करण्याचा निश्चय केला, तो असा—

भोगवर्मानांवाचा त्याचा एक मांडलिक असून मित्र होता. त्याला अशी चिठ्ठी पाठविली कीं, " माझा निरोप घेऊन जो मनुष्य तुझ्याकडे येईल त्याला विचार न करितां मारून टाक." अशी व्यवस्था करून शिववर्म्याला कांहीं निरोप सांगून, भोगवर्म्याकडे जाण्यास सांगितलें. त्याप्रमाणें शिववर्मा भोगवर्म्याच्या घरीं जाण्याकरितां निघून गेला. त्याला सुमारें सात दिवस झाले; इकडे हा सर्व प्रकार राणीला समजल्यावरून ती फार भयभीत होऊन, बायकोचा वेष घेऊन तिच्याजवळ राहणारा जो तिचा यार त्याला बरोबर घेऊन, रात्रीं पळून जात होती. तिला कोतवालानें धरून राजापुढें आणिलें. तेव्हां तें सर्व पाप आपोआपच उघड झालें. स्त्रीरूप धारणकरणारा दुसरा कोणी पुरुष जनानखान्यांत जाऊन त्यापासून राणी गरोदर झाली. अशी प्रत्यक्ष सिद्धता झाल्यावरून आदित्यवर्मराजाला मोठा पश्चात्ताप झाला. आणि तसल्या बुद्धिमान् प्रधानाला विनाकारण आपण मारविलें, ह्मणून त्याला फार दुःख झालें.

इकडे शिववर्मा राजाज्ञेप्रमाणें भोगवर्म्याजवळ प्राप्त झाला, त्यापूर्वीं राजाचें तें गुप्त पत्र घेऊन गेलेला जासूदही तेथें पोहोंचला. त्याणें दिलेलें

पत्र वाचून त्यांतील मजकूर **भोगवर्म्यानें** **शिववर्म्यास** सांगितला. तो ह्मणाला, " शिव, शिव, काय अविचार हा! तुह्माला मारावें असें राजाच्या मनांत कां आलें? अथवा राजाला तरी दोष देऊन उपयोग काय? दैवयोगच तसा असेल ह्मणून त्याच्या मनांत ही गोष्ट आली असावी!" **शिववर्म्यानें** सांगितलें, " असो, त्याचा कांहीं विचार करूं नका. तुह्माला राजाची आज्ञा आहे, त्याप्रमाणें मला लैौकर मारा ह्मणजे झालें. तसें जर तुम्ही न कराल तर मीच आपल्याला मारून घेईन." हें त्याचें भाषण एकून **भोगवर्मा** विस्मित होऊन म्हणाला, " महाराज, काय असेल तें खरें सांगा. तुह्माला माझी शपथ आहे. असे तुह्मी मरण्याला अगदीं तयार कां झालां?" **शिववर्मा** ह्मणाला, "तें सांगण्यासारखें नाहीं, पण तुमच्या आग्रहास्तव सांगतों. माझा असा योग आहे कीं, जेथें मला कोणी मारील अथवा मीच मरेन तेथें बारा वर्षेपर्यंत पर्जन्यवृष्टि व्हावयाची नाहीं!"

वस्तुतः **शिववर्म्यानें** ही एक युक्तीच केली. त्याच्या मरणानें खरोखर आवर्षण पडण्याचा संभव मुळींच नव्हता, तर **भोगवर्म्याच्या** मनांत कांहीं विपरीत कल्पना येऊन, त्याणें आपणास मारूंनये इतकाच यांतला मतलब होता. तेव्हां हें त्याचें भाषण ऐकून **भोगवर्मा** ह्मणाला, "तर मग तो तुमचा राजा मोठा दुष्ट आहे ह्मणावयाचा. जर त्याच्या मनांत तुम्हाला मारायचेंच होतें, तर आपल्याच देशांत कोणत्यातरी गुप्त ठिकाणीं हें घाणेर्डें काम त्यानें केलें असतें तर झालें असतें. तेथें गुप्तरूपानें मारणारे मारेकरी नसतील काय? पण आपल्या देशावरचें पुढचें अरिष्ट टाळण्याकरितां त्याणें तें काम आम्हाकडे सोंपविलें असावें. ह्मणजे कदाचित् अवर्षण पडून नाश झाला तर आमच्या देशाचा होईल, असा त्याचा विचार असेल. तें कसेंही असो. तो तुमचा दुष्ट राजा आमच्यावर रागावला तरी चिंता नाहीं; पण तुमच्यासारख्या बुद्धिमान् प्रधानाला मारावें हें कधींही योग्य होणार नाहीं. छे बुवा, मी तर असलें काम कधींही करणार नाहीं." असा विचार करून **शिववर्म्याचा** मोठा सत्कार करून स्वारीशिबंदी वगैरे

बरोबर देऊन, त्याणें त्या प्रधानाला परत राजाकडे पाठवून दिला. तो येण्यापूर्वींच त्याच्यावर आलेल्या आरोपाची निवृत्ती होऊन राजाला आपल्या कृतीचा पश्चात्ताप झाला होता; ह्मणून मोठ्या प्रेमानें त्याणें शिववर्म्याचा स्वीकार केला.

याप्रमाणें आपल्या बुद्धीच्या सामर्थ्यानें जसा **शिववर्मा** संकटांतून मुक्त झाला, त्याप्रमाणें तुह्मीही व्हाल, तोंपर्यंत माझ्या घरीं सुखानें रहा. **आदित्यवर्म्या**प्रमाणें नंदराजालाही कधीं तरी पश्चात्ताप होईल."

याप्रमाणें **शकटाला**चें भाषण ऐकून मला थोडीशी उमेद आली. काळाची वाट पाहात मी त्या अज्ञातवासांत दिवस काढीत होतों. मित्रा **काणभूते**! असे मोठ्या संकटानें दिवस घालवीत असतां राजाच्या भेटीचा योग लवकरच आला. **योगनंदा**चा **हिरण्यगुप्त**नांवाचा पुत्र होता, तो एकेदिवशीं मृगयेला गेला. एका हरिणाच्या मागें त्याणें आपला घोडा भरधांव सोडल्याकारणानें त्याच्या बरोबरचे सर्व लोक मागें राहून **हिरण्यगुप्ता**ची आणि त्यांची चुकामूक झाली. इकडे राजपुत्रानें सारा दिवस हरिणाचा पाठलाग केला, तथापि तो सांपडला नाहीं. अरण्यांत फिरतां फिरतां दिवस सरून रात्र झाली. दिवसभर हरिणाच्या मागें धावतां धावतां तो अतिशय श्रमला होता. तशांतून क्षुधा आणि तृषा यांणीं फार पीडित झाला होता, परंतु त्यांची निवृत्ति करण्याचें साधन त्याला कांहींच मिळालें नाहीं. मग एका वृक्षाखालीं जाऊन तेथें घोडा सोडून किंचित् विश्रांती घेत बसला. जसजशी रात्र अधिक होऊं लागली तसतशा श्वापदांच्या भयंकर गर्जना ऐकूं येऊंलागल्या. आधींच रात्र काळोखी होती, त्यांतून झाडी अतिशय दाट असल्याकारणानें नक्षत्रांचा प्रकाशदेखील तेथें दिसत नव्हता. अशा त्या भयंकर ठिकाणीं राहणें योग्य नाहीं असें राजपुत्राच्या मनांत वरचेवर येत होतें; परंतु त्याचा कांहीं उपाय चालेना. निबिड अंधकारामुळें कांहींच दिसत नव्हतें. तशांतून पडत झडत कोठें जावें म्हटलें तर, जिकडून तिकडून सिंह, वाघ

इत्यादि भयंकर प्राण्यांच्या गर्जना ऐकूं येत होत्या. त्याला असें वाटलें कीं, कदाचित् आपण येथून हाललों तर आयतेच एखाद्या श्वापदाच्या तोंडांत पडूं. आतां आपलें रक्षण कसें करावें ? याचा विचार करतां करतां त्याणें अशी युक्ती काढली कीं, 'शस्त्रास्त्रें तर आपल्याजवळ आहेतच. आपण झाडावर जाऊन बसावें; ह्मणजे आसपास कोणी श्वापद आल्यास त्याचा कांहीं यत्न चालणार नाहीं. घोड्यावर कदाचित् हल्ला करतील; पण जागें राहून त्याचें रक्षण केलें ह्मणजे झालें.' असा विचार करून राजपुत्र झाडावर चढून बसला. आणि जनावरांचा शब्द कोणकोणत्या दिशेला होत आहे त्याची टेहळणी करित आहे, तों सिंहानें हुसकून दिलेला एक आस्वल मोठ्या त्वरेनें त्याच झाडावर चढून आला. त्याला पाहतांच हिरण्यगुप्ताची अगदीं गाळण झाली. राजपुत्र भ्याला आहे असें पाहून आस्वल मनुष्यवाणीनें त्याला ह्मणाला, "गड्या, भिऊं नको. मी जरी श्वापद आहें तरी यावेळीं तुझा घात करणार नाहीं. आह्मी उभयतां समदुःखी आहों. जसें तुला श्वापदांचें भय वाटतें तसेंच मलाही या सिंहाचें आहे. तुझ्याविषयीं मला फार प्रेम उत्पन्न झालें आहे. मला तूं आपला मित्र असें समजून हवा तर खुशाल झोंप घे. मी जागा राहून तुझें रक्षण करीन!" हें त्याचें भाषण ऐकून राजपुत्राला आस्वलाविषयींचें भय नाहींसें झालें. "समानशीलव्यसनेषु सख्यं" या न्यायानें त्या दोघांचें सख्य जमलें. त्याच्या बोलण्यावर विश्वास ठेवून तो राजपुत्र तेथेंच निजला. आस्वल जागा होता. त्याच्या पाठीस लागलेला सिंह झाडाखालीं होता. आस्वल आणि राजपुत्र या दोघांसही त्याणें पाहिलें होतें. आस्वल अथवा राजपुत्र यांतून कोणास तरी झोंप लागून तो खालीं पडेल आणि मग त्याला आपण मारूं, ह्या आशेवर बराच वेळ सिंहानें वाट पाहिली; पण आस्वल मुळींच निजला नाहीं. व राजपुत्र आणि तो या उभयतांचें सख्य झालें असून आस्वल त्याचें रक्षण करीत आहे; असें पाहून सिंहानें मनांत विचार केला कीं, 'जोंपर्यंत हे दोघेही एक-

विचारानें आहेत तोंपर्यंत आपलें कार्य होणार नाहीं. कारण ते परस्परांचा बचाव करतील. तर यांच्यांत फुटाफूट पाडावी, ह्मणजे कांहीं साधलें तर साधेल,' असा विचार करून सिंह आस्वलाला ह्मणाला, " गड्या ऋक्षराजा, तुझी आमची मैत्री आहे. कसें झालें तरी आह्मी उभयतांही याच अरण्यांत राहणारे आहों. यद्यपि मी तुझ्याहून बलाढ्य आहें व प्रसंगीं तुला मारण्याला देखील मागें पुढें पाहणार नाहीं. तथापि तूं माझें भक्ष्य नव्हेस. मनुष्य हें सर्व श्वापदांचें ईश्वरदत्त भक्ष्य आहे. याकरितां तुझ्याजवळ जो हा मनुष्य निजला आहे तो मला दे, ह्मणजे माझी क्षुधा शांत होईल. नाहीं तर केव्हांना केव्हां तरी मी तुला मारल्यावांचून राहणार नाहीं. पहा, आपल्या जिवावरचें संकट निवारण कर." सिंहाचें भाषण ऐकून आस्वल ह्मणाला, " छे! तें कधींही व्हायचें नाहीं. विश्वासानें आपल्याजवळ निजलेल्या प्राण्याला मृत्यूच्या तोंडांत ढकलून देणारा कोण अधम असेल तो असो! मीं तसलें पाप कधींही करणार नाहीं. मी ज्या मनुष्याला आपला मित्र असें ह्मटलें आहे, व माझ्या वचनावर विश्वास ठेवून जो बिचारा बिनघोर निजला आहे; त्याला तुझ्या, ह्मणजे प्रत्यक्ष मृत्यूच्याच, स्वाधीन करावें हें मला उचित आहे काय ? " असें सांगून आस्वल उगिच बसला. याप्रमाणें सिंहानें त्याला फोडण्याविषयीं पुष्कळ प्रयत्न केला; पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

कांहीं वेळानें राजपुत्र जागा होऊन आस्वलाला ह्मणाला, " मित्रा, मीं थोडीशी झोंप घेतली, आतां मी जागा राहण्यास समर्थ आहें. तर तूंही अम्मळ विश्रांति घे." आस्वल नाहीं नाहीं ह्मणत असतां राजपुत्रानें बळेंच त्याला निजावयास सांगितलें. लवकरच आस्वल सुस्त निजला आहे असें पाहून सिंह मनांत म्हणतो, ' आस्वलाला मी पुष्कळ सांगितलें; पण तो मोठा प्रामाणिक दिसतो. त्याच्याजवळ आपला कांहीं इलाज चालला नाहीं. तरी पण आतां ह्या मनुष्याला दोन गोष्टी सांगून आपलें काम साधेल तर पहावें,' असा विचार करून तो राजपुत्राला

ह्मणाला, "अरे मनुष्या! तूं तर अगदीं अविचारी आहेस असें मला वाटतें. नीट विचार करून पहा कीं, तुझ्याजवळ जो हा निजला आहे तो बोलून चालून आस्वल. त्याची संगती तुला काय कामाची! कोणत्याही रितीनें त्याला आपल्यापासून दूर करावें हें फार चांगलें नाहीं काय?" हें ऐकून राजपुत्र ह्मणाला, "छे, छे, असें काय ह्मणतोस? तो माझा मित्र आहे. आह्मी दोघेही पाळीपाळीनें जागे राहून एकमेकांचें रक्षण करीत आहों. आस्वल झाला ह्मणून काय झालें? तो जर आपल्याशीं स्नेहानें वागत-आहे तर मग त्याचें भय तें कसलें? आणि त्याबद्दल त्याला दूर तरी कां करावा?" सिंह ह्मणतो, "हा वेड्या! माझ्या बोलण्याचा तूं विचारच केला नाहींस. अरे, तूं त्याला आपला मित्र समजतोस काय? ही मित्रता कोठपर्यंत राहील तें तुला माहीत आहे काय? मनुष्य हें श्वापदांचें ईश्वरनिर्मित भक्ष्य आहे. तेव्हां भक्ष्य आणि भक्षक यांची मैत्री फार-करून व्हायची नाहीं; आणि कदाचित् झालीच तर कांहीं तरी निमित्तानें होईल, व तें निमित्त सरलें ह्मणजे भक्षक भक्ष्याचा नाश केल्यावांचून राहणार नाहीं. तुमचीही अशीच स्थिति आहे. मी त्या आस्वलाच्या मागें लागलों होतों. माझ्या भयानें कसा तरी जीव वांचविण्याकरितां तो झाडावर आला. तेथें तुझ्यापासून आपणाला भय न प्राप्त व्हावें ह्मणून त्यानें तुझ्याशीं मैत्री केली आहे. पण तुला शहाणपण असेल तर ती दोस्ती मनापासून आहे असें मात्र समजूं नको. मी येथून गेलों ह्मणजे तो निर्भय होऊन तुझा नाश करण्याचा प्रयत्न करील! खरोखर, यावेळीं तुला आपल्यावरचें संकट निवृत्त करण्याची अमोलिक संधी प्राप्त झाली आहे. दैवयोगानें तुझा मित्र ह्मणविणारा शत्रु जो आस्वल तो झोंपीं गेला आहे. आणि त्या शत्रूला मारून तुला निर्भय करण्याविषयीं मी खालीं उभा आहें. कदाचित् तुला जनावरांशीं मैत्रीच करावयाची असेल तर, ती बरोबरीच्यांशीं तरी कर; म्हणजे त्यांत भूषण आहे. आस्वलासारख्या हिडिस जनावराच्या मैत्रीपासून तुला कमीपणा येणार नाहीं काय?

वस्तुतः माझ्याही बोलण्यावर तुझा विश्वास न बसावा हें अगदीं साहजिक आहे. कारण, मीही तुझा भक्षकच आहें. तथापि अंमळ विचार करशील तर, तूं ज्या ठिकाणीं आहेस तेथें माझें विशेषसें भय बाळगण्याचें कारण नाहीं व मी मृत्यू आहें तथापि सांप्रत तुझ्यापासून दूर आहें; पण तो मित्ररूपी मृत्यू अगदीं तुझ्या सन्निध आहे! तर त्याचा नाश करून आपण निर्भय व्हावें असें तुझ्या मनांत कां येत नाहीं? यद्यपि मीही तुझा शत्रू आहें, तथापि यावेळीं तुझ्या हिताची गोष्ट सांगत आहें; म्हणून मला मित्र असें समजून त्या आस्वलाला खालीं ढकलून दे कसा! ह्मणजे त्याच्या मांसानें मी आपली क्षुधा शांत करून येथून निघून जाईन व मग तूंही निर्भयपणें आपल्या घरीं जाशील."

हें सिंहाचें भाषण ऐकून राजपुत्राला तें खरेंसें वाटलें. तो मनांत विचार करूं लागला कीं, 'सिंह ह्मणतो आहे तें कांहीं खोटें नव्हे. हा बोलून चालून आस्वलच आहे. आस्वलें मनुष्याचे हाल हाल करून त्याला मारतात हें मला माहीत आहे. तेव्हां उगीच मित्रत्वाच्या नादीं लागून आपला जीव धोक्यांत घालावा हें चांगलें नव्हे, तर आस्वलाला नाहींसा करून सिंहाची मर्जी प्रसन्न करावी हेंच योग्य आहे. मित्रता झाली तरी बरोबरीच्यांशीं करावी. तो कसा झाला तरी श्वापदांचा राजा आहे, आणि मी मनुष्यांचा राजा आहें. तेव्हां आह्माउभयतांची दोस्ती होणें योग्य आहे. तें सोडून या भिकारड्या आस्वलाची मैत्री ठेवणें यांत कमीपणाच आहे!" असो, याप्रमाणें विचार करून त्या कृतघ्न राजपुत्रानें, विश्वासानें निजलेल्या आस्वलाला खालीं ढकलून दिला! परंतु तो खालीं न पडतां मधल्या मधें सावध होऊन झाडाच्या ढापीला धरून राहिला. खरोखर, आपला जीव वांचविण्याकरितां अधम लोक काय करतील याचा नेम नाहीं! आस्वलानें यावेळीं राजपुत्राचा प्राणच घ्यावयाचा. परंतु त्याणें त्याला मित्र असें पूर्वीं ह्मटलें होतें त्याचें स्मरण ठेवून, "अरे मित्रद्रोह्या, तूं उन्मत्त पिशाच हो!" असा हिरण्यगुप्ताला शाप दिला. व

तत्काल मित्रद्रोहरूप घोर पातकानें राजपुत्राला तशी स्थिती प्राप्त झाली. हें पाहून सिंह निराश होऊन तेथून निघून गेला. आस्वलही कांहीं वेळानें अन्यत्र गेला. आणि हिरण्यगुप्त उन्मत्त होत्साता इकडे तिकडे भटकूं लागला.

इकडे राजा योगनंदानें बहुतवेळ वाट पाहून, अद्याप आपला पुत्र कां आला नाहीं? याचा शोध करावा ह्मणून निरनिराळ्या प्रदेशांत स्वार पाठविले. त्यांणीं हिरण्यगुप्ताचा शोध करून तो उन्मत्त झाला आहे इतकेंच राजाला कळविलें. कारण, वर सांगितलेला त्याचा सर्व वृत्तांत त्यांना समजला नव्हता. तेव्हां योगनंदाला फारच आश्चर्य वाटलें. त्याणें हिरण्यगुप्ताला आपल्या घरीं नेलें. तेथें अनेक उपचार केले तरी त्याची ती स्थिती पूर्वीप्रमाणें झाली नाहीं. जो पूर्वी मोठा बुद्धिमान् व चतुर होता, तोच एकाएकीं असा उन्मत्त कसा झाला? याचें कारण कांहीं केल्या राजाच्या लक्षांत येईना, तेव्हां त्याला माझें (वररुचीचें) स्मरण झालें. आणि मोठा सुस्कारा टाकून तो ह्मणाला, "हायरे! यावेळीं तो माझा वररुची असता तर त्याणें याचें कारण तेव्हांच सांगितलें असतें. माझ्या बुद्धीला धिक्कार असो! तशा बृहस्पती सारख्या चतुर मंत्र्याचा वध करण्यांत मला काय बढाई वाटली कोणास ठाऊक? पण आतां रडून उपयोग काय? कांहीं केलें तरी त्याचें पुनः दर्शनदेखील होणें कठीण."

राजाचे हे उद्गार ऐकून शकटाल मनांत ह्मणाला, 'हो, कात्यायनाला उघड करण्याची संधी मिळाली. यावेळीं मीं त्याला भेटवीन तर राजाला फारच आनंद होऊन तो मजवर प्रसन्न होईल; पण यापासून दुसरें एक मोठें भय आहे. त्याला राजाला भेटविला तर कारभार त्याच्या हातीं जाणार आहे. तेव्हां मुद्दाम आपणच आपल्या पायावर धोंडा घालून घेणें योग्य नाहीं,' असा विचार करीत तो अम्मळ स्तब्ध बसला. तेव्हां पुनः त्याच्या मनांत आलें,—'छेः, आपण शंका घेतली ती योग्य नाहीं. कारण, कात्यायन मोठा मानी आहे. राजानें त्याला मारण्यास सांगितलें होतें

याचें त्याला विस्मरण झालेलें नाहीं. याशिवाय त्याची आवडती बायको उपकोशा मरण पावली असून आईचाही देहांत झाला हें वर्तमान, अज्ञातवासांतून बाहेर आल्यावर त्याला समजेल. व त्यामुळें तो उदास झाल्यावांचून राहणार नाहीं. तेव्हां विनाकारण अपमान करून नुकसान करणाऱ्या राजाजवळ तो पुनः कधींही राहणार नाहीं. आणि राजाला भेटविल्यानें त्याचा मात्र माझ्यावर अधिक विश्वास बसेल. तर ही संधी फुकट घालवूं नये'. असा निश्चय करून तो अभय मागून राजाला ह्मणाला, "महाराज, आपण खेद करूंनये. ज्याच्याकरितां आपण दुःखी झालां आहां तो वररुची जिवंत आहे". हें ऐकून योगनंद ह्मणाला, "काय? माझा वररुची जिवंत आहे? खोटें सांगतोस तूं. आहे ह्मणतोस तर त्याला माझ्या जवळ घेऊन ये पाहूं!" हें ऐकून शकटाल मोठ्या त्वरेनें माझ्या जवळ येऊन ह्मणाला, "आज सुदीन उगवला आहे, ज्याची मी वाट पाहात होतों तो समय प्राप्त झाला आहे. तर कृपा करून आपण राजाजवळ चलावें." मी पुष्कळ वेळ नाहीं होय ह्मटलें; पण तो कांहीं केल्या सोडीना. शेवटीं निरुपाय होऊन मी योगनंदाजवळ गेलों. आणि त्याला भेटून उन्मत्त झालेल्या त्याच्या पुत्रालाही पाहिला. राजानें प्रथम माझी क्षमा मागितली. नंतर विनयपूर्वक प्रार्थना करून हिरण्यगुप्त वेडा होण्याचें कारण विचारलें. मी तत्काल एकाग्र अंतःकरणानें ध्यान करतांच *सरस्वतीच्या प्रसादानें त्याचा सर्व वृत्तांत मला समजला. तो राजाला सांगून मी ह्मणालों,

---

*-लोकांत ' अप्रशिख ' 'अथवा अप्रशिख असा एक शब्द प्रसिद्ध असून त्या संबंधी-

' अनेन तव पुत्रेण प्रसुप्तस्य वनान्तरे ।
शिखामाक्रम्य पादेन खड्गेनोपहतं शिरः' ॥

असा एक श्लोकही प्रसिद्ध आहे. सोमदेवसूरी नांवाच्या एका जैन ग्रंथकारानें वररुचीशीं या श्लोकाचा संबंध लावला आहे. त्यावरून, वेडा झालेला हिरण्यगुप्त ज्याला त्याला 'अप्रशिखा' ह्मणजे काय असें विचारीत होता. वररुची जेव्हां त्याच्या खुळाच्या कारणाचा शोध करण्यास प्रवृत्त झाला, तेव्हां तो रात्रीं एका वडाच्या झाडावर चढून बसला. तेथें पिशाचांचा संवाद चालला होता त्यावरून मूळ गोष्टीचा खुलासा झाला. आणि ' अप्रशिख ' यांतलें एक एक अक्षर घेऊन त्याणें वरील श्लोक रचून राजास सांगितला, असा या कथेचा संदर्भ असावा असें वाटतें.

" राजा, यार्णे मित्रद्रोह केला आहे ह्मणून हा उन्मत्त झाला. तरी देवीच्या कृपेनें मी याला शापमुक्त करून पूर्व स्थितीला आणतों. " असें सांगून सरस्वतीची प्रार्थना करून मी राजपुत्राला शापापासून मुक्त केला. नंतर पूर्व स्थिती प्राप्त झालेल्या हिरण्यगुप्तानें माझ्या पायांवर मस्तक ठेवून अनेक प्रकारें माझी स्तुती केली. राजाला माझ्या सामर्थ्याविषयीं फारच आश्चर्य वाटलें. त्याणें विचारिलें, "हें सर्व वृत्त तुला समजलें तरी कसें?" नंतर मी सांगितलें, "राजा, बुद्धिमानाला अगम्य असें काय आहे बरें? चतुर पुरुष लक्षणावरून किंवा अनुमानानें अथवा आपल्या स्मरणशक्तीनें गूढ गोष्टीही जाणूं शकतात. तुझ्या राणीच्या कंबरेवरचा तीळ जसा समजला तसेंच हेंही मला समजलें यांत कांहीं आश्चर्य नाहीं. " असें माझें उत्तर ऐकून तो फारच लज्जित झाला. त्यानें माझा पुष्कळ सत्कार केला परंतु मी त्या सर्वांचा अनादर करून आपल्या घरीं गेलों. माझ्यावरचा खोटा अपवाद गेला हाच मोठा लाभ असें मी मानिलें. कारण ज्ञात्या पुरुषांचें, सद्वर्तन हेंच द्रव्य होय!

घरीं जाऊन मी आपली प्रियपत्नी उपकोशा वगैरे घरच्या मंडळीला भेटण्याचा विचार करीत आहें तों तेथील सर्व लोक माझ्या पुढें येऊन मोठ्यानें रडत रडत मला ह्मणाले, "महाराज, आपल्याला राजानें मारलें असें वर्तमान ऐकून आह्मी फार दुःखित झालों होतों. आज ईश्वरानें आह्मावर मोठा अनुग्रह केला, पण उपयोग काय?" हें ऐकून मी घाबरलों. इतक्यांत उपवर्ष-मुनी पुढें येऊन मला ह्मणाले, "दैवानें अनकूल होऊन तुझें दर्शन घडविलें, याचा मला फार संतोष वाटतो; पण दुसरा एक मजवर मोठा प्रसंग आला आहे. तरी उपाय नाहीं. तुला तें वर्तमान सांगितलेंच पाहिजे. माझी प्रियकन्या आणि तुझी धर्मपत्नी उपकोशा तुझ्या देहाचा अंत झाल्याचें वर्तमान श्रवण करून अग्नींत प्रवेश करती झाली! व तें पाहून तुझ्या वृद्ध मातुश्रीचें हृदय शोकानें फुटून तीही परलोकाला गेली. "

मित्रा काणभूते, तुला काय सांगूं, तें दुःखकारक वर्तमान ऐकून,

प्रथमच अनुभवास आलेल्या शोकाच्या आवेशानें माझी चेतनाच नष्ट झाली. मी तत्काल वाऱ्याच्या वेगानें एखादा वृक्ष उलथून पडावा त्याप्रमाणें खालीं पतन पावलों. त्यापूर्वी विलाप करण्याचा प्रसंग कधींच न आल्यामुळें मला त्याची गोडी माहीत नव्हती. पण यावेळीं मी विलापरसाचा पूर्ण अभिज्ञ झालों. खरोखर धीर पुरुषांना विलाप करणें उचित नाहीं. परंतु प्रियजनाच्या विनाशापासून उत्पन्न झालेल्या शोकाग्नीनें हृदय तप्त झाल्यामुळें, सहज अशाही धैर्याचा लोप होऊन मी शोकवश झालों. " हा संसार अनित्य आहे. एथून तेथून यांत एक अनित्यताच भरली आहे. ज्या नानाप्रकारच्या घडामोडी होत आहेत, ते सर्वही ईश्वरी मायेचे खेळ आहेत. असें जाणत असूनही कां मोह पावतोस, ऊठ? विचार कर. उत्पन्न झालेल्या मनुष्याला आज अथवा शंभर वर्षांनीं कधीं तरी मृत्यु हा प्राप्त होणारच आहे. मग विनाकारण शोक करून उपयोग काय! " इत्यादिप्रकारच्या बोधवचनांनीं वर्षाचार्यांनीं समाधान केल्यावर कसा तरी मी पूर्व स्थितीवर आलों. मी जरी जीवंत होतों तरी अज्ञातवासांत असून, लोकांत मला मारल्याचा पुकारा झालेला होता. यामुळें उपकोशेला आणि आईला तें वर्तमान माहीत नव्हतें. व शकटालानें त्या दोघींच्या मरणाबद्दल मला कांहीं कळविलें नव्हतें. शोकादिकांचा त्याग करून मेलेल्या आप्तवर्गाचें उत्तर कर्म इत्यादि जें कांहीं करावयाचें होतें तें सर्व करून मोकळा झालों. माझी परम पूज्य माता व अत्यंत प्रिय स्त्री यांच्या परलोकगमनानें मला जें असह्य दुःख झालें होतें त्याचा जरी मी लवकरच विसर पाडला, तरी त्या दिवसापासून माझें मन अत्यंत विरक्त झालें. राजा योगनंद माझीं आर्जवें करीत होता. व राज्यसूत्रें मी परत हातांत घ्यावीं असा त्याचा मनापासून आग्रह होता. आणि मी कदाचित् तीं हातांत घेतलीं असतीं; पण ज्याचा उपभोग घेण्याला आप्तजन आपल्याबरोबर नाहींत तें वैभव काय कामाचें? असे विचार मनांत येऊं लागल्यामुळें कोणताही ऐहिक विषय मला प्रिय वाटेनासा झाला. म्हणून सर्व व्यवस्था

करून केवळ शांतीलाच बरोबर घेऊन, सर्व मायामोहपाशापासून मुक्त होत्साता मी तपोवनाचा आश्रय करण्यास गेलों. आणि तेथें शांत मनानें ईश्वराचें भजन पूजन करून भक्तिसुखाचा अनुभव घेत राहिलों.

याप्रमाणें आनंदांत दिवस जात असतां पुढें एकेदिवशीं **अयोध्या** नगरीहून एक ब्राह्मण एकटाच त्या तपोवनांत, मी जेथें रहात होतों तेथें प्राप्त झाला. त्याचा यथोचित आदर करून इकडच्या तिकडच्या गोष्टी करीत असतां "**योगनंदाचें** राज्य कसें चाललें आहे?" असें मी त्याला विचारलें. तोही मला पुर्तेपणीं ओळखून दुःखाचा सुस्कारा टाकून, शोक करित होत्साता ह्मणाला, "महाराज! आपण **नंदराजाचें** वर्तमान ऐकूं इच्छितां काय? आतां मला आपली चांगली ओळख पटली. आपण त्यांचे मित्र असून मुख्य प्रधान होतां नव्हे का? असो ते दिवस गेले. मला जी हकीकत माहीत आहे ती सांगतों. आपण त्या राजाला सोडून निघून गेल्यामुळें, बहुत दिवस जिची इच्छा करित होता, ती उत्तम संधी **शकटा-लाला** मिळाली. युक्तीनें **योगनंदाचा** वध कसा करावा याविषयीं तो उपाय शोधीतच होता. एकेदिवशीं मार्गांत, काठीनें जमीन खणीत असलेला एक ब्राह्मण त्याच्या दृष्टीस पडला. **शकटालानें** त्याला विचारलें, "भटजी-बुवा, जमीन कां खणितां?" तो ह्मणाला, "या ठिकाणीं असलेलें हें दर्भांचें बेट तुझ्या दृष्टीस पडलें नाहीं काय? या बेट्यांनीं माझा पाय कापला. म्हणून त्यांचा सूड उगविण्याकरितां ही भूमि खणीत आहें! थोडक्याच वेळांत येथें माझा पाय कापणाऱ्या दुष्ट दर्भांचीं पाळें मुळें देखील अगदीं नाहींशीं करून टाकीन." हें ऐकून **शकटाल** मनांत म्हणाला, 'स्वारी तर मोठी रागिट दिसते. मला असल्यांचीच गरज आहे. हा रागावला तर दर्भांच्या मुळाप्रमाणें माझा वैरी जो **योगनंद** त्याचा हा समूळ नाश करील. तर आतां विशेष विचार करूंनये. **योगनंदाचा** मृत्यु झाला तर हाच ब्राह्मण होण्याला समर्थ आहे." याप्रमाणें विचार करून त्याचें नांव गांव वगैरे विचारून प्रधान त्याला म्हणाला, "भटजी-

बुवा, आमचा राजा **योगनंद** याचें नांव आपणांस माहीत असे-लच. त्याच्या येथें उद्यां त्रयोदशीस श्राद्ध व्हावयाचें आहे. एक लक्ष रुपये दक्षिणा मिळेल आणि सर्वांच्या अगोदर अग्रस्थानीं आसन मिळून भोजनादिकही प्राप्त होईल. याकरितां माझ्या बरोबर चलाल तर आमंत्रण येईल अशी मी व्यवस्था करतों. ह्या माझ्या विनंतीचा स्वीकार कराल अशी मनापासून इच्छा आहे." हें ऐकून ब्राह्मणाला फार संतोष झाला. त्यानें **शकटालाची** विनंती मान्य करून त्याच्या बरोबर जाण्याचें कबूल केल्यामुळें प्रधानास फार आनंद झाला. त्यानें त्यास आपल्या घरीं नेऊन ठेवून श्राद्धाच्या दिवशीं **नंदराजाला**, "हा एक योग्य ब्राह्मण आहे" असें सांगून त्याची भेट करविली. [illegible] तेजःपुंज मुद्रा पाहून **नंदराजाला** तो योग्य वाटल्यामुळें त्यानें त्यास श्राद्धाचा क्षण ( आमंत्रण ) दिला. **शकटालानें**—सर्वांच्या वर आसन व लक्ष रुपये दक्षिणा मिळेल—हें ब्राह्मणाला पूर्वींच सांगितलें होतें. कारण, त्याचें कार्य याच रीतीनें साधण्याचा संभव होता. **सुबंधू**[1], हा त्यावेळीं त्या नगरांत मोठा प्रतिष्ठित असून **नंदराजा** त्याला फार मानीत असे, व राजवाड्यांत कांहीं हव्य-कव्य झालें तर त्यांत त्याचा पहिला मान होता; तेव्हां, तो **चाणक्याला** मुख्य आसन देणार नाहीं व यामुळें दोघांचें भांडण होईल व मग **चाणक्य** रागावून **नंदाचा** सूड उगवील, असा **शकटा-लाचा** विचार होता. व त्याप्रमाणें हा ब्राह्मण सर्वांच्या वर जाऊन बसला. **सुबंधूच्याही** मनांत मुख्य आसन आपणास मिळावें असें होतेंच, म्हणून उभयतांचा वाद उपस्थित झाला. **शकटालानें** हें वर्तमान **नंदराजाला** सांगून काय तो निर्णय करावा म्हणून त्याला विनंती केली. राजा म्हणाला, "त्यांत वादाचें काय कारण? **सुबंधू** मला माहित आहे. तोच त्या आसनाला योग्य आहे. तेव्हां तूं जाऊन त्याला मुख्य आसनावर

---

१– या नांवाचा एक फार प्राचीन कवी प्रसिद्ध आहे. **वासवदत्ता** नांवाचें प्रसिद्ध गद्यकाव्य याणेंच केलें आहे. वर सांगितलेला 'सुबंधु' हा कदाचित् तोच असेल असें वाटतें

असवून दुसऱ्या ब्राह्मणाची समजूत करून त्यालाही त्याच्या योग्य आसन दे." हें राजाचें भाषण ऐकून **शकटाल** मनांत म्हणाला, 'वा! हीं आहे बुवा संधी आपलें काम होण्याची, पहावें काय होतें तें?' मग त्यानें त्या ब्राह्मणाला सांगितलें, "भटजीबुवा! मी राजाचा सेवक आहें, त्याचा काय हुकूम आहे तो सांगतों. कृपा करून माझ्यावर मात्र रागावूं नका. राजाला **सुबंधूची** योग्यता विशेष वाटत असून मुख्य आसन त्यालाच मिळावें अशी यांची आज्ञा आहे." हें वाक्य ऐकून कोपानें आविष्ट झालेला **चाणक्य** डोळे लाल करून शेंडी मोकळी सोडून मोठ्यानें म्हणाला, "असें आहे काय? **नंदराजाला** माझी योग्यता कांहींच वाटत नाहीं काय? आणि म्हणूनच अग्रासन **सुबंधूला** मिळावें असें तो म्हणतो? कांहीं चिंता नाहीं. आजपासून सात दिवसांच्या आंत माझा अपमान करणाऱ्या दुष्ट राजाचा नाश करतों पहा. आणि जोंपर्यंत त्याला मारून माझा राग शांत झाला नाहीं तोंपर्यंत ही शेंडी बांधणार नाहीं." याप्रमाणें ब्राह्मणानें प्रतिज्ञा केल्याचें वर्तमान ऐकून **नंदराजाला** अतिशय राग आला. इकडे **शकटाल** वरवर समाधानाच्या गोष्टी सांगून **चाणक्याचा** राग शांत करण्याचा प्रयत्न करीत होता. आणि तो निष्फळ झाला असें दाखवून, राजाला विशेष राग येईल अशाप्रकारचें भाषण करूं लागला. **नंद** मूळचाच अविचारी त्यांत **चाणक्याची** प्रतिज्ञा ऐकून फार रागावला होता. आणि त्याच्या क्रोधाचें **शकटालानें** प्रोत्साहन करितांच त्यानें तत्काल **चाणक्याला** ठार मारण्याविषयीं हुकूम केला. तेव्हां त्याला पळून जाण्याची संधी देऊन **शकटालानें** त्याला गुप्तपणें आपल्या घरीं आणून ठेविला. **चाणक्य** मोठा मांत्रिक होता, त्याणें **शकटालापासून** अवश्य लागणारें सर्व साहित्य घेऊन मंत्रसामर्थ्यानें कृत्या

---

१—महाकवि **विशाखदत्त** याणें केलेल्या 'मुद्राराक्षस' नांवाच्या नाटकांत ही निराळ्या तऱ्हेची आहे. ज्यांची इच्छा असेल त्यांणीं, आह्मी केलेलें 'आर्यचाणक्य' हें पुस्तक पहावें.

सिद्ध केली. आणि तिचा प्रयोग नंदराजावर करतांच त्याच्या सर्वांगांत दाहज्वर उत्पन्न होऊन सातव्या दिवशीं त्याचा देहांत झाला. नगरांत व राजवाड्यांत जिकडे तिकडे हाहःकार झाला असून सर्व लोक अत्यंत दुःखित झाले होते, अशा संधींत पित्याविषयीं शोक करीत असलेल्या **हिरण्यगुप्ताचा** एकाएकीं वध करून पूर्व **नंदाचा** पुत्र जो **चंद्रगुप्त** त्याला **शकटालानें** राज्याभिषेक केला आणि **बृहस्पतीसारखा** बुद्धिवान् व मोठा दृढनिश्चयी अशा **चाणक्याला** प्रधानगिरी देऊन **शकटालानें** आपल्या जिण्याचें सार्थक झालें असें मानलें. '**योगनंदानें** केलेल्या वैराची प्रतिक्रिया केली. आतां आपणास काय करावयाचें आहे? ज्यांच्याकरितां ऐश्वर्यादिकाची इच्छा करावी ते माझे प्रिय पुत्र पूर्वींच नष्ट झाले. तर आतां सर्वसंग परित्याग करून अरण्यांत जाऊन आत्मसाधन करावें हेंच योग्य आहे.' असा विचार करून विरक्त होत्साता **शकटाल** अरण्यांत प्रवेश करिता झाला."

याप्रमाणें त्या ब्राह्मणाच्या मुखांतून **योगनंदाचें** दुःखकारक वर्तमान श्रवण करून—मी विरक्त असूनही—फार दुःखित झालों. मित्रा **काणभूते**! ऐश्वर्य, स्त्री, पुत्र इत्यादिक सर्व ऐहिक अतिशय चंचल आहे असें पाहून वारंवार मला दुःखाचे आवेश येत असत. मग कशितरी मनाची विश्रांती करावी म्हणून मी ह्या **विंध्यवासिनीच्या** दर्शनास आलों. त्या देवीच्या प्रसादानें तुला पाहून मला जातीचें स्मरण झालें. आणि दिव्य विज्ञान प्राप्त झाल्यावरून तुला ही कथा सांगितली. मित्रा! आतां माझा शाप क्षीण झाला आहे. मी देहाचा त्याग करण्याविषयीं इच्छा करितों. तूं सांप्रत कांहीं दिवसपर्यंत येथेंच राहून शिष्यांसहवर्तमान **गुणाढ्य** नांवाचा ब्राह्मण तुझ्या जवळ येईपर्यंत त्याची वाट पहा. तोही माझा पक्षपाती असून मित्र आहे. माझ्याप्रमाणें त्यालाही **पार्वतीनें** शाप दिला आहे. त्याचें पूर्वीचें नांव **माल्यवान्** असून महादेवाच्या सर्व गणांत तो मुख्य होता. शापानें

सांप्रत मनुष्यत्व पावला आहे. **महादेवानें** सांगितलेली ही मोठी कथा त्याला तूं सांग, म्हणजे तुझ्या शापाचा अंत होऊन तोही शाप-मुक्त होईल. याप्रमाणें **वररुची काणभूतीला** सांगून देहाचा त्याग करावा म्हणून, परम पुण्यकारक अशा **बदरिकाश्रमाला** जाण्यास निघाला. वाटेंत, गंगेच्या तीरावर शाक-भाजी खाऊन निर्वाह करणारा एक ऋषी त्याच्या दृष्टीस पडला. या ब्राह्मणाला आपल्या तपश्चर्येचा मोठा गर्व झालेला होता. **वररुची** त्याच्या जवळ जात आहे इतक्यांत दर्भाचें टोंक लागून त्या ऋषीच्या हाताच्या बोटाला क्षत पडलें. त्यांतून रक्त गळत आहे असें पाहून, **वररुचीनें** तपःसामर्थ्यानें त्याच्या बोटांतून गळत असलेल्या रक्ताचा शाकरस केला. **वररुचीच्या** मनांत त्या ऋषीच्या अहंकाराची परीक्षा करावयाची होती. म्हणून त्यानें कौतुकानें केलेला चमत्कार त्या ब्राह्मणाला न समजून त्यानें, ही आपल्याला तपाची सिद्धीच प्राप्त झाली आहे, असें मानलें. व मोठ्या ताठ्यानें **वररुचीकडे** तो पाहूं लागला. तेव्हां हास्य करून **वररुची** म्हणाला, "अहो महाराज! आपण मोठा गर्व करूं नका. तुमची परीक्षा पहावी म्हणून मी रक्ताचा शाकरस केला आहे, हें पाहूनही तुम्ही अहंकार सोडला नाहीं याचें मला मोठें आश्चर्य वाटतें! ज्ञानमार्गांत अहंकार हें मोठें विघ्न आहे. व्रतें, नियम इत्यादि शेकडों केलीं तरी ज्ञानावांचून कधींही मुक्ति प्राप्त व्हावयाची नाहीं. **स्वर्गलोक** नाश पावणारा आहे. मुमुक्षुलोकांच्या मनांत त्याच्याविषयीं मुळींच लोभ उत्पन्न होत नाहीं. याकरितां तुम्ही अहंकाराचा त्याग करून ज्ञानप्राप्तीविषयीं यत्न करा. नाहीं तर व्रतादिकांच्या भरीस पडून व्यर्थ आयुष्याचा क्षय मात्र करून घ्याल." याप्रमाणें त्या ब्राह्मणाला उपदेश करून त्याच्याकडून प्राप्त झालेल्या सत्काराचा स्वीकार करून, **वररुची बदरिकाश्रमाला** प्राप्त झाला. तेथें एकनिष्ठपणें देवीला शरण जाऊन मनुष्यभावापासून मुक्त होण्याविषयीं तिची मनःपूर्वक प्रार्थना करित राहिला.

मग त्याच्या अनन्य भक्तीनें प्रसन्न होऊन स्वयमेव **पार्वतीनें** त्याला दर्शन दिलें, आणि अग्निधारणेचा उपदेश केला. त्याप्रमाणें अग्नीची धारणा करून **वररुचीनें** मनुष्यशरीराचा दाह केल्यावर पूर्वीचें दिव्य रूप त्याला प्राप्त झालें. व तो **कैलास** पर्वतावर जाऊन पूर्ववत् **शंकर-पार्वतीचें** सेवन करूं लागला. याप्रमाणें **पार्वतीच्या** शापानें मनुष्य-जन्मास आलेला **पुष्पदन्त** शापमुक्त होऊन पुनः पूर्व स्वरूपाला प्राप्त झाला, व **काणभूती गुणाढ्याची** वाट पाहात **विंध्याटवींत** काल-क्रमणा करीत राहिला.

इकडे मनुष्याचें शरीर, धारण करणारा व **गुणाढ्य** या नांवानें सर्वत्र प्रख्यात असलेला **माल्यवान्, सातवाहनराजाची** सेवा करीत होता. बहुत दिवस त्याच्या आश्रयानें राहून सुखांत कालक्रमणा केली. एकेदिवशीं कांहीं कारणानें प्रतिज्ञा करून संस्कृत इत्यादि तीनही भाषांचा त्याग करण्याचा त्यानें संकल्प केला. **सातवाहन** राजाविषयीं त्याचें मन प्रसन्न नव्हतें म्हणून तो खिन्न होत्साता अरण्यांत संचार करीत करीत **विंध्यवासिनी** देवीचें दर्शन घेऊन तिच्या आज्ञेनें **काणभूतीजवळ** प्राप्त झाला. त्याला पाहतांच **गुणढ्याला** पूर्वदशेचें स्मरण होऊन, निजलेला मनुष्य जागा होतो त्याप्रमाणें एका-एकीं त्याला ज्ञान प्राप्त झालें. **सातवाहन** राजाजवळ,—'संस्कृतादि तीन भाषा आपण कधींही बोलणार नाहीं,' म्हणून त्याणें प्रतिज्ञा केली होती, तिचें स्मरण होऊन त्या तीनही भाषांहून निराळी पैशाची नामक भाषा त्याला सहज अवगत झाली होती त्याच भाषेनें आपलें नांव इत्यादि **काणभूतीला** सांगून म्हणाला, "तुझी भेट झाली, हें फार चांगलें झालें. आतां **पुष्पदन्तापासून** ऐकलेली दिव्य कथा लौकर मला सांग म्हणजे तूं आणि मी दोघेही एकदम शापापासून मुक्त होऊं."

---

१– पुढें **गुणाढ्य** आत्मवृत्त कथन करणार आहे त्यावरून ह्या कथाभागाचा संदर्भ कळेल.

तें ऐकून परम आनंदित होऊन नम्रपणें काणभूति त्याला ह्मणाला, "महाराज, मी कथा सांगतों. परंतु तुमचें जन्मचरित्र ऐकण्याविषयीं मला मोठें कौतुक वाटतें आहे. तर कृपा करून आधीं तें मला सांगा." याप्रमाणें त्याची प्रार्थना श्रवण करून गुणाढ्यानें आपलें जन्मचरित्र सांगण्यास प्रारंभ केला. तो म्हणालाः—

"पैठण नांवाचें प्रख्यात नगर आहे. तेथें सोमशर्मा नांवाचा एक कुलीन ब्राह्मण रहात होता. त्याला वत्स आणि गुल्मक नांवाचे दोन पुत्र आणि श्रुतार्था नांवाची एक कन्या अशीं तीन मुलें होतीं. याप्रमाणें लहानच; पण मोठ्या बेताबाताचा आपला संसार चालवीत असतां सोमशर्मा ब्राह्मण आणि त्याची स्त्री या उभयतांनीं एकाएकीं कालधर्माचा स्वीकार केला. तेव्हां वर सांगितलेले दोघेही पुत्र आपल्या कनिष्ठ बहिणीचें पालन करितहोत्साते घरीं कसा तरी निर्वाह करीत राहिले. याप्रमाणें तीं तिघेंही कालक्रमणा करीत असतां एकेदिवशीं अकस्मात् श्रुतार्था गरोदर झाली आहे असें उभयतां बंधूंच्या दृष्टीस पडलें. त्यांच्या घरांत तिघांवांचून चौथें कोणीच मनुष्य नव्हतें. श्रुतार्थेचा विवाह झाला नव्हता. परकी पुरुष कधीं कोणीं त्यांच्या घरीं राहिला नव्हता. व श्रुतार्थाही कधीं बाहेर गेल्याचें अथवा कोणाही पुरुषाचा तिला सहवास घडल्याचें स्मरण होत नाहीं, असें असून ती गरोदर कशी झाली? याचें त्या उभयतां बंधूंस मोठें आश्चर्य वाटलें, आणि विशेष कांहीं कारण न समजल्यावरून त्यांणीं परस्परांवर संशय घेतला. वत्साच्या मनांत गुल्मानें हें पापकर्म केलें असावें असें आलें व गुल्माच्या मनांत वत्सानेंच तें केलें असेल असा संशय आला. यामुळें अर्थात् त्यांचें परस्परांविषयींचें वर्तनही कांहीं निराळ्याच रीतीचें होऊं लागलें. तें पाहून श्रुतार्थेच्या मनांत त्याचें कारण तेव्हांच समजून आलें. ती मोठी चतुर होती. उभयतां बंधूंचें मन शुद्ध व्हावें म्हणून ती त्यांला म्हणाली, "तुमच्या मनांत जी वाईट शंका आली आहे, ती अगदीं

निराधार आहे. भलतीच गोष्ट मनांत आणूं नका. मी गर्भिणी कशी झालें, याविषयीं तुम्हाला संशय आला आहे. तर त्याविषयींचें वृत्त ऐका. एकेदिवशीं मी नदीवर स्नानास गेलें होतें. तेथें नागराज वासुकीच्या बंधूचा मुलगा कुमार कीर्तिसेन क्रीडा करित होता. त्याणें मला अवलोकन करून, कामपीडित होत्साता तो माझ्याजवळ प्राप्त झाला. आणि पुष्कळ प्रकारें माझी विनवणी करून आपलें नांव कुल-गोत्र इत्यादि निवेदन करून गांधर्वविधीनें त्यानें माझें पाणिग्रहण केलें. माझ्याविषयीं तुम्ही संशय धरूंनका. मी हीनपुरुषाशीं विवाह केला नाहीं. तो मोठा कुलीन असून ब्राह्मण आहे. आणि त्याच्यापासूनच हा गर्भ राहिला आहे." याप्रमाणें बहिणींचें वाक्य श्रवण करून वत्स आणि गुल्म म्हणाले, "होय, तूं सांगतेस तें कदाचित् खरें असेल पण जोंपर्यंत प्रत्यक्ष अनुभव आला नाहीं तोंपर्यंत तें आम्हाला खरें वाटावयाचें नाहीं." हें ऐकून श्रुतार्थेनें बंधूंचा संशय निवृत्त करावा म्हणून एकांतीं त्या नागपुत्राचें स्मरण केलें. तत्काल तो तेथें प्रकट होऊन श्रुतार्थेला, स्मरण करण्याचें कारण विचारूं लागला. तेव्हां तिणें पूर्वी झालेलें वृत्त सांगितलें. मग वत्स आणि गुल्म यांला तेथें बोलावून कीर्तिसेन म्हणाला, "ह्या तुमच्या बहिणीला मी आपली भार्या करून घेतली आहे. पूर्वी ही श्रेष्ठ अप्सरा होती. शापानें हिला मनुष्यजन्म प्राप्त झालें आहे. तुम्हींही शापानेंच येथें उत्पन्न झालां आहां. तुमच्या बहिणीला निःसंशय मुलगा होईल. व पुत्रमुखावलोकन करतांच ही आणि तुम्हीं उभयतांही शापमुक्त होऊन पूर्वस्वरूपाला प्राप्त व्हाल." याप्रमाणें बोलून तो नाग तेथेंच गुप्त झाला. हा प्रत्यक्ष अनुभव पाहून वत्स आणि गुल्मक या उभयतां बंधूंचीं अंतःकरणें परस्परांविषयीं शुद्ध झालीं. नंतर कांहीं दिवसांनीं

१- श्रुतार्थे ही ब्राह्मणाची मुलगी होती. व ब्राह्मणवर्णाला गांधर्वविवाह विहित नाहीं तथापि विवाह करून घेणारा नाग, अर्थात् दिव्य पुरुष होता व ती पूर्वजन्मींची अप्सरा होती तेव्हां त्यांला कांहीं दोष नाहीं.

श्रुतार्थेला पूर्ण मास होऊन ती प्रसूत झाली. मित्रा काणभूते! तिला जो पुत्र झाला तोच मी असें जाण. माझ्या जन्मकालीं, "हा महादेवाच्या गणाचा अवतार आहे. हा गुणाढ्य यानांवानें सर्वत्र प्रसिद्ध होईल." अशी आकाशवाणी झाली. नंतर, ज्यांचा शाप क्षीण झाला आहे, अशी माझी मातुश्री आणि उभयतांही मातुल हे कांहीं दिवसांनीं परलोकास गेले. त्यांच्या वियोगानें मीं फारच दुःखित होऊन अधीर झालों. माझी आई मला सोडून गेली त्यावेळीं मी आठ वर्षांचा होतों. मला कांहीं समजत नव्हतें, तरी आपल्याच बुद्धीनें विद्या संपादन करावी असा निश्चय करून अभ्यास करण्याकरितां दक्षिण देशाला गेलों. तेथें बहुत दिवस राहून गुरुकृपेनें सर्व विद्या आणि कला संपादन केल्या. विद्वत्तेविषयीं माझी चहूंकडे प्रख्याती झाली. मग गुरूची आज्ञा घेऊन आपल्या गुणांचा महिमा दाखवीत होत्साता मी पुनः स्वदेशीं आलों. माझी कीर्ति चहूंकडे पसरल्यामुळें निरनिराळ्या ठिकाणाहून बहुत शिष्य विद्याभ्यासाकरितां माझ्याजवळ येऊन राहिले होते. त्या शिष्यमंडळासहवर्तमान मी मोठ्या थाटानें बहुत दिवसांनीं आपल्या नगरांत प्रवेश केला. यावेळीं फारच उत्तम शोभा आमच्या दृष्टीस पडली. येथूनतेथून ती नगरी हृष्टपुष्ट अशा लोकांनीं अगदीं गजबजलेली होती. उज्वल वेष धारण करणाऱ्या स्त्रीपुरुषांचे थवेचे थवे मार्गानें चाललेले दृष्टीस पडत होते. कोठें सामवेदी ब्राह्मण यथाविधि सामें गात होते. कोठें पंडितांची सभा जमलेली असून तेथें शास्त्रीय विवाद चालला होता. कोठें—"जो येथें द्यूतकला जाणणारा असेल त्याच्या; द्रव्याचा निधी अगदीं हातांत आल्यासारखा आहे" इत्यादि प्रकारचीं भाषणें करित असून जुगारी लोक द्यूत खेळत आहेत. तसेंच आपआपल्या व्यापारकौशल्याची तारीफ करणारे वाणी परस्परांत कोठें गोष्टी करित बसले आहेत. त्यांतच एक वाणी आपल्या व्यापारकुशलतेची तारीफ करीत करीत दुसऱ्याला म्हणाला, " अरे, वडिलोपार्जित थोडेंबहुत द्रव्य घेऊन त्यावर विशेष पैसे मिळविले तर त्यांत कांहीं महत्व नाहीं.

माझी पहा कशी स्थिती आहे ती ? माझ्याजवळ एक कवडीदेखील भांडवल नव्हतें. मी आईच्या पोटांत असतांनांच बाप वारला ! आईजवळ पुष्कळ द्रव्य होतें; पण लबाड लोकांनीं तिला फसवून सर्व हरण केलें. नंतर ती आपल्या गर्भाचें रक्षण करित होत्साती **कुमारदत्त** नांवाचा एक व्यापारी तिच्या बापाचा मित्र होता त्याच्याजवळ राहिली होती. माझा जन्म त्या **कुमारदत्ता**च्याच घरीं झाला. तेव्हां तशा आपत्कालांत पुत्र झाला म्हणून तिला फारसा आनंद झाला नाहीं. तरी तिनें माझें उत्तमप्रकारें रक्षण करून मोल-मजूरी अथवा तसल्याच हलक्यां कामावर मिळालेल्या द्रव्यानें माझें पोषण केलें. नंतर विद्याभ्यासाकरितां एका विद्वान् ब्राह्मणाच्या घरीं मला ठेविलें. तेथें अनुक्रमानें लिहिणें, वाचणें, गणित इत्यादिकांचा मीं अभ्यास केला. तेव्हां गुरु मला ह्मणाला, "तूं वाण्याचा मुलगा आहेस. फार विद्या शिकून तुला काय करावयाचें आहे? तर आतां कांहीं तरी व्यापार कर. **विशाखील** नांवाचा एक मोठा सावकार या देशांत आहे. तो कुलीन असून दरिद्री झालेल्यांस भांडवलाकरितां द्रव्य देत असतो. तर तूं त्याच्याकडे जा." याप्रमाणें गुरूचें भाषण ऐकून मी त्या **विशाखिल** सावकाराजवळ द्रव्य मागावयास गेलों. मी तेथें पोहोंचलों त्याचवेळीं तेथें एक वाणी त्याच्या जवळ द्रव्य मागावयास आला होता. त्यावर रागावून **विशाखील** त्याला म्हणाला, "काय ? तुम्हीं भांडवल मागायला आलां? आणि तें घेऊन करावयाचें काय ? खरे व्यापारी असतात त्यांस पाहिजे ती वस्तु भांडवल होते. तो पहा तेथें एक उंदीर मरून पडला आहे. खऱ्या व्यापाऱ्याला तोच भांडवल होऊं शकेल. मीं आजपर्यंत तुला पुष्कळ द्रव्य दिलें आहे. पण तूं असा चांडाळ आहेस कीं, त्याचा कांहींच उपयोग केला नाहींस. व्याज तर एकीकडेच राहिलें; पण मूळ रक्कम देखील परत केली नाहींस ! व तूं आपल्याजवळही कांहीं संग्रह केला नाहींस." याप्रमाणें **विशाखील** सावकार त्या व्यापाऱ्याच्या मुलाला सांगत होता तें ऐकून एकदम पुढें सरून मी म्हटलें, "महाराज, तुमचें

सांगणें मला फार मान्य झालें. आपली कीर्ति ऐकून मीही व्यापाराकरितां कांहीं भांडवल मागावयास आलों होतों; पण मला आतां दुसरें द्रव्य नको. हा मेलेला उंदीरच मी आपल्यापासून भांडवल ह्मणून घेतों." याप्रमाणें सांगून, उंदराचें प्रेत कर्जी घेतल्याबद्दल त्याला खत लिहून देऊन तो उंदीर हातांत घेऊन मी तेथून निघालों, तेव्हां विशाखील सावकार व त्याच्या जवळचे इतर लोक हंसूं लागले. कोणी तर मला वेडाच ठरविला; पण मी तिकडे लक्ष न देतां थेट बाजारची वाट धरिली. बाजारांत बराच वेळ फिरून दोन मुठी हरभऱ्यांस तो उंदीर विकला. एका वाण्यानें मांजराकरितां म्हणून तो विकत घेतला! नंतर ते हरभरे भाजून पदरांत बांधून घेतले आणि गांवाबाहेर एका चव्हाट्यावर वृक्षाची शीतल छाया पाहून तेथें बसलों. बरोबर गार पाण्याचें भरलेलें एक गाडगें घेतलें होतें. ते दिवस उन्हाळ्याचे असल्या कारणानें वाटेनें येणाऱ्या जाणाऱ्यांस पाण्याची फार अपेक्षा होती. तथापि इतर कोणासही मी पाणी दिलें नाहीं, रानांतून लाकडांचे भारे आणून विकणारे लोक जे त्या वाटेनें येत होते, त्या प्रत्येकास थोडथोडे फुटाणें व गार पाणी दिलें. त्यामुळें ते संतुष्ट होऊन एकेकानें दोन दोन लाकडें मोठ्या संतोषानें मला दिलीं. त्यांची मोळी बांधून संध्याकाळीं मी ती बाजारांत आणून विकली. तिच्या किमतीचे जे पैसे आले होते त्यांचे पुनः फुटाणें घेऊन, पूर्वींप्रमाणें दुसरे दिवशीं मोळीविक्यांस दिले. याप्रमाणें तीन दिवस एकसारखा क्रम चालला होता. चौथे दिवशीं अकस्मात् मोठें वादळ होऊन लहान मोठीं पुष्कळ झाडें मोडून पडलीं. तेव्हां पुष्कळ पैसे देऊन मी तीं सर्व खरीद केलीं. त्यांच्या विकरीपासून मला बराच मोठा लाभ झाला. यानंतर क्रमाक्रमानें मी मोठमोठ्या घडामोडी करूं लागलों. त्यापासून अल्पकाळांत मोठ्या सावकारांत माझी गणना होऊं लागली. नंतर आपल्याला मूळ भांडवल देणाऱ्या विशाखिलाचे उपकार फेडावे ह्मणून मी सोन्याचा उंदीर करून त्याला दिला. आणि आपल्या व्यापाराची सर्व हकीकत त्याला सांगितली.

ती ऐकून तो फारच संतुष्ट झाला. व माझ्या ह्या विलक्षण व्यापारकौशल्याची त्यानें मोठी तारीफ केली. त्याला उपवर झालेली एक कन्या होती, आणि तिचा विवाह करण्याचा विचार चालला होता. मजवर फार प्रसन्न झाल्यामुळें त्याणें तीच कन्या मला देऊन आपला जांवई करून घेतला. उंदीर मूळ भांडवल घेऊन त्यावर एवढा मोठा व्यापार करून प्रसिद्ध झालों, म्हणून सर्व लोकांनीं उंदीरशेट हेंच माझें नांव ठेविलें आहे. याप्रमाणें, मूळचा मी अत्यंत दरिद्री असूनही मोठें ऐश्वर्य संपादन केलें." हा चमत्कारिक वृत्तांत ऐकून जवळ बसलेले इतर सर्व वाणी आश्चर्यसमुद्रांत निमग्न झाले. खरेंच आहे, भिंत असून तीवर चितार्‍यानें चित्रें काढलीं तर त्याचें नवल नाहीं; पण भिंत नसतांना चित्रें काढलीं तर किती बरें चमत्कार वाटेल! ही त्या वाण्याची गोष्ट ऐकून मलाही फार आश्चर्य वाटलें.

अम्मळ पुढें जातों तों प्रतिग्रहापासून प्राप्त झालेलें आठ मासे सोनें हातांत घेऊन मोठ्या आनंदानें कोणी एक [illegible] ब्राह्मण मार्गानें जात होता तो भेटला. त्याला एक विट[1] येऊन ह्मणाला, "[illegible]! तुम्ही ब्राह्मण आहां. बाकी तुह्मी ब्राह्मणाचारानें वर्तन करितां हें खरें आहे, तथापि तेवढ्यावर रोज पुरवा मिळण्याला कांहीं [illegible]कत नाहीं. मग हें सोनें ठेवून काय करायचें आहे? याचा कांहीं [illegible] चांगल्या ठिकाणीं व्यय करावा. रोज गळ्यापर्यंत येई तों परान्न [illegible]ऊन हुश् हुश् करीत कोठें तरी देवळाबिवळांत पडून राहतां. [illegible]तील सुखाचा कांहीं लेशमात्र तरी तुह्माला अनुभव आहे काय? [illegible] पोट भरणें हाच पुरुषार्थ असेल तर कुत्रीं देखील भरतात! गृहस्था, [illegible]ठ नागरिक लोकांचा सहवास कर, विषयरसाचा आस्वाद घे, विदग्ध

1—'विट' हा शब्द—वेश्यांचे साथीदार किंवा त्यांचे शिक्षक अथवा त्यांचे भायीबंद, [illegible]लावतात. हे लोक मोठे चतुर धूर्त असून कलाप्रवीण असले पाहिजेत. आह्मी [illegible]या 'चारुदत्त आणि वसंतसेना' या पुस्तकांतलें विटाचें वर्तन वाचलें असतां त्यांचें [illegible]प लक्ष्यांत येईल.

लोकांचें शिष्यत्व कर, ह्मणजे थोडा तरी सुखाचा अनुभव येईल. नाहीं तर तुझ्यासारख्या खादाडांनां शुद्ध बैल ह्मटलें तर काय चिंता आहे बरें ?" हें ऐकून तो ब्राह्मण ह्मणतो, "पुरे पुरे! बाबा तूं तर आज आमची खूपच केलीस म्हणायची! पण तूं म्हटलेंस तें कांहीं खोटें नव्हे. आजपर्यंत तशाच अडाणी रीतीनें माझे दिवस गेले. पण आतां विदग्धलोकांचा सहवास करून खचित नागरिक होतों. मग पहा माझी कशी स्थिति होईल ती. हो, पण मला ह्या गोष्टी शिकवील कोण?" हें ऐकून विट ह्मणाला, "हात्तेचा! हें काय जंगलका आहे? अरे, येथें तुला हवे तितके शिकविणारे भेटतील. पण दुसरे तिसरें कशाला? इकडे समोर पहा. ती तुझ्या नाकासमोर जी खिडकी दिसते आहे, तेथें **चतुरिका** नांवाची एक वेश्या राहत आहे. तेथें जाऊन माझें नांव सांग ह्मणजे ती तुला सर्व शिकवील. तुझ्या हातांत हें सोनें आहे तें तिला दे आणि तिचें मनरंजन कर. तुझे ते कर्कश शब्दप्रयोगांनले मंत्र मात्र तेथें ह्मणूं नकोस. मधुर असें साम कर. ती सांगेल तसा वाग म्हणजे तुझें कार्य होईल." याप्रमाणें त्या भोळ्या ब्राह्मणाला उपदेश करून हंसत हंसत तो **वीट** पुढे चालता झाला.

इकडे तो ब्राह्मण गडबडीनें धांवत धांवत त्या वेश्येच्या घरीं प्राप्त. **चतुरिका** दरवाज्यापर्यंत त्याला सामोरी आली व तिणें आसना देऊन त्याचा मोठा सत्कार केला. पण या ब्राह्मणाचें तिकडे मुळींच ल. नव्हतें. त्यानें हातांतलें सुवर्ण तिच्या पुढें ठेवून, "हें मी तुह्माला देतों. कृपा करून तुह्मी मला कांहीं तरी नागरिक शहाणपण शिकवा." असें बोलत बोलत तिला नमस्कार घातला! नंतर हात जोडून मोठ्या उंच स्वरानें साम गायन करूं लागला! तेथें असलेले लोक हें त्या अ ब्राह्मणाचें विचित्र वर्तन पाहून खदखदां हंसूं लागले. थोडक्याच वेळांत **विट, चेट** इत्यादिकांचा मोठा थवा तेथें जमला. ते ह्मणाले, "हा कोठल कोल्हा येथें आला आहे? अरे, ह्या मूर्खाला अर्धचंद्र देऊन लौकर बाहेर घालवा." हें त्यांचें भाषण ऐकून अर्धचंद्र हा कसला तरी

घेणं असेल; आणि त्याणें हे लोक माझा शिरच्छेद करणार आहेत असें समजून, " मला शिकवली नागरिकता शिकविली! " असें मोठ्यानें ह्मणून तो ब्राह्मण तेथून निघून गेला. आणि ज्याणें त्याला हा उपदेश केला होता त्याच्या जवळ जाऊन घडलेलें सर्व वर्तमान त्याला सांगितलें. आणि आपलें सोनें परत मागूं लागला. तेव्हां तो वीट हंसून पिंगलका-ला ह्मणाला, " अरे ब्राह्मणा, मी तुला साम करायला सांगितलें, त्याचा अर्थ असा कीं, ' साम ' हें सख्याचें नांव आहे. तेव्हां तूं कोणच्या तरी रीतीनें तिचें समाधान करून तिचें सख्य संपादन कर, असें तुला मीं सांगितलें. त्याचा तूं भलताच अर्थ घेतलास याला काय म्हणावें! अरे वेड्या, तेथें सामवेदाचें काय काम होतें? काय असेल तें असो बुवा, तुम्हां वैदिक ब्राह्मणांचें जाड्य अगदीं शिखराला पोंचलें आहे असें ह्मटलें पाहिजे. " असें बोलून तो पुनः हसूं लागला. नंतर त्या पिंगलकाला बरोबर घेऊन चतुरिकेजवळ जाऊन तिला म्हणाला, " ह्या द्विपादपशूनें दिलेलें तें सोनें टाकून दे कशी! तुला काय करावयाचें आहे? असल्या मूर्खाच्या हातचें कांहीं एक ठेवूं नये." हें ऐकून चतुरिका मोठ्यानें हंसली. आणि—" हें घे आपलें. " असें ह्मणून तिणें तें सोनें पिंगलका-च्या अंगावर फेकून दिलें. तें हातांत घेऊन, मरून पुनः जिवंत झाल्या-प्रमाणें मानणारा—तो ब्राह्मण आपल्या घराकडे चालता झाला. याप्रकारचीं पदोपदीं अनेक कौतुकें पहात इंद्राच्या गृहासारखें दिव्य दिसणारें, अशा तेथील राजगृहाजवळ आह्मी प्राप्त झालों.

शिष्यांनीं पुढें जाऊन मी येत असल्याचें वर्तमान राजाला निवे-दन केलें. राजाच्या आज्ञेनें त्याचा प्रधान सामोरा येऊन त्यानें सत्का-

१— बाणांच्या फळांचे निरनिराळे आकार असतात व त्यांवरून त्यांचीं नांवेंही भिन्न भिन्न आहेत. ज्याच्या फळाचा आकार अर्धचंद्रासारखा असतो त्याला 'अर्धचंद्र' असें ह्मणतात. अवतरण चिन्हांतर्गत वाक्यांतल्या अर्धचंद्रशब्दानें 'गचांडी' द्यावयाची असून पिंगलक ब्राह्मण भलतेंच समजला.

रपूर्वक मला राजवाड्यांत नेलें. तेथें मोठ्या सभेंत सिंहासनावर बसलेला राजा **सातवाहन** याला मी पाहिलें, **शर्व** आणि **वर्म** या नांवाचे दोघे मुख्य प्रधान व इतर मंत्रिवर्ग राजाच्या आसमंतांत बसले होते. **सुधर्मा** नांवाच्या सभेंत बृहस्पती इत्यादिकांसह जसा इंद्र शोभावा तसा राजा **सातवहन** शोभत होता. मला पाहतांच सिंहासनावरून खालीं उतरून त्याणें नमस्कार केला. मीही त्याला आशीर्वाद दिल्यावर मला उत्तम आसनावर बसविलें. राजा व प्रधान इत्यादि सर्वही आपआपल्या आसनावर बसले. तेव्हां **शर्व** व **वर्म** इत्यादि प्रधानांनीं माझी स्तुति करून राजाला सांगितलें, " महाराज, हे मोठे विद्वान् आहेत. सर्व विद्या आणि कला ह्यांच्या दासी झाल्या आहेत. फार काय सांगावें, **गुणाढ्य** म्हणून जें यांचें नांव आहे, तें अगदीं अन्वर्थ झालें आहे. " इत्यादि प्रकारें त्यांणीं माझी फार स्तुति केली. ती ऐकून **सातवाहन** राजाला मोठा संतोष झाला. आणि त्याणें तेथल्या तेथेंच मला प्रधानकीचीं वस्त्रें दिलीं. नंतर राजाच्या मर्जीस्तव प्रधानकीचा स्वीकार करून मी सर्व कारभार चालवूं लागलों. इकडे शिष्यांला अध्ययन सांगण्याचें कामही करीत होतों. राजानें बहुतच आग्रह केल्यावरून, कुलशीलादिकांनीं अनुरूप अशा एका **सुशीला** नांवाच्या ब्राह्मणकन्येशीं मी विवाह करून घेतला. तिच्यासह परम आनंदानें संसारसुखाचा अनुभव घेत होतों.

एकेदिवशीं सहज गोदावरी नदीच्या कांठीं फिरत असतां देवीकृती नांवाची एक सुंदर बाग माझ्या दृष्टीस पडली. पृथ्वीवर आलेल्या इंद्राच्या नंदनवनाप्रमाणें रम्य अशी ती बाग पाहून मला फार संतोष झाला. बागेचें रक्षण करणाऱ्या अधिकाऱ्याला—ही बाग येथें कोणी केली? असें मी विचारलें. तेव्हां तो म्हणाला, " महाराज! ही बाग फार प्राचीन आहे. हिच्याविषयीं मला विशेष कांहीं माहीत नाहीं, पण वृद्धलोक अशी कथा सांगतात कीं, पूर्वीं, मौन धारण करणारा असून अगदीं निराहार राहणारा असा कोणी ब्राह्मण येथें आला होता. त्यानें ही दिव्य बाग

आणि हें देवालय बांधलें अशी प्रसिद्धी आहे. आणि जेव्हां त्या ब्राह्मणानें मंदिर बांधलें तेव्हां निरनिराळ्या ठिकाणांहून अनेक ब्राह्मण येथें राहण्यास आले. बाहेरून आलेल्या त्या ब्राह्मणांनीं कौतुकानें आग्रहपूर्वक विचारल्यावरून, त्या ब्राह्मणानें त्यांस आपला वृत्तांत सांगितला. तो असा कीं, 'या भरतखण्डांत भरुकच्छ नांवाचा नर्मदा नदीच्या तीरावर एक देश आहे. त्या देशांत मी एका ब्राह्मणाच्या घरीं उत्पन्न झालों. माझे आईबाप अत्यंत दरिद्रि व अशिक्षित होते. मलाही विद्या-अक्षर कांहीं प्राप्त झालें नाहीं. मी अत्यंत मूर्ख असून आळशी होतों. ह्मणून मला कोठें भिक्षादेखील मिळत नव्हती. तेव्हां खिन्न होऊन मी आपल्या जिवावरदेखील विरक्त झालों. आणि घर सोडून अनेक तीर्थें फिरत फिरत विंध्यवासिनीदेवीजवळ प्राप्त झालों. तेथें माझ्या मनांत असा विचार आला कीं, अशा दुःखांत वांचून तरी काय करावयाचें आहे? ही देवी आपल्या भक्तांवर अनुग्रह करिते. लोक पशूचा बली देऊन हिला प्रसन्न करून घेतात. तर मीं आपल्यालाच बली देईन! कारण "मूर्ख आणि पशू यांत कांहीं अंतर नाहीं." असें विद्वानांचें ह्मणणें आहे. असा निश्चय करून हातांत शस्त्र घेऊन मी आपला मस्तक तोडण्याला प्रवृत्त झालों. तत्क्षणीं देवी प्रकट होऊन प्रसन्न होत्साती मला ह्मणाली, "पुत्रा! तूं सिद्ध झालास. आतां आपल्याला मारून घेऊंनकोस. माझी सेवा करीत एथेंच रहा." याप्रमाणें देवीचा वर प्राप्त होतांच माझ्या अंगीं दिव्य सामर्थ्य प्राप्त झालें. त्या दिवसापासून क्षुधा आणि तृषा मला मुळींच बाधा करीतनाशा झाल्या. मग मोठ्या आनंदानें मी तिची सेवा करीत तेथेंच राहिलों. यानंतर एकेदिवशीं,—"तूं आतां पैठणनगराला जाऊन बाग आणि मंदीर तयार कर." ह्मणून स्वतः देवीची आज्ञा झाली. आणि तिनेंच दिव्य वृक्षांचें बीज मला दिलें. तें घेऊन मी येथें हा बाग तयार केला. हा सर्व देवीचा प्रभाव आहे, तुह्मी या बागेचें उत्तम-प्रकारें संरक्षण करून पूजा अर्चा इत्यादि करावें!" असें सांगून तो ब्राह्मण

मुक्त झाला." माळी ह्मणतो, "महाराज, याप्रमाणें ह्या उद्यानाची कथा आहे." त्या उद्यानपालापासून वर सांगितलेली कथा ऐकून—देवीनें त्या देशावर हा मोठा अनुग्रहच केला आहे असें मला वाटलें. नंतर बागेची आणि मंदिराची शोभा वर्णन करीत होत्साता मी आपल्या घरीं प्राप्त झालों." याप्रमाणें गुणाढ्यानें सांगितलेली कथा श्रवण करून काणभूती ह्मणाला, "मित्रा, प्रसंग तर फारच मनोरम चालला आहे. मध्येंच विघ्न करावें हें योग्य नाहीं. तथापि मला एक प्रश्न करावयाचा आहे. कारण सातवाहन, हें नांव ऐकून मला कांहीं चमत्कार वाटला. तर आधीं त्या राजाला असें नांव पडण्याचें कारण काय? तें सांगून मग तुझा वृत्तांत सांग." हें ऐकून गुणाढ्य ह्मणाला, "कां होईना. तुझी इच्छा आहे तर प्रथम तीच कथा सांगतों.

पूर्वीं पैठण नगरांत दीपकर्णी नांवाचा एक मोठा पराक्रमी राजा होता. त्याची प्राणापेक्षांहीं अत्यंत प्रिय अशी शक्तिमति नांवाची स्त्री होती. उभयतां मोठ्या आनंदानें सुखाचा उपभोग करित होतीं. एकेदिवशीं वसंतऋतूंत चांदण्याच्या रात्रींत उभयतांहीं बागेंत क्रीडा करावयास गेलीं होतीं. तेथें दोघेंही अनेक प्रकारच्या क्रीडा करून श्रांत झालीं, व कांहीं वेळानें उभयतांसही झोंप लागली. अशा स्थितींत तेथें संचार करणाऱ्या सर्पाच्या मस्तकावर राणीचा सहज पाय पडल्यामुळें, क्रुद्ध होऊन त्यानें तिला दंश केला. हें वर्तमान कोणासही माहित नव्हतें. पहाटेस राजा जागृत होऊन पाहतो तों आपली प्राणप्रिया मरून पडली आहे, असें त्याला समजलें. त्यानें अनेकप्रकारचे उपचार केले, तरी मेलेली शक्तिमति पुनः जिवंत झाली नाहीं. नंतर तिचें यथाविधी उत्तरकर्म करून, पोटीं संतान नव्हतें तथापि राजानें ब्रह्मचर्य व्रत धारण केलें. राज्यभार वाहण्याला योग्य पुत्र नाहीं ह्मणून वारंवार त्याला दुःख होत असे. एकेदिवशीं त्याला स्वप्नांत दर्शन् देऊन भगवान् महादेवानें सांगितलें कीं, "अरण्यांत संचार करित असतां सिंहाच्या पाठीवर बस-

ला एक बालक तुझ्या दृष्टीस पडेल. त्याला घरीं घेऊन ये. तोच झा पुत्र होईल." नंतर जागा होऊन त्या स्वप्नाची राजानें आठवण विली व ईश्वर आपणाला पुत्र देणार आहे असें समजून त्याला मोठा ानंद झाला. मग एकेदिवशीं मृगया करीत करीत तो दूर एका रण्यांत गेला. तेथें स्वप्नांत महादेवानें सांगितल्याप्रमाणें भरदोनप्रहरीं सिंहावर बसून एका सरोवराच्या तीरीं जाणारा, सूर्यासारखा तेजस्वी क मुलगा त्याणें पाहिला. त्याला पाहतांच राजाला स्वप्नाचें स्मरण झालें. ालकाला खालीं उतरून पाणी पिण्याची इच्छा करणाऱ्या सिंहावर एक ाण सोडून राजानें त्याला खालीं पाडला. तेव्हां तो सिंहाच्या शरी- ाचा त्याग करून भव्य आणि तेजस्वी असा दिव्य पुरुष झाला. तें ाहून राजाला मोठें दुःख झालें. तो ह्मणाला, "हें काय? न जाणून माझ्या ातून कांहीं अन्याय तर झाला नाहींना?" तेव्हां तो पुरुष ह्मणाला, "राजन्, दुःख करण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. तूं माझ्यावर मोठा उपकारच केला आहेस. मी कुबेराचा मित्र सात या नांवाचा यक्ष आहें. एके- दिवशीं गंगेवर स्नान करणारी एक ऋषीची कन्या मी पाहिली. तिच्या दर्शनानें मी जसा मोहित झालों, तशीच तीही मला पाहून मोहित झाली. तेव्हां आह्मी उभयतांनीं गांधर्वविधीनें विवाह करून आपले मनोरथ पूर्ण करून घेतले. हें वर्तमान तिच्या बांधवांला समजल्यावरून त्यांणीं रागानें आह्मा उभ- यतांसही,—"ज्यापेक्षां तुह्मी दोघेही वडील माणसांची मर्यादा न ठेवतां स्वेच्छा- चारि झालां; त्यांपेक्षां दोघेही एकदम सिंहरूपी होऊन अरण्यांत संचार करा." असा शाप दिला. पुत्र होईपर्यंत शाप राहील अशी त्यांणीं मर्यादा केली होती. कांहीं दिवसांनीं ती माझी प्रियपत्नी गरोदर होऊन हें पुत्ररत्न प्रसवली, आणि थोडक्याच दिवसांत तिनें देहाचा त्याग केला. मीही त्याचवेळीं देह- त्याग केला असता, पण हा बालक अनाथ असून याचें कोणी रक्षण कर- णारा नाहीं, ह्मणून मी राहिलों. दुसऱ्या सिंहिणीचें दूध पाजून या पुत्राचें मी आजपर्यंत रक्षण केलें. माझ्या शापाचा अंत तुझ्या बाणानें व्हायचा

होता, तो समय आज प्राप्त झाला. तूं बाण मारल्यामुळें मी शापापासून मुक्त झालों. तर आतां हा मुलगा मी तुला देतों, याचा स्वीकार कर. हें सर्व असेंच व्हावयाचें होतें असें त्या ऋषीनीं पूर्वींच आह्मास सांगितलें होतें. तर आतां आपल्या लोकाला जाण्याविषयीं मी तुझी अनुज्ञा मागतों." असें सांगून व त्या बालकाला प्रेमपूर्वक कुरवाळून यक्ष तेथेंच गुप्त झाला. नंतर **दीपकर्णी**राजा त्या पुत्राचा स्वीकार करून घरीं आला. **सात** नांवाच्या यक्षानें आपल्या पाठीवर वाहिला ह्मणून त्याला **सातवाहन** असें त्यानें नांव ठेविलें. राजानें त्याचें लालनपालन करून विद्या कला इत्यादि शिकविलें. आणि तो प्रौढ होतांच राज्य त्याच्या स्वाधीन करून तपोवनाचा आश्रय केला. तेव्हांपासून सार्वभौम पदवीचा उपभोग घेणारा महाबलाढ्य हा **सातवाहन**राजा राज्य करूं लागला." यात्रमाणें **काणभूती**नें विचारल्यावरून, मध्येंच ही कथा सांगून **गुणाढ्या**नें पूर्वी सुरू केलेलें आत्मवृत्त सांगण्यास आरंभ केला. तो ह्मणाला:—

"पूर्वी सांगितल्याप्रमाणें मी **सातवाहन** राजाचा प्रधान होऊन त्याच्या जवळ राहत असतां, एकेदिवशीं वसंत ऋतूंत बरोबर स्त्रियांला घेऊन देवीनें केलेलें उद्यान—ज्याचें पूर्वीं मी वर्णन केलें आहे—त्यांत क्रीडा करण्याकरितां राजा गेला. नंदनवनांत जसा इंद्र क्रीडा करतो त्याप्रमाणें बहुतवेळ **सातवाहन** त्या बागेंत क्रीडा करीत होता. स्थलक्रीडा करून श्रांत झाल्यावर जलक्रीडा करण्याकरितां एका तळ्यांत स्त्रियांसहवर्तमान प्रवेश करून तेथें क्रीडा करूं लागला. आसमंतात् स्त्रियांचा वेढा असून, हत्तिणी हत्तीवर आपल्या सोंडेनें उदक फेंकतात त्याप्रमाणें; मध्यें राजा उभा राहिला, तेव्हां थट्टेनें स्त्रिया त्याच्या अंगावर ओंझळीनें पाणी फेंकीत होत्या. व तोही त्यांच्या अंगावर ओंझळी टाकीत होता. पाण्याचें घर्षण झाल्यामुळें ज्यांच्या नेत्रांतलें काजळ धुऊन गेलें आहे, वारंवार पाण्याचा प्रहार झाल्या कारणानें ज्यांचे गाल आणि नेत्र आरक्त

झाले आहेत व नेसलेलें बारीक वस्त्र भिजून शरीराला चिकटल्यामुळें ज्यांचे अवयव स्पष्ट दिसत आहेत, उरस्थलावरच्या पत्ररेखा किंचित् किंचित् अस्पष्ट दिसत आहेत, ज्यांचे मोकळे सुटलेले केंस पाण्यावर शेवाल्याप्रमाणें तरंगत असून अस्ताव्यस्त झाले आहेत, अशा त्या स्त्रिया; त्यांच्या अंगावरील अलंकार नसल्या कारणानें, फुलें गळून पडलेल्या नाजूक वेलींप्रमाणें शोभत होत्या. आणि तशा वेलींस प्रेमानें कुरवाळणाऱ्या वायूप्रमाणें तो विलासी राजा शोभत होता. त्याची याप्रमाणें क्रीडा चालत असतां, त्यांतील एक स्त्री, शरीरानें फारच सुकुमार असल्यामुळें आपल्या स्तनाच्या भारानें अलस झालेली, क्रीडा करून श्रांत झाल्यामुळें, आपल्या अंगावर ओंझळींनीं जलप्रहार करणाऱ्या राजाला ह्मणाली, "महाराज, मला 'मोदकांनीं' ताडण करा." तें ऐकून राजाला असें वाटलें कीं, मोदकांनीं ह्मणजे लाडवांनीं ताडन करा, असें ही ह्मणत आहे! मग काय विचारतां, पुष्कळसे लाडू आणवून राजा तिच्या अंगावर फेकूं लागला! तेव्हां हंसून पुनः ती ह्मणाली, "हें काय बाई! येथें लाडवांचें काय काम? मी काय ह्मटलें त्याचा अर्थदेखील समजूंनये हा मोठाच चमत्कार. माझ्या अंगावर उदकानें सिंचन करूं-नका, असें मी ह्मटलें असून, त्याचा अर्थ असा कसा केला? जिला पाण्याचा प्रहार सहन होत नाहीं तिला लाडवांचा सहन होईल, असें समजणें हा मोठाच अरसिकपणा ह्मणावयाचा! मी 'मोदक' असें ह्मटलें त्यांत 'मा' आणि 'उदक' ह्या दोन शब्दांचा संधी झालेला आहे, हेंदेखील कसें लक्षांत आलें नाहीं? बरें तें एक असो; पण कोणत्यावेळीं काय करावें हें न समजणें हा मोठाच मूर्खपणा होय!" याप्रमाणें, शब्दशास्त्र जाणणाऱ्या त्या स्त्रीनें उपहास केलेला श्रवण करून आसमंतात् असलेल्या सर्व स्त्रियांला अतिशय हसूं आलें. पण राजाला राग येईल ह्मणून त्या गालांतल्या गालांत हसूं लागल्या. सर्व सेवकजनही हंसले. तेव्हां अर्थात् राजा अतिशय लज्जित होऊन विरस झाला. तत्काल क्रीडेचा त्याग करून खजील होऊन तो आपल्या मंदिरांत गेला. त्याला विद्या, कला, रूप, चातुर्य, इत्यादिकांचा

मोठा गर्व होता; पण तो आतां नाहींसा झाला. यःकश्चित् स्त्रीनें आपल्याला अगदीं मूर्ख केलें, असें पाहून तो फारच नम्र झाला. स्त्रियांनीं केलेल्या अपमानाबद्दल त्याला इतकें दुःख झालें कीं, तसें इतर कोणत्याहि गोष्टींनीं झालें नसतें. त्या दिवसापासून तो अगदीं एकांतांत बसून राहूं लागला. खाणें, पिणें, वस्त्र, अलंकार इत्यादि सर्वांचा त्याग करून चिंताक्रांत होऊन चित्राप्रमाणें स्वस्थ बसत असे. कोणीं कांहीं विचारलें तरी मुळींच बोलत नसे. 'आतां मला पांडित्य तरी प्राप्त व्हावें अथवा मरण तरी यावें या दोहोंवांचून तिसरी गती नाहीं,' असा त्याच्या मनाचा ग्रह झाला होता. तो बिछान्यावर अंग टाकून पडला. मानसिक संतापानें त्याच्या सर्वांगाचा दाह होऊंलागला. अकस्मात् राजाची अशी अवस्था कशी झाली ? ह्मणून सर्व सेवकजन घाबरले. मला हें वर्तमान लौकरच समजलें. तेव्हां शर्ववर्म्याला बरोबर घेऊन मी राजवाड्यांत जाऊन पाहतों तों राजाची खरोखरच तशी स्थिती झाली आहे असें समजलें. माझ्या मनांत त्याला समक्ष जाऊन पहावयाचें होतें; परंतु—"यावेळीं महाराजांची प्रकृति फारच अस्वस्थ आहे." असें सेवकांनीं सांगितल्यावरून आम्हीं उभयतांनीं राजहंस नांवाचा राजाचा अत्यंत प्रीतींतला एक खिदमतगार होता, त्याला बोलावून दुखण्याची हकीकत विचारली. तेव्हां तो ह्मणाला, "मी काय सांगूं? महाराज यापूर्वींही कधीं खिन्न होत होते; पण आजच्यासारखी स्थिती मी कधींच पाहिली नाहीं. बरें, असें होण्याचें कारण काय तेंही नीटसें समजलें नाहीं. मी पुष्कळ शोध केला तेव्हां, त्या थोरल्या बाईसाहेबांनीं कायसें सांगितलें. मग खरें काय असेल तें असो! आपल्या त्या धाकट्या बाईसाहेब आहेत किं नाहीं, त्यांनां पांडित्याची घमंड फारच आहे. त्या आमच्यासारख्या अडाण्याजवळदेखील केव्हां केव्हां मोठा कोटिक्रम करतात! त्यांनीं महाराजांची कांहीं थट्टा करून त्यांस हरविलें. त्यामुळें अतिशय दुःख होऊन महाराजांची अशी अवस्था झाली आहे असें मीं समजलों. बाकी खरें काय

असेल तें समजलें नाहीं. त्यांच्या शरीरांत रोगादिकांची कांहीं बाधा नाहीं हें अगदीं खचित आहे. असलें तर मानसिक दुःखच असलें पाहिजे." हें त्या खिदमतगाराचें बोलणें ऐकून शर्ववर्म्याला आणि मला फार वाईट वाटलें. आह्मी असा विचार केला कीं, "जर त्याला कांहीं रोग झाला असेल तर मोठमोठे वैद्य आणवून उपचार करतां येतील. पण तसें कांहीं असल्याचें समजत नाहीं. दुसरें कसलें दुःख असेल म्हणावें, तर त्याचेंही कांहीं कारण दिसत नाहीं. सर्व पृथ्वीवर त्याला कोणी शत्रू नाहीं. जे होते त्यांचा समूळ नाश केला आहे. सर्व प्रजा त्याच्यावर अनुरक्त आहे. कोणत्याही प्रकारें कांहीं कमी आहे असें नाहीं. असें असून एकाएकीं याला असा खेद कां झाला? हें समजत नाहीं. कदाचित् त्या हुजऱ्यानें सांगितलें तसलेंच कांहीं कारण नसेलना?" तेव्हां शर्ववर्मा ह्मणाला, "त्याचा इतका विचार तो कसला? काय आहे तें माझ्या लक्षांत आलें. राजाला आपल्या मूर्खत्वाचा खेद झाला आहे, दुसरें कांहीं नाहीं. आपण मूर्ख आहें ह्मणून पांडित्याची नेहमी तो इच्छा करीत असतो. हा त्याचा हेतू मला पूर्वीपासून माहीत आहे. ती राणी मोठी चतुर असून विदुषी आहे. तिचा बाप विष्णुशक्ती मोठा नामांकित विद्वान् होता. तिनें कांहीं तरी अपमान केला असेल म्हणून स्वारी दुःखित झाली आहे, दुसरें कांहीं कारण नसेल. त्या खिदमतगारानें सांगितलें तेंच खरें." याप्रमाणें आह्मा उभयतांचा विचार झाला. तेव्हां सेवकांला इतर सर्वप्रकारचा बंदोबस्त ठेवण्यास सांगून आह्मी आपआपल्या घरीं गेलों. दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं आह्मी उभयतां राजवाड्यांत जाऊन—आंत प्रवेश करण्याची अगदीं मनाई होती तरी—मी मोठ्या प्रयत्नानें महालांत शिरलों. माझ्या मागून हळूच शर्ववर्माही आला. मी राजाच्या जवळ बसून मोठ्या नम्रतेनें विनंती केली, "महाराज, आपलें शरीर निरोगी आहे. इतर कोणत्याही प्रकारचें दुःख करण्यासारखें योग्य कारण कांहीं दिसत नाहीं. असें असून आपण दुःखितासारखे दिसतां याचें कारण काय?" असें मीं त्याला विचारिलें,

तरी तो कांहींच बोलला नाहीं. सातवानाहची माझ्यावर मोठी भक्ती होती, तरी मी त्याच्या खानगी मंडळींत मिसळत नव्हतों. तो माझी फार मर्यादा ठेवीत असे. ह्मणून मीही त्याच्याशीं तसा बेताबातानेंच वागत होतों. शर्ववर्मा त्याच्या मंडळींतला होता. तो मोठा धूर्त असून राजाचें मन कसें रिझवावें हें त्याला चांगलें कळत होतें. तो खऱ्या खोट्या अनेक गोष्टी सांगून त्याला खुष करी. यावेळींही राजा कांहीं बोलत नाहीं असें पाहून, त्याणें—अडाणी असून मोठा अभिमानी अशा राजाला कांहीं चमत्कारिक गोष्ट बनावून सांगितली. तो ह्मणाला, "महाराज! मला एकवेळ—' तूं कधीं तरी असें ऐकलें असशिल' असें आपण म्हटलें होतें, त्याचें स्मरण होऊन मी गेल्या रात्रीं स्वप्नाचा पुतळा करून उशाशीं ठेवला होता. तेव्हां मला एक स्वप्न पडलें. त्यांत असा कांहीं चमत्कार दिसला कीं, आकाशांतून एक कमल खालीं पडलें. इतक्यांत एका दिव्य मुलानें तें प्रफुल्लित केलें. त्यापासून शुभ्र वस्त्र नेसलेली एक उत्तम स्त्री बाहेर निघाली. आणि तिनें आपल्या (राजाच्या) मुखांत प्रवेश केला. आणि इतकें पाहून मी जागा झालों. मला वाटतें ती साक्षात् सरस्वती असावी, आणि तिनें प्रत्यक्ष आपल्या मुखांत प्रवेश केला असेल यांत कांहीं संशय नाहीं." याप्रमाणें शर्ववर्म्यानें सांगितलेली स्वप्नाची गोष्ट ऐकून राजा किंचित् प्रसन्न झाला, आणि मौन सोडून त्यानें मला विचारलें, "एखाद्याला चांगलें शिक्षण दिलें तर तो किती दिवसांनीं पंडित होईल हें सांगा? पांडित्यावांचून—एवढी मोठी आहे तरी ह्या लक्ष्मीचें मला कांहीं वाटत नाहीं. मूर्खाला ऐश्वर्य घेऊन काय करावयाचें आहे? जसें एखाद्या लाकडाला दागिने घालावे तद्वत् मूर्खानें कितीही ऐश्वर्य भोगलें तरी कांहीं उपयोग नाहीं!" यावर मी ह्मटलें, "महाराज! व्याकरण हें सर्व विद्यांचें मुख आहे. एकसारखें बारा वर्षे अध्ययन केलें तर त्या शास्त्रांत चांगला प्रवेश होईल. असें आहे तरी आपली मर्जी असेल तर मी सहा वर्षांत तें शास्त्र आपणाला शिकवीन." हें माझें

भाषण ऐकून मोठ्या ईर्षेनें मध्येंच **शर्ववर्मा** ह्मणाला, " छे, इतकीं वर्षें महाराजांच्यानें श्रम कसे करवतील? जन्मापासून हाविळपर्यंत ज्याचा सर्वकाळ सुखांत गेला, त्याच्या हातून एकसारखे सहा वर्षें तरी श्रम होणें मोठें कठीणच आहे. तर महाराज, मी आपल्याला सहा महिन्यांत तें सर्व शास्त्र शिकवीन." हें त्याचें असंभाव्य भाषण ऐकून मला फारच राग आला. मी म्हटलें, " काय ? सहा महिन्यांत व्याकरणशास्त्र शिकवणार? आणि तें आपणच काय? असें होईल तर मोठाच चमत्कार ह्मणावयाचा " **शर्ववर्मा** म्हणाला, " हो, हो. खचित शिकवीन पण शिकवीन." मी ह्मटलें, " पण मला तसें होण्याचा संभव दिसत नाहीं." **शर्ववर्मा** म्हणाला, " आणि तसें झालें तर आपण काय कराल?" मी ह्मटलें, " दुसरें तिसरें तर कांहीं करावयाचा नाहीं; पण साहा महिन्यांत जर तूं राजाला व्याकरणशास्त्र शिकविलेंस तर मी प्रतिज्ञा करून सांगतों कीं, संस्कृत, प्राकृत आणि देशीभाषा ह्या लोकांच्या नेहमीच्या प्रचारांतल्या तीनही भाषा बोलावयाचें मी अगदीं सोडून देईन, ही माझी प्रतिज्ञा आहे. आतां तूं सांग कीं, बोलल्याप्रमाणें न झालें तर तूं काय करशील?" **शर्ववर्मा** ह्मणाला, " जर साहा महिन्यांच्या आंत महाराजांला सर्व व्याकरणशास्त्र मी शिकविलें नाहीं तर बारा वर्षें तुमच्या पायांतील जोडा आपल्या डोक्यावर वाहीन!" याप्रमाणें राजासमक्ष प्रतिज्ञा करून आम्ही दोघेही आपापल्या घरीं गेलों. आमचें दोघांचें भांडण झालें; पण त्यापासून राजाचें मात्र समाधान झालें. त्याला वाटलें कीं, दोहोंतून कोणी जरी जितला तरी आपला कार्यभाग होणार आहे. सहा महिन्यांत आलें तर बरेंच आहे, नाहीं तर सहा वर्षांत तरी व्याकरणशास्त्र आपल्याला येईलच येईल.

इकडे **शर्ववर्म्यानें** रागाच्या आवेशांत तशी प्रतिज्ञा केली खरी; पण मग विचार करून पाहिल्यावर त्याला मोठा पश्चात्ताप झाला. केलेली प्रतिज्ञा सिद्ध होईल अशी त्याची खात्री होईना. त्यानें आपल्या बायकोला तो सर्व वृत्तांत सांगितला तेव्हां ती

दुःखित होऊन म्हणाली, "ह्या मोठ्या संकटांतून स्वामिकार्तिकावांचून दुसरा कोणी पार पाडणारा दिसत नाहीं. त्याला शरण जाल तर तो संकटाचें निवारण करील." नंतर त्या उभयतां स्त्रीपुरुषांनीं पुष्कळ विचार करून शेवटीं, शर्ववर्म्यानें स्वामिकार्तिकाच्या दर्शनाला जाण्याचा निश्चय केला, व पहाटेच्या प्रहर रात्रीस उठून कोणाला न सांगतां शर्ववर्मा कार्तिकस्वामीच्या दर्शनाकरितां निघून गेला. शर्ववर्मा काय काय करतो तें कळविण्याकरितां मी हेर नेमले होते. त्यांणीं हें वर्तमान तत्काल मला कळविलें. ज्या दिवशीं शर्ववर्मा गेला त्याचदिवशीं प्रातःकालीं राजाची भेट घेऊन त्याला मी ही सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून राजा ह्मणाला, "काय होईल कोणास ठाऊक? अद्याप त्याच्या बोलण्याचा मला कांहीं भरंवसा वाटत नाहीं." हें आह्मां उभयतांचें बोलणें चाललें असतां तेथें सिंहगुप्त नांवाचा एक राजपुत्र होता. तो हात जोडून म्हणाला, "महाराज, आपण खिन्न झालां असें पाहून मला फारच दुःख झालें. तेव्हां मी देवीचा अनुग्रह व्हावा ह्मणून या नगराच्या बाहेर चंडिकादेवीचें मंदीर आहे तेथें जाऊन देवीसमोर आपलें मस्तक तोडून घेण्यास प्रवृत्त झालों. तेव्हां—"अरे, असें करूं नको. राजाची इच्छा पूर्ण होईल." म्हणून आकाशवाणीनें माझें निवारण केलें. यावरून आपल्याला खास सिद्धी प्राप्त होईल असें मला वाटतें." याप्रमाणें बोलून राजाची आज्ञा घेऊन शर्ववर्म्याच्या पाठोपाठ त्यानें दोन हेर पाठविले.

इकडे शर्ववर्मा, केलेला निश्चय दृढ धरून निराहार व मौनी होत्साता कार्तिकस्वामीजवळ गेला आणि तेथें जिवाची कांहीं काळजी न ठेवितां उग्र तप करून त्यानें भगवान् स्वामिकार्तिकाला प्रसन्न करून घेतला. स्वामिकार्तिकानें शर्ववर्म्याच्या इच्छेप्रमाणें त्याला वरदान दिलें. हें वर्तमान शर्ववर्मा येण्यापूर्वींच, सिंहवर्म्यानें पाठविलेल्या हेरांनीं येऊन सांगितलें. तें ऐकून मी आणि राजा

या दोघांलाही—मेघाला पाहून हंसे आणि चातकपक्षी यांना जसे विषाद आणि आनंद होतात त्याप्रमाणें—एकाच वेळीं विषाद आणि आनंद झाले. थोडक्याच दिवसांनीं शर्ववर्माही आला. 'ज्या विद्येचें चिंतन करशील ती तुला व तूं सांगशील त्याला प्राप्त होईल,' अशा-प्रकारचा त्याला वर मिळाला होता. त्यानें वरदानाच्या सामर्थ्यानें सातवाहनराजाला अल्पकाळांत सर्व विद्या शिकविल्या. उघडच आहे, ईश्वराचा प्रसाद काय करणार नाहीं? आपल्या राजाला सर्व विद्या प्राप्त होऊन तो आनंदित झाला, हें वर्तमान ऐकून नगरांत जिकडे तिकडे उत्सव सुरू झाला. ध्वज, तोरणें, पताका इत्यादि आनंदाचीं चिन्हें सर्वत्र दिसूं लागलीं. राजानें अमूल्य वस्त्रें अलंकार इत्यादिक अर्पण करून शर्ववर्म्याची गुरुपूजा केली आणि नर्मदेच्या किनाऱ्यावरचा भरुकच्छ देश त्याला जहागिर देऊन मोठा सत्कार केला. तसाच ज्याणें आपल्याकरितां मस्तक देखील तोडण्याचा निश्चय केला व शर्ववर्म्याला सिद्धी प्राप्त झाल्याचें आनंदकारक वर्तमान प्रथम येऊन सांगितलें, त्या सिंहगुप्तालाही वस्त्रें अलंकार वगैरे देऊन संतुष्ट केलें. आणि ज्या राणीनें पूर्वीं त्याचा उपहास केला होता ती आपल्याला विद्या प्राप्त होण्यास कारण झाली, ह्मणून तिला सर्व राण्यांवर मुख्य करून तिचा फार सन्मान केला. याप्रमाणें राजा सातवाहन जो अगदीं अविद्वान् होता तो मोठा विद्वान् झाला व शर्ववर्म्याची प्रतिज्ञा पूर्ण झाली.

नंतर दुसऱ्या दिवशीं, पूर्वीं केलेल्या प्रतिज्ञेप्रमाणें संस्कृत, प्राकृत, आणि देशी या तीनही भाषांचा मी प्रसिद्धपणें त्याग केला. तेव्हां अर्थात्

---

१– हंसांला पावसाळा मानवत नाहीं. पर्जन्यकालांत त्यांनां बाह्यसंचार बंद करून मानसरोवरांत जाऊन राहावें लागतें. (याविषयीं विशेष विवेचन आह्मी केलेल्या 'काव्यार्थदीपिका' नामक मेघदूत काव्यावरच्या टीकेंत पहावें.) चातकाला आनंद कां होतो हें प्रसिद्धच आहे.

२.– सांप्रत ज्याला 'भरूच' अथवा 'भडोच' ह्मणतात तोच प्रांत पूर्वीं 'भरुकच्छ' नांवानें प्रसिद्ध होता असें दिसतें.

मला मौनाचा स्वीकार करावा लागला; कारण या तीनच भाषा मला येत होत्या; त्या सोडल्यामुळें बोलण्यास भाषाच राहिली नाहीं. मी मौन धरून राजसभेंत बसलों होतों. तेथें एका ब्राह्मणानें एक स्वकृत श्लोक ह्मटला. तेव्हां त्याचें स्वतः राजानें संस्कृतवाणीनें पुनः उच्चारण केलें. तें पाहून सभेंतील सर्व लोक फार आनंदित झाले. शर्ववर्म्याला राजा गुरूप्रमाणें मानूं लागलाच होता, म्हणून त्याला नमस्कार करून मोठ्या नम्रतेनें, "गुरु-महाराज, स्वामिकार्तिकानें आपल्यावर अनुग्रह कसा केला? तें मला सांगा." ह्मणून राजानें शर्ववर्म्याला प्रश्न केला. आपल्यावर राजाची मर्जी प्रसन्न झाली आहे असें पाहून शर्ववर्मा म्हणाला, "राजन्, येथें प्रतिज्ञा केल्याप्रमाणें तुला विद्या देण्याकारितां स्वामिकार्तिकाचें आराधन करावें म्हणून, मी एकटाच निराहार आणि मौनी होत्साता त्या देवाच्या दर्शनाकारितां निघालों. मला वाटेंत फार श्रम झाले. कांहीं आहार न केल्यामुळें गात्रें अगदीं गलित झालीं होतीं; तरी तिकडे दुर्लक्ष करून तसाच मार्ग क्रमित होतों. दिवस थोडासा अवशिष्ट राहिला होता; अशा संधीस चालतां चालतां अकस्मात् घेरी येऊन मी जमिनीवर पडलों. त्यावेळीं मला शुद्धी मुळींच नव्हती, व सावध करणारा कोणी मनुष्यही जवळ नव्हता. अशा स्थितींत असतां हातांत शक्ति[1] नांवाचें आयुध घेतलेला कोणी दिव्य पुरुष तेथें येऊन मला सावध करून म्हणाला, "अरे बाबा, ऊठ, सावध हो. तुझा मनोरथ पूर्ण होईल." ह्या त्याच्या भाषणानें अमृतवृष्टी झाल्याप्रमाणें मला तत्काल हुषारी वाटली. माझी तहान भागली व भूकही नाहींशी झाली आणि मी अगदीं ताजातवाना झालों. नंतर पूर्वक्रमाप्रमाणें मार्ग क्रमीत क्रमीत देवाच्याजवळ प्राप्त झालों. एकदां कधीं त्या देवाचें दर्शन घेईन, अशी मला उत्कंठा लागली होती. तेथें पोंहचतांच स्नान करून देवाच्या गाभाऱ्यांत गेलों. त्याची दिव्य मूर्ती

---

१– 'शक्ती' हें एक आयुध असून स्वामिकार्तिकाचें तें फार आवडतें आहे. ह्मणूनच त्याला 'शक्तिधर' ह्मणतात. त्याचा आकार कांहींसा चाबकासारखा असतो.

डोळेभर पाहून तृप्ती मुळींच झाली नाहीं. तेथेंच नेत्र झांकून मी त्याच्या दिव्य मूर्तीचें ध्यान करीत बसलों. माझा शुद्ध भाव जाणून त्या देवानें मजवर अनुग्रह केला. मला प्रत्यक्ष दर्शनाचा लाभ झाला. तेव्हां साक्षात् मूर्तिमती **सरस्वती** माझ्या मुखांत प्रवेश करिती झाली. नंतर तो **भगवान्** आपल्या सहाही मुखकमलांनीं मला व्याकरणशास्त्र सांगूं लागला. त्यानें 'सिद्धो वर्णसमाम्नायः' हें सूत्र म्हटलें, त्यासरशीं ब्राह्मणाच्या स्वभावाला उचित अशा चपलपणानें मी लगेच दुसरें [1]सूत्र म्हटलें. तेव्हां हास्य करून **षडानन** ह्मणाला, " अरे, फार गडबड केलीस. जर दुसरें सूत्र तूं म्हटलें नसतेंस तर, हें एक **पाणिनीच्या** व्याकरणाला मागें टाकणारें स्वतंत्र व्याकरणशास्त्र झालें असतें. पण तूं तसें केल्यामुळें आतां हें संक्षिप्त होईल. ह्मणूनच याला **कातंत्र** असें लोक ह्मणतील. माझें वाहन जो **मयूर** त्याच्या नांवानें **कालापक** असेंही याचें दुसरें एक नांव प्रसिद्ध होईल." याप्रमाणें बोलून तें संक्षिप्त नवें व्याकरण-शास्त्र मला सांगून पुनः देव ह्मणाला, 'तुमचा तो राजा **सातवाहन** पूर्वजन्मीं **कृष्णनामक** ऋषी होता. तो **भरद्वाजमुनीजवळ** अध्यन करीत होता. तेथें असतां **कुमुदिनी** नांवाच्या एका मुनिकन्येची त्याच्यावर फार प्रीति बसली होती; म्हणून तोही तिच्यावर आसक्त झाला. विद्यार्थिदशेला विरुद्ध असून ब्रह्मचर्याची हानि करणारें याचें तें वर्तन पाहून ऋषीनीं, याला आणि त्या **कुमुदिनीलाही** शाप दिला; ह्मणून तीं दोघेंही, **सातवाहन**, आणि जिनें त्याला लाजविलें ती राणी झाली. दोघेही ऋषिकुलीन आहेत. पूर्वजन्मीच्या संस्काराच्या प्रभावानें व माझ्या प्रसादानें तुला पाहतांच राजाला सर्व विद्या प्राप्त होतील. थोर आणि कुलीन पुरुषांला महत्वाचे विषयदेखील सहज अवगत होतात. पूर्वजन्मार्जित संस्कारानें त्यांची बुद्धी स्वच्छ असते. अतएव मध्यंतरीं जो

---

१– 'कातंत्र' नांवाचें व्याकरण प्रसिद्ध आहे. 'सिद्धो वर्णसमाम्नायः' हें त्याचें पहिलें सूत्र होय.

थोडासा प्रतिबंध झाला असेल तो निवृत्त होतांच बुद्धीचा विकास होतो." याप्रमाणें बोलून भगवान् षडानन तेथेंच अंतर्धान पावले. नंतर मी गाभाऱ्याच्या बाहेर आलों. तेव्हां पुजाऱ्यांनीं थोडेसे तांदूळ माझ्या पदरांत घातले. हा ईश्वराचा प्रसाद असें समजून मोठ्या आनंदानें मी त्यांचा स्वीकार करून तेथून निघालों. येथें पोंहोचेंपर्यंत मला बरेच दिवस लागले. प्रतिदिवशीं मी पुजाऱ्यांनीं दिलेल्या तांदुळांतून लागतील तितके घेऊन त्यांचा भात करीत होतों. परंतु हा मोठाच चमत्कार आहे कीं, ते तांदूळ होते तितकेच अद्याप आहेत. त्यांतून एक कण देखील कमी झाला नाहीं! याचें कारण ईश्वराचा प्रसाद हेंच असावें." याप्रमाणें शर्ववर्म्यानें आपला वृत्तांत सांगितला. इतक्यांत, 'स्नानाचा समय झाला' ह्मणून चोपदारानें प्रार्थना केल्यावरून राजा सातवाहन स्नानसंध्या करावयास गेला. मी मौन घेतलें होतें, यामुळें सर्व व्यवहारापासून अगदीं बहिष्कृतच झालों होतों, तथापि राजाचें मजवर प्रेम होतें. मी जावें असें त्याच्या मनांत मुळींच आलें नसतांही, खुणाखाणांनीं त्याचा निरोप घेऊन व देवाला नमस्कार करून मी तेथून निघालों. माझ्याजवळ पुष्कळ शिष्य होते, परंतु मौन धरल्या कारणानें माझ्यापासून त्यांचा कार्यभाग होईनासा झाला. तेव्हां ते निराश होऊन अन्यत्र गेले. त्यांपैकीं दोघां शिष्यांनीं मात्र माझी कास सोडली नाहीं. त्यांणीं पक्का निश्चय धरून मी जेथें जाईन तेथें येण्याचा संकल्पकरून, ते माझ्या बरोबर निघाले. मी राजाचा निरोप घेऊन निघालों तो विंध्यवासिनी देवीच्या सन्निध येऊन तिची आराधना करण्यास प्रारंभ केला. लवकरच तिनें स्वप्नांत दर्शन देऊन तुझी (काणभूतीची) भेट घेण्याविषयीं आज्ञा केल्यावरून या भयंकर विंध्याटवींत प्रवेश केला. परंतु येथील मार्ग वगैरे कांहींच मला माहीत नव्हतें. दैवानें एका भिल्लाची गांठ पडली, तेव्हां त्याणें व्यापाऱ्यांच्या बैलांचा तांडा जात होता त्याची मला सोबत लावून दिली. त्यांच्या बरोबर मार्गक्रमण करीत करीत मी

येथें आलों. या अरण्यांत पुष्कळ पिशाच मला भेटले व अनायासें त्यांचा सहवासही घडला. त्यांचा परस्पर संवाद चालत होता तो लक्ष्यपूर्वक ऐकून त्यांची, ह्मणजे पैशाची भाषा मी शिकलों. त्यामुळें पूर्वीं स्वीकार केलेलें मौन मला आपोआप सोडतां आलें. कारण संस्कृत, प्राकृत आणि देशी ह्या तीन भाषांचा मात्र उच्चार करावयाचा नाहीं अशी माझी प्रतिज्ञा होती. ती, हीं पैशाची भाषा येऊंलागल्यापासून सहजच निवृत्त झाली. या ठिकाणीं आल्यावर मी तुझा पुष्कळ शोध केला. आणि तूं उज्जयिनीला गेला आहेस असें समजल्यावरून तुझी वाट पाहात येथेंच राहिलों. तूं परत आल्यावर तुला पाहून पिशाचांच्या भाषेनें मी तुझा सत्कार केला. तेव्हांपासून मला आपल्या पूर्वीच्या जातीचें स्मरण झालें आहे. हा माझा याजन्मींचा वृत्तांत मी तुला सांगितला. आतां याहून विशेष कांहीं नाहीं.

यावर काणभूती ह्मणाला, "खरें सांगितलेंस. थोड्या दिवसांपूर्वीं मी उज्जयिनीला गेलों होतों व कदाचित् तिकडून लौकर परत आलों नसतों. पण तूं येथें आला आहेस हें वर्तमान काल रात्रीं मला समजलें ह्मणून लवकर आलों. तें कसें झालें तें तुला सांगतों ऐक. भूतिवर्मा नांवाचा दिव्यदृष्टी एक राक्षस माझा मित्र आहे. तो उज्जयिनीच्या जवळ एका बागेंत राहतो. काल त्याला भेटावयास मी गेलों होतों. इकडच्या तिकडच्या अनेक गोष्टी झाल्यावर— माझा शाप कधीं सरेल? ह्मणून मीं त्याला विचारलें. तेव्हां तो ह्मणाला, "गड्या, आह्मी पिशाच आहों, ह्मणून दिवसा आमचा कांहीं प्रभाव चालत नाहीं. आमचें जें कांहीं सामर्थ्य तें सारें रात्रीं चालतें. जर रात्रभर येथें राहशील तर तुझ्या शापाचा अंत कधीं होईल, तें समजण्याविषयीं मी प्रयत्न करीन." हें त्याचें सांगणें मान्य करून मी तेथेंच राहिलों. सायंकाल होतांच तेथें असंख्य भूतांचा मेळा जमून अनेक प्रकारें त्यांची वल्गना सुरू झाली. ती ऐकून,— यांला इतका हर्ष होण्याचें कारण काय? असें भूतिवर्म्याला मी विचारलें.

तो ह्मणाला, "सूर्याच्या तेजानें दिपून गेल्यामुळें दिवसा या भूतांचा कांहीं प्रभाव चालत नाहीं. ह्मणून यक्ष, राक्षस, आणि पिशाच इत्यादि योनी ह्या रात्रीं फार आनंद पावतात. जेथें, देवांची अथवा ब्राह्मणांची यथायोग्य पूजा होत नसेल व जेथें पंचमहायज्ञादि केल्यावांचून लोक भोजन करीत असतील आणि मांस न खाणारा अथवा पतिव्रता स्त्री जेथें नसेल तेथें जाऊन हीं आपला प्रभाव दाखवितात. शुद्ध, शूर व ज्ञाते अशा पुरुषांला हीं कदापि स्पर्श करूं शकत नाहींत." असें सांगून त्याणें माझ्याबद्दल भूतांकरवीं चहूंकडे शोध केला. आणि तूं येथें आला आहेस असें समजून मला ह्मणाला, "आतां जा बाबा तूं आपल्या ठिकाणीं. ज्याच्या भेटीनें तुझ्या शापाचा अंत होणार तो गुणाढ्य तुझी वाट पाहत आहे, तर तूं त्याला जाऊन भेट." हें ऐकून मी त्वरित येथें आलों व त्याप्रमाणें तुझी भेट झाली. आतां पुष्पदंतानें सांगितलेली ती दिव्य कथा मी तुला सांगतों. पण तत्पूर्वीं मला एक मोठें कौतुक वाटत आहे, तें तुला विचारतों. तुला माल्यवान् आणि कात्यायनाला पुष्पदन्त हीं जीं नांवें पडलीं आहेत, त्यांचें कारण काय? तें कृपाकरून आधीं मला सांग."

हें ऐकून गुणाढ्य ह्मणाला, "जर तुझी ऐकण्याची इच्छाच आहे तर माझ्याकडून हरकत नाहीं. तो वृत्तांत सविस्तर सांगतों ऐक. गंगेच्या तीरावर बहुसुवर्णक नांवाचा एक मोठा अग्रहार आहे. तेथें गोविंददत्त नांवाचा एक विद्वान् ब्राह्मण होता. त्याची अग्निदत्ता नांवाची पतिव्रता स्त्री होती. गोविंददत्ताला तिच्यापासून पांच पुत्र झाले होते, परंतु ते पांचही अत्यंत मूर्ख असून, रूपानें अप्रतिम सुंदर व मोठे गर्विष्ठ असे होते. एकेसमयीं गोविंददत्ताच्या घरीं अग्निसारखा तेजस्वी वैश्वानर नांवाचा एक ब्राह्मण अतिथी आला. त्यावेळीं गोविंददत्त कांहीं कामाकरितां बाहेर गेला होता. आणि त्याचे पांचही मुलगे मोठ्या थाटानें बाहेरच्या सोप्यांत बसले होते. वैश्वानरा-

ला त्यांतून कोणाचीच कांहीं विशेष माहिती नव्हती. त्यानें सभ्यरीतीला अनुसरून प्रथम त्यांला नमस्कार केला. तेव्हां त्याला प्रतिनमस्कार अथवा कुशलप्रश्न इत्यादि कांहीं न करितां, ते पांचही त्याच्याकडे पाहून मोठ्यानें हंसले. हंसण्याचाच काय तो त्या मुलग्यांकडून सत्कार झाला. तेव्हां **वैश्वानराला** हा अपमान सहन झाला नाहीं, ह्मणून तो रागानें डोळे लाल करून त्या घरांतून निघून जात होता. इतक्यांत दरवाज्यांतच **गोविंददत्ताची** गांठ पडली. त्याणें ह्या अतिथीची प्रार्थना करून अनेक प्रकारें विनवण्या करून परत जाण्याचें कारण विचारिलें. तेव्हां तो ब्राह्मण ह्मणाला, "तुमचे पुत्र अत्यंत मूर्ख अतएव पतित आहेत. व त्यांच्या संसर्गानें तुह्मीही पतित झालां आहां ह्मणून तुमच्या घरीं मला भोजन करतां येत नाहीं. कारण पतितांचें अन्न खाल्लें तर मला प्रायश्चित्त घ्यावें लागेल." हें ऐकून **गोविंददत्तानें** शपथ घेऊन सांगितलें कीं, "हे मुलगे मूर्ख आहेत ह्मणून मी त्यांला कधीं शिवतदेखील नाहीं. मग त्यांचा संपर्क मला कसा होईल? तेव्हां कृपा करून आपण आज आमच्या घरीं भाजीभाकर खावी, अशी माझी अगत्यपूर्वक प्रार्थना आहे, तिचा आपण अनादर करूंनका." याप्रमाणें **गोविंददत्त** त्या ब्राह्मणाची विनवणी करीत आहे इतक्यांत त्याची स्त्री **अग्निदत्ता** ही तेथें येऊन तिणें आपल्याकडून होईल तितकी त्या अतिथीची प्रार्थना केली. तेव्हां पुढें आलेल्या अन्नाचा त्याग करूंनये व त्या उभयतां स्त्रीपुरुषांचा आग्रहही मोडूं नये ह्मणून मोठ्या संकटानें **वैश्वानरानें** त्यांच्या घरीं भोजन करण्याचें मान्य केलें.

इकडे **गोविंददत्तानें** अतिथीचें समाधान करतेवेळीं—"मी आपल्या पोरांना शिवत देखील नाहीं" असें जें ह्मटलें होतें तें त्याच्या मुलांनींही ऐकलें होतें. त्याबद्दल इतर मुलांला कांहीं वाटलें नाहीं; पण त्यांत **देवदत्त** नांवाचा एक मुलगा होता, त्याला मात्र त्याचा फार पश्चात्ताप झाला. हावेळपर्यंत **गोविंददत्त** आपल्या मुलांस कधींच शिवला नव्हता हें खरें; पण तसें करण्याचें कारण काय? हें त्याच्या मुलांपैकीं कोणाच्याच लक्षांत

आलें नव्हतें. ते अप्रबुद्ध असल्यामुळें त्यांनीं त्याच्या कारणाचा शोधच केला नाहीं; पण आतां तें सहज उघड झालें. तेव्हां देवदत्ताला आपल्या बापाच्या निर्दयपणाचा फार तिटकारा आला. तो मनांत ह्मणाला, " खरोखर आमचें जन्म व्यर्थ आहे. आह्माला ईश्वरानें मूर्ख केलें त्याबद्दल कोणावर कांहीं बोल ठेवतां येतच नाहीं. लोक आमच्यावर प्रीति करीत नाहींत किंवा जवळ बोलावीत नाहींत याचेंही कांहीं वाईट वाटत नाहीं; पण प्रत्यक्ष आमचा बाप आह्माला शिवत देखील नाहीं यापरतें दुसरें दुःख तें कोणतें? हरहर! आईबापांनीं देखील ज्यांचा तिरस्कार केला असेल त्यांचें जीवित असून तरी काय उपयोग? असो. मी आतां निश्चयानें यत्न करून पाहीन. केवळ मूर्खत्वाबद्दलच जर सर्व लोक आमचा तिरस्कार करितात व प्रत्यक्ष पिता स्पर्शदेखील करीत नाहीं तर ह्या तिरस्कारकरणाऱ्या लोकांला आणि आईबापांला सोडून, केवळ गुणावरून प्रिय अथवा अप्रिय न मानणारे व केवळ माझेच नव्हे, तर सर्व जगाचे मातापितर जे शंकर आणि पार्वती त्यांची आराधना करून जन्माचें सार्थक्य करून घेईन." असा निश्चय करून तो तप करण्याकरतां बदरिकाश्रमाला गेला. तेथें प्रथम झाडाचीं पानें खाऊन तप करित होता व नंतर केवळ धूम्रपान करून महादेवाचें आराधन करूं लागला. त्याच्या तीव्र तपानें संतुष्ट होऊन महादेवानें लौकरच त्याला दर्शन दिलें. नंदिकेश्वरावर पार्वतीसह आरूढ झालेल्या भगवान् महादेवाचें दिव्य रूप पाहून परम आनंदानें स्तुति, पूजा इत्यादिकेंकरून त्यांचा सत्कार करून, देवदत्त हात जोडून पुढें उभा राहिला. त्या एकनिष्ठ भक्ताला शंकरानें—'वर माग' अशी आज्ञा केली तेव्हां देवदत्त म्हणाला, "मला मृत्युलोकसंबंधी कोणत्याही विषयाची आशा नाहीं. आई-बाप, आप्त-इष्ट इत्यादि सर्व माझा तिरस्कार करतात. याकरितां पुनः त्यांच्यांत जाऊन राहणें अथवा त्यांचा सहवास करणें याचा मला मुळींच कंटाळा आला आहे. मी अनन्यभावानें आपणाला शरण आलों आहें. तर सर्वकाळ मीं आपल्या

चरणकमलाच्या सेवेंत राहावें ही माझी इच्छा आहे ती सफल व्हावी." हें ऐकून शंकर म्हणाले, "हा तुझा मनोरथ पूर्ण होईल. तुला मी आपला गण करीन. परंतु सांप्रत कांहीं दिवस तूं मृत्युलोकांतच रहा. दुर्लभ असें मनुष्यजन्म तुला प्राप्त झालें आहे त्याचा चांगला उपयोग कर. मूळचा तुझा संकल्प विद्वान् होण्याचा होता, अतएव प्रथम विद्याभ्यास कर. सर्व विद्या तुला प्राप्त होतील. आयुष्य सरेपर्यंत ऐहिक विषयांचा उपभोग करून अंतीं माझ्या सन्निध प्राप्त होशील." याप्रमाणें आज्ञा करून भगवान् महादेव तेथेंच गुप्त झाले.

नंतर देवदत्त तेथून निघून गंगातीरीं पाटलिपुत्र नामक नगरांत वेदकुंभ नांवाचा एक विद्वान् ब्राह्मण राहत होता त्याच्याजवळ अध्ययन करावयाकरितां राहिला. एकनिष्ठपणानें गुरूची सेवा करून त्याला त्यानें संतुष्ट केलें. महादेवाच्या कृपेनें त्याची बुद्धी फारच तीव्र झाली होती. कसाही गहन विषय असला तरी एक दोन वेळ ऐकला कीं पुरे; तेव्हांच त्याला अवगत होत असे. याप्रमाणें त्याचा अध्ययनक्रम चालला असतां मध्येंच एक विघ्न उपस्थित झालें. तें असें कीं,—एके-दिवशीं त्याचा गुरु वेदकुंभ हा कांहीं कामाकरितां दुसऱ्या गावाला गेला होता. गुरुपत्नी एकटीच घरांत होती. ती तरुण असून स्वभावानें अम्मळ चंचल होती. देवदत्ताला यापूर्वींच तिची वृत्ती समजली होती, ह्मणून तो बहुतकरून तिच्यापासून दूर रहात असे. पण तिचा याच्या-वर डोळा होता. वेदकुंभ घरीं नाहीं ही तिला आयतीच संधी मिळाली. तेव्हां तिचा लाभ घ्यावा असा निश्चयकरून तिणें, बाहेरच्या ओसरीवर अध्ययन करीत बसलेल्या देवदत्ताला कांहीं कामाचें निमित्त करून घरांत बोलाविलें; आणि त्याच्याशीं वेडें वाकडें कांहीं बोलूं लागली. देवदत्ताचा हेतु मूळापासून अगदीं शुद्ध असल्याकारणानें प्रथम त्याच्या कांहीं लक्षांत आलें नाहीं; पण तिचे ते चमत्कारिक चाळे पाहून—ही सर्व कामदेवाची लीला आहे, असें लौकरच त्याणें जाणलें. तो आपल्याकडून तिला कांहीं समाधानाच्या गोष्टी सांगूं लागला. परंतु त्या तिच्या मनांत कशा प्रवेश

करतील ? कामराजाच्या राज्यांत विवेकाला मुळींच थारा मिळावयाचा नाहीं! म्हणूनच देवदत्ताचा तो प्रयत्न अगदीं व्यर्थ झाला. पुष्कळ आर्जवें व आग्रह करून पाहिलें तरी देवदत्त वळत नाहीं असें पाहून ती रागानें म्हणाली, " हा मेल्या कपाळ फुटक्या! तुझ्या दैवींच नाहीं असें वाटतें. षड्रस अन्नानें भरलेलें ताट लोटून देणारा तुझ्यासारखा मूर्ख दुसरा कोणीही नसेल!" हें ऐकून देवदत्त ह्मणाला, " शिव शिव! मातुश्री, असें काय म्हणतां बरें ? अशा कामांत दैवहतक असावें, हेंच मला चांगलें वाटतें. घोर पातक करून ज्यांला दैववान् ह्मणून घ्यावयाचें असेल ते खुशाल घेवोत. मला नको तें दैव. परमेश्वरा! अशा कुमार्गाविषयीं नेहमीं माझें मन पराङ्मुख राहील असाच तूं मजवर अनुग्रह कर. आणि ह्या बाईच्या अंतःकरणाला कृपाकरून कांहींतरी शांति आणि विवेक दे." हें ऐकून गुरुपत्नी म्हणाली, " हं हं. आपण मोठ्या विवेकीपणाचा डौल दाखवितां आहां काय? पण मला असलीं पाचकळ बोलणीं ऐकावयाचीं नाहींत. एकूण माझ्या सांगण्याला तूं मान्य होत नाहींसना? बरें असूंदे, कांहीं चिंता नाहीं. घरांत येऊंदेत तर खरे. मग दाखवतें कसें काय आहे तें. मेले लोठाश्रम घरांत ठेवून आपण बाहेर जायचें, हें काय चांगलें आहे काय ? म्हणून विचारतें आतां. मग आपली कशी काय स्थिती होईल त्याचा विचार करा." हें त्या दुष्टस्त्रियेचें भाषण ऐकून देवदत्त थर थर कांपूं लागला. आधींच तिची दुष्ट वासना पाहून तो फार दुःखित झाला होता, तशांत तें भयंकर भाषण ऐकून त्याच्या मनाची स्थिती फारच विलक्षण झाली. तो तिला कांहीं उत्तर न देतां एकदम बाहेर येऊन समोरच्या वाटेनें तडक जाऊं लागला. तिनें पुष्कळ हाका मारल्या व अनेक तऱ्हेच्या शिव्या दिल्या; पण देवदत्तानें हूं कीं चूं न करतां थेट पैठणनगराची वाट धरली. वाटेंत अनेक गोष्टी त्याच्या मनांत येत होत्या. गुरुपत्नीचें दुष्ट वर्तन त्याच्या मनांत फारच सलत होतें. इतःपर ज्या गुरूजवळ अध्ययन करावयास

रहावयाचें; त्याच्या घरच्या माणसांची स्थिती कशी आहे? त्याची पुर्ती चौकशी केल्यावांचून मुळींच रहावयाचें नाहीं—असा त्यानें पक्का निश्चय केला. **पैठणास** पोंहचल्यावर त्याणें अनेक ठिकाणीं शोध केला. शेवटीं **मंत्रस्वामी** नांवाचा एक वृद्ध विद्वान् ब्राह्मण तेथें रहात होता. त्याची स्त्रीही वृद्धच होती. घरांत आणखी कोणाचा उपद्रव नाहीं असें पाहून देवदत्तानें **मंत्रस्वामी**जवळ अध्ययनास प्रारंभ केला. अनुक्रमानें निर्वेधपणें त्याचें अध्ययन पूर्ण झालें. नंतर गुरूची आज्ञा घेऊन समावर्तन करून गृहस्थाश्रम स्वीकार करावा असा विचार तो करीत होता. अशा स्थितींत एकेदिवशीं तो देवीच्या दर्शनाला गेला. तेथें **सुशर्मा** नांवाच्या राजाची **कमला** नामक कन्या आली होती. तिची देवदत्ता-वर सहज दृष्टी गेली. तिचें नांव **कमला** म्हणजे—**लक्ष्मी** असें होतें, तेव्हां प्रत्यक्ष **लक्ष्मीनें अच्युताला** पहावें, त्याप्रमाणेंच त्या उभयतांची दृष्टादृष्ट होण्याचा तो सहज प्रसंग आला. देवदत्ताचीही तिच्यावर दृष्टी गेली. जशी प्रत्यक्ष चंद्रिका आकाशरूप विमानांत बसून क्रीडा करते त्याप्रमाणें पालखींत बसून येणाऱ्या राजकन्येला अवलोकन करून तो अत्यंत मोहित झाला. ती पालखींतून खालीं उतरून देवीच्या सन्निध जाऊन पूजा, अर्चा इत्यादिक जें कांहीं तिला करावयाचें होतें तें सर्व करून मोकळी झाली; परंतु तिचें मन देवदत्ताकडे गुंतल्यामुळें केलेलें कर्म फारच अव्यवस्थित रीतीनें झालें. देवदत्त एकसारखा तिच्याकडे लक्ष लावून तटस्थ बसला होता. राजकन्येच्या मनांत त्याच्याशीं कांहीं भाषण करावयाचें होतें; पण यावेळीं तिच्या बरोबर इतर सेवकजन वगैरे होते, त्यांला आपला भाव समजूंनये ह्मणून ती मोठ्या प्रयासानें मनाला आवरीत होती. शेवटीं जातेवेळीं देवदताकडे पाहून तिनें आपल्या भेटीला येण्याबद्दल दृष्टीनें संकेत केला; पण तो देवदत्ताला मुळींच समजला नाहीं. राजकन्येला सवड नव्हती, तेव्हां निरुपाय होऊन मोठ्या कष्टानें ती तेथून निघून गेली. तथापि त्या दिवसापासून तिचें मन देवदत्तावर

आसक्त झाल्याकारणानें फारच अस्वस्थ झालें होतें. ती निघून गेल्यावर निराश होऊन देवदत्तही गुरुगृहीं परत गेला. त्याचेंही मन उद्विग्न झालें होतें व पुनः तिचें दर्शन कसें होईल? याविषयीं योग्य असा कांहीं उपाय सुचत नव्हता, ह्मणून एकसारखी त्याला तळमळ लागली होती. एकेदिवशीं तो राजवाड्यांतील जनानखान्याच्या जवळच्या मार्गानें जात होता, तेव्हां सहज जनानखान्याकडे त्याणें पाहिलें, तों तीच राजकन्या त्याच्या दृष्टीस पडली. उभयतांलाही एकमेकांच्या दर्शनानें फार आनंद झाला. पूर्वीं तिणें त्याला हाच संकेत केला होता ह्मणून—जरी देवदत्त सहज तेथें आला होता तरी—कमलेला, तो आपला संकेत समजूनच आला असें वाटलें व त्यावरून तो मोठा चतुर आहे अशीही तिची समजूत झाली. देवदत्त कामातुर होऊन, ती ज्या खिडकींत उभी होती तिकडे पहात तटस्थ उभा राहिला व तीही त्याच्याकडे त्याच दृष्टीनें पाहात उभी राहिली. जणूं काय मदनानें प्रेमरूपी सांखळीनें दोघांलाही बांधूनच टाकलें आहे, अशी त्यांची स्थिती झाली. नंतर राजकन्येनें, प्रत्यक्ष कामदेवाची आज्ञाच कीं काय? अशा आपल्या अंगुलीनें, त्याला आपल्या जवळ येण्याविषयीं खुणा केली. आणि दासीला, त्याला वर आणण्याकरितां खालीं पाठविलें. थोडक्याच वेळांत तो दासीबरोबर अंतःपुरांतील गुप्त मार्गानें राजकन्येजवळ आला. त्या चतुर स्त्रीनें त्याला पाहून विशेष आनंद प्रदर्शित केला व हंसत हंसत एक फूल आपल्या दातांत धरून तें तिणें त्याच्या अंगावर फेकलें. राजकन्या कमला हिनें केलेली ही गूढ संज्ञा देवदत्ताला मुळींच समजली नाहीं. शंकराचा त्याच्यावर अनुग्रह झाला होता व त्याच्या कृपेनें देवदत्ताला सर्व विद्या प्राप्त झाल्या होत्या, तरी तो मूळचा अगदीं मूर्खच होता. रसिकता अथवा व्यवहारचातुर्य त्याच्या अंगीं मुळींच नव्हतें. तो एवढा मोठा विद्वान् असूनही अगदीं भोळा होता. बराच वेळ तो तेथें उभा राहून विचार करीत होता. पण त्याच्या कांहीं लक्षांत न आल्यामुळें पुढें काय करावें? हेंच त्याला

सुचेनासें झालें. राजकन्या **कमला** ही कांहींच बोलली नाहीं. तेव्हां तो मुकाट्यानें आलेल्या वाटेनें परत गुरुगृहीं गेला आणि दुःखित होत्साता जमिनीवर तळमळत पडला.

त्याची ती अवस्था पाहून गुरुपत्नी इत्यादिकांनीं अनेकप्रकारें त्याची समजूत करून दुःखाचें कारण विचारलें, तरी तो कांहींच बोलेना. मनांतल्या मनांत संतापानें जळत होता. एखाद्या मुक्याला कोणी फसविलें ह्मणजे त्याची जशी स्थिती होते, त्याप्रमाणें त्याची अवस्था झाली होती. नंतर **मंत्रस्वामीनें** त्याची तशी अवस्था पाहून तर्कानें—हीं **मदन**बाधेचीं चिन्हें आहेत, असें जाणून युक्तीनें गोष्टी-वर गोष्ट काढून त्याला विचारलें, तेव्हां लाजत लाजत पूर्वीं झालेली सर्व हकीकत त्यानें सांगितली. **मंत्रस्वामी** मोठा बुद्धिमान् व रसिक होता. तो ह्मणाला, "तिणें तुझ्या अंगावर दांतांनीं फूल टाकलें ही तुला खुणा दिली. ती अशी कीं,—तूं आतां जा आणि जनानखान्याच्या जवळच पुष्पदंत नांवाच्या बागेंत **देवालय** आहे तेथें जाऊन माझी वाट पहा—असें तिणें तुला सुचविलें आहे." याप्रमाणें गुरूचें भाषण ऐकून **देवदत्ता**ला फारच आनंद झाला. राजकन्येनें केलेल्या संज्ञेचा अर्थ हाच आहे अशी त्याच्या मनाची खात्री झाली. मग गुरूच्या पायांवर मस्तक ठेवून अनेक रीतीनें त्याणें त्याची प्रार्थना केली. आणि गुरूनें सांगितल्याप्रमाणें बागेंतल्या देवळांत जाऊन गाभाऱ्यांत दडून बसला. इकडे राजकन्याही अष्टमीच्या व्रताचें निमित्त करून एकटीच रात्रीं त्या देवळांत आली. गाभाऱ्याचें दार लावलेलें होतें. त्याला लहान लहान कमळाच्या आकाराचीं छिद्रें होतीं, त्यांतून हळूच पाहूं लागली तेव्हां तिचा जिवलग तिच्या दृष्टीस पडला. **देवदत्त** ध्यानस्थासारखा बसला होता. राजकन्येनें हळूच आंत जाऊन एकाएकीं त्याच्या गळ्याला मिठी घातली, तेव्हां तोही दचकून उठला आणि तिला प्रेमानें कडकडून आलिंगन देता झाला. इतर कांहीं गोष्टी न बोलतां राजकन्या ह्मणाली," खरंच गडे,

ह्याचं मला मोठंच आश्चर्य वाटतं. मी जी फुलाची संज्ञा केली ती फारच गूढ होती. सहसा कोणाच्या लक्षांत यावयाची नाहीं. असें असून ती इकडे समजली तरी कशी ? यावरून चातुर्याची तर कमालच आहे ह्मणावयाची." यावेळीं बिचारा **देवदत्त** कांहीं बोलला नसता, किंवा खोटें बोलता तर फार बरें झालें असतें. "स्त्रियांजवळ प्रसंगीं असत्य बोललें तरी दोष नाहीं. " असें शास्त्रकारांनीं सांगितलें आहे, तें कांहीं खोटें नाहीं. पण भोळ्या मनुष्याला प्रसंगीं उगीच बसवत नाहीं. तो कांहीं तरी बोलतो, आणि तसें झालें ह्मणजे त्याचें काम बिघडतें व तें बिघडलें ह्मणजे तो आपल्या मूर्खपणाबद्दल उगाच तळमळत असतो; असा परिपाठच आहे. **देवदत्ताचीही** अशीच अवस्था झाली. तो ह्मणाला, " प्रिये ! तो तुझा गूढ संकेत—मी पुष्कळ प्रयत्न करून पाहिला तरी—मला कांहीं केल्या समजला नाहीं." राजकन्या **कमला** ह्मणाली, " असें कसें होईल? उगीच मला गोंधळांत पाडावी असें मनांत आहे वाटतें. संकेत समजला नसता तर येथें कसें येणें झालें असतें?" **देवदत्त** ह्मणाला, "खरोखरच मी कांहीं खोटें बोलत नाहीं. मला स्वतःला तो संकेत मुळींच समजला नाहीं हें अगदीं खचित आहे." **कमला** ह्मणाली, " हें काय बाई, आपल्याला नाहीं समजला तर तो समजला तरी कोणाला? मला अगदीं खरें खरें काय असेल तें सांगितलें पाहिजे." हें बोलत असतां तिची वृत्ती कांहींशी उद्विग्न झाली व **देवदत्ताच्या** गळ्यास तिनें मिठी घातली होती तीही अंमळ ढिली पडली ! **देवदत्त** ह्मणाला, " सखे ! तूं केलेला संकेत परक्या कोणालाही समजला नाहीं. त्याच्याबद्दल इतकें घाबरावयास नको. मला संकेताचा कांहीं अर्थ समजला नाहीं ह्मणून मी आपल्या गुरुजींस विचारलें, तेव्हां त्यांणीं मला त्याचा खुलासा करून सांगितला. त्यांच्यावांचून दुसऱ्या कोणालाही त्यांतलें एक अक्षर देखील माहीत नाहीं !" त्या भोळ्या ब्राह्मणाचें हें भाषण ऐकत असतां राजकन्येच्या अंगाला कंप सुटला आणि खाडकन् **देवदत्ताच्या**

गळ्याची मिठी सोडून ती अंमळ पलीकडे सरून रागानें दांतओंठ खाऊन त्याला झिटकारून ह्मणाली, "मूर्खा, पलीकडे हो. तुला कांहीं अक्कल नाहीं. सहा शास्त्रें आणि अठरा पुराणें शिकलास तरी दगडाचा दगडच आहेस. अशा पढतमूर्खाचा मला स्पर्श देखील नको." असें बोलून ती रागानें तेथून जाऊंलागली. देवदत्त तिची विनवणी करण्याचा प्रयत्न करीत होता, पण गुप्त गोष्ट प्रकट होईल ह्मणून त्याच्या बोलण्याकडे मुळींच लक्ष्य न देतां, ती थेट आपल्या महालांत गेली. याप्रमाणें रागाच्या आवेशांत तिनें त्यावेळीं देवदत्ताचा तिरस्कार केला तरी नंतर तिला त्या गोष्टीचा मोठा पश्चात्ताप झाला. त्याचें भोळेपण व आपल्यावर असलेली त्याची प्रीति यांचें तिला वरचेवर स्मरण होत होतें. व त्यामुळें पूर्वींपेक्षां तिचें त्याच्यावरचें प्रेम अधिकच झालें. इकडे देवदत्तही आपल्या मूर्खपणाबद्दल कपाळावर हात मारून घेऊन, तिच्या वियोगाग्नीनें ज्याचे प्राण व्याकुळ झाले आहेत असा होत्साता, देवळाच्या एका कोपऱ्यांत जाऊन रडत बसला. देवळांत झालेली ही गोष्ट भगवान् महादेवानें प्रत्यक्ष पाहिली. तो देवदत्तावर पूर्वीं प्रसन्न झालाच होता. त्याला ह्या भोळ्या ब्राह्मणाची फार दया आली. आणि पंचशिख नांवाचा एक गण त्यावेळीं जवळ उभा होता त्याला देवदत्ताचें कार्य साधून देण्याविषयीं शंकरानें आज्ञा केली.

याप्रमाणें महादेवाची आज्ञा होतांच पंचशिख, देवदत्त जेथें रडत बसला होता तेथें येऊन त्याचें समाधान करून ह्मणाला, "अरे, उगीच असा रडतोस काय? उठ. चल माझ्या बरोबर. मी तुझें कार्य सिद्ध करून देतों." याप्रमाणें बोलून, त्यानें देवदत्ताला हुबेहुब स्त्रीचा वेष देऊन आपण वृद्ध ब्राह्मणाचा वेष घेतला आणि स्त्रीवेषधारी देवदत्ताचा हात धरून खोंकत खोंकत त्या नगरीचा राजा व कमलेचा पिता राजा सुशर्मा त्याच्या सभेंत गेला. राजानें सत्कार करून येण्याचें कारण विचारलें; तेव्हां वृद्धब्राह्मणाचें रूप धारण करणारा पंचशिख ह्मणाला, "राजन्, माझ्यावर मोठें

संकट आलें आहे, ह्मणून निरुपायास्तव तुझ्याजवळ एक गोष्ट मागावी असा विचार करून आलों. आम्हीं तुझ्या राज्यांत सुखानें राहतों अतएव तुझी प्रजाच आहों. राजानें प्रजेला संकटकाळीं साहाय्य करावें हा त्याचा धर्म आहे, हें म्हणजे तुला माहित नसेल असें नाहीं. पितरांच्या ऋणापासून मुक्त करणारा मला एकच पुत्र होता. त्याच्यावांचून दुसरें कोणी नाहीं, माझी स्त्री तप करून करून अशक्त होऊन परलोकवासिनी झाली. मीही, संसार पुत्राच्या स्वाधीन करून तपोवनाला जाण्याच्या तयारींत होतों. अशा संधीस माझा पुत्र—कुलदेवतेचें दर्शन करून येतों म्हणून—निघून गेला; त्याला आज सुमारें सहा महिने होत आले. तो अजून परत आला नाहीं. किंवा त्याचा कांहीं ठाव-ठिकाणही लागला नाहीं. आज येईल, उद्यां येईल, म्हणून इतके दिवस मी त्याची वाट पाहिली; पण त्याचा कांहींच पत्ता नाहीं. असें पाहून, आतां स्वतः त्याच्या शोधाला जावें असा मी निश्चय केला आहे. तपोवनाला जाण्याच्या वेळीं हें एक मोठेंच विघ्न उपस्थित झालें. कारण मायापाश मोठा कठिण आहे. मी त्याच्या येण्याची वाट न पाहतां तपोवनाला गेलों असतों; पण हा एक दुसराच पाश माझ्या गळीं पडला आहे. ही मुलगी माझी सून, आणि त्या मुलाची बायको होय. नवरा गेल्यामुळें ही अनाथासारखी झाली आहे. तशांतून मीही हिचा त्याग केला तर, हिचें कोण रक्षण करील ? म्हणून हिच्या नवऱ्याचा शोध करून एकदांची हिला त्याच्या हवालीं करून आपण बिनघोर व्हावें असा निश्चय केला आहे. आतां तुझ्याजवळ इतकेंच मागावयाचें आहे कीं, पुत्राचा शोध करून परत येईपर्यंत तूं हिचें आपल्या कन्येप्रमाणें रक्षण कर. पोर तरणीताठी आहे, तेव्हां हिला घरांत एकटी ठेवावी हें योग्य वाटत नाहीं म्हणून तुला सांगतों. तुमच्या घरीं सर्व व्यवस्था नीट आहे. जेथें तुझ्या मुली रहात असतील त्याठिकाणीं थोडे दिवस हिला राहूंदे, म्हणजे मला मागची काळजी करायला नकोसें होईल. हें माझें वचन त्वां मान्य केलेंच पाहिजे." याप्रमाणें त्या वृद्ध ब्राह्मणाचें भाषण श्रवणकरून राजाला तें

खरेंच आहे असें वाटलें. व त्या ह्मातारबुवाची राजाला फार दया आली. यावेळीं आपण नाहीं म्हटलें तर कदाचित् ब्राह्मणाला राग येऊन तो शाप देईल, असेंही त्याच्या मनांत आलें, म्हणून राजानें त्याच्या सुनेला ठेवून घेण्याचें मान्य केलें. तेंव्हां संतुष्ट होऊन राजाला अनेक आशीर्वाद देऊन "माझी ठेव नीट जतन करून परत मला दे." असें पुनः सांगून वृद्धब्राह्मणाचा वेष धारणकरणारा **पंचशिख** तेथून निघून गेला. नंतर राजानें आपल्या मुलीच्या अंतःपुरांतील दासीला बोलावून,—स्त्रीवेष धारण करणाऱ्या **देवदत्ताला**—खरोखरीची स्त्री असून त्या ब्राह्मणांची सून आहे असें समजून—तिच्या बरोबर तिला आपल्या कन्येच्या अंतःपुरांत पाठविलें आणि तिची उत्तमप्रकारें व्यवस्था करण्यास सांगितलें.

अशारीतीनें **देवदत्ताच्या** मनाप्रमाणें सर्व योग तर घडून आला. कन्येच्या अंतःपुरांत तो निर्भयपणानें मोठ्या आनंदानें राहूं लागला. **देवदत्त**, पूर्वी आपला तिरस्कार करणाऱ्या राजकन्येजवळ रात्रंदिवस रहात होता, तरी त्याचा स्त्रीवेष अगदीं हुबेहुब असल्याकारणानें त्याचें खरें स्वरूप कोणाच्याच लक्षांत आलें नाहीं. दिवसेंदिवस राजकन्येचा त्याच्यावर अधिकच विश्वास बसत चालला. कांहीं दिवसांनीं राजकन्येचें त्याच्यावर इतकें प्रेम जडलें कीं, ती त्याला आपली जिवलग मैत्रीण मानूं लागली. त्याच्यावांचून क्षणभर देखील तिला करमत नसे. कितीही गुप्त गोष्ट असली तरी ती राजकन्या त्याला सांगत असे. अशा रीतीनें बरेच दिवस लोटले. पुढें एकेदिवशीं वसंतऋतूंत पौर्णिमेच्या रात्रीं राजकन्या आणि स्त्रीवेषधारण करणारी तिची सखी हीं उभयतांही गच्चीवर मोकळेपणानें खेळत बसलीं होतीं. कांहीं वेळ खेळून उभयतां एकाच बिछान्यावर गोष्टी बोलत पडलीं. त्यावेळीं मध्यरात्रीचा समय झाला होता. चंद्राचा पूर्ण प्रकाश पडल्यामुळें दशदिशा स्वच्छ दिसत होत्या. सुगंध आणि शीतल वारा मंद मंद वहात होता, जवळच्या फुलझाडांवर भ्रमर गुंजारव करीत होते. याप्रमाणें कामाचें उद्दीपन करणाऱ्या सर्व गोष्टी अनुकूल असल्याकारणानें राजकन्या एकाएकीं

उत्सुक झाली. तिच्या सर्वांगाला घाम आला व व्याकूळ होऊन तिच्यानें कांहीं बोलवेनासें झालें. अशी तिची अवस्था पाहून देवदत्त मनांत म्हणाला, 'वाः फार चांगलें झालें. भगवान् शंकर आज मजवर प्रसन्न झाला असावा असें वाटतें ! बहुत दिवस मी ज्याची वाट पहात होतों, तो योग आतां सहज आला आहे. तर यावेळीं चिरकाळ वृद्धीपावलेला मनोरथ पूर्ण करून घ्यावा, हेंच योग्य आहे.' असा निश्चय करुत देवदत्त तिचें मस्तक आपल्या मांडीवर घेऊन वारा घालून सावध करित होत्साता म्हणाला, "सखे ! बाई एकाएकीं तुझी अशी अवस्था कशी झाली हें समजत नाहीं ? मंद सुगंध वारा येत आहे, चंद्राचे शतिल किरण अंगाचा संताप निवृत्त करीत आहेत असें असून तुझें अंग घामानें डवडवलें याचें कारण काय बरें? मीं पुष्कळ विचार करून पाहिला; पण तुला असा संताप होण्याचें कारण माझ्या लक्षांत येत नाहीं." हें ऐकून अंग मोडून आल्यासारखें करून व उजव्या हातानें देवदत्ताच्या कंबरेला विळखा घालून राजकन्या म्हणाली, "गडे, काय सांगूं ! जळो तो मेला चंद्र आणि सुंगध वायू; तेच मला अधिक त्रास देत आहेत ! ह्या भोंग्यांनीं तर माझे कान बहिरेंच करून टाकले. ही सुगंधिचंदनाची उटी मला फारच संताप करते. तूं उटी लावण्यापेक्षां विषाचा रस लावला असतास तर मला इतकें दुःख झालें नसतें. हा सुवासिकफुलांचा हार, नको नको म्हणत असतां तूं माझ्या गळ्यांत घातलास. जें जें मला अत्यंत त्रास देण्याला कारण होणार तें तें सर्व अनुकूळ करून देऊन,—तुझी अशी अवस्था कशी झाली ? आणि संताप कां झाला ?— ह्मणून तूंच विचारितेस याला काय म्हणावें बरें ! गडे, तूं माझी जिवलग मैत्रीणना ! मग मला काय होतें तें तुला समजलें नाहीं काय ? ज्यांचें जिणें सर्वस्वीं पराधीन अशा आम्हासारख्या मुलींचें जन्म अगदीं व्यर्थ आहे. ऐश्वर्य पुष्कळ आहे, सर्व कांहीं आहे; पण त्याचा उपयोग काय ? उपवर झालेल्या मुलीला दुःखांत दिवस कंठायला लावावें, हें आईबापांला कसें योग्य वाटतें कोणास ठाऊक ! पण अशा स्थितींत मला आणखीं किती

दिवस कंठावे लागणार कोण जाणें !" हें तिचें भाषण ऐकून हंसत हंसत सखी ( देवदत्त ) म्हणाली, " हें असें काय ? गडे, रागावूं नको बाई. प्रथम माझ्या लक्षांत आलें नाहीं ह्मणून मी तसें विचारलें. आतां तुझा हेतु काय आहे तो समजला. मग तसें असेल तर मनाप्रमाणें कां करित नाहींस ? आपल्याला अनुरूप पती पाहून स्वेच्छेनें त्याच्याशीं विवाह करून घेणें, हा राजकन्यांचा धर्मच आहे. आईबापांनींच विवाह केला पाहिजे असें कांहीं नाहीं. बरें, खरेंच सांग, तुझें कोणातरी गुणी पुरुषावर मन जडलें आहे काय? माझ्याजवळ पडदा ठेवण्याचें कांहीं कारण नाहीं. तूं सांगशिल त्या पुरुषाला हरप्रयत्नानें मी घेऊन येईन." हें ऐकून दीर्घ सुस्कारा टाकून दुःखानें राजकन्या ह्मणाली, " हाय देवा ! गडे, मी तुला आतां काय सांगूं? तुझ्यासारख्या मैत्रिणीजवळ कोणी खोटें बोलेल का ? आमच्या शहरांत मंत्रस्वामी नांवाचा एक विद्वान् ब्राह्मण आहे. त्याचा देवदत्त नांवाचा शिष्य विद्या, रूप, गुण इत्यादिकांनीं अप्रतीम असा आहे. त्याच्यावर माझें मन जडलें होतें. त्याला मी संकेत केला व त्याप्रमाणें नियमित ठिकाणीं त्याची भेटही झाली. परंतु तो संकेत आपल्या गुरूकडून समजून घेऊन आला होता. त्यामुळें अरसिक आहे असें समजून मी चांडाळणीनें त्याचा धिःकार केला. खरोखर त्यावेळीं मला काय वाटलें कोणास ठाऊक ? मी थोडादेखील विचार केला नाहीं. त्यादिवसापासून मला किती पश्चात्ताप झाला आहे, तें सांगवत नाहीं. खरोखर, त्याच्यासारखा गुणसंपन्न दुसरा कोणीच मिळावयाचा नाहीं. तो कांहीं मूर्ख नव्हता. त्याचा स्वभाव सात्विक असल्याकारणानें कदाचित् तो संकेत त्याच्या लक्षांत आला नसेल; परंतु तेवढ्यावरून म्यां चांडाळणीनें त्याचा तिरस्कार करणें योग्य नव्हतें. पण आतां बोलून उपयोग काय? तो माझ्या तोंडावर दृष्टी तरी घालील किंवा नाहीं कोणास ठाऊक? माझें मन जर ह्मणशील तर काय तें त्याच्यावर मात्र आसक्त झालें आहे. त्याच्यावांचून दुसरा कोणीही मला प्रिय वाटत नाहीं." हें तिचें भाषण ऐकून देवदत्ताचा हर्ष गगनांत मावेनासा झाला. जिच्यावर

आपण प्रीति करितों तिचें मन सर्वप्रकारें आपल्यावरच आसक्त असावें-असें प्रत्येक कामिपुरुषाच्या मनांत वागत असतें. ती राजकन्या कमला आपल्या प्रश्नावर काय बोलते इकडे देवदत्ताचें लक्ष्य लागलें होतें. तिणें पूर्वी घडलेली सर्व हकीकत सांगितली, तरी याच्या मनाची तृप्ती झाली नव्हती; कारण, देवालयांत भेट झाली त्यावेळीं, अरसिक असें समजून तिनें आपला त्याग केला होता; तेव्हां आतां आपल्यावर तिचें मन आहे किंवा नाहीं याविषयीं त्याला संशय होता. व ह्मणूनच तिच्या लाभाकरता त्याणें इतका प्रयत्न केला तरी, शेवट गोड होईल किंवा नाहीं? याची त्याला फार काळजी होती. कारण, ज्या स्त्रीचें मन आपल्यावर नसेल तिची प्राप्ति झाली तरी त्यापासून आनंद होत नाहीं. पण तिचें वरील भाषण ऐकून त्याचा संशय नाहींसा झाला. आपल्यावांचून दुसऱ्या कोणावर तिचें मन मुळींच आसक्त झालेलें नाहीं, असें पाहून देवदत्त म्हणाला, " इतकेंच ना? तर तुझ्या मनाजोक्तें होण्याचा संभव आहे. तो जर विद्वान् असला, तर स्त्रियांच्या स्वभावाची माहिती त्याला असलीच पाहिजे. कारण कित्येक कवी स्त्रियांचें हृदय तरवारी-सारखें आहे, असें ह्मणतात. पण वस्तुतः तें खरें नाहीं. त्यांचें मन फार कोमळ असून स्वभाव मायाळू असतो. जो कोणी त्यांला दुखवील, अथवा त्यांचें अप्रिय करील त्यावर मात्र त्या नागिणीसारख्या रुष्ट होतात. पण ज्याणें त्यांचें अप्रिय केलें नसेल त्यावर एकादवेळ अविचारानें रागावल्या तरी, पुनः क्षणमात्रानें प्रीति करूं लागतात. अशाप्रकारचीं उदाहरणें वारंवार दृष्टीस पडतात, हें त्याला माहीत असेल. व म्हणूनच तो तुझ्यावर रुष्ट झाला नसेल अशी माझी खात्री आहे. तूं अगदीं भाबडी आहेस, तुला आपली योग्यता किती आहे हेंच मुळीं कळत नाहीं. अग वेडे! तुझ्यासारखी सुंदर स्त्री अनुरक्त होऊन प्राप्त झाली, आणि आपल्याच मूर्खपणामुळें रागावून गेली, तर त्याबद्दल तो किती दुःख करीत असेल? तें माझ्यानें सांगवत नाहीं. खरोखर जर रसिकपणाचा गंध

तरी त्याच्या हृदयांत असेल तर तुझें त्याला अगदीं वेडच लागलें पाहिजे. मला असें वाटतें कीं, तो तुझ्या भेटीविषयीं उत्सुक असून अनेकप्रकारचे प्रयत्न करीत असेल. अंमळ सूचना झाली कीं पुरे." हें भाषण ऐकून राजकन्येला अंमळ समाधान वाटलें. तरी तो येईल, अथवा त्याची भेट होईल याविषयीं तिची पुर्ती खात्री झाली नव्हती. कमला, देवदत्ताचा हात धरून ह्मणाली, "पुरे बाई तुझें बोलणें, मला ठाऊक नव्हतें तूं अशी गोडबोली आहेस ह्मणून. आतां त्याची भेट होण्याचा संभव तरी आहे का? कसेंतरी माझें समाधान करावें ह्मणून तूं आपली गोड गोड बोलतेस; यावांचून दुसरें कांहीं मला वाटत नाहीं." देवदत्त ह्मणाला, "असें असेल तर मी त्याची आतांच भेट करवून देईन." राजकन्या उत्सुक होऊन ह्मणाली, "ती कशी?" देवदत्त ह्मणाला, "कशी ह्मणजे? त्याला प्रत्यक्ष येथें आणून." राजकन्या ह्मणाली, "तर मग तो कोठें आहे हें तुला माहीत आहे काय?" देवदत्त ह्मणाला, "ह्मणजे? तो कोठें दूर नाहीं. तो येथेंच आहे." राजकन्या ह्मणाली, "असें काय बोलतेस कोणास ठाऊक? येथें ह्मणजे कुठे? तो अगदीं माझ्याजवळ का आहे? आणि तो मला दिसत नाहीं कसा तर?" देवदत्त ह्मणाला, "हो हो, अगदीं जवळ. ह्मणजे प्रत्यक्ष तूं त्याचाच हात धरला आहेस." असें बोलून देवदत्तानें तिला आलिंगन दिलें! यावेळीं उभयतांलां किती आनंद झाला असेल याचें वर्णन करतां येत नाहीं! दोघांनींही परस्परांलां आनंदाश्रूंनीं स्नान घातलें. कांहीं वेळ उभयतांचेही गळे दाटून आल्यामुळें भाषण मुळींच झालें नाहीं. राजकन्येला—देवदत्तानें स्त्री वेष घेतला, आणि इतके दिवस तो अगदीं जवळ असून आपल्याला कळलें नाहीं, याचें मोठें आश्चर्य वाटलें. ती मनांत ह्मणाली, 'माझ्या संकेताचा अर्थ कळला नाहीं ह्मणून मीं याला अरसिक व अक्कलशून्य ह्मटलें होतें, पण मी किती मूर्ख कीं, हा आपल्याजवळ—ह्मणजे अगदीं बिछान्यावर इतके दिवस राहिला असून हा पुरुष किंवा स्त्री, ह्याची हा-

वेळपर्यंत मला शंकादेखील आली नाहीं!" नंतर तिणें देवालयांत भेट झाल्या वेळापासून काय काय केलें तें सांगण्याविषयीं आग्रह केल्या-वरून देवदत्तानें सर्व हकीकत सांगितली. त्याच्यामनांत उसणें फेडा-वयाचें होतें. पण त्यापूर्वींच तिणें—"देवालयांत आपण धिक्कार केला त्याची क्षमा करावी." म्हणून प्रार्थना करून, आपलें स्वरूप ओळखलें नाहीं ही चूक कबूल केली, म्हणून देवदत्त कांहीं बोलला नाहीं. असो.

याप्रमाणें त्या उभयतांही प्रेमळ स्त्रीपुरुषांचा बहुत दिवस इच्छा केलेला समागम होऊन त्यांनीं परस्परांच्या संमतीनें तेथेंच गांधर्वविवाह करून आपआपला हेतु पूर्ण करून घेतला. उभयतांही जनानखान्यांत सुखानें राहत असतां थोडक्याच दिवसांत राजकन्या गर्भिणी झाली. जसजसे दिवस जाऊं लागले तसतशी तिची भीति अधिकाधिक वाढूं लागली. उभय-तांचा विवाह झाला, तरी देवदत्त एकांताशिवाय स्त्रीवेषानेंच तेथें राहत होता. राजकन्येवांचून त्याचें खरें स्वरूप कोणालाही माहीत नव्हतें. एकेदिवशीं राजकन्येनें डोळयांत अश्रू आणून मोठ्या संकटानें देवदत्ताला सांगितलें कीं, "आजपर्यंत झालें तें सर्व ईश्वरकृपेनें ठीकच झालें; पण आतां मात्र प्रसंग कठिण आला आहे. हें गुप्त वर्तमान प्रकट झालें तर काय काय दुःखें भोगावीं लागतील त्याचा नियम नाहीं. तेव्हां तो दिवस येण्यापूर्वींच कांहींतरी तजवीज करून ठेवली पाहिजे. पुढचा प्रसंग मनांत आला ह्मणजे माझ्या काळजांत धस्स होतें." असें बोलून देवदत्ताच्या गळ्याला मिठी घालून ती रडूं लागली. तेव्हां तिचें समाधान करून देवदत्त म्हणाला, "प्रिये! तूं भिऊंनकोस, याविषयीं आपणाला काळजी करा-वयास नको. महादेवाचा पंचशिख नांवाचा गण आहे, तो माझा परम मित्र आहे. स्मरण करतांच येथें येऊन कोणाला न कळतां आह्मांस पाहिजे त्या ठिकाणीं तो घेऊन जाईल." हें ऐकून राजकन्या कमला आनंदित होऊन म्हणाली, "असें असेल तर मग विलंब तरी कां? आतांच त्याला बोलावून आपण येथून जावें हें बरें नव्हे काय?" देवदत्तानें तिचें ह्मणणें मान्य

करून महादेवाला नमस्कार करून पंचशिखाचें स्मरण केलें, तेव्हां तो तत्काल तेथें प्रकट झाला. आणि राजकन्या व देवदत्त यांच्या प्रार्थनेवरून, गुप्तपणें दोघांलाही अंतःपुरांतून नेऊन त्याणें एका उत्तम ठिकाणीं पोहोंचविलें. तेथें पोहोंचतांच राजकन्येला थोड्या वेळाकरितां चांगल्या सुरक्षित ठिकाणीं ठेवून देवदत्ताला पुरुषाचा वेष देऊन आपण पूर्ववत् वृद्धब्राह्मणाचें रूप घेऊन, देवदत्तासह पंचशिख राजसभेंत प्राप्त झाला. तेथें राजानें केलेला सत्कार ग्रहण करून त्याला आशीर्वचनांनीं संतुष्ट करून ह्मणाला, "राजन्! माझा यत्न सफल झाला. बहुत प्रयत्न करून ह्या पुत्राचा पत्ता लावून त्याला घेऊन आलों. आतां तुझ्याजवळ ठेवलेली माझी सून मला दे. ह्मणजे तिला याच्या स्वाधीन करून मी तपोवनाला जाईन." राजानें बहुत बरें, म्हणून अंतःपुरांतून सुनेला आणविण्याविषयीं सेवकांस आज्ञा केली. पूर्वरात्रीं सुनेचा वेष घेणारा देवदत्त व आपली कन्या अशीं दोघेंही पळून गेलीं, हें राजाला माहीत नव्हतें. सेवकांनीं अंतःपुरांत शोध करून हें वर्तमान सांगितल्यावरून राजा फार घाबरला. आतां ब्राह्मणाला काय उत्तर सांगावें हें त्याला सुचेना. इकडे हा वेषधारी ब्राह्मण राजाची तशी मुद्रा पाहून फारच घाई करूं लागला. तेव्हां—" देतों अम्मळ धीर धरा," असें सांगून राजा प्रधानांला म्हणाला, " एकंदरींत मला या ब्राह्मणाविषयीं मोठाच संशय येतो. हा खरोखरीचा ब्राह्मण नसावा असें दिसतें. कोणी तरी देव माझी वंचना करण्याकरितां ब्राह्मणाच्या रूपानें आला असेल असें मला वाटतें. यापूर्वीं अशा पुष्कळ गोष्टी झाल्याचें इतिहासवेत्ते लोक सांगतात.

पूर्वीं शिबी नांवाचा एक राजा होता. तो मोठा दानशूर, धैर्यवान् व सर्वप्राणिमात्रांला अभय देणारा म्हणून त्याची सर्वत्र ख्याती होती. त्याची वंचना करण्याकरितां कपटानें ससाण्याचें रूप धारण करणारा इंद्र व कपोताचें रूप धारण करणारा यमधर्म हे दोघेही देव त्याच्या जवळ

प्राप्त झाले. कपोतावर ससाण्यानें झडप घातली. तेव्हां तो भयभीत होऊन शिबिराजाच्या मांडीवर जाऊन बसला. तेव्हां—" कपोत माझें भक्ष्य आहे. त्याला माझ्या स्वाधीन कर, नाहीं तर भुकेनें माझा प्राण जाईल." म्हणून अनेक रीतींनें ससाण्यानें राजाची प्रार्थना केली. परंतु—" शरणागताला मी त्याच्या मृत्यूच्या हातीं देणार नाहीं. या कपोतावांचून तुला पाहिजे तितकें मांस देतों." असें राजानें सांगितलें. यावर ससाण्यानें—" कपोताच्या भारंभार प्रत्यक्ष तुझेंच मांस मला देशील तर माझी क्षुधा शांत होऊन मी वांचेन," म्हणून राजाला सांगितलें तेव्हां त्या उदार राजानें श्येनाचें मागणें मान्य करून तागडी आणवून तो कपोताशीं आपलें मांस तोलूं लागला. राजाचें सर्व शरीर तागडींत येऊन पडेपर्यंत कपोतानें आपला भार वाढवून, राजाच्या वजानाइतकें आपलें वजन केलें. शिबीचें हें औदार्य पाहून सर्वांनीं त्याचा जयजयकार केला. तेव्हां इंद्र आणि **यम** निजरूपानें तेथें प्रकट झाले व राजाचें शरीर पूर्ववत् करून त्याला अनेक वर देऊन स्वर्गलोकाला निघून गेले. ह्या कथेवरून मला वाटतें हा ब्राह्मण कोणीतरी देव असावा यांत कांहीं संशय नाहीं. तेव्हां याला शरण जाऊन प्रसन्न करून घ्यावें, हेंच योग्य आहे." असा निश्चय करून **सुशर्म्या**नें त्या वृद्धब्राह्मणाच्या पायांवर मस्तक ठेविलें; आणि अभय मागून म्हणाला, " महाराज, आपल्या सुनेचें मी उत्तमप्रकारें रक्षण केलें; व इतके दिवस ती माझ्या कन्येबरोबर येथें सुखरूप होती. पण काय चमत्कार झाला असेल तो असो, काल रात्रीपासून त्या दोघीही कोठें नाहींशा झाल्या. आपली सून माझ्या मुलीबरोबर गेली अथवा दुसरीकडे कोठें गेली हेंदेखील मला पुरतेंसें माहीत नाहीं. रक्षण करण्यांत माझ्याकडून कांहीं हयगय झाली नाहीं. जनानखान्यावर कित्येक पाहरे असून अगदीं सक्त बंदोबस्त आहे. आंत दुसऱ्या कोणाचाही प्रवेश झाला नाहीं. व त्या दोघी बाहेर गेल्याचेंही वर्तमान कोणास माहीत नाहीं, तर हा काय चमत्कार आहे? ईश्वराला माहीत. महाराज! मी

आपल्या कर्तव्याला चुकलों नाहीं असें असून एकाएकीं आपली सून नाहींशी झाली याला माझा कांहीं इलाज नाहीं. क्षमा करा. मी निरपराधी आहें, असें समजून माझ्यावर अनुग्रह करा. इतकेंही असून, नकळत झालेल्या गोष्टी-बद्दल कांहीं शिक्षा कराल तर तीही मी मान्य करीन." हें ऐकून ब्राह्मणरूपी पंचशिख दुःखित होऊन अनेकप्रकारें घालूनपाडून बोलून राजाला म्हणाला, "बरें, माझेंच दैव फुटकें तेथें तुला बोलून उपयोग काय ? झालें तें झालें. पण राजा, दुसऱ्यानें विश्वासानें ठेवलेल्या वस्तूचें रक्षण करण्याविषयीं विशेष खबरदारी ठेवली पाहिजे असें तुझ्या स्मरणांत असूंदे. आतां हा माझा मुलगा स्त्रीवांचून संसार कसा करील ? बरें, याचें दुसरें लग्न करण्याचें तरी माझें सामर्थ्य कोठें आहे ? मी तुझ्याहातून झालेल्या अपराधाची क्षमा केली असती, पण खरोखर तो अपराध अगदीं अक्षम्य आहे. जर तूं आपली मुलगी माझ्या पुत्राला देशील तर मात्र माझा राग शांत होईल, नाहींतर कोणत्याही रीतीनें या अन्यायाचें विस्मरण होणार." राजाला हें भाषण ऐकून फारच दुःख झालें. मुलीचा विवाह करावयाचा होता, म्हणून आयताच वर मिळाला याबद्दल त्याला संतोष झाला असता; पण अशा संकटानें मिळाला तर तो कोणालाही मान्य व्हावयाचा नाहीं. तशांतून राजांच्या मुली आपल्या इच्छेस येईल तो वर पसंत करतात. बोलून चालून हा एका गरीब ब्राह्मणाचा मुलगा. कदाचित् तिला मान्य झाला तर बरें, नाहीं तर मोठें कठीण पडेल, असे अनेक विचार त्याच्या मनांत येऊंलागले. तरी ब्राह्मणाच्या रागानें आपलें अहित करून घ्यावें व दुसऱ्याचा ठेवा—त्यांतूनही तरुण स्त्री—परत न दिला तर आपणास लोक काय म्हणतील ? त्यापेक्षां ब्राह्मणाची राजी करण्याकरतां मुलगी देणें हेंच फार उत्तम, असा निश्चय करून 'मुलगी देतों' असें पंचशिखाला सांगणार इतक्यांत मुलगीही पळून गेल्याचें त्याला स्मरण झालें आणि म्हणाला, "महाराज, आपली आज्ञा मला शिरसा मान्य आहे. मी आपल्या पुत्राला माझी कन्या देईन; पण प्रार्थना करण्यास कठीण वाटतें कीं, तीदेखील

कालपासून कोठें नाहींशी झाली आहे. हें मी आपणाला पूर्वींच सांगितलें आहे तेव्हां कन्या देतों असें तरी कोणच्या आधारावर म्हणावें." यावर ब्राह्मण म्हणाला, "त्याविषयीं तूं कांहीं काळजी करूं नको. कदाचित् ती परत आली तरच माझ्या मुलाला दे. यावेळच्या प्रश्नावरून ती फार लांब गेलेली नाहीं, कोठें तरी जवळच असेल असें दिसतें. कदाचित् आज रात्रींदेखील आली तर येईल. आलीच नाहीं तर तुझा काय उपाय ? पण परत आली असून न देशील तरमात्र तुझ्यावर दोष येईल." राजानें यावर—"कन्या घरीं आलीतर अवश्य देईन" असें सांगितलें. तेव्हां पंचशिख संतुष्ट होत्साता पुत्ररूपी देवदत्तासह तेथून निघून ज्या ठिकाणीं राजकन्येला ठेवली होती, तेथें जाऊन, झालेली सर्व हकीकत त्याणें तिला सांगितली. नंतर तिवांनींही आपआपल्यांत विचार करून पुढें कशी व्यवस्था करावयाची त्याचा निश्चय केला व मध्यरात्रीच्या समयास कोणाला न कळवितां, ज्या महालांतून तिला आणली होती त्याच महालांत राजकन्येला पोंहचविली.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं स्नानसंध्यादि कर्मे आटपून पंचशिख वृद्धब्राह्मणाच्या रूपानें देवदत्ताला बरोबर घेऊन राजाजवळ गेला. आणि—"तुझी मुलगी आली किंवा नाहीं ?" असें विचारिलें. तेव्हां राजा म्हणाला, "होय महाराज, आपलें वचन खरें झालें. ती काल रात्रींच परत आली. पण चमत्कार असा कीं इतकावेळ ती कोठें होती याचें तिला मुळींच स्मरण नाहीं. खरोखर हा एक भुताटकीचा खेळच झाला असावा !" पंचशिख म्हणाला, "तें कांहीं कां असेना ? मी सां[illegible]ें तुझी मुलगी परत आली. आतां कबूल केल्याप्रमाणें ती माझ्या मुलग्याला देतोस किंवा नाहीं ? तें सांग म्हणजे झालें." पूर्वी झालेल्या सर्व प्रकारांवरून राजाचें मन अगदीं गोंधळून गेलें होतें. एकामागून एक असे बरेच चमत्कार त्याच्या अनुभवाला आले. पण त्यांतील खरें तत्त्व काय हें त्याला मुळींच

न समजल्यामुळें त्याची स्थिती वेड्यासारखी झाली होती. व काय करावें हेंही त्याला सुचेनासें झालें. तरी ह्या वेषधारी ब्राह्मणाच्या भयानें, दिलेलें आपलें वचन पाळावें म्हणून त्याच्या पुत्राला मुलगी देण्याचा निश्चय करून, त्याणें विवाहाची तयारी केली आणि मोठ्या समारंभानें आपली कन्या कमला ही देवदत्ताला दिली. यापूर्वीच त्या उभयतांचा गांधर्वविवाह होऊन राजकन्या गर्भिणी देखील झाली होती, तरी प्रसिद्धपणें विवाह झाल्यापासून उभयतांचें नातें सर्वलोकांला विदित झालें. पंचशिखाला देवदत्ताचा विवाह झाल्यामुळें फार आनंद झाला. तो राजाला अनेक आशीर्वाद देऊन सर्वांचा निरोप घेऊन मोठ्या संतोषानें तेथून निघून गेला. विवाह करतेवेळीं राजाचें मन फारसें प्रसन्न नव्हतें तरी देवदत्ताचा उत्तम स्वभाव, त्याची मोठी विद्या, कला इत्यादि गुणांचें ज्ञान पाहून राजाला फार आनंद झाला. दिवसेंदिवस सुशर्मा राजाची त्याच्यावर फारच प्रीति बसली. तो आपल्या मनांत म्हणाला कीं, 'प्रथम मला ह्या प्रकाराबद्दल मोठी भीतीच वाटत होती. कारण कुल-शीलादिकांचा विशेष विचार न करतां केवळ ब्राह्मणाच्या आग्रहास्तव मी हा संबंध केला; पण ईश्वरकृपेनें सर्व यथायोग्यच झालें. मी पुष्कळ शोध केला असता तरी अशाप्रकारचा गुणवान् जांवयी मिळणें कठीणच होतें." याप्रमाणें देवदत्त आपल्या प्रियपत्नीसहवर्तमान सासऱ्याची प्रीति वाढवीत होत्साता त्याच्याच घरीं सुखानें राहिला. नवमास पूर्ण झाल्यावर उत्तम मुहूर्तावर देवदत्ताची स्त्री पुत्ररत्नाला प्रसवली, तेव्हां राजाला फारच आनंद झाला. त्याला कमला ही एकुलती एक कन्या मात्र होती. पुत्राविषयीं तो रात्रंदिवस देवाची प्रार्थना करीत होता तरी पुत्र झाला नाहीं. तरी आतां नातू झाल्यामुळें वंशाला[1] आधार झाला असें मानून त्यानें त्या पुत्राचे जातकर्मादि संस्कार मोठ्या समारंभानें केले.

---

१– पुत्राच्या अभावीं दौहित्र, ह्मणजे मुलीचा मुलगा अधिकारी होतो, असें शास्त्रांत सांगितलें आहे

इतके दिवस देवदत्त सासऱ्याच्या ऐश्वर्याचा उपभोग घेत होताच, तरी आतां त्याला राज्याचा अधिकार प्राप्त झाला. ह्मणजे सुशर्मा-राजानें आपण वृद्ध झालों असें पाहून, नातवाला राज्याभिषेक करून देवदत्ताच्या हातीं त्याचा सर्व कारभार सोंपविला. नंतर देवदत्ताचा कारभार प्रजेला पसंत पडला, असें पाहून राजा सुशर्मा यानें परलोकसाधन करण्याकरितां तपोवनाचा आश्रय केला.

इकडे देवदत्तही बहुत दिवस पुत्राच्या नांवानें राज्याचा कारभार चालवून ऐहिक सुखाचा अनुभव घेत होता. पुत्र प्रौढ झाल्यावर राज्यकार-भार त्याच्या स्वाधीन करून आपल्या प्रियपत्नीसह—पुत्र व इतर लोक नको नको ह्मणत असतांही—तपोवनांत गमन करिता झाला. तेथें स्त्रीसहवर्तमान उग्र तप करून महादेवाला प्रसन्न केला, आणि मर्त्यशरीराचा त्याग करून देवदत्त शंकराच्या पार्षद्गणांत आपण मुख्य होऊन राहिला. प्रियेनें दातांनीं फेंकलेल्या पुष्पाची संज्ञा त्याला समजली नाहीं ह्मणून पुष्पदन्त असें शंकरानें त्याचें नांव ठेवलें. त्याची स्त्री कमला हिला पार्वतीनें आपली प्रतीहारी (दार रक्षण करणारी) करून तिचें जया असें नांव ठेवलें." याप्रमाणें कथा सांगून गुणाढ्य ह्मणाला, पुष्पदन्त हें नांव पडण्याचें कारण काय? ह्मणून तूं विचारलेंस त्याचा हा तुझा इतिहास सांगितला. आतां माझी कथा सांगतों ती ऐक.

पूर्वीं सांगितलेल्या देवदत्ताचा गोविंददत्त नामक पिता होता हें तुला पूर्वीं सांगितलेंच आहे. त्याचाच मी सोमदत्त नामक दुसरा पुत्र होतों. बापाच्या निर्दयपणाचा राग येऊन जसा देवदत्त निघून गेला तसाच मीही—त्याच्या मागून थोड्या दिवसांनीं—हिमाचलावर निघून गेलों. तेथें अनेक उत्तम फुलांनीं मीं शंकराची पूजा करून, एकनिष्ठपणानें बहुत दिवस आराधन केल्यावर देवदत्ताप्रमाणें भगवान् शंकर मजवरही प्रसन्न होऊन—"वर माग" असें ह्मणाला. मला तर कोणत्याही विषयाची इच्छा नव्हती ह्मणून मी,

" भगवन्! सार्वकाळ तुझी सेवा करित तुझ्या सन्निध रहावें, " असा वर मागितला. तेव्हां **शंकर** ह्मणाला, तूं माझी माल्यांनीं ( फुलांनीं ) विशेष प्रकारची पूजा केलीस आणि तेणेंकरून मी प्रसन्न झालों. अतएव **माल्यवान्** असें तुझें नांव ठेवतों. तूं माझ्या गणांत मुख्य होशील. " याप्रमाणें वरदान देऊन भगवंतानें मला आपला गण केला. मी त्याची अनन्यभावानें सेवा करित **कैलासावर** सुखानें राहत होतों. असें असतां पार्वतीनें रुष्ट होऊन शाप दिल्यामुळें मला हें मनुष्यशरीर धारण करावें लागलें. असो. तूं विचारलेली सर्व कथा मी सांगितली. आतां तूं **महादेवानें** रचलेली दिव्य कथा मला सांग, ह्मणजे आह्मी उभयतांही शापमुक्त होऊन स्वस्थानाला जाऊं."

ह्याप्रमाणें **गुणाढ्यानें** प्रार्थना केल्यावरून **काणभूतीनें**, जिच्यांत निरनिराळ्या सात कथा होत्या, अशी दिव्य मोठी कथा संस्कृत भाषेनें **गुणाढ्याला** सांगितली. **गुणाढ्यानें** संस्कृतादि तीन भाषा अगदीं वर्ज्य केल्या होत्या, ह्मणून **काणभूतीपासून** ज्या सात कथा त्याणें ऐकल्या त्यांवेंच संविधानक धरून त्यावर पैशाचीभाषेंत सात लक्ष श्लोकांचा मोठा ग्रंथ त्याणें रचला. त्याची रचना करतेवेळीं आसपास विद्याधर बसले होते. ते, हें आपलें काव्य कदाचित् घेऊन जातील ह्मणून—तेथें शाई नसल्याकारणानें—ती कथा आपल्याच रक्तानें त्या अरण्यांतील मोठमोठ्या दगडांवर **गुणाढ्य** लिहून ठेवीत होता. कथा सांगतेवेळीं तेथें सिद्धविद्याधरादिकांचा मोठा समाज जमला होता. आकाशांत गुढ्या उभारल्याप्रमाणें श्रवणाकरितां आलेल्या देवादिकांच्या विमानांची गर्दी झाली होती. **गुणाढ्यानें** तें काव्य संपूर्ण केल्यावर, शापापासून मुक्त होत्साता **काणभूती** आपल्या गतीला गेला व त्याच्या बरोबर संचार करणारीं जीं इतर भूतें तेथें होतीं तींही दिव्य कथा श्रवणाच्या प्रभावानें उत्तम गतीला गेलीं. **गुणाढ्याचाही** शाप त्याचवेळीं निवृत्त व्हावयाचा पण—" रचेलेली दिव्य कथा मृत्युलोकांत स्थीर केली ह्मणजे शापापासून मुक्त

होशील"—असें पार्वतीनें सांगितलें होतें म्हणून तो, 'रचलेल्या बृह-त्कथेला मृत्युलोकांत स्थीर कशी करावी?' याचा विचार करीत होता. यावेळीं त्याच्याजवळ गुणदेव आणि नंदिदेव नांवाचे दोन शिष्य होते. ते गुरुजीला (गुणाढ्याला) ह्मणाले, "ही बृहत्कथा सातवाहन राजाला अर्पण करावी. तो मोठा रसिक आहे. जसा वायू फुलांचा सुवास धारण करतो, तसा तो हें काव्य आपल्या कंठांत धारण करील असें वाटतें. व एकदां त्याणें स्वीकार केला ह्मणजे रसिकलोकांत तिचा आपोआप प्रसार होऊन ही कथा लोकांत सुस्थिर होईल." हें शिष्यांचें बोलणें गुणाढ्याला पसंत पडलें. तेव्हां भूर्जपत्रावर सर्व काव्य लिहून तें उभयतां शिष्यांच्या हातीं देऊन पैठण नगरांत सात-वाहन राजाकडे त्याणें पाठविलें. शिष्यांला पुढें नगरांत पाठवून, आपण नगराच्या बाहेर देवीनें उत्पन्न केलेल्या बागेंत[1] एका प्रदेशाचा संकेत करून तेथें बसला. इकडे ते उभयतां गुणशाली शिष्य राजसभेंत जाऊन राजाचें अभिनंदन करून आदरपूर्वक—"आमचे गुरू गुणाढ्यकवी यांनीं हें काव्य रचून आपणाला अर्पण केलें आहे." असें सांगून आणलेलें पुस्तक त्यांणीं राजाच्या हातीं दिलें. राजानें चाळून पाहिलें तों अथपासून इतिपर्यंत तें पैशाची भाषेंत रचलेलें आहे असें दिसल्यावरून त्याणें त्याचा तिरस्कार केला. त्याला ती भाषा मुळींच समजत नव्हती, तरी त्याला आपल्या विद्वत्तेची मोठी घमंड होती. ह्मणून काव्याला दोष देऊन राजानें आपलें अज्ञान झांकलें. तो ह्मणाला, "मुळीं पिशाचांची भाषा फारच निरस. त्यांतून ग्रंथ तरी लहानसा असता तर चिंता नव्हती, पण तोही सात लक्ष. तेव्हां हें एवढें पानचटभाषेंतलें अजस्र भारूड वाचतो कोण? तशांतून रक्तानें लिहिलेलें हें तर फारच किळसवाणें. आपल्याला तर असलें मुळींच नको. हें पैशाचपुस्तक पिशाचांनींच पाहिजे तर वाचावें."

---

१–'देवीकृति' नांवाच्या ज्या बागेचें पूर्वीं (पृष्ठ ९६, येथें) वर्णन आलें आहे तीच ही बाग असावी असें वाटतें.

असें बोलून **सातवाहनानें** पुस्तक परत दिलें. तें घेऊन, विरस झालेले उभयतां शिष्य परत गुरूजवळ येऊन, त्यांणीं झालेला सर्व वृत्तांत त्याला सांगितला. **सातवाहनानें** गर्विष्ठ होऊन आपल्या काव्याचा तिरस्कार केल्यामुळें **गुणाढ्याला** फारच खेद झाला. खरेंच, अभिज्ञ मनुष्यानें जाणून बुजून आपल्या कृतीचा तिरस्कार केला तर कोणाच्या मनाला संताप होणार नाहीं! **सातवाहनाला** पैशाची भाषा येत नव्हती; अर्थात् त्या भाषेंत रचलेल्या **बृहत्कथेच्या** रसाचा आस्वाद त्याला मुळींच घेतां आला नाहीं. तथापि त्या काव्याचा तिरस्कार करून त्याणें आपल्या अज्ञानावर पांघरूण घातलें. त्याकाळीं सर्व पृथ्वीवर **सातवाहन** हा मोठा काव्यरसाभिज्ञ अशी सर्वत्र ख्याती होती. त्याणें आपल्या कृतीचा तिरस्कार केला ह्मणून **गुणाढ्याला** फार राग आला. मग शिष्यांसहवर्तमान बागेंतून निघून तो एका उंच टेकडीवर गेला आणि तेथें विस्तव पेटवून त्या **बृहत्कथेचें** एकेक पत्र मोठ्यानें वाचून अग्नींत जाळून टाकण्याचा क्रम त्याणें आरंभला. याप्रमाणें त्यानें साहालक्ष ग्रंथ जाळून टाकला. तो ह्मणाला, "मनुष्यांच्या नशीबीं नाहीं तर नाहीं; पण पशुपक्ष्यादि प्राणी तरी माझें काव्य ऐकून संतुष्ट होवोत!" क्रमाप्रमाणें त्याणें सातवा लक्ष जाळण्यास प्रारंभ केला त्यावेळीं शिष्यांनीं आग्रहपूर्वक—ही एवढी तरी कथा जाळूं नका—ह्मणून प्रार्थना केली. त्या भागांत **नरवाहनदत्ताचें** चरित्र होतें. ती दोघांही शिष्यांला फारच आवडत होती ह्मणून त्यांनीं आग्रह केला. तेव्हां शिष्यांचें प्रिय करावें ह्मणून **गुणाढ्यानें** तो एक लक्ष ग्रंथ जाळला नाहीं. **गुणाढ्य** मोठ्यानें एकेक पत्र वाचून जाळीत होता; तेव्हां त्याच्या सभोंवतीं हरिण, ससे, गवे इत्यादि हजारों श्वापदांचे कळपाचे कळप बसले होते. त्यांला कथाश्रवणाचा असा कांहीं विलक्षण नाद लागला होता कीं, आहार विहार वगैरे बिलकूल न करितां ते रात्रंदिवस एकसारखे ऐकत बसले होते! कथा श्रवण करीत असतां त्यांच्या डोळ्यांतून एकसारखा अश्रुपात होत होता. हा प्रेमळ श्रोत्यांचा समाज पाहून

गुणाढ्याला फार समाधान वाटलें. तो सातवाहनराजानें तिरस्कार केल्यावरून---आपली कृतीच नीरस आहे असें समजून फारच खिन्न झाला होता. कारण, अभिज्ञ मनुष्याला पसंत झाली नाहीं तर आपली कृतीच वाईट आहे असें वाटणें साहजिक आहे. पण वर सांगितल्याप्रमाणें जमलेला श्रोत्यांचा समाज पाहून त्याचा खेद समूळ नाहींसा झाला. पशू जर इतक्या प्रेमानें रात्रंदिवस माझी कृती श्रवण करताहेत, तर मनुष्य असून विद्वान् आणि रसिक [illegible] सातवाहनानें तिचा तिरस्कार केला तो केवळ मूर्खपणानें अथवा आपल्या दुर्दैवानेंच केला असेल असें त्याला वाटलें. असो.

इकडे सातवाहनराजाची प्रकृती बिघडून तो एकाएकीं अस्वस्थ झाला. त्याणें प्रकृती बिघडविण्याचें कारण वैद्याला विचारल्यावरून त्याणें सांगितलें कीं, " सुकलेलें मांस आपण खाल्लें, तें पचन न झाल्याकारणानें हा विकार उत्पन्न झाला." राजानें वाकनिसाला बोलावून स्वयंपाक्यांकडे चौकशी केली. तेंव्हां ते म्हणाले, " आम्हीं काय करावें ? पारधीलोक तसलेंच मांस आह्माकडे आणून देतात. " हें ऐकून पारध्यांला विचारलें. ते म्हणाले, "महाराज, येथून जवळच एका डोंगरावर कसल्याशा ग्रंथाचें एकेक पत्र वाचून कोणी एक ब्राह्मण तें अग्नींत टाकीत बसला आहे. त्याच्या सभोंवती हजारों प्राणी रात्रंदिवस निराहार होत्साते, तो काय वाचतो तें ऐकत बसले आहेत. असा क्रम बहुत दिवस चालला आहे. आसपासच्या रानांतलीं श्वापदें कांहीं आहार करीत नाहींत म्हणून त्यांचीं शरीरें अगदीं शुष्क होऊन गेलीं आहेत. यांत आमचा कांहीं अपराध नाहीं." हें त्यांचें बोलणें ऐकून राजाला मोठाच अचंबा वाटला. म्हणून त्या पारध्यांला बरोबर घेऊन---प्रकृती नीट नव्हती तथापि---त्यांणीं सांगितलेल्या ठिकाणीं राजा जावयास निघाला. व्याधांनीं दाखविलेल्या वाटेनें तो, जेथें गुणाढ्य आपलें काव्य जाळीत होता तेथें प्राप्त झाला. आसमंतात्,---ज्यांच्या नेत्रांतून

खळखळां अश्रुधारा वाहत आहेत, अशा हजारों श्वापदांच्या मध्यभागीं अग्निकुंडाजवळ बसलेला, वनवासामुळें ज्याचें शरीर अगदीं मलीन झालें आहे व थोडासा शेष राहिलेल्या शापाग्नीच्या ज्वाळाच कीं काय; या प्रकारच्या पिंगट जटांनीं ज्याचें तोंड अगदीं झांकून गेलें अशा अशा गुणाढ्याला राजानें प्रथम ओळखला नाहीं. तथापि लक्षपूर्वक पाहिल्यावर पूर्वींचा माझा प्रधान **गुणाढ्य** तोच हा आहे अशी त्याची खातरी झाली. तेव्हां नम्रतेनें नमस्कार करून, "महाराज, आपण हें काय करतां?" म्हणून राजानें प्रश्न केला. तो ऐकून **गुणाढ्यानें** पिशाच भाषेनें, ग्रंथ जाळण्याचें कारण सांगतांनां पूर्वजन्मीं आपण कोण होतों व आपल्याला शाप कसा झाला आणि तो सरण्याचा उपाय कोणता वगैरे सर्व वृत्त सांगितलें. तें ऐकून हा गणावतार आहे; शापानें याची अशी अवस्था झाली आहे असें जाणून, राजानें **गुणाढ्याच्या** पायांवर मस्तक ठेवलें आणि जाळून अवशिष्ट राहिलेली कथा आपल्याला द्यावी, म्हणून प्रार्थना केली. तेव्हां **गुणाढ्य** ह्मणाला, "आतां काय उपयोग! ज्यावेळीं सन्मानपूर्वक तुझ्याकडे हें काव्य पाठविलें होतें त्यावेळीं तुला तें योग्य वाटलें नाहीं आतां मागून उपयोग काय? निरस अशा पिशाच भाषेंत रचलेली आणि रक्तानें लिहिलेली कथा तुझ्या काय उपयोगाची! असो. तिचे रसज्ञ श्रोते हे आसमंतात् बसले आहेत, यांला तिचा रस पाजून मीं ती अग्नीला समर्पण केली. याप्रमाणें सहा लक्ष ग्रंथ अग्नीच्या मुखांत गेला. हें माझें मोठें कथासत्रच झालें. या माझ्या निरस काव्यापेक्षां अनेक उत्तम काव्यें तुझ्याजवळ असतील तीं वाच म्हणजे झालें. यांत कांहीं अर्थ नाहीं." असें बोलून **गुणाढ्य** स्तब्ध झाला. **सातवाहन** अत्यंत लज्जित होऊन क्षमा करण्याविषयीं अनेक प्रकारें प्रार्थना करून ती कथा आपणास देण्याविषयीं आग्रह करूं लागला. तेव्हां **गुणाढ्य** म्हणाला, " असो. तूं अज्ञानानें माझ्या काव्याचा तिरस्कार केलास याची मी तुला क्षमा करतों. सहा

 ग्रंथ तर जळून गेलाच. आतां एक लक्ष अवशिष्ट राहिला आहे. तो

पाहिजे तर घे तुला पैशाची भाषा समजत नाहीं याकरितां हे माझे दोघे शिष्य ती भाषा तुला शिकवितील. आणि ह्या काव्याचें तुला व्याख्यान करून सांगतील. माझा शाप सरला. मी आतां या शरीराचा त्याग करून पूर्वस्वरूपाचा स्वीकार करणार." असें बोलून बाकी राहिलेला एक लक्ष ग्रंथ त्याणें राजाला दिला. आणि उभयतां शिष्यांच्या मस्तकांवर हात ठेवून गुणाढ्यानें त्यांला सातवाहनाबरोबर जाण्यास निरोप दिला. नंतर त्याणें एकवेळ मोठ्या प्रेमानें आपल्या आवडत्या सर्व श्रोत्यांकडे पाहिलें. तेव्हां प्रेमाश्रूनें त्याचे डोळे भरून आले. नंतर,—"प्रिय श्रोतेहो! तुह्मां सर्वांचें कल्याण असो, परमेश्वर तुह्मावर कृपा करो!" असा श्रोत्यांना आशीर्वाद देऊन समाधी धारण करून गुणाढ्यानें मर्त्यशरिराचा त्याग केला, आणि शापमुक्त होत्साता दिव्य रूप धारणकरून महादेवाच्या सान्निध प्राप्त झाला.

नंतर गुणाढ्यानें दिलेलें बृहत्कथानांवाचें काव्य घेऊन त्या दिव्य पुरुषाच्या वियोगानें दुःखित झालेला राजा सातवाहन, उभयतां शिष्यांसह आपल्या नगराला गेला. तेथें, गुणदेव आणि नंदिदेव नांवाच्या गुणाढ्याच्या शिष्यांला वस्त्रें, अलंकार, हत्ती, घोडे, गृह, जहागीर वगैरे देऊन त्यानें संतुष्ट केलें. याप्रमाणें, शर्ववर्म्याचा पक्षपात धरून गुणाढ्यासारख्या महापंडिताचा आपण अपमान केला हें फार वाईट केलें असें त्याला वाटत होतें व त्याबद्दल लोक राजाची निंदाहीं करीत असत, त्या सर्वांचा गुणाढ्याच्या शिष्यांचें गौरव करून सातवाहनानें परिहार केला. गुणाढ्याविषयीं आपला पूज्यभाव व्यक्त करून त्याच्या शिष्यांकडून राजानें बृहत्कथेचा अर्थ समजून घेऊन लोकांत त्या काव्याचा प्रसार केला.

ही कथा प्रथमतः कैलासपर्वतावर महादेवानें पार्वतीला सांगितली, ती पुष्पदन्तानें श्रवण केली. नंतर मृत्युलोकीं वररुचीचें रूप धारणकरणाऱ्या पुष्पदन्तानें काणभूतीला सांगितली. काणभूतीनें गुणाढ्याला

सांगितली. गुणाढ्यानें काव्यरूपानें तिचें ग्रथन केलें; पण त्यांतला सहा लक्ष ग्रंथ जळून जाऊन बाकी एक लक्ष राहिला तो त्याणें सातवाहन राजाला दिला, आणि सातवाहनानें त्याचा लोकांत प्रचार केला. याप्रमाणें महादेवापासून परंपरेनें ही कथा प्राप्त झाली आहे. हिच्यांत अनेक विचित्र रस आहेत. देवांच्या कथा देखील हिच्यापुढें अगदीं फिक्या पडतील अशी ही सर्वोत्तम आहे.

---

येथपर्यंत ह्या ग्रंथाचा उपोद्घात झाला. यापुढें मूळग्रंथाला आरंभ होऊन प्रथमतः फारच सुरस असें वत्सराजचरित्र सांगण्यांत येईल.



# वत्सराजचरित्र.

गौरीनवपरिष्वङ्गे विभोः स्वेदाम्बु पातु वः।
नेत्राग्निभीत्या कामेन वारुणास्त्रमिवाहितम्॥ १॥

ह्या भरतखंडांत, स्वर्गलोकाशीं स्पर्धा करण्याकरितांच ब्रह्मदेवानें उत्पन्न केला कीं काय, असा, वत्स[1] या नांवानें प्रसिद्ध एक देश आहे. त्याच्या मध्यभागीं कौशांबी[2] नांवाची मोठी नगरी होती. लक्ष्मीची विलास करण्याची जागा व पृथ्वीचा केवळ मध्यबिंदूच कीं काय, अशी ती नगरी सर्वप्रकारें उत्तम होती. तेथें पांडवांच्या वंशांत झालेल्या परीक्षितीराजाचा नातू व जनमेजयराजाचा पुत्र, शतानीक नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याचा पराक्रम इतका अमित होता कीं, सर्व पृथ्वीवर त्या एकट्याच राजाची सत्ता चालत होती. त्याची विष्णुमती नांवाची पट्टराणी होती व त्या राजाच्या अन्यही पुष्कळ स्त्रिया होत्या. पण त्यांतून कोणालाही संतती झाली नाहीं. मोठ्या पुरुषाला जे गुण अवश्य असले पाहिजेत ते सर्वही त्या राजाला प्राप्त झाले होते. अफाट राज्याचा तो उपभोग करित होता, तथापि संतती नसल्यामुळें राजा शतानीकाचें मन उदास झालें होतें. एकेदिवशीं, इतर कोणत्याच विषयांत मन रमेना ह्मणून, थोडेसे सेवक बरोबर घेऊन, तो मृगयेकरितां अरण्यांत गेला. तेथें फिरतां फिरतां सहज शांडिल्यनांवाच्या ऋषीची भेट होऊन त्याच्याशीं याचा विषेश परिचय झाला. पुत्राची इच्छा करणाऱ्या राजानें कांहीं तरी कार्य करावें, या हेतूनें तो ऋषी राजाबरोबर कौशांबीनगरीला आला. आणि त्याच्याकडून पुत्रकामेष्टी नामक यज्ञ

---

१. या देशाचें हें नांव सांप्रत प्रसिद्ध नाहीं, तथापि उत्तरेकडच्या प्रदेशांत गंगानदीच्या कांठीं हा देश असावा असें वाटतें. २. या नांवाचें खेडें वायव्यप्रांतांत मुरादाबादजिल्ह्यांत आहे.

करवून मंत्रांनीं अभिमंत्रण केलेला चरू (हवन करून बाकी राहिलेला भात.) विष्णुमती राणीला भक्षण करावयास दिला. आणि " ईश्वरकृपेनें लौकरच तुझा मनोरथ पूर्ण होईल." असा आशीर्वाद देऊन शांडील्यऋषी परत आपल्या आश्रमाला गेला. इकडे राणी विष्णुमती गरोदर झाली तेव्हां राजाला फार आनंद झाला. सर्व प्रजाजनांनीं उत्सवादिक करून आपला आनंद प्रदर्शित केला. राजानें, जें जें मागेल तें तें देऊन विष्णुमतीचे डोहाळे पुरविले.. अनुक्रमानें नऊ मास पूर्ण होऊन विष्णुमतीला प्रसववेदना होऊं लागल्या. तेव्हां हजारों ब्राह्मण, सूत, मागध, बंदी इत्यादिकांचा राजद्वारांत मोठा समाज जमला. शांडिल्य-ऋषीच्या आशीर्वादानें आपल्याला पुत्र होणार अशी राजाची पुर्ती खात्री होती. त्याप्रमाणें राणी विष्णुमती प्रसूत होऊन पुत्रच झाला. त्या वेळीं नगरांत जिकडे तिकडे उत्सव चालू झाले होते. राजानें ब्राह्मणांला अनेक दानें दक्षणा वगैरे देऊन संतुष्ट केलें. तसेंच सूत, मागधादिक गुणि-जन व नगरांतलि इतर लोक या सर्वांला त्याणें संतुष्ट केलें. ज्योतिष्यांनीं सांगितल्याप्रमाणें यथाकालीं नामकर्मसंस्कार करून राजानें, सहस्रानीक असें आपल्या पुत्राचें नांव ठेविलें, अनुक्रमानें तो पुत्र राजाच्या आनंदाला वाढवीत होत्साता थोर होऊं लागला. जसा विनयाच्यायोगानें गुण शोभा देतो, तसा त्या पुत्राच्या योगेंकरून राजा शोभूं लागला. त्याला विद्या व कलाकौशल्य इत्यादिकांचा अभ्यास करवून राजनीतींत निपुण केलें. यावेळीं सहस्रानिकाचें वय सुमारें अठरा वर्षांचें झालें होतें.

एकेसमयीं राजा शतानीक प्रधानादिकांसह सभेंत राजकार्याचा विचार करीत बसला होता. तेथें अकस्मात् मातली नांवाचा इंद्राचा सारथी प्राप्त झाला. त्याला सत्कारपूर्वक आसनावर बसवून राजानें इंद्राचा क्षेमसमाचार विचारून, " येण्याचें प्रयोजन काय ? " असा प्रश्न केला. तेव्हां मातली ह्मणाला, " राजन् ! सर्व देवगणांसह आमचा प्रभु भगवान् महेन्द्र सुखरूप आहे. त्याणें माझ्या मुखानें आपल्याला कुशल-

प्रश्न करून कांहीं विशेष कार्यानिमित्त निरोप सांगितला आहे." राजा ह्मणाला, "देवराजाचें माझ्या हातून होण्यासारखें असें काय कार्य आहे बरें? त्यांणीं काय आज्ञा केली असेल ती सांगा. मी त्यांच्या कार्याविषयीं सर्वप्रकारें तत्पर आहें." यावर मातली ह्मणाला, "राजा! हें भाषण तुला योग्यच आहे. तुझे पूर्वज पांडव यांणीं इंद्राचें सहाय करण्याविषयीं अनेक संकटें देखील भोगलीं. त्याच शूर कुलांत तूंही उत्पन्न झाला आहेस. देवराजाशीं तुमचा कुलपरंपरागत संबंध आहे. तेव्हां त्याच्या कार्याविषयीं आपण सिद्ध असणें योग्यच आहे. सांप्रत दैत्यांशीं लढाई करण्याचा प्रसंग उपस्थित झाला आहे. लौकरच युद्ध सुरू होईल. तेव्हां इंद्राची अशी मर्जी आहे कीं, त्या प्रसंगीं आपण त्याचें सहाय करावें. या प्रसंगाला फारसा विलंब लागणार नाहीं, ह्मणून आतांच आपल्याला देवराजाच्या भेटीला येण्याविषयीं विनंती करण्याकरितां मी आलों आहें. यावर आपली मर्जी असेल तसें करावें." हें भाषण ऐकून राजा शतानीकाला फार आनंद झाला. खरेंच आहे. शूरपुरुषांनां लढाईचा प्रसंग पुत्रजन्मापेक्षांही विशेष आनंदकारक होतो. त्यांतून आपल्या पूर्वजांनीं ज्याला साह्य केलें त्याच इंद्राला साह्य करण्याचा प्रसंग प्राप्त झाला व त्याबद्दल तो प्रेमपूर्वक बोलावितो, असें पाहून राजानें इंद्राजवळ जाण्याचा निश्चय केला. आणि प्रधानादिकांच्या संमतीनें, अल्पवयस्क अशा आपल्या पुत्राला राज्याभिषेक करून युगंधर नांवाचा एक मुख्य प्रधान व सुप्रतीक नांवाचा मुख्य सेनापति या उभयतांच्या हातीं आपला पुत्र आणि सर्व राज्य सोंपवून, दैत्यांशीं युद्ध करण्याकरितां मातलीसहवर्तमान राजा शतानीक इंद्राच्या भेटीस गेला.

इंद्रानें प्रेमपूर्वक त्याचा सत्कार करून आपल्याजवळ त्याला राहून घेतलें. इतक्यांत लौकरच लढाई सुरू झाली, तेव्हां शतानीकाला आपल्या सेनेचा अधिपति करून इंद्र युद्धाला प्रवृत्त झाला. शतानीकानें, यमदंष्ट्र इत्यादि मोठमोठे दैत्य मारून पुष्कळ वेळां जय मिळ-

विला, परंतु शेवटीं एकेदिवशीं दैत्यांनीं कपटानें शतानीकाला एकटाच गांठून त्याचें मस्तक तोडलें. इंद्राला राजाच्या मरणानें फार दुःख झालें व त्याच्या पराक्रमादिकांला आठवून त्याणें बहुत शोक केला. परंतु निरुपायास्तव मोठ्या दुःखानें त्याचें प्रेत मातलीच्या हातीं देऊन कौशांबीनगरींत पाठवावें लागलें. इकडे राजाचा युद्धांत अंत झाला असें समजून सर्व लोक शोक करूं लागले, व शहरांत मोठी गडबड झाली. तेव्हां युगंधर आणि सुप्रतीक या दोघांनीं जिकडे तिकडे शांतता करून शोक करणाऱ्या राजपुत्रांचें समाधान केलें. 'आपला पती क्षत्रियांला उचित अशा लढाईंत पडला तेव्हां आपणाला तरी वांचून काय करावयाचें आहे,' असें मानून राणी विष्णुमती पतीच्या देहासह अग्नींत प्रवेश करिती झाली. राजाचें उत्तरकर्म वगैरे सर्व यथाविधी करून सहस्रानिकानें वडिलोपार्जित राज्याचा भार आपल्या मस्तकावर पूर्णपणें घेतला. तो राज्यकारभार पाहूं लागला हें वर्तमान ऐकून, शतानीकाच्या मरणाची बातमी ऐकून संतुष्ट झालेल्या त्याच्या शत्रूंचीं मनें उदास झालीं. कारण सहस्रानीक वयानें अल्प होता तरी त्याचा पराक्रम फार मोठा होता.

शतानीक आपल्याकरितां लढाईंत मरण पावला, ही गोष्ट इंद्राच्या मनांत फार सलत होती. त्या लढाईचा शेवट झाला तेव्हां विजयप्रदर्शनार्थ जो मोठा उत्सव केला होता त्यांत, मातलीला मुद्दाम पाठवून सहस्रानीकाला त्याणें बोलावून नेलें. या पराक्रमी राजपुत्राला पाहून इंद्राला फार संतोष झाला. त्यानें मोठ्या प्रीतीनें आपल्या पुत्राबरोबर सहस्रानिकाला आपल्या जवळ बसवून घेऊन त्याचा मोठा सन्मान केला. व त्याच्याविषयीं आपलें प्रेम व्यक्त करण्याकरितां त्याला कांहीं दिवस आपल्या येथें ठेवून घेतलें. सहस्रानीक स्वर्गलोकाची शोभा अवलोकन करीत नंदनवनांत यथेच्छ संचार करीत होता. तेथें स्त्रियांसहवर्तमान अनेक प्रकारच्या क्रीडा करणाऱ्या देवांचे विलास पाहून सहस्रानीकाला, त्यांच्यासारखी आपणही क्रीडा करावी असें वाटलें. परंतु अनुरूप

स्त्री नाहीं ह्मणून तो फार दुःखित झाला. त्याची मुद्रा खिन्न झालेली पाहून इंद्र ह्मणाला, " राजा, विषाद करूं नको. ही तुझी इच्छा लौकरच पूर्ण होईल. तुझ्यायोग्य अशी स्त्री पृथ्वीतलावर यापूर्वीच उत्पन्न झाली आहे. तुझ्या मनाचें समाधान होण्याकरतां तिचा वृत्तांत तुला सांगतों तो ऐक. पूर्वी एकेसमयीं मी ब्रह्मदेवाच्या दर्शनाकरितां त्याच्या सभेंत गेलों होतों. माझ्या मागून विधूम नांवाचा एक वसूही तेथें आला. आम्ही ब्रह्मदेवाचें दर्शन घेऊन सभेंत बसलों होतों. इतक्यांत, जिचे केंस विखरलेले होते व वस्त्रही अस्ताव्यस्त झालें होतें, अशा रीतीनें अलंबुषा नांवाची एक अप्सरा सभेंत आली. तिची तशाप्रकारची स्थिती पाहून सभेंतील सर्व लोकांनीं आपली दृष्टी खालीं लावली. परंतु तो विधूम नांवाचा वसू सकाम होऊन एकसारखा तिच्याकडे पहात होता, व तीही त्याच्या रूपाला मोहित झाली. हा प्रकार पाहून ब्रह्मदेवानें हंसत हंसत माझ्याकडे पाहिलें, तेव्हां ब्रह्मदेवाचा अभिप्राय समजून मी त्या उभयतांलाही सांगितलें कीं, "तुह्मी दोघांनींही फार अयोग्य वर्तन केलें आहे. या सभेंत अशाप्रकारचा अविनीतपणा तुह्मी केला म्हणून तुह्माला शिक्षा होणें योग्य आहे. तर ज्यापेक्षां सकामदृष्टीनें एकमेकांकडे तुम्ही पहात होतां त्यापेक्षां तुमच्या इच्छेप्रमाणेंच, मनुष्यलोकांत जन्म घेऊन, तुह्मी दोघेंही स्त्रीपुरुषांच्या नात्यानें वास्तव्य करा! असा मी त्यांना शाप दिला होता. त्यांतून विधूम नांवाचा जो वसू तो प्रत्यक्ष तूंच आहेस, व ती अप्सराही सप्रांत अयोध्येचा राजा कृतवर्मा याच्या घरीं उत्पन्न झाली आहे. तिचें नांव मृगावती. ती तुझी बायको होईल. तूं काळजी करूं नकोस." याप्रमाणें इंद्राचें वाक्य श्रवणकरून राजाला फार आनंद झाला व इंद्रवाक्यरूप वायूनें त्याच्या हृदयांत

१–देवांचे निरनिराळे गण अथवा मंडळ्या आहेत. जसें—आदित्य, साद्ध्य, मरुत, वसू इत्यादि. वसू हे ८ देव आहेत त्या प्रत्येकांचीं निरनिराळीं नांवें आहेत. 'विधूम' हें त्यापैकींच एकाचें नांव आहे.

मदनाग्नी फारच प्रदीप्त झाला. असो. नंतर कांहीं दिवस आपल्या घरीं ठेवून घेऊन इंद्रानें सत्कारपूर्वक, मातलीला बरोबर देऊन सहस्रानीकाला आपल्या राजधानींत जाण्याविषयीं आज्ञा दिली. तो तेथून निघाला तेव्हां तिलोत्तमा नांवाची अप्सरा घाबऱ्यां घाबऱ्यां राजाजवळ येऊन त्याला ह्मणाली, "अंमळ दम धरा. मी तुम्हाला कांहीं सांगतें तें ऐका." असें तिणें वारंवार ह्मटलें; पण यावेळीं राजाचें चित्त मृगावतीकडे गेल्यामुळें ठिकाणावर नव्हतें म्हणून त्याणें तें मुळींच ऐकलें नाहीं. आपला अनादर झाला असें पाहून लज्जित झालेल्या तिलोत्तमेनें रागानें राजाला तत्काल शाप दिला. ती म्हणाली, "जा! जा! माझें भाषणदेखील तुला ऐकूं येत नाहीं काय? पण कांहीं चिंता नाहीं. जिनें तुझें मन इतकें हरण केलें आहे व तूं जिच्यावर इतका आसक्त झाला आहेस तिचा चवदा वर्षेंपर्यंत तुझ्याशीं वियोग होईल! हें माझें बोलणें कधींही खोटें होणार नाहीं." हा तिलोत्तमेचा शाप मातलीनें मात्र ऐकला होता. राजाला त्याचें कांहीं वर्तमान देखील नव्हतें.

याप्रमाणें उत्सुक झालेला राजा सहस्रानीक इंद्राच्या रथांत बसून मोठ्या त्वरेनें कौशांबीनगरीला येऊन पोहोंचला आणि त्याचें मन अयोध्येंत मृगावतीजवळ पोहोंचलें. प्रधानादिकांनीं सामोरें जाऊन त्याचा सन्मान केला, तेव्हां त्यांच्यासह मोठ्या समारंभानें आपल्या वाड्यांत प्रवेश करून राजानें मातलीचा सत्कार करून त्याला परत जाण्याविषयीं निरोप दिला. सहस्रानीकाला मृगावतीचें अगदीं वेडच लागल्यासारखें झालें होतें. बऱ्याच दिवसांनीं तो आपल्या राजधानींत परत आला होता, तरी कामाकाजाची कांहीं व्यवस्था त्याणें विचारली नाहीं. इंद्रानें सांगितलेली मृगावतीची हकीकत आपल्या मंत्र्यांला कधीं सांगेन असें मात्र त्याला झालें होतें, ह्मणून युगंधरादि सर्व प्रधानांला बोलावून इंद्रानें सांगितलेली मृगवतीची कथा त्याणें त्यांस निवेदन केली. आणि उत्सुक होऊन कसें तरी करून तिच्याशीं आपला विवाह होण्याचा योग घडवून आणा, असें त्यांनां

आग्रहपूर्वक सांगितलें. नंतर युगंधरानें राजाचा अभिप्राय जाणून एका चतुर मनुष्याला निरोप सांगून, अयोध्येंत कृतवर्म्याजवळ पाठविला. तो दूत त्वरेनें अयोध्या नगरीला प्राप्त होऊन राजा कृतवर्म्याची भेट घेऊन त्याला प्रधानांनीं [illegible] निरोप त्याणें कळविला. कृतवर्म्यानें त्या दूताला ठेवून घेतला आणि आलेला निरोप आपली राणी कलावती हिला कळविला. ती म्हणाली, “ असें असेल तर फार चांगलेंच झालें म्हणायचें. कुल, शील, रूप, गुणादिकांनीं आपल्या मृगावतीला तो नवरा योग्य आहे. काल स्वप्नांत कोणी ब्राह्मण माझ्या दृष्टी पडला होता. त्यानेंही असेंच सांगितलें होतें; तेव्हां राजा सहस्रानीक मागत असला तर मृगावती त्याला द्यावी, हें मला चांगलें वाटतें. ” याप्रमाणें आपल्या स्त्रीचीही सम्मती आहे असें पाहून कृतवर्म्यानें मृगावती सहस्रानीकाला देण्याचा निश्चय केला. जो दूत सहस्रानीकाचा निरोप घेऊन गेला होता, तो पुरुष मोठा चतुर असाच होता. त्याला मृगावतीचीं सर्व लक्षणें व गुण रूप इत्यादिकांचीही माहिती घेण्याविषयीं प्रधानांची सूचना होती. ह्मणून तो मृगावतीच्या लक्षणांची परीक्षा घेण्याचा प्रयत्न करीत होता. तो त्याचा अभिप्राय जाणून राजा कृतवर्म्यानें त्याचा हेतू पूर्ण केला. संगीतशाळेंत त्याला नेऊन मृगावतीकरवीं तेथें एक नाटकाचा प्रयोग करविला. त्यांत स्वतः मृगावती नायिका झाली होती. त्याप्रसंगीं तिचें अप्रतिम गायन, नृत्य, वगैरे श्रवणकरून व तिचें अप्रतिम रूप पाहून दूताच्या मनाची अगदीं खात्री झाली. नंतर कृतवर्म्याचें निश्चय झाल्याचें वचन घेऊन, तो परत कौशांबी नगरीला आला, आणि उत्सुक झालेल्या राजाला हें आनंद देणारें वर्तमान सांगून संतुष्ट करिता झाला. तेव्हां त्याला मोठें इनाम देऊन राजानें विवाहाला जाण्याची तयारी केली, आणि चतुरंग सैन्य बरोबर घेऊन मोठ्या थाटानें अयोध्येला प्रस्थान केलें. कामी पुरुष एकदां उत्सुक झाले ह्मणजे त्यांच्या मनाची स्थिति कांहीं चमत्कारिकच होते. सह-

स्रानिकाला वाटेंत कितीही चाललें तरी तें फार थोडेंच वाटत असे. व अयोध्यानगरी अजून किती तरी दूर आहे? असें तो आपल्याजवळच्या लोकांला वरचेवर विचारीत असे. मृगावतीला एकदां कधीं पाहीन, असें त्याला झालें होतें. थोड्याच दिवसांनीं तो एकदांचा अयोध्येस येऊन पोंहचला. कृतवर्म्याला कळविण्याकरितां पुढें दूत पाठविले होते त्यांणीं सहस्रानीक येत आहे हें वर्तमान राजा कृतवर्म्याला सांगितलें. यावेळीं ध्वज, पाताका, इत्यादिकांनीं सर्व शहर शृंगारून विवाहाची कडेकोट तयारी केली होती. सहस्रानीक अयोध्येच्या जवळ आला असें समजलें तेव्हां कृतवर्मा सामोरा जाऊन मोठ्या सत्कारानें त्याला नगरांत घेऊन आला. त्याला राहण्याकरितां पूर्वींच योजून ठेवलेल्या ठिकाणीं पोंहचवून इतर सर्व व्यवस्था केली. उभयतांकडचे शिष्टाचार वगैरे होऊन शुभ मुहूर्तावर लग्न लागलें. सहस्रानीकाला यथाविधी आपली कन्या देऊन कृतवर्म्यानें आपणाला, कृतकृत्य झालों असें मानलें. कांहीं दिवस मोठ्या प्रेमानें जांवयाला आग्रहपूर्वक ठेवून घेऊन अनेक प्रकारचे—राजेलोकांला उचित असे नाचरंग तमाशे व मेजवान्या शिकारी वगैरे प्रकार केले. शेवटीं मोठ्या संकटानें जांवयाला निरोप दिला. सहस्रानीक कौशांबीला जाण्यास निघाला त्यावेळीं कन्येच्या विरहानें राजा कृतवर्मा आणि कलावती उभतांही फार दुःखित झालीं. त्यांणीं आपल्या मुलीला अनेक उत्तम उत्तम वस्तू आंदण दिल्या. कृतवर्मा डोळ्यांत आसवें आणून मृगावतीला आलिंगन देऊन सहस्रानीकाला म्हणाला, “ तुम्हां उभयतांचा समागम मोठा आनंदकारक झाला आहे. मी आतां कांहीं बोलावें असें नाहीं; पण स्नेह ‘ वाइटाची शंका मनांत आणतो ’ म्हणून कांहीं बोलतों. ही माझी कन्या रूपगुणादिकांनीं आपल्याला आवडलीच आहे. आजपर्यंत इचें रक्षण करण्याचें काम माझ्याकडे होतें तें आतां तुमच्या हातीं आलें आहे. स्त्रिया सर्वप्रकारें रक्षण व पोषण करण्यास योग्य आहेत. तेव्हां सर्वथा

उभयतांच्या संबंधाला उचित असेंच वर्तन व्हावें, याहून विशेष कांहीं सांगावयाचें नाहीं." याप्रमाणें जांवयाला दोन गोष्टी सांगून कन्येच्या विरहानें अस्वस्थ झालेला राजा कलावतीकडे पाहूं लागला. तेव्हां तीही मृगावतीला पोटाशीं धरून प्रेमाश्रूंनीं तिला स्नान घालित होत्साती सद्गदित होऊन म्हणाली, "बाळे, तुझ्या मंगलकारक प्रयाणसमयीं रडणें हें अशुभ आहे. परंतु कितीही आवरलें तरी तें राहत नाहीं. तूं आपल्या पतीच्या समागमें स्वगृहाला गेलीस म्हणजे तेथें फार नम्रतेनें वाग. गुरुजनांची मनोभावानें सेवा कर. अद्यापि कोणी तुला सवत नाहीं; पण कदाचित् पुढें आलीच तर तिच्याशीं द्वेष करूंनको. सेवकजनांवर नेहमी सदयदृष्टी ठेव. नवऱ्यानें अप्रिय केलें तरी वाकडें वागूंनको. तुला विशेष कांहीं सांगितलें पाहिजे असें नाहीं. परंतु स्नेह माझ्याकडून वदवीत आहे. सर्वथा उभय कुलांला आनंद देणारी हो." याप्रमाणें उभयतां मातापितारांनीं प्रेमानें वारंवार जिचें चुंबन घेतलें आहे व जिचा वियोग सहन करण्यास असमर्थ होऊन दुःखानें जिला निरोप दिला आहे, अशा मृगावतीला रथावर बसवून राजा सहस्रानीक मोठ्या समारंभानें अयोध्येहून निघाला. राजा कृतवर्मा आणि कलावती यांणीं सरयूनदीपर्यंत त्यांला पोहोंचवून, संकटानें कन्या वियोगदुःख सहन करीत होत्सातीं उभयतां परत नगरांत गेलीं.

राजा सहस्रानीक मार्गक्रमण करीत करीत कौशांबीनगरीजवळ पोहोंचला. तेव्हां युगंधरादि प्रधान व इतर सर्व प्रजाजनांनीं त्याला सामोरें जाऊन आनंदपूर्वक मोठ्या थाटानें राजवाड्यांत आणून पोहोंचविलें. राजा सहस्रानीकानें विवाहानिमित्त एकसारखा सात दिवस उत्साह केला. सर्व लोकांचे मनोरथ पूर्ण करून त्यांना संतुष्ट केलें. सहस्रा-

---

१—आप्त किंवा मित्र वगैरे स्निग्ध मनुष्याला, वाटेंत जो जलाशय अथवा डोंगर प्रथम लागेल त्यापर्यंत पोंचविण्यास जावें. त्याच्यापुढें जाऊं नये, असें शास्त्रांत सांगितलें आहे.

नीकाला मृगावतीचा समागम फारच आनंदकारक झाला. उभयतां-लाही परस्परांपासून गुणांची प्राप्ती झाली. जशी शास्त्रानें बुद्धी व बुद्धीच्या योगानें शास्त्र, ह्यांच्या गुणाचा विकास होतो; तसाच राजा आणि मृगावती या उभयतांच्या आंगच्या गुणांचा विकास उभय-तांच्या समागमानें झाला. याप्रमाणें दोघेंही आनंदानें विषयोप-भोग करित असतां मृगावती गरोदर झाल्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. याच संधीस राजाचा मुख्य प्रधान युगंधर याला यौगंधरायण व सुप्र-तीकनामक सेनापतीला रुमण्वान् या नांवाचे पुत्र झाले. तसाच राजाचा खुषमस्कऱ्या रैवतक नांवाचा ब्राह्मण होता, त्याला वसंतक नांवाचा मुलगा झाला. इकडे मृगावतीला डोहाळे होऊं लागले. तिच्या तोंडावर पांढुरकीची छाया दिसूं लागली. राजानें प्रश्न केल्यावरून मृगावती म्हणाली, “ र-क्तानें भरलेल्या तळ्यांत स्नान करावें असें वाटतें. ” राजाला ही तिची इच्छा कांहीं चमत्कारिक अशी वाटली. प्राण्यांला मारल्यावांचून इतकें रक्त एकत्र व्हावयाचें नाहीं व केवळ बायकोचे डोहाळे पुरविण्याकरतां गरीब जीवांला मारावें हें राजाला युक्त वाटलें नाहीं; म्हणून त्यानें एक सुंदर तळी तयार करून आळत्याच्या रसानें तिचें पाणी लाल करविलें, यामुळें तें थेट रक्तासारखेंच दिसत होतें. मग राणी मृगावती त्यांत स्नान करण्यास उतरली तेव्हां तिचें सर्वांग लाल होऊन गेलें. आपला मनोरथ पूर्ण झाल्यामुळें तिला फार आनंद झाला; पण दुर्दैवानें त्यापासून मोठाच अनर्थ झाला. ती तळींत पोंहत असतां—हा कांहीं तरी मांसाचा गोळा आहे—असें समजून, आकाशांत घिरट्या घालणाऱ्या गरुडपक्ष्यानें तिला अचानक उचलून नेलें !

हा चमत्कार पाहून राजानें– “अरे धनुष्य आणा ! धनुष्य आणा !” म्हणून ओरड केली. सेवक धनुष्य आणतात तों तो पक्षी दिसेनासा झाला. त्याबरोबर आपल्या प्रियेचा पाठलाग करण्याकरितां म्हणूनच कीं काय, विव्हळ झालेल्या राजाचें धैर्यही मृगावतीच्या मागून गेलें.

प्रियेबरोबरच राजाचें अंतःकरणही त्या पक्ष्यानें हरण केलें म्हणून, बेशुद्ध होऊन तो तत्काल भूमीवर पडला. इतक्यांत आकाशमार्गानें मातली तेथें आला, आणि राजाला सावध करून, तिलोत्तमेनें— " चौदा वर्षेपर्यंत वियोग होईल. " म्हणून शाप दिल्याचें वर्तमान त्याणें त्याला सांगितलें. तेव्हां, " हे प्रिये, एकून तूं चौदा वर्षें माझ्या दृष्टीस पडणार नाहींसना ? त्या चांडाळीण तिलोत्तमेचा हेतु पूर्ण करावा असेंच तुझ्या मनांत होतें म्हणूनच तूं गेली असशील ! " इत्यादिप्रकारें राजा विलाप करूं लागला. मातलीनें आणि प्रधानादिकांनीं पुष्कळ प्रकारें समाधान केल्यावरून,— वांचलों तर चौदा वर्षांनीं तरी प्रियेचा समागम खास होईल, ह्या आशेनेंच त्यानें प्राणधारण केलें.

इकडे तो पक्षी मृगावतीला आपल्या पायांत धरून उदयपर्वतावर घेऊन गेला. तेथें एका वृक्षावर बसून,—आतां हें भक्ष्य खावें,—म्हणून विचार करून, पाहातो तों, तें जीवंत माणूस असल्याचें त्याला समजलें. तेव्हां दयेनें मृगावतीला तशीच तेथें सोडून, तो पक्षी दुसरें भक्ष्य शोधण्याच्या प्रयत्नाला लागला. मृगावती मृत्यूच्या दाढेंत सांपडली होती, परंतु दैवानें कृपा केल्यावरून ती वांचली. हावेळपर्यंत तिला आपल्या देहाची मुळींच शुद्धी नव्हती. पक्षी तेथून गेल्यावर त्या पर्वतावरील शीतळ वारा लागल्यानें ती अम्मळ सावध झाली; आणि चहूंकडे पाहते तों तिला आपल्या ओळखीचें असें तेथें कांहींच दिसलें नाहीं. जिकडे पहावें तिकडे सघन झाडी, मोठमोठाल्या शिळा, लहान लहान पर्वतांचीं शिखरें, उंचावरून खालीं पडणारे पाण्याचे ओझर, अनेकप्रकारच्या लहानमोठ्या औषधी, हेंच तिच्या दृष्टीस पडलें. आणखी कांहीं वेळ गेल्यावर तिला चांगली हुषारी आली आणि उभी राहून आसपास गांव, नगर वगैरे कांहीं दिसतें आहे काय म्हणून पाहूं लागली, तेव्हां—आपण एका अतिशय उंच पर्वताच्या शिखरावर असून, सभोंवतीं कडे तुटलेले असल्यामुळें तेथून अन्यत्र जाण्याला वाटदेखील नाहीं, असें पाहून ती अगदीं निराश

झाली. अनेकप्रकारच्या कल्पना मनांत येऊन वरचेवर तिचें मन अधिकाधिक अस्वस्थ होऊंलागलें. असह्य दुःखाचा पूर तिच्या पोटांत मावेनासा झाला, तेव्हां फारवेळ रडून रडून तिनें आपलें दुःख कमी केलें. जवळ वस्त्र-पात्र कांहीं नव्हतें. फक्त स्नान करीत असतां नेसलेलें बारिकसें पातळ हेंच कायतें तिच्या अंगाला झाकण्याचें साधन होतें. वृक्षांचीं फळें जिकडे तिकडे विपुल दिसत होतीं; परंतु तिला दुःखामुळें क्षुधा अथवा तृषा मुळींच लागली नाहीं. एका मोठ्या झाडाखालीं ती शोक करीत बसली होती. 'कोणावर तरी संकटें, येंऊंलागलीं म्हणजे तीं चहूंकडून एकसारखीं पाठ पुरवितात' असें जें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. गरीब बिचारी मृगावती त्या पक्ष्याच्या हातून सुटून नुकतीच आपल्यावर आलेल्या दुःखकारक प्रसंगाविषयीं शोक करीत बसली होती. तों तिच्यावर आणखी एक अरिष्ट कोसळलें. ती ज्याठिकाणीं बसली होती तेथें जवळच एक मोठा अजगर पडला होता. तो जवळ आहे हें दुःखीकष्टी झालेल्या मृगावतीच्या लक्षांत आलें नाहीं. ती शोक करित असल्यामुळें दुःखाश्रूंनीं तिचे डोळे भरून गेले होते, म्हणून तिला कांहीं दिसलें नाहीं; पण तिकडे अजगरानें हळूच तिचा पाय तोंडांत धरला तेव्हां घाबरी होऊन तिनें पुष्कळ प्रयत्न केला परंतु त्यानें कांहीं केल्या पाय सोडला नाहीं व तो हळूहळू अधिकाधिक गिळूं लागला. यावेळीं, अनाथ झालेल्या मृगावतीनें हात जोडून— "देवा! तुजवांचून मला अनाथाला दुसरा कोणीही या संकटापासून मुक्त करणारा नाहीं." म्हणून प्रार्थना केली. पण थोडक्याच वेळांत तिचा विचार फिरला. ती ह्मणाली, "अरे, मी किती तरी मूर्ख आहें! या दुःखांतून माझी आतां सुटका होण्याची आशा तरी आहे काय? मग अशा स्थितींत वांचून तरी काय करावयाचें आहे? मेल्यावांचून ह्या दुःखाचा अंत होणार नाहीं आणि तें मरण तर आयतेंच मला प्राप्त झालें आहे. प्रथम त्या पक्ष्यानेंच मला खाल्लें असतें तर त्याच्या श्रमाचें सार्थक तरी झालें असतें व मलाही हें

दुःख पहावें लागलें नसतें; पण माझें नशीब जोरावर! त्याच्या मनांत मला अनेकप्रकारचीं दुःखें भोगण्यास लावायचें असेल. ह्मणूनच त्याणें पक्ष्यालादेखील, मला न खाण्याची बुद्धी दिली असेल. असो. तें एक झालें तें झालें; पण हा अजगर बापडा माझ्यावर उपकारच करीत आहे. हा अनायासानें माझ्या दुःखाचा शेवट करीत असून मी वेड्यासारखी देवाला आणि धर्माला हाका मारतें हें काय? खरोखर, देवाच्या मनांत मला दुःख द्यायचें नसतें तर असा प्रसंग कां आला असता? तळ्यांत कोणी स्नान करीत नाहीं काय? पण इतकें कशाला? मीच यापूर्वीं कित्येकवेळां तळ्यांत सारखी प्रहरो गणतीं डुंबलें आहें. त्यावेळीं मला कोणी नेलें नाहीं हें? बरें, माझें अंग लाल दिसलें ह्मणून नेलें ह्मणावें, तर तांबड्यारंगाची पैठणी नेसून मी कित्येकवेळां बागेंत मोकळ्या ठिकाणीं हिंडलें फिरलें आहें; पण तेव्हां मला कोणी देखील नेली नाहीं आणि आतांच हें कोठून अरिष्ट आलें? मेले पक्षी पुष्कळ आकाशांत हिंडत असतात; पण माणसें उचलून नेणारा पक्षी हा आजच पाहिला. तर दुसरें तिसरें कांहीं नाहीं, माझें दैव— ज्याच्या मनांत मला छळावयाचें आहे तेंच—पक्ष्याच्या रूपानें माझा सूड घेण्याकरतां आलें होतें!" असें बोलून अजगराला उद्देशून ह्मणाली, "बाबा, मी तुला कांहीं विघ्न करीत नाहीं. तूं खुशाल मला गिळून टाक. मी तुझ्या पोटांत कांहीं बाधा करणार नाहीं. कृपाकरून उशीर मात्र लावूं नको. लौकर एकदांची गट्ट करून टाक कशी!" याप्रमाणें, दुःखाचा अंत व्हावा ह्मणून मरणाला सिद्ध होऊन अजगर गिळीत होता तरी ती अगदीं डोळे झांकून स्वस्थमनानें बसली. पण ईश्वराला ती गोष्ट मान्य झाली नाहीं ह्मणूनच कीं काय? अकस्मात् एक दिव्यपुरुष तेथें येऊन त्यानें अजगराला मारून मृगावतीचा पाय त्याच्या तोंडांतून सोडविला.

मृगावती, पायाची ओढ अकस्मात् कशी नाहींशी झाली म्हणून डोळे उघडून पाहते तों, तो पुरुष तत्क्षणीं गुप्त झाला. आणि अजगराचे तुकडे तुकडे झालेले तिच्या दृष्टीस पडले, यामुळें तिच्या

मनाला फारच आश्चर्य वाटलें. अजगराला येथें कोणी मारला असावा ? ह्मणून मृगावती विचार करूं लागली, तेव्हां तिच्या मनांत अनेकप्रकारच्या कल्पना आल्या. प्रथम तिला असें वाटलें कीं, कोणी तरी देवानें हें कर्म केलें असेल. मंतर कांहीं वेळानें ह्मणाली, " ही सर्व भूताटकी असावी ! अथवा येथें कोणी तरी राक्षस असून त्याणेंच माझा छळवाद आरंभला असेल. मला भय दाखविण्याकरतां प्रथम त्यानेंच या अजगराला पाठविलें असेल. पण मी भीत नाहीं असें पाहून, त्याणेंच त्याला मारला असावा ? आणि यापुढें आणखी तो काय काय चमत्कार करणार असेल हें तरी कोणास ठाऊक ? पण मी असल्याला भ्यायची नाहीं. मी सहस्रानीक-राजाची बायको आहें. जिवांतजीव आहे तोंपर्यंत दडून अथवा प्रत्यक्ष येऊन त्याणें पाहिजे तें केलें तरी माझ्याजवळ कोणाचें कांहीं चालायचें नाहीं." असो. याप्रमाणें अनेकप्रकारचे तर्क तिच्या मनांत वारंवार आले. पण बराच वेळ गेला तरी दुसरी कांहीं हालचाल नाहीं, असें पाहून तिला आपली कल्पना खोटी असेल असें वाटलें. ती ह्मणाली, " राक्षसाची कल्पना मी उगीच केली. तसा कोणी असता तर तो इतकावेळ उगीच बसला नसता. आणि राक्षस झाले ह्मणून काय झालें ? ते कामी असतात तरी परक्याच्या स्त्रीवर उगीच बलात्कार कशाला करतील ! स्त्रिया सर्वांच्या दयेला पात्र आहेत. तशांतून दुःखाग्नीनें होरपळेल्या मला तें कशाला छळतील. अजगराला प्रत्यक्ष माझ्या दैवानेंच येऊन मारलें असावें ! कारण, त्याच्या मनांत आणखी पुष्कळ दुःखें भोगण्याकरितां मी जिवंत रहावें असेंच असेल ! पण ही त्याची इच्छा मी पूर्ण होऊं देणार नाहीं. अजगराला मारला ह्मणून काय झालें ? दुसऱ्यारितीनें मरण्याला मला पुष्कळ साधनें आहेत. " असें बोलून विलाप करित होत्साती ती मरणाचा उपाय शोधीत त्या अरण्यांत फिरूं लागली. बराच वेळ चोहोंकडे संचार केल्यावर मदानें उन्मत्त झालेला एक जंगली हत्ती तिच्या दृष्टीस पडला. ' हा आपल्याला दुःखांतून सोडवील ! ' असें ह्मणून ती त्याच्या समोर

जाऊन बसली; पण दैवाचा चमत्कार फारच विलक्षण आहे. हत्ती तिला वलांडून गेला परंतु,—त्या अनाथ स्त्रीला मारूं नये असें वाटलें ह्मणूनच कीं काय ?—त्याणें तिला स्पर्श देखील केला नाहीं. खरोखर जंगली हत्ती-सारख्या मदांध पशूनेंदेखिल मृगावतीला चिरडलें नाहीं, यांत फारसें आश्चर्य तें काय? कारण, या जगाचा नियंता ह्मणून जो कोणी आहे त्याच्या आज्ञेवांचून प्रत्यक्ष मृत्युदेखील कोणाचा नाश करूं शकत नाहीं; तेथें इतरांचें काय सामर्थ्य! असो.

याप्रमाणें मृगावती—"हत्तीदेखील आपणाला मारीत नाहीं, तेव्हां माझें नशीब फारच खडतर आहे. तर आपण आतां अगदीं बिनतोड उपाय करून पहावा," असें मनांत आणून जवळच एक पाण्याचा धबधबा होता त्याच्याजवळ गेली आणि त्यांत पडून मरावें असा तिणें पक्का निश्चय केला. प्रथम हात जोडून व डोळे झांकून आपल्या भर्त्याला नमस्कार करून रडत रडत ती ह्मणाली, "जलदेवतांनो, तुह्मीं तरी आतां मला गती द्या! मी मोठी पापिणी आहें. क्रूर जनावरेंदेखील मला शिवत नाहींत; पण तुह्मीं जनावरां-सारख्या भिऊं नका. तुम्ही आपल्या उदकानें सर्व वस्तूंला पवित्र करणाऱ्या आहां. माझें पाप सहन करण्याची तुमच्या अंगीं शक्ती आहे, तेव्हां मला आपल्या उदरांत घेऊन ह्या दुःखांतून एकदांची सोडवा कशी?" अशी प्रार्थना करून, ती उदकांत प्रवेश करणार इतक्यांत, फलमूलें नेण्याकरतां तेथें आलेल्या एका ऋषिपुत्रानें हें तिचें भाषण श्रवणकरून धांवत जवळ जाऊन तिला मागें ओढलें. तेव्हां—"येथें देखील माझा दावा साधण्याला कोण आलें?" असें ह्मणून तिणें डोळे उघडन पाहिलें तों, तो ऋषिपुत्र दृष्टीस पडला. त्याला पाहून बराचवेळ मृगावती कांहीं बोलली नाहीं. ती अगदीं स्तब्ध उभी राहिली असें पाहून ऋषिपुत्र ह्मणाला, "बाई, हें काय? अशी जीवावर उदार कां झालां? मला तुमची ओळख नाहीं तरी आकारावरून वाटतें कीं, तुह्मी मोठ्या कुळांतल्या असून फार दुःखीकष्टी असाल. तसेंच कांहीं तरी अनिवार दुःख झाल्यामुळें असा वाईट विचार

तुमच्या मनांत आला असावा. सांगण्याला कांहीं अडचण नसेल तर आपलें वृत्त सांगून माझें समाधान करा." मृगावतीला प्रथम बराच संशय येऊन ती कांहींशी भ्याली होती; पण ऋषिपुत्राच्या प्रेमळ भाषणानें तो तिचा संशय निवृत्त होऊन तिला अंमळ धीरही आला आणि तिणें त्याला आपलें सर्व वृत्त व असें साहस करण्याचा उद्देश वगैरे सर्व सांगितलें. तेव्हां ऋषिपुत्र म्हणाला, "बाई, तुमच्यावरं खरोखरच मोठा दुःखकारक प्रसंग आला आहे; पण त्याला कांहीं उपाय नाहीं असें नाहीं. दुःखांतून मुक्त होण्याला तुम्ही जी तजवीज योजली होती, ती फारच अयोग्य व घातक आहे. तुम्ही चांगल्या जाणत्या आहां. तुम्हाला विशेष बोध करण्यासारखें मला कांहीं ज्ञान आहे असें नाहीं. तरीदेखील तुम्ही प्राणत्याग करण्याचा निश्चय केला, हें फारच वाईट आहे असें मला वाटतें. आमच्या गुरुजींच्या मुखांतून मी कैकवेळां ऐकलें आहे कीं,—"आत्मघातासारखें दुसरें कोणतेंच मोठें पातक नाहीं. मनुष्यजन्म फारच दुर्लभ, आणि तें प्राप्त झालें असून जो त्याचा वाईटरीतीनें नाश करतो, त्याच्यासारखा मूर्ख दुसरा कोणीच नाहीं. असो. स्त्रिया दुःख सहन करण्याविषयीं फार भित्र्या असतात ह्मणून कदाचित् तुमच्या मनांत मरावें असा विचार आला असेल. पण आतां तसलें अगदीं मनांत देखील आणूं नका. येथून जवळच आमचे गुरू जमदग्निऋषी यांचा आश्रम आहे तेथें तुम्ही चला. आमचे गुरुजी फार दयाळू आहेत. ते तुमच्या सर्व दुःखांचा परिहार करतील." असें सांगून तिला आश्रमांत येण्याविषयीं त्या ऋषिपुत्रानें फार आग्रह केला, तेव्हां तिला कांहींसें समाधान वाटलें. मृगावती मनांत ह्मणाली, 'हा सांगतो आहे हें एका अर्थी बरें आहे. मी एक, दोन, तीन,—वेळां मरण्याचा प्रयत्न करून पाहिला; पण कांहींना कांहीं विघ्न येतेंच. यावरून माझ्या आयुष्याची दोरी खंबीर आहे असें वाटतें. मग उगीच प्रयत्न करून तरी उपयोग काय? याच्या ह्मणण्याप्रमाणें त्या ऋषीच्या आश्रमांत जावें हेंच बरें. ऋषी कृपाळू

असतात आणि त्यांचें तपाचें सामर्थ्यही विलक्षण असतें. तेव्हां ते कृपा करतील तर न जाणों पुनः मला त्यांचे ( पतीचे ) पाय दिसणार नाहींत कशावरून? एकंदरींत परमेश्वराची मर्जी! पुढें काय होणार तें होवो!' असा विचार करून,—"चल बाबा, कोठें तुझे गुरुजी आहेत तेथें मला ने." असें त्या ऋषिपुत्राला ह्मणाली. तेव्हां मोठ्या आनंदानें—"अशा माझ्या मागून या," असें ह्मणून तो तिला थेट जमदग्नीच्या आश्रमांत घेऊन गेला. मृगावती गर्भिणी होती हें पूर्वीं सांगितलेंच आहे. यावेळीं तिला सुमारें आठ महिने झाले होते. खाणें पिणें वगैरे कांहीं नसल्यामुळें व रात्रंदिवस दुःख आणि चिंता करीत असल्यामुळें तिचें शरीर अगदीं कृश झालें होतें. गर्भाचा भार तिच्यानें तोलवत नव्हता. वाटेनें चालत असतां ती फारच थकली. तरी कसें तरी करून हळूहळू त्या ऋषिपुत्राबरोबर जमदग्नीच्या आश्रमांत येऊन पोंहचली. तेथें, बालसूर्यासारखा तेजस्वी आणि प्रत्यक्ष स्वरूप धारण करणारा संतोषच कीं काय असा, अग्निशाळेंत बसलेला जमदग्नी समोरच तिला दिसला. ऋषिपुत्रानें दुरून—"हेच आमचे गुरू जमदग्निऋषी. चला, आतां तुह्माला त्यांच्याजवळ घेऊन जातों." असें ह्मणून जमदग्नीच्या जवळ तिला नेलें. मृगावती मोठ्या नम्रतेनें अग्नीला आणि ऋषीला नमस्कार करून, जवळच हात जोडून मान खालीं घालून उभी राहिली. तेव्हां त्या ऋषिपुत्रानें—मृगावतीनें प्रथम त्याला सांगितलेला—तिचा सर्व वृत्तांत, व पुढें झालेली सर्व हकीकत आपल्या गुरूला सांगितली. ती ऐकून जमदग्नीला फार वाईट वाटलें. तो मृगावतीला ह्मणाला, "बाई, तूं कांहीं काळजी करूं नकोस. तूं आमच्या मुलीसारखी आहेस. तुझा पती राजा सहस्रानीक मला माहीत आहे. दैवानें तुझ्यावर असें संकट आणलें त्याला कांहीं उपाय नाहीं, तथापि तूं दुःख करूं नको. प्रत्यक्ष आपलें घरच असें समजून तूं येथें रहा. दैवयोगानें त्यावेळीं हा आमचा शिष्य तेथें पोंहचला हें फार चांगलें झालें.

नाहीं तर तूं व्यर्थ आत्मघात केला असतास! मला तपाच्या सामर्थ्यानें सर्व अवगत झालें आहे. तूं गरोदर आहेस. लौकरच महापराक्रमी पुत्राला प्रसवशील, आणि सहस्रानीकराजाचा वंश याच पुत्राच्या योगानें स्थिर होईल. हा तुझा पुत्र सर्व लोकांत प्रख्यात होईल. व हें तुझें दुःख फार दिवस रहावयाचें नाहीं. लौकरच पतीचा समागम होऊन पुत्रासहवर्तमान सुखाचा उपभोग करशील." ह्याप्रमाणें विशेष समाधान करणारें जमदग्नीचें भाषण श्रवणकरून मृगावतीचें मन अंमळ स्वस्थ झालें. यापूर्वीं ती अगदीं निराश झाली होती. पण ऋषीच्या वचनावरून, कांहीं दिवसांनीं तरी पतिसमागम होईल अशी तिला आशा उत्पन्न झाली, व मोठा पराक्रमी पुत्र होणार हें ऐकून तर तिला अतिशय आनंद झाला. यामुळें तत्काल तिच्या मनोवृत्तीही अगदीं पूर्वीच्या विरुद्ध झाल्या. दोन तीन वेळां प्रयत्न केला तरी मरण आलें नाहीं, याचें प्रथम तिला फार वाईट वाटत होतें; पण आतां त्याचा संतोषच वाटला. खरेंच आहे. मनुष्याला बरे वाईट जसे प्रसंग येतात तशा त्याच्या मनोवृत्ती बदलत असतात. मरण हें कोणासही पाहिजेसें वाटत नाहीं, पण दुःख सोसवेनासें झालें ह्मणजे तेंच यावेसें वाटतें, आणि कांहीं सुखाची आशा उत्पन्न झाली कीं तेव्हांच मन बदलतें. तात्पर्य प्रसंगाप्रमाणें मनाची स्थिती होत असते.

जमदग्निऋषीच्या वचनावर विश्वास ठेवून मृगावती त्याच्या आश्रमांत राहिली. ऋषीनें आश्रमांत एक वृद्ध ऋषिपत्नी होती, तिच्या स्वाधीन करून मृगावतीला सर्वप्रकारें सुख होईल अशा रीतीनें वागविण्यास सांगितलें. हळूहळू मृगावतीला दुःखाचा बराच विसर पडत चालला. जमदग्नी वारंवार तिचें समाधान करीत असे. याप्रमाणें थोडे दिवस गेल्यावर नवमास पूर्ण होऊन तिथीनक्षत्रादिकांच्या उत्तम योगावर मृगावती प्रसूत झाली. योग्य सत्संगतीपासून जसा सुविचार उत्पन्न होतो, तसा मृगावतीपासून तो उत्तम पुत्र उत्पन्न झाला. त्याचे जात-

कर्मादि सर्व संस्कार जमदग्नीनेंच केले. त्या वेळीं, "सर्वविद्याधरांचा अधिपती हा तुझा पुत्र उदयननामक मोठा भाग्यशाली राजा होईल." अशी—उदास झालेल्या मृगावतीच्या चित्ताला आनंद देणारी—आकाशवाणी झाली. त्या पुत्राच्या जन्मानें आश्रमवासी सर्वजनांला फार आनंद झाला. बालपणांतल्या अनेक लीलांनीं उदयनानें आपल्या आईला दुःखाचा अगदीं विसर पाडला, तरी ती साध्वी वारंवार भर्त्याचें स्मरण करीत असे. मुलाचे खेळ पाहून—"आज जर मी घरीं असतें तर आपल्या पतीला केवढा आनंद झाला असता ! ह्या मुलाच्या लीला एकटीनेंच आपण पहाव्या काय ?" असें वारंवार मनांत आणून ती दुःखाचे सुस्कारे सोडित असे. हळूहळू जसा तो पुत्र वाढत होता, तसेच—जणूं काय त्याचे खेळगडीच—याप्रमाणें त्याचे सद्गुणही वाढत होते. तो कौमार वयांत आला तेव्हां जमदग्नीनें क्षत्रियवर्णाला उचित असा त्याचा उपनयनसंस्कार करून वेदाध्ययनाला प्रारंभ केला. क्रमानें वेदांचें अध्ययन पूर्ण करून त्यानें धनुर्विद्येचा अभ्यास केला. अम्मळ त्याला समजूं लागलें तेव्हांपासून,—" माझे बाबा कोठें आहेत ?" ह्मणून तो वारंवार मृगावतीला विचारीत असे. तेव्हां ती डोळ्यांत आसवें आणून,—" बाळा, दैव दाखवील तर लौकरच तुझ्या दृष्टी पडतील." असें ह्मणून त्याचें समाधान करी. तो प्रौढ झाला तेव्हां मृगावतीनें—सहस्रानीकाच्या नांवाचा एक तोडा तिच्या हातांत होता तो उदयनाच्या हातांत घातला. त्याला शिकारीचा फारच नाद लागला होता. प्रतिदिवशीं कांहींतरी शिकार केल्यावांचून त्याचा दिवस जात नसे.

एकेदिवशीं तो शिकारीकरितां अरण्यांत फिरत असतां एका गारुड्यानें बलात्कारानें सर्पाला अडवून धरल्याचें त्यानें पाहिलें. सर्प दिसण्यांत फार सुंदर होता. उदयनाला त्याची दया आली आणि त्यानें " ह्या सर्पाला सोड," ह्मणून त्या गारुड्याला सांगितलें. तो ह्मणाला, " महाराज, हा माझा पोट भरण्याचा धंदा आहे. मी फार गरीब आहें.

साप खेळवून काय मिळेल त्य,
माझ्या गरीबाच्या पोटाआड ़ रला निर्वाह चालवितों, तर आपण
ऐकून उदयनाला त्याचीही दया अ " हें त्या गारुड्याचें बोलणें
होता. तेव्हां चटकन् आईनें त्याच्या त्या स्वभाव फारच उदार
काढून गारुड्याला ह्मणाला, "एकून तु ोडा घातला होता तो
घे तोडा. सर्पाला खेळवून तूं जें मिळविणार ला पाहिजेना ? हा
असें सांगून त्यानें तोडा गारुड्याला देऊन ें जास्त आहे."
फारच अमोलिक होता. गारुड्याला एकदम ़ ोडविलें. तोडा
त्यामुळें, संतुष्ट होऊन उदयनाला लवून रामराम ़ बाड मिळा-

इकडे गारुड्याच्या हातून आपणाला सोडविल्य न गेला.
संतुष्ट होऊन उदयनाला मनुष्यासारख्या वाणीनें ह्मणाल. र्प फार
तुझा फार उपकारी आहें. खरा दयाळू आणि उदार मनुष्य ा, मी
सर्पाचें आणि मनुष्यांचें अगदीं हाडवैर असून, मिळेल ़ देस.
त्यानें सर्पाला मारणें हा मनुष्यांचा अगदीं स्वभावच झाला आ़
असून तूं मला संकटांतून मुक्त केलेंस हें तुझें केवढें मोठें औदार्य
नांव वसुनेमि. मी वासुकीचा वडील भाऊ आहें. तूं माझें रक्षण के़
हे तुझे उपकार माझ्या हातून कधींही फिटावयाचे नाहींत, तरी मी तुझी
थोडीशी सेवा करण्यास इच्छितों. ही एक वीणा (बीन) तुला देतों ही
घे. हिचा सूर नेहमीं मनोहर असून, इच्यापासून अपस्वर कधींही निघणार
नाहीं. तुझ्या इच्छेस येईल तो राग या बिनांतून निघेल. तशी ही एक माळ
मीं तुझ्या गळ्यांत घालतों. हिचीं फुलें कधींही कोमेजणार नाहींत
व सुवासही जाणार नाहीं. आणखी हा तिलक तुझ्या कपाळास लावतों.
हा तुझ्या मुखाला शोभा देणारा असून नेहमीं असाच राहील. तसाच
हा एक विडा घे. याच्या योगानें तुझ्या ओंठाचा रंग नेहमीं एकसारखा
लालच राहील. ह्या सर्व वस्तू दिव्य आहेत. यांपासून तुझीं अनेक
इच्छित कार्यें सिद्ध होतील." असें बोलून नागानें त्या सर्व वस्तू

उदयनाला दिल्या. आणि, अ ता दाखविण्याकरितांच कीं
काय, त्याला आपल्या पाठी जमदग्निऋषीच्या आश्रमांत
पोंहचवून, त्याचा निरोप घे नाला गेला.
यादिवशीं उदयना ा जाऊन फार वेळ झाला होता.
इतका वेळ झाला तरी येत नाहीं ? म्हणून मृगावती काळजी
करीत होती. इत ा डोळ्यांवर अमृतवृष्टी करणारा उदय-
नाचा मुखचंद्र जशी गाय वासराकरतां उत्सुक होते, त्या-
प्रमाणें घाबरी गावती पुत्राला मिठी मारून त्याचे मुके घेऊन
कुरवाळून अरे माझ्या लाडक्या, इतकावेळ तूं कुठें रमला
होतास ? शिकार करून तुला कंटाळा येत नाहीं काय ? मला
घटका ुझा वियोग सहन होत नाहीं हें कसें बरें तुझ्या लक्षांत
येत ्यावर अवलंबून कायते माझे प्राण राहिले आहेत. तेव्हां
ळ्यांआड फार वेळ रहात जाऊं नकोस." असें बोलत असतां
आईच्या डोळ्यांतून टपटपां अश्रु पडूं लागले. यावेळीं उदयन
प्रौढ झाला होता. तरी त्याचा पोरस्वभावच होता. तो आपल्या
दरानें आईचे डोळे पुसून तिचें समाधान करून ह्मणाला, "आई ! हें असें काय बरें,? तूं रडतेस हें काय ? मी आज कसल्या कसल्या जिनसा आणल्या आहेत ? आणि आज अरण्यांत काय मौज झाली ? तें तुला सांगावयाचेंच आहे." त्याला पुनः कुरवाळून मांडिवर घेऊन मृगावती म्हणाली, "बाळा, काय काय आणलें आहेस तें पाहूं ? आणि तेथें कसला चमत्कार झाला तोही सांग बरें." हें ऐकून उदयनानें ती वीणा, माळ, विडा, आणि तिलक यांचे गुण सांगून एकेक वस्तु आईला दाखविली. आणि अरण्यांत घडलेला नागाचा सर्व वृत्तांत सांगितला. त्या वस्तू पाहून व नाग प्रसन्न झाल्याची गोष्ट ऐकून, मृगावतीचे डोळे आनंदाश्रूंनीं पुनः भरून आले. भर्त्याच्या नांवाचें कडें उदयनानें गारुड्याला दिलें तें मात्र तिला आवडलें नाहीं. कारण इतकेंच कीं, त्यावर सहस्रा-

नीकाचें नांव कोरलें होतें. एरव्हीं कडें देऊन नागाला सोडवून घेतलें याचा तिला फार आनंद झाला, कारण, त्यावरून पुत्राच्या दया व औदार्य इत्यादि गुणांविषयीं तिची खात्री झाली. अकस्मात् योग येऊन नागाची मैत्री झाली, आणि त्यापासून दिव्य वस्तू मिळाल्या ही सर्व ईश्वराची कृपा आहे असें समजून तिनें फार समाधान मानलें. व त्या कड्याच्या योगानें कदाचित् झाला तर प्रियसमागम होईल असेंही तिला वाटलें.

इकडे उदयनानें दिलेलें कडें घेऊन गारुडी मोठ्या खुषीनें आपल्या घरीं गेला. जन्मभर दारोदार साप खेळवीत फिरलें तरी जो लाभ व्हावयाचा नाहीं, तो अनायासानें एकदम झाल्यामुळें गारुड्याच्या आनंदाला पारावार नाहींसा झाला. घराकडे गेल्यावर त्यानें आपल्या सर्व माणसांस तें कडें दाखवून, आतां आपण दरिद्रांतून मुक्त झालों, असें सांगितलें आणि तें कडें बाजारांत विकावयास नेलें. सहस्रानीकाचें राज्य सर्वत्र पसरलें होतें. तो गारुडी ज्या गांवांत राहात होता, तो देश खास सहस्रानीकाच्या राज्यांतलाच होता. गारुड्यानें तें कडें सराफाजवळ नेलें, तेव्हां त्याला संशय आला. राजाचें नांव त्यावर खोदलेलें होतें; तेव्हां कदाचित् आपल्यावर संकट येईल म्हणून त्याणें, तेथें राजाधिकारी होते त्यांला तें कडें दाखविलें. त्यांणीं गारुड्याला कैद करून कड्यासह राजाकडे पाठविलें. स्वतः राजाला कडें पाहतांच मृगावतीचें स्मरण होऊन मोह उत्पन्न झाला. त्यानें गारुड्याला विचारलें कीं, “ तुला हें कडें कोणीं दिलें? तें खरें खरें सांग.” गारुडी अगदीं भिऊन गेला होता. त्याला कडें नको आणि कांहीं नकोसें झालें होतें. आपला जीव कसा बचावेल? म्हणून तो काळजी करीत होता. राजानें पुनः पुनः विचारलें, तरी तो कांहीं सांगेना. शिक्षेच्या भितीनें तो अगदीं बावरला होता. तेव्हां “ तूं घाबरूं नकोस. या कड्याच्या प्राप्तीपासून मला मोठा आनंदच झाला आहे. मी तुला शिक्षा तर करणार नाहींच; पण उलट मोठें इनाम देईन. मात्र खरी हकीकत असेल ती सांग.” असें बोलून

राजानें त्याला अभय दिलें. तेव्हां गारुड्यानें कड्याविषयींचा सर्व वृत्तांत सांगितला. तो ऐकून राजाला मोठा विचार पडला. कीं, मृगावतीच्या हातांत घातलेलें कडें हा सांगतो त्या मुलाजवळ कसें गेलें ? व त्याणें याला कसें दिलें, याविषयीं त्याला मोठें गूढ पडलें. इतक्यांत अकस्मात् मातली तेथें प्रकट होऊन म्हणाला, "राजा तिलोत्तमेनें तुला दिलेला तो शाप सरला. उदयपर्वतावर जमदग्निऋषीच्या आश्रमांत पुत्रासहवर्तमान तुझी स्त्री मृगावती सुखरूप आहे. तेथें जाऊन तिला घेऊन ये." असें बोलून मातली तेव्हांच निघून गेला. राजाला हें त्याचें भाषण—उन्हानें तापलेल्या मोराला पाण्याप्रमाणें—फारच शांती देणारें झालें. सहस्रानीक राजानें त्या गारुड्याला वस्त्रपात्रादि देऊन संतुष्ट करून, त्याला ठेवून घेतलें. आणि तो दिवस मोठ्या कष्टानें कसातरी घालवून दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं सड्या स्वारीनिशीं राजा प्रियेचा शोध करण्याकरितां गारुड्याला बरोबर घेऊन, त्यानें दाखविलेल्या मार्गानें जमदग्निऋषीच्या आश्रमाला जाण्याकरितां निघाला.

याप्रमाणें उदयाचलावर जाण्याचा संकेत करून राजा सहस्रानीक निघाला तो, त्या दिवशीं सायंकालपर्यंत मार्गक्रमण करून फार श्रमल्यामुळें एका अरण्यांत नदीच्या तीरीं त्याणें मुक्काम केला. जेवणखाण आटपून राजा बिछान्यावर पडला होता. यावेळीं संगतकनांवाचा एक कथेक बिच्छान्याच्या जवळच त्याची सेवा करण्याकरितां बसला होता. मृगावतीकडे मन वेधलें होतें म्हणून, इतके श्रम झाले होते तरी राजाला झोंप लवकर आली नाहीं. तेव्हां तो संगतकाला म्हणाला, "अरे कथका ! मला झोंप येत नाहीं मृगावतीच्या मुखकमलाचें दर्शन घेण्याची

१–राजे अथवा श्रीमान् लोकांजवळ काहण्या वगैरे सांगणारे लोक असतात, त्यांनाच 'कथक' ह्मणतात. आपले यजमान बिछान्यावर पडले ह्मणजे झोंप येईपर्यंत त्यांना काहण्या वगैरे सांगण्याचा यांचा मुख्य धंदा असतो. अशा प्रकारचे लोक कांहीं राजेरजवाड्यांजवळ सांप्रत देखील आहेत.

फारच उत्कंठा लागली आहे. मनाला स्वस्थता कशीती मुळींच नाहीं. तूं एखादी मौजेची काहणी तरी सांग बरें! कदाचित् अंमळ डोळा लागतो का पाहूं." हें ऐकून **संगतक** म्हणाला, "महाराज! उगीच कां श्रम करून घेतां. आपला शाप क्षीण झाला. आतां लौकरच राणीसाहेबांचा समागम होईल. ह्या संसारांत प्रियजनाचे संयोग आणि वियोग वारंवार होतच असतात. याचा केवळ महाराजांलाच अनुभव घ्यावा लागला आहे असें नाहीं. यापूर्वीं अनेकांलां असे प्रसंग भोगावे लागले आहेत. याविषयीं मीं एक आपल्याला गोष्ट सांगतों, ती ऐकावी महाराज.

पूर्वीं **मालव** ( माळवा ) देशांत **यज्ञसोम** नांवाचा एक ब्राह्मण राहत होता. त्याचे, लोकांला प्रिय होणारे असे दोघे पुत्र होते. एकाचें नांव **कालनेमी** आणि दुसऱ्याचें नांव **विगतभय.** ते दोघेही मुलगे अम्मळ प्रौढ होऊन संसार पाहण्यास लागणार, अशा संधीस **यज्ञसोम** एकाएकीं, परलोकवासी झाला. त्याची उत्तरक्रिया वगैरे करून ते उभयतां बंधू विद्याभ्यास करण्याकरितां **पाटलिपुत्रक** नांवाच्या नगरांत जाऊन, तेथें **देवशर्मा**नांवाचा एक विद्वान् ब्राह्मण होता, त्याच्या जवळ अध्ययन करण्याकरतां राहिले. क्रमानें सर्व विद्यांचा अभ्यास पूर्ण करून त्यांणीं स्वदेशीं जाण्याविषयीं गुरूची आज्ञा मागितली. **देवशर्म्याला** दोन मुली होत्या व तो त्यांच्या विवाहाची तजवीज करीत होता. त्याला हे दोघे शिष्य वर योग्य वाटल्यावरून त्यानें दोघांलांही आपले जांवयी करून घेतलें.

याप्रमाणें ते उभयतां गृहस्थाश्रमी तर झाले; परंतु त्यांच्याजवळ द्रव्य मुळींच नव्हतें. संसारांत द्रव्यावांचून दुसरा कोणी मित्र नाहीं. शेजारिपाजारी श्रीमान् गृहस्थांची स्थिती पाहून ह्या दोघांही बंधूंला आपल्या दरिद्रास्थितीचा फार तिरस्कार येत असे. असें होतां होतां एकेदिवशीं **कालनेमी,** लक्ष्मीला प्रसन्नकरून घेण्याकरतां कांहीं अनुष्ठान करण्याचा संकल्प करून व्रत घेऊन बसला. त्याणें होम-हवन जप-जाप्य इत्यादि-

करून साक्षात् लक्ष्मीला प्रसन्नकरून घेतली. तेव्हां कालनेमीला प्रत्यक्ष दर्शन देऊन लक्ष्मी ह्मणाली, " ब्राह्मणा! मी तुजवर प्रसन्न झालें आहें. तुला पुष्कळ द्रव्य मिळेल व सर्व पृथ्वीवर सत्ता चालविणारा असा पुत्रही होईल. परंतु शेवटीं चोरासारखा तूं शत्रूंच्या हातून मारला जाशील! कारण, तूं होम-हवन वगैरे जें कांहीं केलेंस तें ईर्ष्यापूर्वक रागाच्या आवेशांत केलेंस. त्याचें तसलेंच फळ तुला भोगलें पाहिजे." हें ऐकून कालनेमी कांहीं बोलणार, इतक्यांत लक्ष्मी गुप्त झाली. तेव्हां तो आपलें अनुष्ठान समाप्त करून घरीं आला. लक्ष्मीच्या प्रसादानें लवकरच त्याला बहुत द्रव्य मिळालें. व थोडक्याच दिवसांत एक उत्तम पुत्रही झाला. तो श्रीनें दिला (लक्ष्मीच्या वरानें झाला) ह्मणून कालनेमीनें आपल्या त्या पुत्राचें श्रीदत्त असें नांव ठेविलें. दिवसेंदिवस कालनेमीला फारच द्रव्य मिळूंलागलें. देवीच्या कृपेनें अमित ऐश्वर्य व उत्तम पुत्र ह्यांचा लाभ होऊन मोठ्या संतोषानें तो संसारसुखाचा अनुभव घेऊंलागला.

इकडे त्याचा पुत्र श्रीदत्त बराच प्रौढ होऊन त्याचे उपनयनादि संस्कारही झाले. तो ब्राह्मण होता, तरी वेदाध्ययन वगैरे विशेषसें न करतां त्याणें शस्त्रास्त्रविद्येचाच मनापासून विशेष अभ्यास केला. लहानपणापासून क्षात्र विद्येकडेच त्याचा विशेष कल होता, ह्मणून बापानेंही त्याच विद्येच्या अभ्यासाविषयीं अनुमोदन दिलें. प्रथम शस्त्रविद्येचा व नंतर अस्त्रविद्येचा अभ्यास पूर्ण झाल्यावर त्याणें बाहुयुद्धाचा अभ्यास केला. तात्पर्य, लवकरच श्रीदत्त हा एक मोठा शूर असून अप्रतिम योद्धा आहे, अशी सर्व लोकांत ख्याती झाली. कालनेमीचा कनिष्ठ बंधू विगतभय हा लहानपणापासून मोठा विचारी असून शांतस्वभावाचा होता. त्याला दैवानें जें मिळेल त्यांतच तो संतोष मानीत असे. त्याणें वडीलभावाप्रमाणें, दुसऱ्याचें ऐश्वर्य पाहून दुःख अथवा ईर्षा धरण्याचें कधींच मनांत आणलें नाहीं, ह्मणून पुष्कळ द्रव्य मिळविण्याविषयीं त्याणें विशेष प्रयत्नही केला नाहीं. प्रत्यक्ष त्याचा बंधू मोठा ऐश्वर्यवान् झाला होता व तो त्याला मागेल तें

देण्यास सिद्ध असून, आपल्याजवळ राहण्याविषयीं आग्रह करीत होता; परंतु त्या सत्वशलि **विगतभयानें** त्याचीही फारशी आशा केली नाहीं. तो एका लहानशा घरांत राहून गरीबीनें आनंदांत संसार चालवीत होता. "अरे, माझ्यायेथें राहून, ईश्वरकृपेनें मिळालेल्या ऐश्वर्याचा व सुखाचा विभागी कां होत नाहींस ?" असें ज्येष्ठ बंधूनें विचारलें ह्मणजे तो ह्मणे, "दादा, तुझ्यावर देवाची कृपा आहे हें पाहून मला फार संतोष वाटतो. प्रत्येक प्राणिमात्राला दैव ह । आहेच. सुख-दुःख, संपत्ति-विपत्ति इत्यादि सर्व दैवाच्या अधीन आहे।. तुझा दैवयोग तसा होता, ह्मणून तुला एवढें मोठें ऐश्वर्य मिळालें. पण माझा योग तसा दिसत नाहीं. कदाचित् असेल तर पुढें काय होणार तें होईल. पण खरोखर विचारशील तर, एवढें मोठें ऐश्वर्य असून व राजवाड्यासारख्या मोठ्या हवेलींत राहून तुला जें सौख्य होतें, तेंच—किंबहुना त्याहूनही अधीक—ह्या भिकार झोपड्यांत राहून मला सुख होतें. कोणी ह्मणतात, '**स्वर्गलोकांत** इच्छीत अर्थ देणारी **कामधेनू** व नेहमी संतोष देणारें **नंदनवन** आहे.' पण मला वाटतें कीं तीं सर्व माझ्याजवळ येथेंच आहेत. तीं कोणतीं ह्मणशील तर, **शांती** ही **काम-धेनू** व संतोष हेंच माझें **नंदनवन**. पुष्कळ ऐश्वर्य अथवा अन्य कांहीं मिळाल्यानें सुख होतें, असें नाहीं. जसजसा लाभ होत जाईल, तसतशी तृष्णा वाढत जाते. माझ्या दैवीं मुळींच जो उपभोग नसेल, त्याची मीं बहुत इच्छा केली तरी तो मला कधींही मिळावयाचा नाहीं. उगीच हाय हाय मात्र करावी लागणार ! मग तुझ्या घरीं तरी राहून उपयोग काय ? तूं बंधुप्रीतीनें मला आपल्या ऐश्वर्याचा विभागी करण्याची इच्छा करतोस याबद्दल मी तुझा आभारी आहें; पण त्याकामीं मनुष्याला स्वतंत्रता नाहीं. खरोखर माझ्या नशीबीं तसा योगच नसेल तर ही गोष्ट कशी होईल ? तेव्हां तुझ्या दैवानें तुला जें प्राप्त झालें आहे, त्याचा तूं यथेच्छ उपभोग कर. मला जें मिळत आहे त्यावर मींही मोठ्या आनंदानें निर्वाह करित आहें. माझ्यावर प्रेम ठेव ह्मणजे झालें."

या शांत मनुष्याचे विचार खरोखर प्रत्येक मनुष्यानें मनांत वागविण्यासारखे आहेत. जो मनुष्य दैवानें प्राप्त झालेल्यांत संतुष्ट न होऊन अधिकाधीक यातायात करतो, त्याला नेहमीं तळमळ मात्र करावी लागते. बाकी जें कांहीं व्हावयाचें असतें तेंच होतें. असो. विगतभय याप्रमाणें गरीबींत; पण मोठ्या संतोषानें संसार करीत होता; तरी त्याचें परमार्थाकडे दिवसेंदिवस अधिकाधिक लक्ष्य लागलें होतें. दुसरें कांहीं न करतां सारा वेळ ईश्वरसेवेंत घालवावा नें त्याच्या मनांत येत असे. ह्या त्याच्या इच्छेप्रमाणें संसारबंधन [illegible]चा योग अकस्मात् आला. त्याला संसारांत बंधन ह्मणून काय ती त्याची एक बायको होती. मूल-बाळ तर मुळीं झालेंच नव्हतें, आई-बाप पूर्वींच निवर्तले होते. बंधू होता तो मोठ्या चैनींत राजासारखें ऐश्वर्य भोगीत असल्यामुळें विगतभयाला त्याची काळजी मुळींच करावयास नको होती. त्याच्याजवळ माल-मत्तेचें तर मुळीं नांवच नाहीं, तेव्हां येऊन जाऊन राहिली काय ती बायको. तिच्यावांचून काळजी वागविण्यासारखें दुसरें कोणीच नव्हतें; पण दैवानें तेंही बंधन नाहींसें केलें. एकेदिवशीं सायंकालीं त्याची स्त्री गायीची धार काढीत होती. तेथेंच सर्पदंश होऊन तिचा अंत झाला. तेव्हां बंधू व शेजारिपाजारि तेथें येऊन पुष्कळ शोक करूं लागले. परंतु विगतभयाला बायको मेल्याचें कांहींच दुःख वाटलें नाहीं. उलट, तिच्या ऐहिक दुःखाचा शेवट झाला व आपल्या पायांतली एक शृंखळा नाहींशी झाली असें समजून त्यानें संतोषच मानला. तिचें अंत्यकर्म वगैरे सर्व आटपून, पुढें लवकरच उदय पावणाऱ्या भाग्यश्रीनेंच प्रेरणा केला होत्साता, तो एकेदिवशीं तीर्थयात्रेचें निमित्त करून तेथून निघून गेला, त्याचा पुनः पत्ता लागला नाहीं.

**वल्लभशक्ति**नांवाचा त्या **पाटलिपुत्रक**नगराचा राजा होता. तो मोठा गुणज्ञ असून उदार होता. त्याचा **विक्रमशक्ति** नांवाचा एकुलता एक मुलगा होता. तो धनुर्विद्या इत्यादिकांत बराच प्रवीण झाला होता, तरी

विशेष वाखाणण्यासारखे त्याच्या अंगीं कांहीं गुण नव्हते. वल्लभशक्ती-जवळ, लोक श्रीदत्ताची फारच तारीफ करीत असत. तेव्हां एकदां त्याला पहावा ह्मणून, सत्कारपूर्वक श्रीदत्ताला राजानें आपल्या सभेंत बोलावून आणिला. कुशलप्रश्नादि करून, श्रीदत्ताची–अस्त्रविद्या, शास्त्रविद्या, बाहुयुद्ध इत्यादिकांत राजानें थोडथोडी परीक्षा घेतली; तेव्हां त्याला फारच संतोष झाला. ' आपल्या पुत्राचें आणि याचें वय बराबरीचें आहे. हा ब्राह्मण आहे तरी क्षात्रविद्येंत आपल्या पुत्रापेक्षांदेखील विशेष आहे. तेव्हां उभयतांची मैत्री होईल तर फार चांगलें. अशा प्रकारचा पराक्रमी पुरुष अवश्य आपल्या संग्रहाला असावा '—असा विचार करून राजानें श्रीदत्ताची आपल्या पुत्राशीं मैत्री करून दिली. विद्येंत श्रीदत्तापुढें राजपुत्राचें कांहीं तेज पडत नव्हतें, तरी तो मोठा अभिमानी असून कुत्सितस्वभावाचा होता. सामान्यतः शूर पुरुष मनाचे मोकळे असतात; त्याप्रमाणें श्रीदत्त शूर असून मोकळ्या मनाचा होता. एकमेकांचा विरुद्ध स्वभाव असल्यामुळें अर्थात त्या उभयतांचें सख्य भीमाच्या आणि दुर्योधनाच्या सख्याप्रमाणेंच झालें. उभयतांची नेहमीं झटापट होत असे. अवंतिनगरींत राहणारे बाहुशाली आणि वज्रमुष्टी या नांवाचे दोघे सरदारांचे पुत्र श्रीदत्ताचे परममित्र झाले होते. याशिवाय महाबल, व्याघ्रभट, उपेंद्रबल, तसाच निष्ठुरक या नांवाचे श्रीदत्ताचे दुसरेही मित्र होते. तसेच कुस्तिखेळण्यांत जिंकलेले प्रधानादिकांचे पुत्र, यांच्याशींही त्याची मैत्री झाली होती. त्यांतून पूर्वीं सांगितलेल्या सहा असामींशीं त्याची कट्टी मैत्री होती. ते नेहमीं एकजुटीनें वागत असत.

वर्षाऋतूंत एकेदिवशीं भागिरथीच्या वाळवंटांत क्रीडा करण्याकरितां राजपुत्रानें बोलाविल्यावरून श्रीदत्त आपल्या मित्रांसह गेला होता. तेथें सर्वांनीं अनेकप्रकारचे खेळ यथेच्छ खेळून त्यांतच, " राजा आणि प्रजा " याही खेळाला आरंभ केला. राजपुत्राबरोबर त्याचे मित्र व सेवक असे बहुत लोक आले होते. त्यांणीं राजपुत्र विक्रमशक्ती याला आपल्या खेळांतला

राजा केला, पण श्रीदत्ताच्या मित्रांला तें मान्य झालें नाहीं. ह्मणून त्यांनींही श्रीदत्ताला आपला राजा केला. वस्तुतः खरोखरीचें यांत कांहींच नव्हतें. हा मुलांचा खेळ होता, तरी राजपुत्राला श्रीदत्ताला राजा केलें हें खपलें नाहीं. तेवढ्यावरूनच तो फार रागावला आणि गर्विष्ट होऊन ह्मणाला, " प्रथम मला राजा केलें आहे, तेव्हां येथला मुख्य राजा मींच आहें. जरी मीं यावेळीं खेळांतला राजा आहें, तरी हा अधिकार जन्मतःच मला प्राप्त झाला आहे. मी खऱ्या राजाचा पुत्र असल्याकारणानें कधींतरी त्या पदावर बसेनच बसेन. ह्मणून खेळांतदेखील मला राजा केलें हें योग्यच आहे. पण ह्या भिक्षुक ब्राह्मणाच्या पोराला राजपद स्वप्नांतदेखील मिळण्याचा संभव नसतां, राजा केला हें योग्य नाहीं. कधींतरी ब्राह्मण राजा झाल्याचें तुह्मी ऐकलें आहे काय? बरें, कदाचित् तुह्मी प्रीतीनें, ' राजा हो ' ह्मटलें तरी श्रीदत्तानें त्या गोष्टीला मान्य व्हावयाचें नव्हतें. पण मागें पुढें न पहातां तो राजा झाला हें त्याणें योग्य केलें नाहीं. एका ठिकाणीं दोन राजे नसतात. तेव्हां मी किंवा तो दोहोंतून कोणीतरी एकानें राजा व्हावें. व ज्यापेक्षां तो राजा झाला आहे, त्यापेक्षां तो यावेळीं माझा मित्र नसून प्रतिस्पर्धी आहे असें ह्मटलें पाहिजे व ह्मणूनच त्याचे आमचे दोन हात झाले पाहिजेत. नाहीं तर आपल्या समोर प्रतिस्पर्ध्याचें महत्व पाहणें हें राजाला मोठें लाजिरवाणें आहे. याकरितां मी लढाईला तयार झालों आहें. श्रीदत्ताला राजा ह्मणून घ्यावयाचें असेल तर त्याणें माझ्याशीं लढाई करावी. श्राद्धें झोडणाऱ्या ब्राह्मणाला राज्यपद कधींही पचावयाचें नाहीं." याप्रमाणें पुष्कळ उद्दाम व अश्लील भाषण करून राजपुत्र युद्धाला तयार झाला. खरोखर गर्वाचा प्रभाव कांहीं विलक्षणच असतो! मानी असणें हें क्षत्रियाला मोठें भूषण आहे; पण उद्दाम असणें हें मात्र योग्य नाहीं. बोलूनचालून हा पोरांचा खेळ होता. व जमलेले सर्व परस्परांचे मित्र होते. अशावेळीं विक्रमशक्तीला इतका गर्व करण्याचें कांहीं कारण नव्हतें; पण हीं लक्षणें भावी गोष्टींचीं सूचकच होतीं. पुढें जसें व्हावयाचें असतें तदनुसार मनोवृत्ती

होतात. आतां या अहंकाराचा परिणाम काय होणार तें लौकरच निदर्शनाला येईल. असो.

राजपुत्रानें अशा ताठ्यानें लढाईला बोलाविलें, तरी श्रीदत्ताला त्याचा फार आनंदच झाला. तो ब्राह्मणकुलांत जन्मला होता इतकेंच कायतें; पण त्याचा स्वभाव चालचलन इत्यादि सर्व क्षत्रियांसारखींच होतीं. ह्मणून त्यानें तत्काल राजपुत्राचें वचन मान्यकरून लढाईची तयारी केली. तो ह्मणाला, "गड्या, तूं लढाईला तयार झालास यामुळें एकप्रकारचा मला मोठा आनंदच झाला आहे. तरी मित्राशीं हा प्रसंग आल्यामुळें मला फारच वाईट वाटतें. तुला माझें वैभव पाहून इतका राग येईल असें मला वाटलें नव्हतें; पण आला, त्याला कांहीं उपाय नाहीं. ब्राह्मणाच्या अंगीं राज्य करण्याचें सामर्थ्य नाहीं ह्मणून ते करीत नाहींत असें तूं समजत असशील तर ही तुझी मोठी चूक आहे. ब्राह्मण क्षमादिक सहा गुणांचा स्वीकार करून ब्रह्मसुखाचा अनुभव घेण्याविषयीं तत्पर असतात ह्मणून त्यांना राज्यसुखाचें कांहीं महत्व वाटत नाहीं. ते इच्छा करतील तर त्रैलोक्याचेंदेखील राज्य चालविण्याला त्यांला फारसें अशक्य आहे असें नाहीं. परशुराम ब्राह्मणच होता. त्यानें यज्ञांत जसे बोकड मारतात,तसे लक्षावधि राजे मारून कुरुक्षेत्रांत त्यांच्या रक्ताचे नऊ डोह केले. एकवीस वेळ सर्व पृथ्वी निःक्षत्रिया केली! तो आला असें समजलें तर कित्येक क्षत्रिय, हातांत बांगड्या घालून लुगडीं नेसून बायका बनत असत! तो एवढा मोठा पराक्रमी होता तरी राज्य करण्याची त्याला इच्छा नव्हती. त्यानें सर्व पृथ्वी जिंकून कश्यपाला दिली. पण त्यानें तरी ती आपल्या जवळ ठेवली नाहीं. पुनः क्षत्रियांच्याच हातीं दिली. इतिहासांत अशीं अनेक उदाहरणें मिळतील; पण इतकें कशाला? आतां तुझेआमचे दोन हात होणारच आहेत. मी श्राद्धें झोडणाऱ्या भटाचा मुलगा आहें आणि तूं प्रत्यक्ष राजाचा मुलगा आहेस. आतां पाहूंया बरें कोणाची सरशी होते ती.

तसेंच क्षत्रीय झाला ह्मणून त्याला जन्मतःच राज्याचा हक्क मिळतो

असें नाहीं. जो पराक्रमी असेल—मग तो ब्राह्मण कां असेना—त्यासच राज्य मिळेल. ही पृथ्वी वेश्येसारखी आहे. तिला शूर व गुणवान् असाच यजमान आवडतो. जर तुझ्या अंगीं शौर्य असेल तर असा पुढें ये. आणि होऊंदे तुझें आमचें युद्ध." याप्रमाणें राजपुत्राला उत्तर देऊन श्रीदत्त सर्व खेळगड्यांना ह्मणाला, "गड्यांनो, तुह्मी सर्व प्रेक्षक व्हा. येथें काय प्रकार होतो तो स्वस्थ पाहत बसा ह्मणजे झालें." याप्रमाणें बोलून श्रीदत्त राजपुत्रासमोर गेला व उभयतांचें मल्लयुद्ध सुरू झालें. जसे हत्तीचे छावे लीलेनें आपआपल्यांत लढतात त्याप्रमाणें या उभयतांचें युद्ध चाललें होतें. तें पाहून प्रेक्षकांला मोठी मौज वाटली. बराचवेळ उभयतां वीरांची अगदीं बरोबरी होती, यामुळें जयश्रीला कोणाच्या गळ्यांत माळ घालावी? याचा मोठा विचार पडला होता. पण थोडक्यांतच ब्राह्मणवीराची सरशी झाल्याकारणानें तिनें त्याच्या गळ्यांत माळ घातली. श्रीदत्तानें राजपुत्राचा पराभव केला, हें पाहून त्याच्या मित्रांनीं आनंदानें टाळ्यांचा गजर केला व त्याची वाहावा करूं लागले. परंतु तेवढ्यानें श्रीदत्त फुगला नाहीं. त्यानें तत्काल राजपुत्राचें समाधान केलें. आणि, "ही सर्व खेळांतली मौज आहे. जो लढेल त्याचा कधीं जय व कधीं पराजय हें होणारच. खरोखरी यांत वाईटवाटण्यासारखें कांहीं नाहीं." असें सांगून श्रीदत्तानें राजपुत्राशीं पूर्ववत् मैत्री केली. तथापि, दुर्बळ असून गर्विष्ठ अशा त्या राजपुत्राचें समाधान झालें नाहीं. मुळापासूनच त्याचा स्वभाव मोठा खुनशी होता. श्रीदत्तानें समाधानाच्या गोष्टी सांगितल्या त्यांपासून त्याचें मन शांत तर झालें नाहींच; पण उलट त्याला अधिक राग आला. व कांहीं तरी करून तेथल्या तेथेंच श्रीदत्ताला मारून टाकण्याविषयीं तो विचार करूं लागला! वस्तुतः त्या नेभळ्या राजपुत्राच्या मनांत अशी वाईट गोष्ट आली हें अगदीं योग्य आहे. कारण, ज्यांच्या अंगीं विशेष सामर्थ्य असतें ते उदारमनाचे असतात. त्यांचा राग फार वेळ

राहात नाहीं. कारण, त्यांच्या मनांत जी गोष्ट करावयाची असते ती ते तत्काल करितात, ह्मणून रागाला फारवेळ राहण्याचें कांहीं कारण पडत नाहीं. पण ज्यांच्या अंगीं तितकें सामर्थ्य नसतें त्यांचा क्रोधाग्नी मनांतल्या मनांत धुमसत असतो. व त्यामुळें कांहीं तरी कुत्सित विचार नेहमीं त्यांच्या मनांत येत असतात. श्रीदत्ताला राजपुत्राच्या मनांतला अभिप्राय समजल्यावरून— "ह्या दुष्ट मनुष्याची संगती नको." असें ह्मणून तो आपल्या मित्रांसह तेथून दुसऱ्या ठिकाणीं क्रीडा करण्याला गेला. तेथें गंगेच्या कांठीं जाऊन पोंहोचतो इतक्यांत, गंगेच्या प्रवाहाच्या मध्यभागीं वाहून जात असलेली, समुद्रांत जशी लक्ष्मी असावी; त्याप्रमाणें एक उत्तम स्त्री त्याणें पाहिली. पावसाळा अससल्यामुळें गंगेचें पात्र अगदीं भरून गेलें होतें. पाणी लाल झालें असून मोठमोठ्या लाटा येत होत्या. अशा मोठ्या पात्रांतून वहात जाणाऱ्या त्या स्त्रीची अवस्था कशी झाली होती याचें वर्णनदेखील करतां येत नाहीं. धीर व साहसी पुरुषांला तशाप्रकारचा कांहीं साहसाचा प्रसंग आला ह्मणजे त्यांच्यानें उगीच बसवत नाहीं. त्यावेळीं त्यांचें मन अनावर होतें. श्रीदत्ताचीही तशीच अवस्था झाली. त्याला त्या स्त्रीची फार दया आली. आणि तिला वर काढण्याचा त्याणें निश्चय केला. तो आपल्या मित्रांला ह्मणाला, "गडे हो ! पहा पहा ! ती स्त्री वाहून जात आहे. ही कोठून वहात येत आहे कोणास ठाऊक ! ती अजून जीवंत आहे; तरी लवकरच तिचा अंत होईल असें वाटतें. तर कसेंही करून हिला वर काढावी. तुह्मी येथेंच उभे रहा. मी तिला वर काढतों." असें सांगून,—सोबती नको नको ह्मणत असतां—ती जवळ आली असें पाहून त्यानें एकट्यानें गंगेंत उडी टाकली. श्रीदत्त मोठा बाहदर पोंहणारा होता. झपाझप हात टाकून ती स्त्री ज्या ठिकाणीं वहात होती, तेथें जाऊन त्याणें तिचे केंश एका हातानें घट्ट धरले आणि तिला आपल्या पाठीवर घेऊन तो तडीस आणण्याचा प्रयत्न करूं लागला. तों ती खालीं

खालीं जाऊन एकदम पाण्यांत बुडाली. श्रीदत्ताच्या हातांत तिचे केश होते, ह्मणून श्रीदत्तही तिच्या हिसक्यासरसा पाण्यांत बुडाला. तो बराच खालीं गेला; इतक्यांत तेथें एक भव्य आणि सुंदर महादेवाचें देऊळ त्याला दिसलें. ती स्त्री थेट त्या देवळांत शिरली. श्रीदत्तही तिच्याबरोबर गेला. आंत जाऊन पाहतो तों तेथें पाणी वगैरे कांहीं नसून देवळाच्या आंतील भाग अगदीं कोरडा खणखणीत आहे ! हा चमत्कार पाहून श्रीदत्ताला मोठें आश्चर्य वाटलें. इतक्यांत त्याच्या हातांतून सुटून ती स्त्रीही कोठें दिसेनाशी झाली. हा आणखी एक चमत्कार झाला, यामुळें श्रीदत्ताचें मन अगदीं गोंधळून गेलें. इतका वेळ त्याला बरेच श्रम झाल्यामुळें तो थकला होता, 'हा काय दैविक किंवा भौतिक चमत्कार असेल तो असो ! मग त्याचा विचार करूं. आधीं आपण येथें कांहींवेळ विश्रांति घ्यावी.' असा विचार करून महादेवाला नमस्कार करून जवळच तेथें एक सुंदर बगीचा होता त्यांत एका झाडाखालीं तो विश्रांती घेत बसला. थोडक्याच वेळानें रात्र झाली. तरी बागेंत रत्नांच्या अनेक वस्तू होत्या, त्यांच्या प्रकाशानें त्याला रात्रीचें स्वरूप मुळींच माहित पडलें नाहीं. कांहीं वेळानें त्याला गाढ झोंप लागली. तो मध्यें हुं किं चूं न करितां पहाट होईपर्यंत स्वस्थ निजला होता.

पहाटेची चार घटका रात्र राहिली तेव्हां—स्नान केलेली असून, दिव्य वस्त्रें अलंकार इत्यादिकांनीं भूषित अशी, हातांत पूजेचें साहित्य घेऊन येणारी स्त्री त्याच्या दृष्टीस पडली. यावेळीं श्रीदत्ताची झोंप पुरती होऊन तो उठून बसला होता. प्रथम तर त्याला तिची ओळखच पटली नाहीं; पण जसजशी ती जवळ जवळ येऊं लागली, तसतशी— 'काल आपण जिला पाहिली होती, व जिच्या नादानें आपण येथें आलों, तीच ही असावी.' असें त्याला वाटलें, तरी तो आपल्या जाग्यावरून हालला नाहीं. ती स्त्री त्याच्या जवळूनच, पण त्याच्याकडे न पाहतां

थेट देवळांत गेली. तेथें स्वस्थपणानें तिणें भक्तिपूर्वक महादेवाची यथासांग पूजा केली. नंतर तीर्थप्रसाद घेऊन ती परत आपल्या घरीं जाण्याला निघाली. श्रीदत्त एकसारखा टक लावून ती काय करीत आहे हें पाहत होता. काल आपण हिच्याकरितां इतके श्रम केले असूनही अगदीं जवळून गेली तरी तिनें आपल्याकडे पाहिलेंदेखील नाहीं, याचा श्रीदत्ताला मोठा अचंबा वाटला. तथापि, इचा पुरता शोध करावा, असा निश्चय करून तो तिच्या पाठोपाठ गेला. थोडा दूर गेल्यावर देवांच्या मंदिरासारखें उत्तम असें एक दिव्य गृह दृष्टीस पडलें. ती स्त्री आंत गेली तेव्हां हा ही तिच्या मागून घरांत गेला. यावेळीं तिची मुद्रा अंमळ भांबावल्यासारखी झाली असून तिचें मन तिरस्कारयुक्त आहे असें दिसत होतें. त्या घरांत प्रवेश करतांच उत्तम रूपवती अशा शेंकडों स्त्रिया तिला सामोऱ्या आल्या. पूजापात्र त्यांच्या हातांत देऊन ती तेथून अंतर्गृहांत प्रवेश करून एका पलंगावर जाऊन बसली. त्या स्त्रिया तिच्या दोहीं बाजूला उभ्या राहिल्या. श्रीदत्तही तेथें गेला. ती याच्याशीं मुळींच कांहीं बोलली नाहीं, तरीं धट्टपणानें हा तिच्या पुढें जाऊन बसला. बराच वेळ झाला तरी कोणींच कांहीं बोलत नाहीं असें पाहून श्रीदत्ताला, ह्या एकेक गोष्टीचा फारच चमत्कार वाटत होता. कांहीं वेळानें ती एकाएकीं मोठा गळा काढून रडूं लागली. तिच्या नेत्रांतून दुःखाश्रूंच्या उष्ण धारा स्तनावर पडूं लागल्यामुळें ते अगदीं सुकल्यासारखे झाले. ती रडूं लागली त्यावेळीं तिच्या आसमंतात् ज्या स्त्रिया उभ्या होत्या त्याही रडूं लागल्या. तो हृदयद्रावक देखावा पाहून श्रीदत्तालाही फार दुःख झालें. तो तिला ह्मणाला, "बाई, तूं कोण ? ह्या तुझ्या आसमंतात् ज्या स्त्रिया आहेत ह्या कोण आहेत ? आणि तुला असें मोठें दुःख कोणतें प्राप्त झालें आहे हें सांगशील काय ? मी खात्रीपूर्वक सांगतों कीं, तुझें दुःख निवारण करण्याला मी समर्थ आहें. कालपासून मी तुझ्या नादाला लागलों आहें. तेव्हां-

पासूनच तुझी मुद्रा उदास आहे, असें दिसत होतें. तुझ्यावर जें कांहीं संकट आलें असेल तें सांगशील तर मी त्याचें खास निवारण करीन." शूरपुरुषाला उचित असें हें श्रीदत्ताचें भाषण ऐकून त्या स्त्रीला अमळ समाधान वाटलें. नंतर पदरानें डोळे पुसून ती म्हणाली, "सद्गृहस्था! तूं, सर्व दैत्यांचा राजा जो बली त्याचें नांव ऐकलेंच असशील. आम्ही सर्वजणी त्या दैत्यराजाच्या नाती आहोंत. मी सर्वांत वडील आहें. माझें नांव **विद्युत्प्रभा.** आमच्या आजाला भगवान् विष्णूनें सुतलांत[1] बंदिखान्यांत ठेविलें आहे. आमच्या बापाचें नांव **बाणासुर.** त्यालाही त्याच विष्णूनें बाहुयुद्धांत जिंकून आम्हास आपल्या नगरींतून बाहेर घालविलें. **शोणितपुरांत** कदाचित् पुनः आम्ही प्रवेश करूं म्हणून विष्णूनें त्या नगराच्या वेशींत एका सिंहाला बसविलें आहे. जेव्हां त्याणें तें आमचें स्थान बळकाविलें, त्याबरोबरच दुःखानेंही आमचें हृदय आक्रमण केलें. आतां तो सिंह कोण आहे? ह्मणशील तर तो सामान्य श्वापदांपैकीं नसून मोठा बलाढ्य आहे. तो पूर्वजन्मीं कोणी यक्ष होता. **कुबेराच्या** शापानें त्याला सिंहत्व प्राप्त झालें आहे. 'मनुष्याकडून तुझा पराभव होईल तेव्हां तुझ्या शापाचा अंत होईल,' असें **कुबेरानें** त्याला सांगितलें आहे. '**शोणितपुरांत** पुनः कधीं प्रवेश होईल व त्याविषयीं उपाय काय?' ह्मणून आह्मी विष्णूला विचारलें, तेव्हां त्याणें ही शापाची गोष्ट सांगितली. एकंदरींत तो सिंह हाच काय तो आमचा शत्रू आहे. त्याचा नाश झाला ह्मणजे आह्मी सुखी होऊं. तूं मोठा पराक्रमी आहेस ह्मणूनच मी तुला येथें आणण्याचा इतका प्रयत्न केला.

---

१—पुराणादि प्राचीन ग्रंथांत, ह्या ब्रह्माण्डांत, निरनिराळीं १४ भुवनें (लोक अथवा विभाग) आहेत असें वर्णन केलें आहे. चवदा लोक मानले म्हणजे पृथ्वीला सोडून वर ६ व खालीं ७ लोक आहेत. त्यांत पृथ्वीपासून खालीं तिसरा जो लोक, त्यालाच 'सुतल' म्हणतात. विष्णूनें वामनावतार घेऊन बलिराजाचें सर्व ऐश्वर्य हरण करून त्याला सुतल लोकांत नेऊन ठेवला, अशी कथा पुराणांत आहे. भागवत स्कन्ध ८ अध्याय १५—२३ पर्यंत पहा.

आमचें संकट निवृत्त करावें असें जर तुझ्या मनांत असेल तर तूं त्या सिंहाला मार. यापासून केवळ आमचेंच कार्य होईल असें नाहीं, तर तुलाही मोठा लाभ होईल. तूं सिंहाला जिंकलेंस ह्मणजे तो तुला **मृगांक** नांवाची एक उत्तम तरवार देईल. आणि तिच्या प्रभावानें तूं सर्व पृथ्वीला जिंकून सार्वभौम राजा होशील."

दैत्यकन्येचें हें भाषण ऐकून श्रीदत्ताच्या वीरश्रीला स्फुरण आलें. त्याणें आपण सिंहाला मारीन अशी त्या स्त्रीची खातरी केली. नंतर इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलत बोलत तो दिवस तेथेंच घालविला. दुसऱ्यादिवशीं दैत्यकन्यांला पुढें करून श्रीदत्त त्यांच्या नगरीलीं जाण्यास निघाला. नगराच्या वेशींत जाऊन पोंहोंचल्यावर आंत जाण्याविषयीं प्रयत्न करतात तों त्या सिंहानें मनाई केली. तेंच निमित्त धरून श्रीदत्तानें सिंहाशीं कुस्ती मारण्याला आरंभ केला. कांहीं-वेळ दोघांची झटपट झाली. शेवटीं सिंहाला खालीं पाडून श्रीदत्त त्याच्या छातीवर बसला. तेव्हां तत्काल त्याचा शाप सरल्याकारणानें, तो दिव्य पुरुषाचें रूप धारण करून श्रीदत्ताला ह्मणाला, "तूं आज मजवर मोठा अनुग्रह केलास. आज माझ्या शापाचा अंत झाला. तुझे उपकार तर अनंत आहेत. ते फेडण्यासारखें माझ्या हातून कांहीं होणें शक्य नाहीं; तरी पण थोडीशी तुझी सेवा करण्याला इच्छितों तिचा स्वीकार कर. ही **मृगांक**नांवाची उत्तम तलवार घे. इच्या योगानें तूं केवळ मृत्युलोकांतच नाहीं, तर त्रैलोक्यांतही अजिंक्य होशील. इचें संरक्षण मात्र फार जपून कर." असें सांगून तलवार श्रीदत्ताच्या हातांत देऊन तो पुरूष दैत्यकन्यांच्या दुःखासह तत्काल अदृश्य झाला.

नतर दैत्यकन्यांला बरोबर घेऊन श्रीदत्त मोठ्या आनंदानें त्या नगरांत प्रवेश करता झाला. त्या नगरांतील मोठमोठाले राजवाडे, तशींच उत्तम घरें, विहारस्थलें, इत्यादि पाहून श्रीदत्ताचें मन अगदीं थक्क झालें. दैत्यकन्या श्रीदत्ताला बरोबर घेऊन तेथील एका उत्तम

राजवाड्यांत जाऊन उंच अशा एका सुंदर माहालांत गेली. तेथें, आपल्यावर उपकार करणाऱ्या श्रीदत्ताचें तिणें उत्तम आदरातिथ्य केलें. स्नान भोजनादिक झाल्यावर उभयतांच्या अनेक गोष्टी झाल्या. तेव्हां श्रीदत्ताच्या मनांत तेथें रहावें असें आलें होतें तरी, हा भाव व्यक्त न करितां वरकांती, जाण्याची इच्छा आहे असें दाखवून तो दैत्यकन्येला ह्मणाला, “ बरें, आतां मला निरोप दे. तूं सांगितलेलें काम जसें माझ्या हातून झालें तसें केलें. आतां तुमचें दुःख कांहीं राहिलें नाहीं. तुह्मी खुशाल आनंदांत कालक्रमणा करा. मी आपल्या घरीं जातों. माझे मित्र, आप्त वगैरे वाट पाहत असतील. मी त्यांला सांगून देखील आलों नाहीं.” श्रीदत्त जाण्याला निरोप मागत आहे, हें पाहून दैत्यकन्येला अतिशय वाईट वाटलें. तिचा त्याच्यावर फारच लोभ जडला होता. आपल्याकरतां इतकें दुःख भोगून त्याणें आपलें कार्य केलें ह्मणून ती त्याची फार आभारी झाली होती. तिचा हेतु अगदीं शुद्ध होता. ती म्हणाली, “ महाभागा! हें असें काय बरें बोलतां? आमच्याकरतां आपण फार श्रम केले. तुमच्या कृपेनें आम्ही सुखी झालों आहों, तर कांहीं दिवस येथें राहून आमच्या हातून सेवा घ्यावी, असें आपल्या मनांत कां बरें येत नाहीं? स्वजनांचा वियोग दुःसह आहे हें मला समजतें, तरी थोडे दिवस येथें राहण्याला कांहीं हरकत नाहीं. पाहिजे तर, आपण येथें खुशाल असल्याचा तिकडे निरोप पाठवितां येईल. आम्हालाही आपण स्वजनच केलें आहे. मग आम्हाला तरी वियोगदुःखांत टाकणें हें आपल्याला युक्त वाटतें काय?” असें बोलून तिणें आग्रहपूर्वक त्याला ठेवून घेतला. रोज नानाप्रकारचे आहार, विहार इत्यादि होत असत. दैत्यकन्या श्रीदत्ताच्या मनाची कर्मणूक व्हावी म्हणून अगदीं मोकळ्या मनानें त्याच्याशीं वागत असे; पण त्याचा हेतु मात्र फार निराळ्याप्रकारचा होता. तो आपल्या मनांत नानाप्रकारचे बेत करित असे. दैत्यकन्येच्या मनांत कांहीं शंका नसल्यामुळें ती रात्रंदिवस त्याच्याजवळ

असे. त्यावरून श्रीदत्त—ही आपल्यावर अनुरक्त झाली आहे, असें समजून सकामबुद्धीनें तिच्याशीं वागूं लागला. तरी बाह्यात्कारें आपला अभिप्राय स्पष्ट करून दाखविण्याचें त्याला धैर्य होईना. खरोखर कामी पुरूष फार अविचारी असतो. तो प्रसंगीं कशाचीच पर्वा करीत नाहीं. तथापि त्याचें अशाप्रकारचें वर्तन इतर लोकांशीं मात्र असतें. ज्या स्त्रीवर तो आसक्त होतो; तिच्याशीं फार निराळ्या रीतीनें वागतो. बहुतकरून स्त्रीनें तशाप्रकारचा अभिप्राय स्पष्ट दाखविल्यावांचून पुरूष तिच्यावर आसक्त होत नाहीं आणि कदाचित् तिच्या मनांत नसून हाच तिच्यावर आसक्त झाला असला तर त्याबद्दल त्याला एक प्रकारचें मोठें भय वाटतें. स्त्रीनें आपल्या म्हणण्याला रुकार दिला नाहीं तर पुरुषाला त्याची फार लाज वाटते. म्हणून त्याच्या मनांत अनेक तरंग येतात. तरी स्त्रीजवळ गोष्ट काढण्याची त्याची छाती होत नाहीं. स्त्रियांचीही मनोवृत्ती अशीच होते. त्या, पुरुषापेक्षांही मोठ्या मानी असतात. आपला शब्द खालीं न पडावा म्हणून मनांतील अभिप्राय दुसऱ्या अनेक रीतींनीं व्यक्त करितात, तरी प्रत्यक्ष बोलून दाखवीत नाहींत. सांप्रत आमच्या कथानायकाचीही अशीच अवस्था झाली आहे. दैत्यकन्या, त्याच्या मनाचें रंजन व्हावें म्हणून अनेक उपाय करीत होती व तो बाह्यात्कारानें आपणाला संतोष झालासें दाखवीत असे. पण मनांत अधिकाधिक उद्विग्न होत होता. आपला अभिप्राय व्यक्त करून दाखविण्याची संधी मिळेल काय? याची तो वाट पहात होता. इतक्यांत एकेदिवशीं गोष्टीवर गोष्ट निघतां निघतां दैत्यकन्येनें श्रीदत्ताला—“आपण अद्यापि विवाह कां करून घेतला नाहीं?” असें विचारलें. तेव्हां हीच उत्तम संधी आहे असें समजून श्रीदत्त म्हणाला, “होय, माझें आतां विवाह करून घेण्याचें वय आहे. तथापि लग्न करूनये असें मला वाटतें. अनुरूप स्त्री मिळाल्यावांचून विवाहांत कांहीं सौख्य नाहीं. तशा स्त्रिया पुष्कळ आहेत, पण उप-

योग काय ? माझें मन एखादीवर असलें तरी तिचें आपल्या ठिकाणीं असलें पाहिजे. तसा एक योग आला आहे. ती सर्वप्रकारें माझ्या प्रेमाला पात्रभूत झाली आहे व तिचेंही मजवर प्रेम असावें, असें वाटतें. आजपर्यंत मी तिच्याकरितां पुष्कळ दुःखें भोगलीं. त्याबद्दल ती कृतज्ञ आहे, पण अद्याप तिचा खरा अभिप्राय काय आहे हें समजत नाहीं." हें बोलत असतां त्याचा स्वर व मुद्रा कांहीं निराळ्याच प्रकारची झाली होती. दैत्यकन्या मोठी चतुर होती. तिनें तेव्हांच ताडलें आणि—आपण शुद्धमनानें याच्यावर प्रेम ठेवीत असतां याणें भलतीच गोष्ट मनांत आणली याचें तिला वाईट वाटलें. पण श्रीदत्ताचें मन न दुखवितां युक्तीनें याला येथून घालवावा असा विचार करून ती म्हणाली, "आपला हेतू काय आहे तो मला समजला. मग त्याचें इतकें संकट तें कसलें? पुरुषांची जात कपटी ह्मणतात ती कांहीं खोटी नव्हे. बरें, असो! आपल्या मनांत असेल तर तसा योग येण्याला कांहीं प्रतिबंध नाहीं. आपले जे आमच्यावर फार मोठे उपकार झाले आहेत त्याचें कांहींतरी उतराई झालेंच पाहिजे. तेव्हां अशा रीतीनें जर आपल्या मनाचा संतोष होत असेल, तर फारच चांगलें झालें ह्मणायचें!" असें बोलून तिनें, उभयतांचा वाग्निश्चय झाल्याची खूण ह्मणून एक आंगठी श्रीदत्ताच्या बोटांत घातली. दैत्यकन्या म्हणाली, "ही आंगठी आपल्या हातांत असूंद्या. उभयतांच्या प्रीतीची ही मुख्य खूण ह्मणून मी आपल्या हातांत घातली आहे. तथापि हिच्या अंगीं असा कांहीं विलक्षण गुण आहे कीं, कसलेंही जलाल विष असलें तरी हिच्यायोगानें तें तेव्हांच उतरतें. ही आंगठी हातांत असेल तर विषाची मुळींच बाधा होणार नाहीं. आतां आपण या तळींत स्नान करा. ती तलवार मात्र हातांत असूंद्या. कदाचित् सुसराबिसर आली तर तिचा नाश करण्याला ती उपयोगी पडेल. शूरपुरुषानें आपलें हत्यार सार्वकाळ जवळ बाळगावें हें चांगलें. स्नान करून आल्यावर आपला हेतु पूर्ण होईल."

श्रीदत्ताला हें तिचें बोलणें खरें वाटलें आणि तो तरवार हातीं घेऊन मोठ्या आनंदानें तळींत स्नान करावयाला उतरला. पाण्यांत बुडी मारून डोकें वर करून पाहतो तों, गंगेच्या कांठीं ह्मणजे—जेथें प्रथम त्याणें उडी मारली होती तेथें, आपण आहों असें त्याला दिसलें! ती दिव्य तळी व ती दैत्यकन्या वगैरे कांहीं एक दिसलें नाहीं! तेव्हां तो फार दुःखित झाला.

हवेळपर्यंत जे जे चमत्कार दिसले, त्यांचें स्मरण होऊन त्याला फार आश्चर्य वाटलें. दैत्यकन्या मोठी लबाड असून तिनें फसविल्याबद्दल त्याला फार राग आला, पण करतो काय? तो खिन्न होऊन तेथेंच कांहींवेळ दुःख करित बसला. इतके दिवस श्रीदत्त एका नादांत गुंग झाला होता. त्याला आपले माता-पितर किंवा इष्ट-मित्र यांचें स्मरणदेखील झालें नव्हतें. आतां जेव्हां तो नाद सुटला तेव्हां त्याला सर्वांची आठवण झाली. प्रथमतः आपल्या मित्रांस भेटावें ह्मणून त्यांचा शोध करण्याकरतां तो आपल्या घराकडे जाण्यास निघाला. जातां जातां वाटेंत त्याचा परममित्र निष्ठुरक अकस्मात् त्याला भेटला. तो दुरून श्रीदत्ताला पाहून धांवत धांवत पुढें आला आणि प्रथम त्याला कडकडून मिठी मारून घाबऱ्यां घाबऱ्यां ह्मणाला, "गड्या, येथें रस्त्यावर उभा राहूं नकोस. असा इकडे माझ्या बरोबर ये. आपण त्या समोरच्या पडक्या देवळांत जाऊन बसूं." असें बोलून तो श्रीदत्ताला देवळांत घेऊन गेला. यावेळीं निष्ठुरकाचा चेहरा दुःखित व भयाभीत झाल्यासारखा दिसत होता. श्रीदत्तानें सर्व मित्रांचें व आपल्या घराकडच्या मंडळींचें कुशल विचारलें तेव्हां निष्ठुरक मोठा सुस्कारा टाकून ह्मणाला, "बाबा, कुशल कसलें विचारतोस? आह्मी तुझे मित्र सर्वही अद्याप जिवंत आहोंत. त्या दिवशीं नको नको ह्मणत असतां तूं एकदम गंगेंत उडी टाकलीस, आणि लवकरच कोठें दिसेनासा झालास. आह्मी तेथें पुष्कळ-वेळ तुझी वाट पहात बसलों होतों, परंतु तुझा कांहीं ठिकाण नाहीं. आणि इतक्यांत रात्रही पुष्कळ झाली ह्मणून वाटेनें शोध करीत करीत मध्यरात्रीच्या सुमारास आपापल्या घरीं गेलों. दुसऱ्या दिवशीं पाहाटेस

उठून पुनः गंगेवरचे सारे घाट, देवालयें वगैरे चहूंसारीं धुंडून पाहिलीं, तरी तुझा पत्ता लागला नाहीं ! प्रतिदिवशीं आमचा असा क्रमच चालला होता. नदींत कोठें वाहून गेला असशील कीं काय? असें समजून, नावेंतून फार दूर पर्यंत जाऊन पाहिलें. पाण्यांत जाळीं घातलीं. जे जे ह्मणून उपाय सुचले ते ते सर्व केले. परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं, तेव्हां निराश होऊन, तें गांवाच्या पूर्वेकडच्या बाजूस कालीचें मंदिर आहे कीं नाहीं, तेथें गेलों आणि कालीची प्रार्थना करून आह्मी सर्वांनीं तिच्या पुढें आपलीं मस्तकें तोडून घेण्याचा निश्चय केला. तेव्हां अकस्मात्—"मुलांनों, असें साहस करूंनका. तुमचा मित्र अद्याप जीवंत आहे. आणि तो लौकरच तुह्माला भेटेल." अशी आकाशवाणी झाली. तेव्हां तो उद्योग सोडला आणि आकाशवाणीवर भरंवसा ठेवून हावेळ-पर्यंत तुझी वाट पहात बसलों आहों. त्याप्रमाणें ईश्वरकृपेनें आज तुझी भेट झाली व आतां आमची सारी काळजी गेली. असो. ही आमची खबर झाली. आतां आपल्या घराकडची ऐक.

आकाशवाणी ऐकली तेव्हां तें वर्तमान सांगण्याकरतां आह्मी तुझ्या घरीं जात होतों. इतक्यांत वाटेंत घाबऱ्यां घाबऱ्यां एक मनुष्य आह्माजवळ येऊन ह्मणाला, "अरे बाबांनों, अम्मळ उभे रहा आणि मी काय सांगतों तें ऐका. यावेळीं तुह्मी नगरांत जाऊंनका. कारण, राजा **वल्लभशक्ती** नुक्ताच मेला आहे. सर्व प्रधानांनीं एकमतानें **विक्रमशक्तीला** राज्यावर बसविलें आहे. हातीं सत्ता येतांच, सूड उगविण्याच्या हेतूनें **विक्रमशक्ती** **कालनेमी**च्या घरीं जाऊन रागानें,—"तुझा तो द्वाड कार्टा कोठें आहे ?"— ह्मणून त्याला विचारूं लागला. त्याणें,—"अमुक ठिकाणीं गेला हें मला माहित नाहीं; पण कोठेंसा गेला आहे खरा."—असें सांगितलें. तेव्हां **विक्रमशक्तीला** फारच राग आला. त्यानें दांतओंठ खाऊन आपल्या प्रधानाला सांगितलें कीं, "याचा (**कालनेमी**चा) मुलगा राजाचा अपराधी आहे, त्याच्यावर मोठा दोष असून त्याला यानें दडवून ठेविलें आहे.

तेव्हां हाही दोषीच होतो. तुह्मी याला नीट सांगून पहा. जर याणें श्रीदत्ताला तुमच्या स्वाधीन केला, तर मग याच्यावर कांहीं दोष नाहीं; नाहींपेक्षां राजाच्या गुन्हेगाराला छपवून ठेवल्याचा दोष याच्यावर पूर्ण रीतीनें शाबीत होतो. आतांपासून एका प्रहराचा अवधी दिला आहे. इतक्या वेळांत श्रीदत्ताला हजर न केला तर, या कालनेमीला अपराधी समजून बेलाशक सुळावर चढवावा." ह्याप्रमाणें हुकूम करून कालनेमीच्या मुसक्या बांधून त्याला कोतवालाच्या हवालीं केला. श्रीदत्ताचा कोठें पत्ताच नाहीं. मग बिचारा कालनेमी त्याला कोठून आणून देणार. एक प्रहर पुरा होतांच हुकुमाप्रमाणें कोतवालानें त्याला सुळीं दिलें. हें वर्तमान ऐकून कालनेमीच्या स्त्रीचें हृदय दुःखानें फुटून गेलें व त्यांतच तिचा दुःखकारक अंतकाल झाला. हरहर ! एकंदरींत राजानें काय क्रूरपणा केला त्याचें स्मरण झालें ह्मणजे अंगावर शाहरे उभे रहातात. पापी पुरुषांचीं कर्में अशीं वाईट असतात कीं, त्यांच्या एका कृत्यापासून अनेक अनर्थ होतात. तो दुष्ट राजा आतां श्रीदत्ताला मारण्याकरतां त्याचा बारीक शोध करीत आहे व त्याचे जे कोणी आप्त इष्ट मित्र असतील, त्यांलाही मारण्याकरतां शोधित आहे. ह्मणून तुह्मी सांप्रत नगरांत जावें हें मला योग्य वाटत नाहीं. मी श्रीदत्ताचें कांहीं दिवस अन्न खाल्लें आहे. तुमच्याशीं माझी पुर्तीशी ओळख नाहीं. तरी तुह्मी त्याच्या बरोबर फिरत होतां ह्मणून त्याचे मित्र आहां, असें समजून मी ही गोष्ट तुह्माला सांगितली. याउप्पर मर्जीस येईल तसें करा." असें सांगून तो पुरुष पुढें चालता झाला. आह्मी सर्वांनीं हें भयंकर वर्तमान ऐकून आपसांत असा निश्चय केला कीं, मी एकट्यानें वेष पालटून गुप्तपणें तुझा शोध लावण्याकरितां येथेंच रहावें व बाकीच्या बाहुशाली इत्यादि पांच असामींनीं उज्जयनीस जावें. त्याप्रमाणें ते तर तिकडे निघून गेलेच. मी मात्र तुझ्या शोधाकरितां येथें राहिलों होतों. तर चल आतां तिकडे जाऊं. आह्मी सर्व मित्र एकत्र जमून मग पुढें काय करावयाचें तें करूं. मी सांगितलेलें हें वर्तमान फार दुःखका-

रक आहे. परंतु शोक करित बसण्याचा हा समय नाहीं." श्रीदत्ताला माता-पितरांचा दुःखकारक अंत झाल्याचें श्रवण करून विक्रमशक्तीविषयीं अतिशय राग आला. शोक आणि क्रोध यांच्या आवेशांत येऊन त्याणें आपल्या तलवारीकडे दृष्टी फेंकली, आणि त्याचवेळीं विक्रमशक्तिचा सूड घ्यावा असें त्याच्या मनांत आलें, पण त्याचें सांत्वन करून निष्ठुरक त्याला हातांत धरून हळू हळू उज्जयनीच्या मार्गाला लागला. कांहीं वेळानें त्याचा राग अंमळ शांत झाला. व वाटेनें चालत असतां गंगेंत बुडी मारल्यापासून पुनः वर येईपर्यंत झालेलें सर्व वर्तमान श्रीदत्तानें निष्ठुरकाला सांगितलें.

याप्रमाणें ते उभयतां मित्र बोलत बोलत मार्गक्रमण करित असतां वाटेंत एक रडत बसलेली स्त्री त्यांला भेटली. श्रीदत्तानें—"बाई ! येथें कां रडत बसलीस ?" ह्मणून तिला विचारिलें तेव्हां ती ह्मणाली, "बाबांनों, देव तुमचें कल्याण करो. मी उज्जयिनीला जाण्याला निघालें आहें. सोबतीला कोणी मनुष्य मिळाला नाहीं, तरी जाण्याची फारच निकड होती ह्मणून तशी एकटीच निघालें. पण वाटेची मला मुळींच माहिती नाहीं. रस्ता चुकून भलतिकडेच चाललें आहें किंवा सरळ रस्त्यानें जात आहें हें कांहींच समजत नाहीं. वाटेंत कोणी मनुष्यही भेटला नाहीं. तेव्हां एकटी अबला मी आतां काय करूं ? ह्मणून येथें देवाचा धांवा करित बसलें आहें." श्रीदत्ताला तिची दया आली आणि तो निष्ठुरकाला ह्मणाला, "गड्या, ही गरीब बिचारी येईना आपल्या बरोबर. ह्या अरण्यांत एकटी काय करील ही ? तर आपण हिला बरोबर घेऊन जाऊं." निष्ठुरकानें मान्य केल्यावरून श्रीदत्तानें—"बाई रडूं नको. चल, तुला थेट उज्जयिनीला पोंहचवितों." असें सांगून, तिला बरोबर घेतली. पुढें वाट चालतां चालतां संध्याकाळ झाला ह्मणून ते एका ओसाड गांवांत मुक्कामाला उतरले. तेथें कांहीं फलाहार करून ती स्त्री आणि हे उभयतां मित्र एका पडक्या देवळांत निजले. मध्यरात्रीच्या सुमाराला कांहीं हालचाल

झाली ह्मणून श्रीदत्त ऊठून पाहतो तों; ती स्त्री—निष्ठुरकाला मारून आनंदानें त्याचें मांस खात बसली आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. हें तिचें भयंकर कृत्य पाहून श्रीदत्तानें आपली तरवार उपसली, तेव्हां त्या स्त्रीनेंही आपलें राक्षसीचें भयंकर रूप प्रकट केलें; तरी मोठ्या धैर्यानें पुढें होऊन श्रीदत्तानें त्या राक्षसीचे केंस डाव्या हातानें घट्ट धरले. आणि आतां तो तिचें मस्तक तोडणार इतक्यांत ती त्याच्या हातांतून सुटून दिव्य रूपिणी अप्सरा होऊन श्रीदत्ताला म्हणाली, “ महाभागा ! मला मारूनको. मी राक्षसी नव्हें. मला सोड. हें असें भयंकर कृत्य मी मुद्दाम केलें नाहीं. पूर्वी कौशिकऋषीचा मला शाप झाला होता. तो ऋषी कुबेराचें स्थान मिळावें ह्मणून उग्र तपश्चर्या करित होता. तें वर्तमान ऐकून कुबेर भयभीत झाला आणि त्याणें, तपाला विघ्न करण्याकरितां त्याच्याजवळ मला पाठविलें. आह्मी अप्सरा मायेच्या योगानें पाहिजे तशीं रूपें धारण करितों. कुबेराचें प्रिय करावें ह्मणून मी सुंदर रूप धारण करून कौशिकऋषीजवळ गेलें. तेथें गायन, नृत्य, हावभाव इत्यादि जितके ह्मणून उपाय होते तितके करून पाहिले. पण त्यानें माझ्याकडे पाहिलें देखील नाहीं. यामुळें मला फारच लाज वाटली व रागही आला. तेव्हां त्याला त्रास द्यावा ह्मणून भयंकर राक्षसीचें रूप घेऊन मी त्याच्या पुढें गेलें. मला पाहून क्रोधानें तो ऋषी ह्मणाला, “ दुष्टे, तूं मला विनाकारण त्रास देण्याकरतां राक्षसासारखें भयंकर स्वरूप घेऊन आलीस, त्यापेक्षां अशी राक्षसी होऊनच रहा! जेव्हां कोणी ब्राह्मणवीर तुझे केंश धरून तुला मारण्याला प्रवृत्त होईल तेव्हां तुझ्या शापाचा अंत होईल.” याप्रमाणें कौशिकऋषीनें शाप दिला ह्मणून दुःखकारक राक्षसपणाचा स्वीकार करून मी या निर्मनुष्य अरण्यांत येऊन राहिलें. हें नगर पूर्वी मनुष्यांनीं गजबजलेलें होतें. मी येथें येऊन राहिल्यापासून प्रतिदिवशीं मनुष्यें खातां खातां सांप्रत अगदीं ओसाड झालें आहे. फार दिवसांनीं तूं माझ्या शापाचा शेवट केलास. आतां

मी तुजवर प्रसन्न झालें आहें. तुला कोणचा पाहिजे तो एक वर माग." हें तिचें भाषण ऐकून **श्रीदत्त** आदरपूर्वक ह्मणाला, "दुसरा कोणचा वर पाहिजे ? हा माझा मित्र जीवंत होण्याचा कृपाकरून वर दे ह्मणजे झालें." नंतर "बहुत बरें" म्हणून वर देऊन अप्सरा गुप्त झाली. इकडे **निष्ठुरक** पर्वी होता त्याप्रमाणें झाला. हें आश्चर्य पाहून विस्मित झालेल्या **श्रीदत्तानें निष्ठुरकाला** प्रेमानें आलिंगन दिलें, आणि दोघांनीं **उज्जयिनीची** वाट धरली. **निष्ठुरकाला** राक्षसीनें खाल्लयाचें वगैरे कांहींच स्मरण नव्हतें. ती हकीकत **श्रीदत्तानें** वाटेंत त्याला सांगितली. दोघेही मित्र बोलत बोलत त्याच दिवशीं **उज्जयिनीस** जाऊन पोंहचले.

**उज्जयिनींत** राहणारे **बाहुशाली** आदिकरून **श्रीदत्ताचे** मित्र, दिवसांतून एकवेळ तरी गांवाबाहेर रस्त्यावर येऊन त्याची वाट पहात बसत असत. त्याप्रमाणें यादिवशींही ते आले होते. **श्रीदत्त** आणि **निष्ठुरक** येत आहेत असें दुरूनच त्यांस दिसलें. जसा तृषित झालेल्या मोराला मेघ आपल्या दर्शनानें आनंद देतो, त्याप्रमाणें मित्राच्या भेटीविषयीं उत्सुक झालेल्या **बाहुशाली** इत्यादि मित्रांला **श्रीदत्ताच्या** दर्शनानें आनंद झाला. याप्रमाणें बहुत दिवसांनीं त्या सर्व मित्रांचा आनंदकारक समागम झाला. **श्रीदत्त** इत्यादिक मित्रांला **बाहुशालीनें** आपल्या घरीं नेऊन त्यांचें उत्तम आतिथ्य केलें व एकमेकांचे सर्व वृत्तांत परस्परांनीं परस्परांला सांगितले. **बाहुशालीचे** आईबाप व घरचीं इतर सर्व मनुष्यें **श्रीदत्ताचा** मनापासून आदरसत्कार करित असत यामुळें **श्रीदत्ताला** केवळ आपल्या घराप्रमाणेंच वाटलें. प्रतिदिवशीं निरनिराळ्या करमणुकीच्या गोष्टी करून आनंदानें **श्रीदत्त बाहुशालीच्या** घरीं राहिला.

एकेदिवशीं चैत्रमहिन्यांत गौरीची यात्रा भरली होती. ती पाहण्याकरितां हे सर्व मित्र बागेंत गेले. तेथें साक्षात् मधुमासाची शोभाच कीं काय ? अशी, **श्रीबिंबक** नामक तेथील राजाची कन्या देवीच्या दर्शनाला आली. **श्रीदत्तादिक** मित्रमंडळी यात्रेंत इकडून तिकडे फिरत असतां,

श्रीदत्ताची तिच्यावर दृष्टी गेली. उघडलेल्या दृष्टीच्या मार्गानेंच• कीं काय ? ती राजकन्या मृगांकवती तत्काल श्रीदत्ताच्या हृदयांत शिरली. तशीच तिचीही, स्निग्ध असून प्रथमचें प्रेम दाखविणारी दृष्टी उभयतांची मध्यस्ती करणाऱ्या दूतीप्रमाणें मागें पुढें होऊं लागली. इतक्यांत श्रीदत्ताची एकांतीं भेट घ्यावी ह्मणूनच कीं काय? ती तेथल्याच दाट वृक्षांच्या झाडींत शिरली. श्रीदत्ताचें मन मुळींच ठिकाणावर नव्हतें म्हणून त्याला दिशा देखील दिसेनातशा झाल्या. आपल्या मित्राची स्थिति तशी अस्वस्थ अवलोकन करून बाहुशाली म्हणाला, "गड्या, उगीच आमच्या जवळ चोरतोस कशाला ? तुझ्या मनांत काय आलें आहे तें मला समजलें. तर तुझें मन चोरणारी ती राजसुता जिकडे गेली आहे तिकडेच आपणही जाऊंया." इंगित जाणणाऱ्या बाहुशालीनें याप्रमाणें सांगितलें, तेव्हां हंसून श्रीदत्त त्याच्या बरोबर, ती राजकन्या जिकडे गेली होती तिकडे गेला. इतक्यांत जवळच—"अरे देवा ! हें काय झालें. हिला सर्पानें दंश केला. आतां काय करावें? " असा, श्रीदत्ताच्या हृदयांत ज्वर उत्पन्न करणारा आक्रोश त्यांच्या कानीं पडला. तेव्हां—"विषाची बाधा घालविणारी आंगठी व त्याच्या परिहाराचा मंत्र माझ्या मित्राजवळ आहे." असें, धांवत धांवत पुढें जाऊन बाहुशालीनें राजकन्येच्या चोपदाराला सांगितलें. श्रीदत्त आलिकडेच एका झाडाखालीं उभा राहिला होता. चोपदार घाबऱ्या घाबऱ्यां बाहुशालीला म्हणाला, "महाराज, असें असेल तर देवानें मोठीच कृपा केली म्हणावयाचें. कृपा करून मला आपल्या मित्राकडे घेऊन चला." बाहुशालीनें, "बहुत बरें" म्हणून त्याला श्रीदत्ताजवळ आणलें. तेव्हां चोपदार श्रीदत्ताच्या पायांवर मस्तक ठेवून ह्मणाला, "महाराज! कसेंतरी करून आमच्या बाईसाहेबांला जीवंत करा. आमच्या महाराजांची ही एकुलती एक कन्या आहे. तिचा असा परिणाम होईल तर आमचा सर्वांचाच घात होणार आहे. तर आपण दया करावी महाराज." चोपदार अशी प्रार्थना करूं

लागला हें श्रीदत्ताला इष्टच होतें. तो लगेच त्या चोपदाराला बरोबर घेऊन राजकन्येजवळ आला आणि तत्काल आपल्या हातांतली आंगठी तिच्या हातांत घालून मंत्राचा जप करूं लागला. तेव्हां निजून उठल्या-सारखी, राजकन्या मृगांकवती तत्काल उठून बसली ! हा चमत्कार पाहून सर्व लोकांला फारच आनंद झाला. ते सारे श्रीदत्ताची स्तुती करूं लागले. इतक्यांत, आपल्या कन्येला सर्पदंश झाला हें वर्तमान ऐकून मोठ्या त्वरेनें राजा बिंबिकीही तेथें आला. कंचुकीनें (चोपदारानें) त्याला हें सर्व वर्तमान सांगितलें. तेव्हां राजानें श्रीदत्त व बाहुशाली इत्यादि, त्याचे मित्र यांचे फार फार उपकार मानून त्यांचा मोठा सत्कार केला. राजानें त्यांलां आपल्या घरीं येण्याविषयीं पुष्कळ आग्रह केला, परंतु "यावेळीं आपलें वचन आमच्यानें मान्य करवत नाहीं. प्रसंगवशात् पुढें कधीं तरी येऊं," असें सांगून त्याचा निरोप घेऊन श्रीदत्त आपल्या मित्रांसह तेथून निघाला. राजकन्या सावध झाल्यानंतर एकसारखी टक लावून त्याच्या-कडे पहात होती; परंतु भाषण वगैरे कांहीं होण्याची संधी मुळींच मिळाली नाहीं. तिच्या हातांत घातलेली अंगठी श्रीदत्तानें मुद्दाम परत मागितली नाहीं. श्रीदत्त व बाहुशाली इत्यादिक त्याचे मित्र, यात्रा पाहून परत स्वस्थानीं आले. इतक्यांत राजाचा चोपदार सुवर्णादिकांचे अलंकार, वस्त्रें वगैरे चांगल्या चांगल्या वस्तु राजानें श्रीदत्ताला बक्षीस दिल्या होत्या, त्या घेऊन आला. श्रीदत्ताला त्यांची मनापासून अपेक्षा नव्हती, तथापि राजाची मर्जी न मो-डावी ह्मणून त्याणें तें सर्व घेतलें आणि लगेच बाहुशालीच्या बापाला दिलें. श्रीदत्ताचें मन राजकन्येकडे वेधलें होतें. त्याला तिच्याविषयीं फारच काळजी लागली. खाण्यापिण्याकडेदेखील त्याचें लक्ष्य लागत नाहींसें झालें व तिच्या गोष्टीवांचून दुसऱ्या कशानेंच त्याच्या मनाचें रंजन होईना. ही त्याची अवस्था पाहून बाहुशाली इत्यादिक मित्रांला—याला काय उपाय करावा? याचा मोठा विचार पडला. प्रथम राजकन्येचा नाद सुटावा ह्मणून त्यांनीं अनेक उपाय केले; तरी त्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं असें

पाहून, ती कोणत्या रीतीनें मिळेल याविषयीं ते विचार करूं ल कांहीं योग्य उपाय सुचला नाहीं.

इकडे राजकन्येचीही श्रीदत्तासारखीच स्थिती झाली होती. प्रथम जेव्हां तिणें श्रीदत्ताला पाहिला तेव्हांपासूनच तिचें मन त्याच्याः बसलें होतें. नंतर जेव्हां सर्पाच्या विषापासून त्यानें तिला वांचविलें, तेव्हां प्रेमबंधनाची गांठ फारच घट्ट बसली. पूर्वीं केवळ प्रेमच होतें; पण जीवंत केल्यापासून त्याच्या जोडीला उपकारही आला. यामुळें तिच्या मनाची स्थिती फारच विलक्षण झाली. खरोखर स्त्रियांचा स्वभाव विशेष मायाळू असून त्यांच्या ठिकाणीं कृतज्ञपणा पुरुषांपेक्षां विशेष असतो. बहुतकरून तरुण स्त्रिया—त्यांचें मन ज्याच्यावर बसलें असेल त्याच्यावर, विशेष प्रेम करतात; पण कांहीं संकटाच्या प्रसंगीं त्याणें साह्य केलें असलें तर त्या जितक्या आभारी होतात तितक्या अन्य कोणत्याही रीतीनें होत नाहींत. आणि अशा संकटकालीं साह्य करणाऱ्या पुरुषाला द्रव्य इत्यादिक, काय पाहिजे तें दिलें तरी आत्मा समर्पण केल्यावांचून त्याचे उपकार फेडले असें त्यांला वाटत नाहीं, व संकटकालीं उपयोगी पडणाऱ्या पुरुषाकरतां सर्वस्व किंवा प्रसंगीं आपले प्राण देखील वेंचण्याला त्या मागें पुढें पहात नाहींत. असो. या **मृगांकवती** राजकन्येचीही तशीच अवस्था झाली होती. प्राणदात्या श्रीदत्ताला आपण आत्मा समर्पण केल्यावांचून त्याच्या उपकारांतून आपण पार होणार नाहीं असें तिला वाटत होतें. परंतु तसें करण्याला तिला कांहीं उपाय सुचेना. **श्रीदत्त** कांहीं तरी युक्ती करून आपल्याला येऊन भेटेल, अशी तिला आशा होती. पण एकदोन दिवस गेले तरी त्याचा कांहीं थांग नाहीं, असें पाहून तिणें त्याची आंगठी परत देण्याच्या निमित्तानें **भावनिका** नांवाची आपली प्रिय मैत्रीण श्रीदत्ताकडे पाठविली. ती एकांतीं श्रीदत्ताला भेटून आंगठी तिणें त्याला दिली. श्रीदत्तानें राजकन्येचें कुशल विचारलें तेव्हां ती ह्मणाली, "महाभागा; तिचें

.र्वी तुमच्यावर अवलंबून आहे. ज्यापेक्षां तुह्मी तिचें मन हरण .पेक्षां माझ्या सखीला प्राणदान करणारे आपण, अथवा मृत्यु या .वांचून तिसरी गती नाहीं." हे शब्द बोलत असतां तिचें अन्तः-.रण अगदीं सद्गदित झालें होतें. श्रीदत्ताचें प्रेमही यावेळीं अनावर झालें होतें; पण मन स्थीर करून मोठ्या गंभीरपणानें तो तिला ह्मणाला, "बाई, त्या तुझ्या मैत्रिणीलाहीं माझा असाच निरोप सांग. माझ्या मनाला विश्रांती देणारी एक तुझी सखी किंवा तपोवनांतली शांत गुहा यावांचून तिसरें स्थान नाहीं. देव करील तर लौकरच तिचा मनोरथ पूर्ण होईल." असें सांगून श्रीदत्तानें बाहुशाली इत्यादि मित्रांला तेथें बोलावून भावनिकेच्या अनुमतानें राजकन्येला गुप्तपणें हरण करून मथुरेंत घेऊन जाण्याचा निश्चय केला. आणि याचवेळीं कोणी कोणी काय काय करावें, व सर्वांची भेट कोणत्या ठिकाणीं व्हावी वगैरे सर्व प्रकारचे संकेत ठरले. नंतर भावनिका राजकन्येजवळ गेली आणि झालेला सर्व प्रकार तिणें तिला सांगितला.

इकडे ठरल्याप्रमाणें दुसरे दिवशीं बाहुशाली आपल्याबरोबर तिघां मित्रांला घेऊन व्यापाराच्या निमित्तानें मथुरेला जाण्यास निघाला. त्याणें वाटेंत प्रतिमुक्तामाला घोडे व सांडणी ठेवल्या. कारण, राजकन्येला घेऊन जातेवेळीं वाटेंत यांचा उपयोग व्हावा असा त्याचा उद्देश होता. बाहुशाली मित्रांसह मथुरेला जाऊन पोंहोंचला व तेथें त्याणें राहण्याच्या जाग्याची वगैरे व्यवस्था केली. इकडे श्रीदत्तानेंही एक गरीब स्त्री व तिची मुलगी यांना द्रव्य देऊन अनुकूळ करून घेतलें. आणि दोघींलाही अतिशय मद्य पाजवून, रात्रीं राजकन्या ज्या गृहांत राहत होती तेथें त्यांलां निजविल्या. मध्यरात्रीच्या सुमाराला संकेताप्रमाणें दिवा लावण्याचें निमित्त करून घराला बत्ती लावून, भावनिका राजकन्या मृगांकवतीसह कोणाला न कळतां संकेताच्या ठिकाणीं येऊन पोंहचली. तेथें श्रीदत्त पूर्वी येऊन वाट पाहत बसला होता. एक रथ आणि दोन घोडे जवळच

तयार करून ठेविले होते. राजकन्येला घेऊन **भावनिका** तेथें येतांच श्रीदत्तानें तिला रथावर बसविली. **भावनिकेला** तिचें रक्षण करण्याला सांगून आपल्या दोघां मित्रांला घोड्यांवर बसवून तिच्या बरोबर जाण्याला सांगितलें व त्या सर्वांनींही पुढें गेलेल्या **बाहुशालीस** जाऊन भेटावें असा संकेत केला.

याप्रमाणें राजकन्येची रवानगी करून श्रीदत्त पूर्वीप्रमाणें गांवांत यथेच्छ फिरूं लागला. इकडे मद्यानें उन्मत्त झालेली ती स्त्री आपल्या मुलीसहवर्तमान त्या घरांत जळून गेली. सर्व लोकांला असें वाटलें कीं, राजकन्याच आपल्या सखीसह जळून गेली असावी, ह्मणून लोक जिकडे तिकडे हाहाकार करूं लागले. स्वतः राजा व राणी इत्यादिकांनीं पेटलेला महाल विझविण्याविषयीं पुष्कळ प्रयत्न केला, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. नंतर दुसऱ्या दिवशीं रात्रीं ती **मृगांकक** नांवाची तलवार बरोबर घेऊन श्रीदत्त एकटाच घोड्यावर बसून आपल्या प्रियेला भेटण्याकरितां निघाला. त्यानें आपला घोडा भरधांव सोडला होता. तो रात्रभर तसाच चालवून दुसऱ्या दिवशीं सकाळीं प्रहरदिवसाच्या सुमाराला विंध्याटवीजवळ जवळ येऊन पोहोंचला. त्याला वाटेंत अनेक अपशकून झाले. त्यांवरून पुढें कांहीं तरी अशुभ येणार असें त्याला वाटलें होतें. तरी पुढें गेलेल्या राजकन्येला व आपल्या मित्रांला भेटण्याकरितां तो एकसारखा चालत होता. तो विंध्याटवीच्या जवळ पोंहचतो तों, **भावनिकेसह** सर्व आपले मित्र शस्त्रांनीं घायाळ झालेले त्याच्या दृष्टीस पडले. श्रीदत्ताला पाहून त्यांना अम्मळ धीर आला. त्यानें विचारण्यापूर्वीच ते मोठ्यानें ह्मणाले, "मित्रा ! आह्मी फसलों रे फसलों ! आह्मी वाट चालत असतां, येथें बहुत स्वारांनीं आमच्यावर हल्ला केला. त्यांतून एक स्वार, आह्मी घायाळ झालेले आहों असें पाहून भयभीत झालेल्या राजकन्येला आपल्या घोड्यावर बसवून घेऊन गेला. तो अद्याप फार दूर गेला नसेल. उत्तरेच्या ह्या रस्त्यानें लौकर जाशील तर कदाचित् तो तुला

भेटेल. आमची तर अशी अवस्था झालीच आहे. तेव्हां आमच्याबद्दल यावेळीं विशेष दुःख करून कांहीं उपयोग नाहीं. आधीं तूं राजकन्येचा शोध करावयास जा." हें त्याचें भाषण ऐकून श्रीदत्त भ्रमिष्टासारखा झाला होता तरी त्यांनीं दाखविलेल्या मार्गानें तो राजकन्येचा शोध करण्याकरितां मोठ्या त्वेरेनें निघाला. वाटेनें चहूंकडे पहात चालला होता. बराच दूर गेल्यावर एक तरुण क्षत्रिय, मृगांकवतीला पुढें घेऊन मोठ्या वेगानें आपला घोडा चालवीत आहे व त्याच्या बरोबर दुसरे पुष्कळ घोडेस्वार आहेत असें श्रीदत्तानें पाहिलें. तेव्हां ह्या ब्राह्मणवीरानें आपला घोडा हळूंच मध्यें घुसवून राजकन्या ज्या घोड्यावर होती, त्याच्याजवळ नेला. आणि प्रथम मोठ्या नम्रतेनें त्या क्षत्रियाला मुजरा करून ह्मणाला, "आपण जिला नेत आहां ती माझी स्त्री आहे. परस्त्रीला बलात्कारानें नेणें हें फार निंद्य आहे. तशांतून ती आपल्या खुषीनें येण्याला तयार नाहीं. याकरितां तिला माझ्या स्वाधीन करावी." श्रीदत्तानें याप्रकारचें सामोपचाराचें बोलणें लावलें; पण तो तें कांहीं ऐकत नाहीं असें पाहून युक्तीनें हळूच त्याचा एक पाय धरून असा जोरानें हिसका मारला कीं, त्यासरशीं तो घोड्यावरून खालीं आला. तेव्हां त्याला जमीनीवर आपटून श्रीदत्त आपल्या घोड्यावरून चटकन् त्याच्या घोड्यावर जाऊन बसला. राजकन्या अगदीं घाबरी झाली होती, तिला डाव्या हातानें सांवरून धरली आणि घोड्याचा लगाम तिच्या हातांत दिला. हा इतकाही सर्व प्रकार श्रीदत्तानें मोठ्या शिताफीनें केला. त्या क्षत्रियाबरोबर बरेच स्वार होते, पण ते असावध होते. श्रीदत्तानें त्या सरदाराला मारला, तेव्हां ते सर्व एकवटून त्याच्या अंगावर धांवले. पण या ब्राह्मणवीराचें धैर्य फारच विलक्षण होतें. त्याणें आपल्या तरवारीच्या प्रभावानें बहुत स्वारांची कत्तल केली. कितीकांचे घोडे मारले, कोणाचे हात तोडले, कोणाचे पाय छांटले, याप्रमाणें सर्वांची त्या एकट्या वीरानें धांदल केली. हें त्याचें अमानुष कर्म पाहून बाकी राहिलेले स्वार जिवाचा बचाव करण्याकरितां पळून गेले.

यांप्रमाणें आपल्या शत्रूंचा पराभव करून प्रिय **मृगांकवतीला** पुढें घेऊन **श्रीदत्त** आपल्या मित्रांला भेटण्याकरतां मागें परतला. थोडेसें दूर गेल्यावर **मृगांकवतीला** पाणी पाजण्याकरितां ह्मणून घोड्यावरून खालीं उतरला. इतक्यांत, जखमी झालेला त्याचा घोडा खालीं पडला तो पुनः उठला नाहीं. त्याच्यावर हें एक मोठेंच संकट प्राप्त झालें. **मृगांकवती** तर अगदीं व्याकुळ झाली होती. आसपास पाहिलें तों पाणी कोठेंच दिसत नव्हतें, ह्मणून तिला एका झाडाखालीं बसवून **श्रीदत्त** पाण्याचा शोध करण्याकरितां गेला. तो बराच दूर गेला तरी पाणी कोठें मिळालें नाहीं. शेवटीं जवळच **सारस** पक्ष्यांचा शब्द ऐकून त्याच्या धोरणानें पुढें गेला, तेव्हां एक सरोवर मिळालें. त्याचें पाणी घेऊन परत राजकन्येकडे येण्यास निघाला. इतकें होईपर्यंत अगदीं सायंकाळ झाला. तो प्रदेश अरण्यमय होता. तेथें मोठा रस्ता असा एक देखील नव्हता. तशांतून रात्र झाल्यामुळें वाट चुकून **श्रीदत्त** रात्रभर **चक्रवाकपक्ष्याप्रमाणें** आपल्या प्रियेविषयीं उत्सुक होऊन आरडत ओरडत सारी रात्र रानोमाळ फिरत होता. सूर्यउदय झाल्यावर अंदाजानें राजकन्येला ज्याठिकाणीं ठेविली होती त्याठिकाणीं येऊन पोंहचला. तेथें घोड्याचें प्रेत पडलें होतें; त्या खुणेवरून जाग्याची ओळख पटली, पण तेथें राजकन्या मुळींच दिसली नाहीं. आसपास कोठें तरी असेल असें समजून आपली तलवार खालीं ठेवून **मृगांकवतीला** टेहळण्याकरतां **श्रीदत्त** एका उंच झाडावर चढला. इतक्यांत त्या वाटेनें, तेथील भिल्लांचा राजा **श्रीचंड** जात होता त्यानें झाडाखालीं पडलेली **श्रीदत्ताची** तलवार उचलून घेतली. **श्रीदत्त** भिल्लाला पाहून लौकर लौकर खालीं उतरून, "माझी प्रिया तूं कोठें पाहिलीस काय?" ह्मणून त्याला विचारूं लागला. आर्त झालेल्या **श्रीदत्ताचें** भाषण ऐकून भिल्ल ह्मणाला, "येथून जवळच माझें घर आहे तिकडे तूं जा. तुझी प्रिया कदाचित् तेथेंच गेली असेल. मी यावेळीं दुसरीकडे कामाला जात आहें. थोड्यावेळानें परत घरीं येईन. ही तुझी तलवार तोंप-

र्येत माझ्या हातांत असूंदे. घरीं आल्यावर परत देईन." असें बोलून त्याणें आपल्या बरोबरचे दोन भिल्ल श्रीदत्ताबरोबर दिले. श्रीदत्ताच्या मनांत तलवार द्यायची नव्हती. पण करतो काय जबरदस्तापुढें उपाय नाहीं असें पाहून तो मुकाट्यानें त्या भिल्लाबरोबर त्याच्या झोंपड्याकडे गेला. तो तेथें पोंहचला तेव्हां एका हांतरीवर त्याला बसवून, ते बरोबर आलेले भिल्ल ह्मणाले, "येथें क्षणभर विश्रांती घे. आमचे यजमान इतक्यांत येतील. मग तुझें काय काम असेल तें होईल." श्रीदत्ताला फार श्रम झाले होते. तो तेथें अम्मळ आडवा होतांच झोपीं गेला. बराच वेळ निजून जागा झाल्यावर पाहतो तों आपल्या दोनही पायांत बेडी घातली आहे असें त्याला दिसलें. दैवाची गती फारच विचित्र! जो पुरुष एका उत्तम अवस्थेंत राहून सुखाचा उपभोग करित असतो तोच क्षणमात्रानें अतिशय दीन होतो. असा क्षणिक सुखदु:खांचा अनुभव देणाऱ्या दैवगतीप्रमाणेंच जिचा समागम झाला; त्या राजकन्येविषयीं शोक करित दीन झालेला श्रीदत्त निरुपायास्तव भिल्लाच्या त्या भिकार झोंपड्यांत राहिला. श्रीदत्ताचें स्वरूप, आकृती, स्वभाव वगैरे पाहून त्या भिल्लांच्या राजाच्या सर्व सेवकांला त्याची दया येत असे; पण त्यांचा कांहीं उपाय नव्हता.

एकेदिवशीं जवळ कोणी नाहीं असें पाहून त्याच्याच घरांतली मोचनिका नांवाची एक बटिक श्रीदत्ताजवळ येऊन ह्मणाली, "महाभागा! तुला पाहून मला फार आनंद होतो; पण तूं ह्या मृत्यूच्या घरांत कोठें आलास? केवळ बंदिशाळेंतच येथें रहावें लागेल असें नाहीं. ज्यानें तुला इकडे पाठविलें तो आमचा राजा श्रीचंड कोठें कामाकरितां गेला आहे. तो येईपर्यंत कायते तुझे प्राण राहणार आहेत. मग तूं चंडिकेचा बळी होशील! याकरितांच त्याणें तुला युक्तीनें येथें आणून खोड्यांत घालून ठेवला आहे. आमच्या घरांत कोणी टांचा घांसून प्राण दिले, तरी परक्या मनुष्याला पाणी देखील येथें मिळायचें नाहीं. पण तुला खाणें, पिणें, वस्त्रें, इत्यादिकांची चंगळ उडत आहे, याचें कारण काय समजलें का? तूं देवीचा

बली होणार आहेस म्हणून. ज्या मनुष्याला बली द्यावयाचा असेल, त्याला खुप खायाला प्यायला देऊन पुष्ट करण्याचा आमचा सांप्रदाय आहे. तुझा असा वाईट परिणाम होणार हें जाणून माझें काळीज तिळ तिळ तुटत आहे. पण काय करावें ? तुझें दैवच प्रतिकूळ झालें असावें म्हणून त्याणें तुला अशा संकटांत पाडलें असेल तर कोणास ठाऊक?" श्रीदत्त आधींच दीन व निराश झाला होता. पाहिजे त्या संकटांत साह्य करणारी तलवार गेल्यामुळें त्याचे हातपाय अगदीं गळल्यासारखे झाले होते. मित्रांच्या व प्रियेच्या वियोगानें त्याचा उत्साह अगदीं नाहींसा झाला होता. तशांतून वांचलों तर त्यांची भेट होण्याविषयीं यत्न करीन, अशी आशा होती; पण चंडिकेला आपण बली होणार हें ऐकून तीही नाहींशी झाली. यावेळीं त्याला मूर्छा आली. मोचनिका दासीनें वारा घालून त्याला सावध केला. धीरपुरुषांवर वारंवार अनेक दुःखाचे प्रसंग आले तरी ते त्यांची पर्वा करीत नाहींत. श्रीदत्त हा मोठा छातीचा पुरुष होता. तो आपलें मन स्थिर करून मोचनिकेला म्हणाला, "बाई, मी अशा संकटांत पडलों असतांही तूं माझ्याविषयीं काळजी करतेस याबद्दल मी तुझा फार ऋणी आहें. तूं आपल्या यजमानाचें अन्न खात असून, केवळ मजवर दया करण्याकरतांच जसें हें गुप्त वर्तमान मला सांगितलेंस तसाच जर, माझे प्राण वांचण्याविषयींही कांहीं उपाय असेल तर तूंच कृपा करून सांगेनास. मीं तर सर्व प्रकारें पराधीन झालों आहें. मोकळा असतों तर कोणालाही दाद दिली नसती." हें त्याचें दीनवाणें भाषण ऐकून मोचनिका म्हणाली, "दुसरा तर कांहीं उपाय नाहीं; पण एक उपाय आहे. तुला जर तो मान्य होईल तर पहा. आमच्या यजमानाची सुंदरी नांवाची एक उपवर कन्या आहे. ती तुला पाहून फारच कामातुर झाली आहे. तिचा स्वीकार करशील तर कदाचित् तुझे प्राण वांचतील." श्रीदत्ताला भिल्लाच्या मुलीचा स्विकार करावा हें बरेंसें वाटलें नाहीं. पण शरण आलेल्या स्त्रीचा त्याग करणें हें मोठें पाप

आहे व कोणत्यातरी रीतीनें आपली सुटका व्हावी, ह्मणून श्रीदत्त त्या गोष्टीस मान्य झाला. आणि कोणाला नकळतां त्यानें गांधर्वविधीनें सुंदरीचा स्विकार केला. मग दररोज रात्रीं ती त्याला बंधनांतून मुक्त करून, पहाटे पूर्ववत् त्याच्या पायांत शृंखळा घालीत असे.

इकडे भिल्लांचा राजा ज्या कामाला गेला होता, तिकडे त्याला फार दिवस लागले. तितक्यांत सुंदरी लौकरच गरोदर झाली, मोचनिकेनें हें सर्व वर्तमान तिच्या आईला सांगितलें होतें. आधींच श्रीदत्ताला पाहून तिला त्याची दया येत होती. तशांतून त्याच्याशीं जांवयाचें नातें झालें, यामुळें तिचा त्याच्यावर फारच स्नेह जडला. आपला पती आतां लौकरच घरीं येईल असें समजलें तेव्हां ती श्रीदत्ताजवळ येऊन मोठ्या प्रेमानें ह्मणाली, “ बाबा, तुझें कल्याण असो. तुझा वियोग व्हावा हें मला इष्ट वाटत नाहीं. पण काय करावें? सुंदरीचा बाप श्रीचंड आतां लौकरच घरीं येणार आहे. तो कांहीं तरी भलतीच गोष्ट करील तर आमचें काय चालणार! तर तूं आतांच येथून जा आपला. पण माझ्या सुंदरीला मात्र विसरूं नकोस हो. आह्मा भिल्लांचा स्वभाव किती तामस आहे हें तुला माहित नाहीं. तुझे प्राण सुंदरीनेंच वांचविले. नाहींपेक्षां तूं देवीचा बली झाला असतास! ती पोर सर्वस्वीं तुझ्यावर हेतु ठेवून आहे. तूंही भला मनुष्य आहेस, तर आतां जें तुला योग्य वाटेल तें कर. याहून विशेष कांहीं सांगावयाचें नाहीं.” असें बोलून तिनें श्रीदत्ताच्या पायांतली बेडी काढून त्याला मोकळा केला. श्रीदत्तानें सुंदरीला विसणार नाहीं, अशाविषयीं आपल्या सास्वेची खात्री करून, आपली तलवार श्रीचंडाच्या हातांत सांपडली आहे ती युक्तिप्रयुक्तीनें हस्तगत करण्याविषयीं सुंदरीला सांगितलें आणि मोठ्या संकटानें तिचा निरोप घेतला. श्रीदत्त तेथून निघाला तो राजकन्या नाहींशी झाली होती त्या अरण्यांत पुनः आला.

मृगांकवतीचा शोध करावा असा त्याचा हेतु होता. व त्याप्रमाणें कांहीं शुभसूचक निमित्तेंही त्याला दिसूं लागलीं. त्यांवरून प्रियेचा कांहींतरी

शोध लागेल अशी त्याला आशा उत्पन्न झाली; ह्मणून जेथें त्याचा घोडा मरून पडला होता व प्रिया हरपली होती, त्या जाग्याचा शोध करित करित तेथें जाऊन पोहोंचला. तो तेथें गेला तों एक फांसेपारधी त्याच्याकडेच थेट येत असलेला दृष्टीस पडला. श्रीदत्तानें त्याच्या जवळ जाऊन विचारलें, "अरे भल्या मनुष्या, तूं पारधी आहेस असें वाटतें. हरणांची तुला पक्की ओळख असेल. माझ्या प्रियेचेही डोळे हरिणासारखेच होते. तर तशा प्रकारची हरिणाक्षी स्त्री तुला कोठें आढळली काय?" हें ऐकून तो ह्मणाला, "होय, तुझें नांव श्रीदत्त किंवा काय तें आधीं सांग."—"होय बाबा, तोच फुटक्याकपाळाचा मीं. माझेंच नांव श्रीदत्त. बरें, पण पुढें काय तें सांग."—असें सुस्कारा टाकून श्रीदत्तानें उत्तर दिलें. तेव्हां पारधी ह्मणाला, "तूं श्रीदत्त असशील तर माझा मित्र आहेस. तुला तुझ्या प्रियेची हकीकत सांगतों. त्यादिवशीं पाणी आणण्याकरितां ह्मणून तूं तिला सोडून निघून गेलास, तो परत आला नाहींस. फार वेळ तिनें तुझी वाट पाहिली. तरी तुझा थांग नाहीं, असें पाहून ती इकडे तिकडे तुला हाका मारित फिरत होती. इतक्यांत मीही येथें येऊन पोंहचलों. मी तिची हकीकत विचारल्यावरून तिणें सर्व वृत्तांत सांगितला. तो ऐकून मला तिची फार दया आली. आणि मी आपल्या घरीं तिला घेऊन गेलों. तिचा स्वभाव पाहून मला आपल्या मुलीपेक्षांही ती विशेष आवडूं लागली. बिचारी ती माझ्या झोंपड्यांत सुखानें रहात होती, पण तेथेंही एक विघ्न उपस्थित झालें. तेथें कांहीं कारणाकरितां तरुण तरुण भिल्लांची एक टोळी आली. त्यांला पाहून ती तुझी प्रिया फार घाबरली. तेव्हां तिला दुसरीकडे कोठें तरी सुरक्षितठिकाणीं नेऊन ठेवावी असें माझ्याही मनांत आलें. कारण माझें घर ह्मटलें ह्मणजे बोलून चालून गवताचें एक लहानसें झोपडें. तेथें बंदोबस्तही तितकाच! तशांतून जर माझें नेहमीं घरीं राहणें असतें तर चिंता नव्हती, पण सकाळ झाली कीं मी आपलें तिरकमटें घेऊन जंगलांत फिरणार! ती तरणीताठी सुंदर

बायको, जो पाहील त्याच्या डोळ्यांत भरणारी. तेव्हां कदाचित् त्या दुष्ट भिल्लांनीं किंवा दुसऱ्याकोणी तिच्यावर हल्ला केला तर काय करणार? असा विचार करून मी, मथुरेजवळ नागस्थल नांवाचें लहानसें खेडें आहे, तेथें राहणारा विश्वदत्तनांवाचा एक वृद्ध ब्राह्मण माझ्या ओळखीचा आहे, त्याच्या घरीं तिला नेऊन ठेवली आहे. तिणें तुझें नांव वगैरे जी माहिती मला सांगितली ती ऐकून मी या अरण्यांत तुझा शोध करित होतों. दैवयोगानें तुझी आज भेट झाली हें फार चांगलें झालें. तर तूं आतां येथून लौकर नागस्थलाला जाऊन तेथें विश्वदत्त ब्राह्मणाच्या घरीं तुझ्या प्रियेचा शोध कर. जा. आतां विलंब लावूं नको. ती फारच काळजी करीत आहे. तुझी भेट लौकर न होईल तर कदाचित् काय करील याचा नेम नाहीं." शोकाग्नीनें दग्ध झालेल्या श्रीदत्ताला हें त्या व्याधाचें भाषण केवळ अमृतासारखेंच पुनर्जीवन करणारें झालें. तो व्याधाचे फार फार उपकार मानून ह्मणाला, "गृहस्था! तुझ्या या ऋणांतून मी कधींही पार पडणार नाहीं. माझ्याकरितां जिणें आपल्या आईबापांदिकांचा देखील त्याग केला, तिला मी अशा भयंकर अरण्यांत एकटी टाकून गेलों! खरोखर त्यावेळीं एखाद्या क्रूर जनावरानें तिच्यावर झडप घातली असती, किंवा कोणी मारलें असतें, तर काय करावयाचें होतें; पण ईश्वर दयाळू आहे. त्याला सर्वांची काळजी आहे, ह्मणून तुझ्यासारख्या सज्जनाची गांठ पडून तिचा बचाव झाला. नाहींतर दुसरेंच कांहीं तरी वर्तमान ऐकण्याचें माझ्या दैवीं आलें असतें. असो. जें झालें तें ठीकच झालें. यावेळीं विशेष कांहीं बोलत नाहीं. पुनः तुझी गांठ पडावी इतकीच माझी इच्छा आहे" असें श्रीदत्तानें सांगितलें. त्या हितकर्त्या व प्रियेचें कुशल सांगणाऱ्या पारध्याला कांहीं तरी पारितोषिक द्यावें अशी त्याची फार इच्छा होती, पण त्या वेळीं त्याच्या जवळ देण्यासारखें कांहींच नव्हतें. ह्मणून प्रेमालिंगनरूप इनाम दिलें, आणि त्याचा निरोप घेऊन श्रीदत्त नागस्थलाला जाण्यास निघाला. त्या दिवशीं रात्रीं वाटेंत एकेठिकाणीं मुक्काम करून

दुसरे दिवशीं संध्याकाळीं विश्वदत्ताच्या घरीं पोंहोंचला. त्याच्या आंगणांत गेला तों तो ब्राह्मण ओटीवर संध्या करित बसला होता. श्रीदत्तानें जवळ जाऊन मोठ्या नम्रतेनें त्याला नमस्कार केला. तेव्हां विश्वदत्तानें सत्कारपूर्वक त्याला बसवून घेऊन प्रश्न केल्यावरून श्रीदत्तानें आपली सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून विश्वदत्त ह्मणाला, "वः फार चांगलें झालें. एकून श्रीदत्त ते तुह्मीच. तुमच्या आगमानानें मला फार संतोष झाला. तुमची प्रिया मृगांकवती खुशाल आहे. त्या व्याधाशीं माझा परिचय आहे. केव्हां केव्हां तो आमच्या घरीं येत असतो. त्याणें तिला आमच्या घरीं आणून पोंचविलें. तेव्हांपासून ती आमच्या येथेंच होती, पण थोड्या दिवसांपूर्वीं मथुरेंत आमचा एक मित्र आहे, त्याच्या घरीं मी तिला पोंहचवून आलों. ती येथें राहिल्यापासून आम्हाला फार संतोष होता. आणि तिचे गुण असे आहेत कीं, ती कधीं कोणालाही नकोशी व्हावयाची नाहीं. पण करावें काय? हें आमचें गांव पडलें अगदीं खेडें. तशांतून आम्ही गरीब आणि ती म्हणजे एक अमूल्य रत्नच व तशा उत्तम वस्तूवर पुष्कळांचे डोळे असावयाचे. अंगांत सामर्थ्य असल्यावांचून त्याचें रक्षण व्हावयाचें नाहीं. तेंव्हां न जाणो, कदाचित् कोणी तिचा अभिलाष केला तर आमच्या हातून तिचें रक्षण व्हावयाचें नाहीं, असें माझ्या मनांत आलें ह्मणून मी तिला मथुरेंत आपल्या मित्राच्या घरीं पोंहचविली आहे. तोही ब्राह्मण मोठा विद्वान् असून कुलीन आहे. आमचा राजा जो शूरसेन त्याचा गुरू असून मंत्रीही तोच आहे. त्याच्या घरीं तुमची स्त्री सुरक्षित आहे. तर आपण उद्यां सकाळीं तेथें चला ह्मणजे तिची भेट होईल. आतां रात्र फार झाली आहे तेव्हां येथेंच विश्रांति घ्यावी. आह्माला हा तुमच्या दर्शनाचा अलभ्य लाभ आहे. आमच्या घरांत काय ओलीकोरडी भाकर असेल तिचा स्वीकार करून रात्रीची रात्र येथेंच घालवा." हें त्या ब्राह्मणाचें मनःपूर्वक अगत्याचें भाषण ऐकून श्रीदत्ताला समाधान वाटलें. ब्राह्मणानें प्रेमपूर्वक

केलेल्या आदरातिथ्याचा स्वीकार करून उभयतां गोष्टी करित करीत निजले. पहाटे उठून श्रीदत्तानें त्या ब्राह्मणाचा निरोप घेऊन मथुरेची वाट धरली. तो प्रियेच्या दर्शनाविषयीं फारच उत्कंठीत झाला होता. ह्मणून श्रमाकडे लक्ष न देतां होईल तितक्या त्वरेनें चालत होता. तरी त्यादिवशीं मथुरेला पोंचला नाहीं. मथुरा अद्याप बरीच दूर आहे व रात्रही झाली असें पाहून त्यानें वाटेंत एके ठिकाणीं मुक्काम केला. दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं प्रहर दिवसाच्या सुमारास तो मथुरेच्या जवळ पोंहचला. तेथें त्याच्या मनांत असें आलें कीं, आपल्याला एका प्रतिष्ठित गृहस्थाच्या घरीं जावयाचें आहे, तेव्हां अंमळ बेताबातानें जावें. रानोमाळ वणावणा करीत फिरल्यामुळें त्याच्या अंगावर धुरळा सांचला होता, वस्त्रें लाल झालीं होतीं, ह्मणून शहराच्या आलीकडे स्वच्छ उदकानें भरलेल्या एका तळींत वस्त्रें वगैरे धुऊन त्याणें यथेच्छ स्नान केलें. अस्त्यांत नीटनेटका पोषाख करून जाण्याचा त्याचा विचार होता. त्याचीं वस्त्रें वाळत होतीं ह्मणून तोंपर्यंत तो त्या तळींत खुशाल बुड्या मारीत बसला. इतक्यांत तळीच्या एका बाजूला दगडाच्या सांधींत एक वस्त्र खोंचून ठेविलेलें त्याच्या हाताला लागलें. वर काढून पाहिलें तों त्यांत, एक उत्तम रत्नांचा हार मिळाला. श्रीदत्ताला तो हार पाहून फार आनंद झाला. कोणी तरी चोरानें हें येथें ठेवलें असावें, असें त्याला वाटलें. तरी आपण कोणाची चोरी केली नाहीं आणि येथें सहज मिळालेला माल घेण्याला कांहीं हरकत नाहीं असा विचार करून त्याणें तो हार घेतला. तो आपल्या प्रियेच्या गळ्यांत कधीं घालीन असें त्याला झालें होतें. तो कोणाच्या दृष्टीस न पडावा ह्मणून त्याणें काखेंत दडवून घेऊन त्वरेनें शहरांत प्रवेश केला. हार याला मिळाला हें वर्तमान कोणालाही समजलें नसतें, पण ज्यांत तो बांधला होता, तें वस्त्र राजसेवकांच्या ओळखीचें होतें. याच्या काखेंत तें वस्त्र आहे, असें पाहिल्यावरून संशयानें त्यांनीं श्रीदत्ताला पकडला. तेव्हां हार व वस्त्र दोनींही मुद्याच्या वस्तू मिळाल्यावरून

श्रीदत्त चौकशीअंतीं चोर आहे, असें ठरलें. अधिकाऱ्यांनीं हें सर्व प्रकरण राजाकडे पाठविलें. राजानें विशेष विचार न करितां एकदम देहांत शिक्षा देण्याचा हुकूम केला! तेव्हां रीतिप्रमाणें त्याच्या गळ्यांत माळा वगैरे घालून सर्व शहरांतून टिमकी वाजवीत श्रीदत्ताला शिपाई घेऊन चालले होते.

त्याची प्रिया **मृगांकवती** प्रधानाच्या घरीं रहात होती. तेथें जवळ हलग्या वाजलेल्या ऐकून, हें काय आहे ह्मणून पाहण्याकरितां ती गच्चीवर उभी राहिली. तों ज्याला मारायला नेत आहेत तो आपला प्रिय **श्रीदत्त** आहे असें तिला समजलें. तेव्हां धांवत धांवत जाऊन तिनें प्रधानाला सांगितलें, "महाराज, हा जो चोर ह्मणून सुळीं देण्याकरितां नेत आहेत, तोच माझा भर्ता आहे. आपण कसेंही करून त्याला अम्मळ उभा करा. खरोखर तो कसल्याही वाईट अपराधांत सांपडणार नाहीं. चौकशी केल्यावर या गोष्टीचा प्रत्यक्ष आपणांसच अनुभव येईल. याकरितां कांहीं वेळपर्यंत शिक्षा अमलांत आणण्याचें तहकूब ठेवावें." प्रधान तिच्यावर फार ममता करित असे. त्याणें तिला आपली मुलगी ह्मणविली होती. कसें तरी करून तिच्या नवऱ्याचा शोध लागावा म्हणून तोंही फार प्रयत्न करित होता व हरएक रीतीनें तिला सुख व्हावें ह्मणून त्याणें सर्व प्रकारचा उत्तम बंदोबस्त ठेवला होता. यावेळीं हें तिचें भाषण ऐकून श्रीदत्ताला घेऊन जाणाऱ्या सेवकांला तेथेंच उभें करून तो स्वतः राजाजवळ गेला आणि त्यानें त्याला या उभयतांचें सर्व वर्तमान सांगितलें. राजानें श्रीदत्ताला आपल्या समक्ष बोलावून खरी हकीकत विचारिली; तेव्हां हार कोणत्या रीतीनें आपणाला मिळाला तें सर्व त्यानें राजाला सांगितलें.

तें ऐकून श्रीदत्तावर व्यर्थ चोरीचा आरोप ठेवून आपण त्याला शिक्षा दिली, याबद्दल राजाला पश्चात्ताप होऊन त्यानें त्याची क्षमा मागितली. आणि त्याचा मोठा सत्कार करून प्रधानाला, त्याला आपल्या घरीं घेऊन जाण्यास सांगितलें. प्रधानानें श्रीदत्ताचें समाधान करून त्याला आपल्या

घरीं आणिलें. श्रीदत्त जेव्हां जेव्हां त्याच्याकडे रेखून पहात असे, तेव्हां तेव्हां हा कोणी तरी आपल्यापैकीं असावा, असें त्याला वाटे; परंतु विशेष प्रकारच्या खाणाखुणा व ओळख पटली नाहीं, यामुळें तो संशयांत पडला होता. जेवणखाण झाल्यावर इकडच्या तिकडच्या गोष्टी करतांकरतां, श्रीदत्ताला आपला संशय निवृत्त करावयाचा होता ह्मणून त्याणें प्रधानाची मूळची स्थिती वगैरेविषयीं कांहीं गोष्टी काढल्या. त्यावरून त्याणें सर्व वर्तमान सांगितलें. तें ऐकून हा प्रत्यक्ष आपला चुलता **विगतभय** आहे, अशी श्रीदत्ताच्या मनाची पूर्ण खातरी झाली. तत्काल श्रीदत्तानें त्याचे पाय धरले आणि सद्गदित होऊन म्हणाला, "काका! दैवानें आज आपलें दर्शन झालें. आपण होतां म्हणून माझे प्राण वांचले, नाहीं तर यावेळीं मीं **यमाचा** पाव्हणा झालों असतों!" असें बोलून घळघळां रडूं लागला. हें पाहून प्रधानही गोंधळल्यासारखा झाला. त्याच्या मनांत श्रीदत्ताविषयीं मुळींच संशय नव्हता. हा कोणीतरी राजपुत्र असून संकटामुळें याची अशी दशा झाली आहे—इतकेंच तो श्रीदत्ताविषयीं समजत होता. श्रीदत्ताची तशी स्थिती पाहून त्याचें अंतःकरण कळवळलें व तोही त्याच्या गळ्याला मिठी घालून रडूं लागला. तरी त्याच्याशीं आपलें काकाचें नातें कसें आहे हें त्याला कळलें नव्हतें. म्हणून त्यानें श्रीदत्ताला सर्व हकीकत विचारली. तेव्हां रडें आवरून लहानपणापासून हावेळपर्यंत झालेली सर्व हकीकत श्रीदत्तानें त्याला सांगितली. त्यांत श्रीदत्तानें आपल्या बापाच्या मरणाचें वर्तमानही सांगितलें होतें. तें ऐकून आपला बंधु **कालनेमी** याचा तसा दुःखकारक शेवट झाल्यामुळें प्रधान **विगतभय** याला फार वाईट वाटलें. नंतर श्रीदत्ताचा हात धरून त्याला एकांतांत नेऊन प्रधान म्हणाला, "मुला, बाप मेला म्हणून दुःखित होऊं नको. धीर धर. मला यक्षिणीची सिद्धी आहे. तिनें पांच हजार घोडे आणि सात कोटी रुपये मला दिले आहेत. माझ्या पोटीं पोरबाळ कांहीं नाहीं. जें कांहीं मजपाशीं

आहे, त्या सर्वांचा धनी तूंच आहेस. तुला जें पाहिजे तें साह्य करीन. बापाचा सूड उगवून सुखानें ऐश्वर्याचा उपभोग कर. माझ्या घरीं ही **मृगांकवती** ह्मणून जी कन्या राहिली आहे, हीच तुझी स्त्री आहे. तुझे प्राण तिनेंच वांचविले. ती जर त्यावेळीं मला न सांगती तर तूं माझ्या दृष्टी पडला नसतास! असो. दैवयोगानें जें झालें तें चांगलेंच झालें. **मृगांकवती**चा स्वीकार करून तूं कांहीं दिवस येथेंच रहा. समय पाहून पुढच्या सर्व गोष्टी करतां येतील."

याप्रमाणें उभयतां चुलत्या पुतण्यांचा संकेत झाला. बहुत दिवसांनीं अकस्मात् एकमेकांच्या गांठी पडल्यामुळें उभयतांसही अतिशय आनंद झाला. नंतर उत्तम मुहूर्त पाहून **विगतभयानें श्रीदत्ताच्या** विवाहाची तयारी केली. सर्व गोष्टी अनुकूळ झाल्याकारणानें मोठ्या थाटानें **श्रीदत्ताचा मृगांकवती**शीं विवाह झाला. बहुत श्रम व दुःख भोगून प्राप्त झालेल्या प्रिय **मृगांकवती**च्या समागमानें श्रीदत्ताला किती आनंद झाला असेल, याचें वर्णन करतां येत नाहीं. त्या दिवशीं विवाह संबंधीं सर्व विधी आटोपल्यावर रात्रीं **श्रीदत्त** आणि **मृगांकवती** यांचा प्रथमसमागम झाला. राजकन्या **मृगांकवती** इची मुग्धावस्था होती. तिला इतर कांहीं गोष्टी माहीत नव्हत्या. **श्रीदत्ता**वर तिचें निस्सीम प्रेम होतें व त्याच्या समागमाविषयीं अतिशय उत्सुक झाली होती, तरी लज्जेनें आपल्या मनांतील भाव व्यक्त करण्याविषयीं ती असमर्थ झाली होती. केवळ **श्रीदत्ताच्या** लोभानें आपल्या घरच्या सर्वांचा त्याग करून त्याच्या बरोबर ती निघाली. पण दैवानें तिच्यावर एकापेक्षां एक असह्य संकटें आणून इतके दिवस तिचा फार छळ केला. तथापि तसले सर्व दुर्धर प्रसंग ज्याच्याकरतां तिनें सहन केले, त्या **श्रीदत्ताचा** समागम झाल्यामुळें तिला मागच्या सर्व दुःखांचें कांहींच वाटलें नाहीं. **श्रीदत्ता**नेंही तिच्याकरतां फार संकटें भोगलीं. त्याणें आपल्या जिवाकडेदेखील पाहिलें नाहीं. आणि इतके सायास करून **मृगांकवती**ची भेट झाली व तिचें पूर्ववत् आपल्यावर प्रेम आहे हें पाहून

श्रीदत्ताला आपण कृतकृत्य झालों असें वाटलें. खरोखर, स्त्रिया पुरुषांच्या नादानें पाहिजे तें दुःख सहन करण्यास तयार होतात तथापि वारंवार संकटें आलीं म्हणजे कदाचित् त्यांचें मन उदास होतें. पण ज्यांचें निस्सीम प्रेम असेल त्यांच्यावर जसजशीं दुःखें कोसळतील तसतसें त्यांचें मन आपल्या हृदयवल्लभावर अधिकच आसक्त होतें! आणि तशा आसक्त झालेल्या स्त्रीचा, जेव्हां तिच्या प्रियाशीं समागम होतो आणि त्याला ती आपल्यावर निस्सीम प्रेम करीत आहे असें समजून येतें, तेव्हां जो एकप्रकारचा आनंद व अभिमान होतो, तो खरोखरच अवर्णनीय आहे. मोठे कवी, हे वर्णन करण्याच्या कामांत फार निपुण असतात. तरी जिच्यावर आपलें मन आसक्त झालें असेल ती, वरचेवर अनेक संकटें आलीं तरी त्यांची पर्वा न करतां आपल्यावर अधिक प्रेम करित आहे, असें पाहून तिच्या हृदयवल्लभाला जो आनंद होतो, त्याचें वर्णन कोणत्याही कवीच्यानें केलें जाणार नाहीं. असो. आमच्या कथेचा नायक मोठा भाग्यशाली. त्याला यावेळीं ज्या अवर्णनीय सुखाचा अनुभव झाला आहे, त्याचें तरी कोण वर्णन करूं शकेल! असो.

याप्रमाणें त्या प्रेमळ स्त्रीपुरुषांचा प्रथमसमागम झाला. त्यांत उभयतांनीं वियोग झाल्यापासून ज्या ज्या गोष्टींचा अनुभव घडला, त्या त्या परस्परांना सांगण्यास आरंभ केला. एका बिच्छान्यावर एकमेकांच्या मानेखालीं हात घालून गालाला गाल लावून गोष्टी सांगत असतां रात्र सरली; पण गोष्टी सरल्या नाहींत. श्रीदत्ताला प्रियस्त्रीचा समागम, चुलत्याची भेट आणि मोठें ऐश्वर्य व प्रिया यांचा लाभ एकदम झाल्यामुळें फार आनंद झाला. तो मथुरेंत आपल्या चुलत्याच्या घरीं मोठ्या सुखानें राहूं लागला. तो आनंदसमुद्रांत डुंबत होता तरी त्याला मागचें विस्मरण झालें नाहीं. पूर्ण चंद्राला लांच्छन असावें त्याप्रमाणें श्रीदत्ताला बाहुशाल्यादिक प्रिय मित्रांची काळजी लागली होती. तो रात्रंदिवस मित्रांचा शोध लावण्याविषयीं प्रयत्न करीत होता व आपल्या बापाला

मारणाऱ्या **शक्तिवर्म्याचा** सूड उगविण्याची त्याला मोठी फिकर लागली होती. एकेदिवशीं त्याचा चुलता **श्रीदत्ताला** एकांतीं नेऊन ह्मणाला, "बाबा, एक संधी फार चांगली आली आहे. आमच्या **शूरसेन**राजाची **कुमुदिनी** नांवाची एक मुलगी आहे. सांप्रत ती उपवर झाली असून, **उज्जयिनी**च्या राजाच्या पुत्राला तिला देण्याचा निश्चय ठरला आहे. **शूरसेन** राजा **उज्जयिनी**ला जाणार नाहीं. त्याला येथें पुष्कळ काम आहे. परंतु विवाह **उज्जयिनी**तच होण्याचा ठराव झाला आहे; ह्मणून राजानें बरोबर पुष्कळ फौज घेऊन मुलीबरोबर मलाच जाण्याविषयीं हुकूम केला आहे. तर यावेळीं तूंही माझ्याबरोबर ये. वाटेंत राजकन्या कुमुदिनीचें मन वळवून मी तुझ्याशीं तिचा विवाह करून देण्याचा प्रयत्न करतों. ह्मणजे तुला स्त्रीचा लाभ होऊन आयतेंच तिच्या बरोबरचें सैन्यही मदतीस मिळेल. यक्षिणीनें दिलेले पांच हजार स्वार आपल्या जवळ आहेतच; त्यांत राजकन्येबरोबरच्या फौजेची मदत मिळाली ह्मणजे आपलें सैन्य बरेंच मोठें होईल. याशिवाय **शूरसेन** राजाचा तूं जांवयी होशील. तेव्हां अर्थात् त्याला सर्वप्रकारें तुझें साह्य करणें भाग पडेल. यावेळीं मुलगी तुला देण्याचें त्याच्या मनांत देखील आलेलें नाहीं व ती गोष्ट त्याला पसंतही पडणार नाहीं. पण एकदां लग्न झालें आणि त्याविषयीं कन्येनें आपला संतोष प्रदर्शित केला ह्मणजे त्याला राग येणार नाहीं. त्याचा कायतो सर्व जिवाळा या मुलीवर आहे. तिला जें आवडेल त्याविषयीं तो तेव्हांच अनुकूल होतो. तेव्हां मी ह्मणतों याप्रमाणें व्यवस्था केली तर तुला आपल्या बापाचा सूड उगवून शत्रूचें राज्य बळकावून बसण्यास फार सुलभ जाईल." चुलत्याचें हें भाषण **श्रीदत्ताला** तेव्हांच आवडलें. तेव्हां उभयतांनीं त्याचवेळीं पुढें कसें काय करावयाचें त्याचा संकेत ठरविला.

मग नियमित दिवशीं दोघेही संकेताप्रमाणें **शूरसेन**राजाच्या कन्येला बरोबर घेऊन मोठ्या फौजेसह **उज्जयिनीस** जाण्याला निघाले.

कांहीं मुक्काम जाऊन विंध्यपर्वताच्या अरण्यांत पोहोंचले. यांच्या येण्याचें वर्तमान भिल्ल लोकांस पूर्वींच समजलें होतें. ह्मणून ते आपली कडे-कोट तयारी करून एका खोऱ्यांत दबाव धरून बसले होते. हे जवळ आले असें पाहून अडचणीच्या जागीं रात्रीं एकदम त्यांणीं यांच्यावर हल्ला केला. त्या चोरांनीं मोठीच युक्ति केली. त्यांणीं आपल्या लोकांच्या तीन टोळ्या केल्या होत्या. एका टोळीनें अघाडीच्या फौजेवर हल्ला करण्याची हुलकावणी दाखवून त्यांस बरेंच दूर आडवाटेला नेऊन सोडलें. दुसऱ्या टोळीनें मागच्या बाजूनें येऊन हल्ला करण्याचा प्रयत्न केल्यावरून पिच्छाडीची फौज त्यांच्या मागें लागली. अशी संधी पाहून तिसऱ्या टोळीनें श्रीदत्त, त्याचा चुलता, राजकन्या इत्यादि खाशी मंडळी जेथें होती तेथें छापा घातला. मागची व पुढची फौज दुसरीकडे गुंतल्यामुळें राजकन्येबरोबर फार थोडे लोक राहिले होते. चोरांच्या टोळीनें त्यांची अगदीं दाणादाण करून सोडली. श्रीदत्त मोठा शूर होता; पण चोरांचा जमाव विशेष असल्याकारणानें त्याचा कांहीं इलाज चालेना. तशांतून त्याची तलवारही जवळ नव्हती. बराच वेळ दम धरून त्याणें चोरांशीं टक्कर मारली; पण शेवटीं श्रीदत्त, त्याचा चुलता, राजकन्या वगैरे सर्वांला कैद करून भिल्ल आपल्या राजधानींत घेऊन गेले. विंध्यपर्वताच्या खोऱ्यांत भील, कोळी, वगैरे चोर लोक बहुत रहात असत. त्यांणीं तेथेंच एक आपलें राज्य स्थापन केलें होतें. श्रीदत्ताला पूर्वीं ज्यानें खोड्यांत घातला होता, तो भीललोकांचाच राजा होता. देवीला मनुष्य बळी द्यावयाचा असा त्यांचा कुलाचार होता. श्रीदत्त एकवेळ त्यांच्या तडाक्यांतून सुटला होता; पण पुनः तोच प्रसंग त्याच्यावर आला. यावेळीं बली देण्याला पुष्कळ मनुष्यें त्यांच्या हातीं लागलीं होतीं. पण त्यांच्यांतील कांहीं लोकांनीं श्रीदत्ताला ओळखला आणि एकवेळ यानें आह्मास फसविलें आहे, ह्मणून त्यालाच प्रथम बळी द्यावा असा निश्चय करून त्या भयंकर देवीच्या मंदिरांत श्रीदत्ताला

नेला. तेथें पुष्कळ घंटा टांगलेल्या होत्या. देवळांत गेल्यावर ते चोर आनंदानें घांटा वाजवूं लागले. तो नाद ऐकून श्रीदत्ताला—आपणाला मृत्यूचें बोलावणें आलें आहे असें वाटलें. तेथें गेल्यावर श्रीदत्ताच्या मुसक्या सोडून त्याच्या अंगाला तेल लावून स्नान घातलें. नंतर फुलांच्या माळांनीं वगैरे शृंगारून त्याला उत्तम उत्तम पदार्थ यथेच्छ खाऊं घातले. हा सर्व विधी आटपल्यावर श्रीदत्ताला देवीच्या समोर हात जोडून उभा केला. आणि मानेवर तरवार ठेवून देवीची प्रार्थना करावयास सांगितलें. इतक्यांत श्रीदत्तानें जिच्याशीं गुप्तपणें विवाह केला होता, ती भिल्लांच्या राजाची कन्या सुंदरी आपल्या मुलग्याला कडेवर घेऊन हा समारंभ पाहण्यास देवळांत आली. देवीला नमस्कार करून बलिदानाकरितां उभा केलेल्या श्रीदत्ताच्या जवळ येऊन पाहते तों हा आपला पती; अशी तिची ओळख पटली. तेव्हां तत्काल आनंदित होऊन त्याच्या मानेवरची तरवार काढून त्याला न मारण्याविषयीं तिणें सर्व चोरांस हुकूम केला. सुंदरीचा बाप कांहीं दिवसांपूर्वीं मरण पावला होता. त्याला पुत्रसंतान नव्हतें म्हणून त्याणें मरतेवेळीं आपल्या सर्व राज्याचा अधिकार सुंदरीच्या मुलाला दिला होता. तिचा मुलगा वयानें अगदीं लहान होता. तेव्हां अर्थात् सर्व अधिकार सुंदरीच चालवीत होती. भिल्ललोक यावेळीं मोठे आनंदांत होते. एवढा प्रयत्न करून आणलेल्या श्रीदत्ताला बली दिल्यावांचून ते कधींही राहतेना; पण प्रत्यक्ष राणीनेंच मनाई केल्यामुळें निरुपायास्तव दांत ओंठ खाऊन त्यांणीं श्रीदत्ताला सोडला. त्याला बरोबर घेऊन सुंदरी आपल्या वाड्यांत गेली. आणि आपल्या बापाच्या मरणाची हकीकत सांगून आपलें शरीर, पुत्र आणि राज्य हीं तिणें श्रीदत्ताच्या हातीं दिलीं.

राज्याचा अधिकारी मुलगा अल्पवयस्क होता, तेव्हां अर्थात् सर्व अधिकार श्रीदत्ताच्याच हातीं आला. जिकडे तिकडे आजपासून या भिल्लांच्या राज्याचा सर्व कारभार माझ्या हातीं आहे—अशी दवंडी पिटवून श्रीदत्तानें सर्व कारभार आपल्या हातीं घेतला. आणि तत्काल

**शूरसेन** राजाची कन्या व आपला चुलता यांस चोरांनीं पूर्वी कैद करून ठेवलें होतें त्यांला मोकळें केलें. **सुंदरीनें मृगांकक** नांवाची तलवार—जी पूर्वीं तिच्या बापानें श्रीदत्ताजवळून घेतली होती, ती पुनः श्रीदत्ताला दिली. नंतर शुभमुहूर्त पाहून तेथेंच **शुरसेन**राजाच्या मुलीशीं त्याणें विवाह करून घेतला. यावेळीं श्रीदत्ताच्या तीन बायका झाल्या. सर्वांत, विवाहाच्या नात्यानें भिल्लाची कन्या **सुंदरी** हीच वडील झाली. राजकन्या **मृगांकवती** हिचा, **सुंदरी**च्या पूर्वींच स्वीकार केला होता, पण तिच्याशीं विवाह **मथुरें**त गेल्यावर झाला. **सुंदरी** क्षत्रियाची कन्या नव्हती, तरी लहानशा कां होईना, पण एका राजाची कन्या होती, व सांप्रत तर तिचेंच वर्चस्व होतें. कारण, श्रीदत्ताला तिचें राज्य मिळालें होतें व तिच्या योगानेंच सर्व भिल्ल त्याचे अंकित होऊन **श्रीदत्त** बलाढ्य झाला होता. जरी राज्याचा हक्क त्याच्या पुत्राचा होता तरी **सुंदरी**च्या आग्रहास्तव त्याणें तेथें मोठ्या समारंभानें आपल्याला राज्याभिषेक करून घेऊन 'महाराज' या पदवीचा स्वीकार केला. वाटेंत चोरांनीं हल्ला केल्यामुळें अस्ताव्यस्त झालेली आपली व **शूरसेन**-राजाची फौज एकत्र करून त्यांची चांगली व्यवस्था लावली.

यावेळीं श्रीदत्ताला जें राज्य मिळालें होतें तें केवळ भिल्ल कोळी वगैरे जंगली लोकांचें होतें. याच्यापूर्वी त्या राज्यावर अनेक पुरुषांनीं अधिकार चालविला होता; परंतु ते सर्व अडाणी असल्याकारणानें त्यांच्याकडून उत्तम व्यवस्था करण्यांत आली नाहीं. पण **श्रीदत्त** पडला ब्राह्मण. तो सर्व कामांत अतिशय हुषार होता. त्याणें उत्तम व्यवस्था करून त्याला सुराज्याचें स्वरूप आणलें. पूर्वी तेथें राजा हें फक्त नांव मात्र होतें. लोकांवर धाडा घालणें, लुटणें वगैरे चोरांचीं कामें चालू होतीं. पण श्रीदत्तानें, सारासार विचार पाहून गोरगरिबांना उपद्रव न देतां व कोणाच्या जिवाला इजा न करतां युक्तीनें आपलें काम करण्याविषयीं सर्व भिल्लांला सक्त ताकीद दिली. याप्रमाणें सर्व बंदो-

बस्त करून उज्जयिनीचा राजा त्रिविक्री व मथुरेचा राजा शूरसेन या दोघांही सासऱ्यांकडे, आपणास येऊन मिळण्याविषयीं त्याणें जासूद पाठविले. बापाचा ज्यानें क्रूरपणानें वध केला, त्या विक्रमशक्तीचा समूळ नाश करावा, ह्मणून श्रीदत्ताचा प्रयत्न चालला होता. दूतांनीं सांगितलेली सर्व हकीकत ऐकून ते दोघेही राजे श्रीदत्ताच्या भेटीस आले. प्रत्येकांच्या बरोबर बहुत सैन्य आलें होतें. जांवयाचें साह्य करण्याविषयीं मनापासून त्यांची तयारी होती.

इकडे बाहुशाली इत्यादिक त्याचे मित्र—चोरांनीं घायाळ केल्यामुळें विंध्याटवींत पडले होते ते तसेच युक्तिप्रयुक्तीनें परत उज्जयिनीस गेले होते. तेथें औषधउपचार करून त्यांच्या जखमा बऱ्या झाल्या. ते चांगले हुषार झाल्यावर श्रीदत्ताचा शोध करित होते. श्रीदत्तालाही त्यांच्याविषयीं मोठी काळजी लागली होती. राजकन्या मृगांकवती आपली प्रियसखी भावनिका इची काळजी करीत होती. लहानपणापासून तिच्यावर तिचें फार प्रेम होतें. परंतु हावेळपर्यंत एकमेकांला परस्परांचें वर्तमान देखील कळलें नव्हतें. ती गुप्तपणें बाहुशालीच्या घरांत राहात होती. श्रीदत्तानें आपल्या सासऱ्याला बोलावणें पाठविलें, व तो मोठी फौज घेऊन त्याला येऊन मिळाला. हें वर्तमान उज्जयिनींत जिकडे तिकडे प्रसिद्ध झालें. तेव्हां श्रीदत्त व मृगांकवती यांचा समाचार बाहुशाली इत्यादिकांला कळला. तेव्हां ते फार आनंदित होऊन भावनिकेला बरोबर घेऊन श्रीदत्ताच्या भेटीस आले. बहुत दिवस वियुक्त झालेल्या मित्रांच्या भेटीनें श्रीदत्ताला फारच आनंद झाला. बहुशाली इत्यादि मित्र तेथें पोहोंचले त्यावेळीं श्रीदत्त, आपले उभयतां सासरे व इतर सरदार यांसहवर्तमान सभेंत कांहीं विचार करित बसला होता. त्याला हे आल्याचें वर्तमान समजतांच मोठ्या त्वरेनें पुढें जाऊन त्यानें त्या आपल्या प्रियमित्रांला कडकडून आलिंगन दिलें. भावनिका श्रीदत्ताला नमस्कार करून मृगांकवती-

कडे गेली. आपल्या मित्रांला विश्रांति घेण्यास सांगून **श्रीदत्त** पुनः सभेंत जाऊन बसला. इकडे सेवकांनीं **भावनिकेला मृगांकवती**जवळ नेलें. तेव्हां डोळ्यांतून प्रेमाश्रू पडत आहेत, अशा स्थितींत दोघी एकमेकींला भेटल्या. परस्परांनीं, वियोग झाल्यापासून घडलेलें सर्व वर्तमान एकमेकींला सांगितलें. **भावनिका** हावेळपर्यंत अज्ञातवासांत होती. कारण, **मृगांकवती** आईबापांस न सांगतां घरांतून पळून गेली व त्याकामीं **भावनिकेनें** साह्य केलें, किंवा त्याची प्रवर्तक कायती हीच; असा तिच्यावर आरोप होता. ती राजा **बिंबिकीच्या** हातीं लागली असती तर तिला फार दुःख भोगावें लागलें असतें. ह्मणून **बाहूशाली**इत्यादिकांनीं मोठ्या बंदोबस्तानें तिला छपवून ठेविली होती. **मृगांकवती**ही, तिचा बाप तेथें येईपर्यंत अपराधीच होती. नंतर, **श्रीदत्ता**सारखा योग्य पती मिळाला ह्मणून राजा **बिंबिकीला** फार आनंद झाल्यावरून त्याणें तिला अपराधाची क्षमा केली होती. तशीच **भावनिके**वरही आपल्या बापानें दया करावी असें तिच्या मनांत आल्यावरून तिणें एकांतीं **भावनिकेला** आपल्या बापाच्या पायां-वर घालून तिलाही क्षमा करण्याविषयीं त्याची प्रार्थना केली. तेव्हां राजा **बिंबिकी** सद्गदित होऊन ह्मणाला, "हिच्याविषयीं माझी प्रार्थना करावयास नको. तूं जें केलेंस तें जेव्हां मी मान्य केलें, तेव्हांच हिच्यावरचा देखील माझा राग गेला. ईश्वर तुमचें कल्याण करो. तुह्मी जें केलेंत तें सर्व चांगलेंच झालें. आतां त्याबद्दल एक अक्षर देखील काढूं नका." असें सांगून त्यानें दोघींचेंही समाधान केलें.

इकडे **श्रीदत्तानें** लढाईची सर्व तयारी केली. त्याच्याजवळ यावेळीं फारच मोठी फौज जमा झाली होती. **बिंबिकी** व **शूरसेन** यांनीं आपल्याबरोबर जें सैन्य आणलें होतें त्यांचें आधिपत्य ते स्वतःच करित होते. **यक्षिणीनें** दिलेल्या पांच हजार स्वारांवर **बाहुशालीला** मुख्य अधिकारी केला. सर्व भिल्लांच्या फौजेवर त्यांचा जो मूळचा अधि-कारी होता, त्यालाच मुख्य करून सर्व फौजेचें आधिपत्य **श्रीदत्तानें** स्वतः

आपल्याकडे घेतलें. आपल्या चुलत्याला सर्व सैन्यांची व्यवस्था ठेवण्याचें काम दिलें. याप्रमाणें निरनिराळ्या कामावर अधिकारी नेमून कडेकोट बंदोबस्त करून **श्रीदत्तानें** आपल्या शत्रूवर स्वारी करण्यास प्रस्थान ठेविलें. एका चतुर दूताला पुढें पाठवून, बापाला मारणाऱ्या **विक्रमशक्तीला** **श्रीदत्तानें** निरोप कळविला. त्यानेंही लढाईची तयारी केली. फार दिवस **श्रीदत्ताचें** कांहीं वर्तमान त्याला समजलें नव्हतें. तो, हा **गंगेंत** बुडाला असेंच समजत होता. तरी त्याच्याविषयीं **विक्रमशक्तीला** मोठी धास्ती होती. 'त्याच्या बापाला मारून आपण त्याची सर्व संपत्ति उध्वस्त केली आहे, पण कदाचित् तो जीवंत असेल तर कधींना कधीं सूड घेतल्यावांचून राहणार नाहीं,'—असें त्याच्या मनांत वारंवार येत होतें. ह्मणून तो **श्रीदत्ता**विषयीं केवळ असावध नव्हता. दूतानें वर्तमान सांगितलें तेव्हां तर त्याची पुरतीच खात्री झाली. तो आपल्या फौजेचा नीट बंदोबस्त करून **श्रीदत्ताचा** सामना करण्यास पुढें येण्याची तयारी करीत [illegible] फौज त्याच्या नगराशेजारीं जाऊन पोहों[illegible] युद्ध झालें. **विक्रमश-क्तीनें** आप[illegible]. तथापि त्याचा अगदीं पराभव झाला. आ[illegible] स्वभावतःच अनुरक्त होते. कारण, त्याचा ब[illegible]यवान् होता. तो नेहमीं लोकांवर उपकार करित [illegible]क त्याला फार चाहात असत. **श्रीदत्त** हा त्याचा एकुलता [illegible] मुलगा. हा लहानपणापासून सद्गुणी व लोकांशीं मिळून वागणारा. **कालनेमीचा** तशा क्रूररितीनें **विक्रमशक्तीनें** नाश केला, हें कोणासही आवडलें नव्हतें. **विक्रमशक्तीचा** स्वभाव क्रूर होता. लोक त्याच्याविषयीं राजी नव्हते. प्रत्यक्ष त्याचे प्रधान, सेनापती, इत्यादि कामदारदेखील त्याला चाहत नसत. **श्रीदत्तानें** त्याच्या-वर स्वारी केली, हें सर्व लोकांला मनापासून आवडलें. असो.

**विक्रमशक्तीचा** पराभव झाल्यावर तो पळून जाण्याचा प्रयत्न करीत

होता; इतक्यांत श्रीदत्त आपली मृगांकक तलवार हातांत घेऊन धांवत पुढें गेला. आणि विक्रमशक्तीची शेंडी धरून त्याला उभा केला. सर्व लोक हा चमत्कार पाहत होते. तेव्हां श्रीदत्त सर्वांला उद्देशून ह्मणाला, "आमच्या आणि शत्रूच्या सैन्यांतील वीरहो! अम्मळ इकडे लक्ष देऊन माझें भाषण ऐका. हा माझा शत्रू विक्रमशक्ति यावेळीं माझ्या हातांत सांपडला आहे. लहानपणांत याच्या बापानें माझी याच्याशीं मैत्री करून दिली. त्यादिवसापासून खरोखर मी याचा कांहीं अन्याय केला नाहीं. हा मोठा गर्विष्ठ असून स्वभावानें दुष्ट आहे. लहानपणीं खेळत असतां वारंवार माझ्याकडून याचा पराभव होत असे. त्यामुळें हा नेहमीं माझ्यावर दांत ओंठ खात होता. एकेदिवशीं गंगेच्या वाळवंटांत आमची कुस्ती झाली. त्यांत याचा पराजय झाला. व त्याच दिवशीं मी एका गुप्त ठिकाणीं कांहीं दैविक चमत्कारानें गेलों होतों. तो बहुत दिवस परत आलों नाहीं. या[illegible] याचा बाप परलोकवासी झाल्यामुळें राज्याचा अधिका[illegible] [illegible]खेळांतलें वैर मनांत ठेवून या दुष्टा[illegible] [illegible]ईट रीतीनें वध केला! त्या दु[illegible] [illegible]ली. यानें माझें घरदार लुटून [illegible] आज माझ्या हातांत सांपडला आहे. दगा [illegible]च नाश केला असता; पण तसें करणें हें शूर पुरुषाल[illegible] [illegible]रवाणें आहे; ह्मणून इतके दिवस अनेक दुःखें व संकटें भोगून लढाईची तयारी केली. तर शूरपुरुषांला मान्य होईल अशा रीतीनें मी याला युद्धांत जिंकून आतां आपल्या बापाच्या ऋणांतून मुक्त होणार. याच्या अंगीं सामर्थ्य असेल तर यानें आपला बचाव करावा. हा पहा मी याचें मस्तक तोडून रणयज्ञांत हवन करून वैराग्नीला पूर्णाहुती देतों." असें ह्मणून श्रीदत्तानें तत्काल त्याचें मस्तक उडविलें; तेव्हां सर्व लोकांनीं श्रीदत्ताचा जयजयकार केला. विक्रमशक्ती लढाईत मरण पावला हें पाहून त्याचे प्रधान व नगरांतील

सर्व लोक अस्वस्थ होऊन भयानें श्रीदत्ताला शरण आले. त्या सर्वांला अभय देऊन श्रीदत्तानें त्यांचें समाधान केलें. नंतर प्रधानादिकांनीं सत्कारपूर्वक श्रीदत्ताला राजवाड्यांत नेला. आणि तेथें सर्वांनीं एकविचारानें आपआपल्यांत निश्चय करून श्रीदत्ताला राज्याभिषेक केला. त्यावेळीं मृगांकवती व शूरसेनराजाची कन्या कुमुदिनी ह्या दोघीही त्याच्याजवळ बसल्या होत्या. हा प्रसंग फारच आनंदकारक झाला. श्रीदत्ताला आपण कृतकृत्य झालों असें वाटलें. त्याणें प्रधान, सेनापती, नगरांतील इतर संभावित, बंदी, भाट इत्यादि सर्व लोकांला त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें वस्त्रें, अलंकार वगैरे देऊन त्यांचा सत्कार केला. पूर्वीं ज्यांच्याकडे जीं कामें होतीं तीं त्यांच्याकडेच सोंपविलीं. याप्रमाणें सर्व लोकांला त्यानें संतुष्ट केलें.

राजा बिंबिकी व शूरसेन या उभयतांलाही जांवयाचें ऐश्वर्य पाहून फार संतोष झाला. श्रीदत्तानें ... ांना कांहीं दिवस ठेवून घेतलें. मग त्याचा व आपआ... ोप घेऊन ते स्वस्थानीं निघून गेले. चुलता श्रीद... त होता, पण त्यानें दिला नाहीं. त्याला मुख्य ... र देऊन सर्व कारभार त्याच्या हातीं दिला. व ... ांला त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें अधिकार देऊ... ऊन त्यांच्या ऋणांतून मुक्त झाला. सुंदरीही श्रीदत्ताबरोबर आली होती. तिच्या मुलग्याच्या राज्याची व्यवस्था ठेवण्याकरितां कामदार वगैरे नेमून प्रीतिपूर्वक पुत्रासहवर्तमान श्रीदत्तानें तिला आपल्या राजधानींत पाठविलें. भिल्ल वगैरे जे लोक त्याच्याबरोबर साह्य करण्याकरितां आले होते, त्या सर्वांचेंही त्यानें मोठें गौरव केलें. श्रीदत्त मोठा शूर व चतुर होता; त्यानें आपल्या राज्याचा नीट बंदोबस्त करून हळू हळू आपली सत्ता वाढविली. जे इतर राजे त्याला वश झाले, त्यांना अभय देऊन स्पर्धा करणाऱ्या शत्रूंचा पराभव करून त्यानें सार्वभौमपदवी

संपादन केली. याप्रमाणें अनेक संकटें आलीं तरी आपलें धैर्य न खचूं देतां **श्रीदत्तानें मृगांकवतीसह** समुद्रवलयांकित पृथ्वीचें चिरकाल राज्य केलें."

ही कथा सांगून **संगतक** ह्मणाला, "महाराज जे पुरुष धैर्य धरतात, ते संकटसमुद्राला तरून सुखाचा अनुभव घेतात. आपणही शूर व धीर आहां. राणीसाहेबांचा वियोग आतां फार दिवस राहणार नाहीं. दुःखाचे दिवस मागें पडले. आतां चिरकाल सुखाचाच उपभोग कराल." राजा **सहस्रानीक मृगावतीच्या** भेटीविषयीं फार उत्सुक झाला होता. **संगतकानें** सांगितलेली **श्रीदत्ताची** कथा ऐकून त्याचें मन प्रियेच्या भेटीविषयीं फारच आतूर झालें. रात्र कधीं सरेल व मीं आपल्या प्रियेला कधीं भेटेन असें त्याला झालें होतें. विरहावस्थेंत दिवस कसा तरी जातो; पण रात्र सरतां सरत नाहींसें होतें. **सहस्रानीकराजा** रात्रभर तळमळत होता. त्याला निद्रा कशीती मुळींच लागली नाहीं. पहाट होतांच निघण्याची तयार[illegible] जड शरीर रथावर बसून मार्ग चालत होतें, तरी त्या [illegible]पी रथावर बसून प्रियेला निरोप सांगण्याकरितांच कीं [illegible] होता. याप्रमाणें तो मुक्काम करित करित उदया[illegible]च्या आश्रमाजवळ पोहोंचला. आश्रमांतील ऋषिजनां[illegible] ह्मणून आपला परिवार बाहेर ठेवून **संगतकाला** बरो[illegible]ांनीं आश्रमांत गेला. तो आश्रम फारच शांत होता. हा[illegible]ादिक श्वापदें देखील शांतपणें वागत असत. जिकडे तिकडे अग्निहोत्रें प्रदिप्त झालीं होतीं. पक्षी मंजुळ शब्दानें राजाचें, जणुं स्वागत करीत आहेत, असें वाटत होतें. राजा **सहस्रानीक** आला, हें वर्तमान शिष्यांनीं **जमदग्नीला** सांगितलें. तेव्हां ऋषि सामोरा जाऊन त्या राजर्षिला सत्कारपूर्वक आंत घेऊन गेला. **सहस्रानीकानें** ऋषीला नम्रतापूर्वक नमस्कार केला. व परस्परांचे कुशलप्रश्न इत्यादि शिष्टाचार झाला. तेव्हां ऋषीच्या जवळच, तापस्याचा वेष धारणकरणारा तेजस्वी मुलगा पाहून, कौतुकानें राजा ह्मणाला, "महाराज,

आपले हे शिष्यवर्ग मी पाहिले. यांत माझ्या नेत्रांला आनंद देणाऱ्या ह्या शिष्याला वरचेवर पहावें असें वाटतें. हा ब्रह्मचारी तर आहेच; पण ब्राह्मण कीं क्षत्रीय ? याविषयीं मात्र मला संशय वाटत आहे. बहुतकरून हा क्षात्रियच असावा, असें वाटतें." हें कौतुकाचें राजाचें भाषण ऐकून हास्य करून **जमदग्नी** ह्मणाला, "होय. हा क्षत्रिय-बटूच आहे. दैववशात् याला असा वनवास प्राप्त झाला आहे. पण लौकरच आपल्या कुळाला उचित अशा ऐश्वर्याचा हा उपभोग करील." **उदयनाला** राजा **सहस्रानीक** येथें येणार आहे व तोच आपला पिता हें आईच्या सांगण्यावरून माहीत होतें. परंतु प्रत्यक्ष आपल्या बापाला त्यानें मुळीं पाहिलाच नव्हता, तेव्हां त्याची ओळख कशी असणार! **जमदग्नीनें उदयनाला** आपल्या बापाला नमस्कार करण्यास सांगितलें. **मृगावतीला** राजा आला, हें वर्तमान समजल्यावरून ती त्याच्या दर्शनाविषयीं फार आतूर झाली होती. तथापि ऋषीच्या आज्ञेवांचून एकदम राजासमोर येण्याविषयीं संकोच वाटल्यामुळें ती आड राहून राजाकडे पहात होती. **सहस्रानीकाचेंही** सर्व लक्ष्य तिच्याकडेच लागलें होतें. तिला कधीं पाहीन ह्मणून तो उत्कंठित झाला होता तरी संकोचानें त्याचें मन दबलें होतें. ऋषी तिला बोलावून, एकदां केव्हां आपली भेट करून देईल ह्मणून तो वाट पहात होता. इतक्यांत **जमदग्नीनें**—"बाळा, तुझ्या आईला बोलावून आण"—असें **उदयनाला** सांगितलें. तेव्हां **सहस्रानीकाचा** जीव अम्मळ स्थीर झाला. **मृगावती** वाटच पहात होती. ऋषीची आज्ञा होतांच पुत्रासहवर्तमान ती बाहेर आली. यावेळीं लज्जेनें तिची गती फारच मंद झाली होती. ती मोठ्या भिडेनें पुढें आली आणि प्रथम ऋषीला व नंतर राजाला नमस्कार करून बाजूला उभी राहिली. **उदयनानेंही** आपल्या पित्याला नमस्कार केला. ऋषीनें त्याचा संबंध वगैरे पूर्वींच सांगितला होता, तेव्हां **सहस्रानीकानें** पुत्राला मांडीवर घेऊन प्रेमाश्रूंनीं त्याला स्नान

घातलें. ऋषी म्हणाला, "राजा, आम्ही तुला कांहीं सांगितलें पाहिजे असें नाहीं. ही मृगावती तुझी स्त्री हें तुला माहीत आहेच. तूं हिचा बुद्धिपूर्वक वियोग व्हावा अशी इच्छा देखील कधीं केली नाहींस. पण दैवानें तुम्हा उभयतांची ताडातोड केली. ही इतके दिवस आमच्या आश्रमांत माझ्या मुलीप्रमाणें राहिली. ज्या शापाच्या प्रभावानें तुह्मा दोघांचा वियोग झाला होता, त्याचा आतां अंत झाला. हा तुझाच पुत्र. आम्हीं याचे सर्व संस्कार करून सर्व विद्येंत याला निपूण केला आहे. हा पुत्र मोठा अलौकिक पराक्रमी व तेजस्वी होणार आहे. याच्या योगानें तुझा वंश सुप्रतिष्ठित होईल." **जमदग्नीचें** भाषण संपतें आहे तों राजाला व **मृगावतीला** गहिंवर आला. **सहस्रानीक** म्हणाला, "ही सर्व आपली कृपा आहे. आपलें दर्शन झालें नसतें तर माझ्या स्त्रीची पुनः भेट होण्याची आशा नव्हती. आपण माझ्या स्त्रीचें आणि पुत्राचें आपण प्रतिपालन केलें म्हणून हा आजचा आनंदकारक समय प्राप्त झाला आहे. आपल्या कृपेनें माझे सर्व मनोरथ पूर्ण होतील." इत्यादिप्रकारें राजानें **जमदग्नीला** कृतज्ञता दाखविली. त्या दिवशीं सैन्यासहवर्तमान **सहस्रानीकाला** ऋषीनें मोठ्या थाटाची मेजवानी दिली. त्याच्या घरीं **कामधेनु** होती, ती इच्छामात्रानें जें पाहिजे तें पुरवीत असे. **सहस्रानीकाला**—तपोवनांत राहणारा ऋषी मेजवानी ती कसली देणार ?—असें प्रथम वाटलें होतें. पण आयतेवेळीं झालेली तयारी पाहून तो अगदीं थक्क झाला. तीं सर्व सोन्यारुप्याचीं भांडीं, उत्तम उत्तम पक्वान्नें, इत्यादिकांचा थाट असा अप्रतिम होता कीं, तसा **सहस्रानीकाच्या**येथेंही कधीं होण्याचा संभव नव्हता. असो.

याप्रमाणें ऋषीनें केलेला सत्कार ग्रहण करून त्यादिवशीं तेथें राहिला. आणि दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं ऋषीची आज्ञा घेऊन राजा **सहस्रानीक, मृगावती** आणि **उदयन** यांना बरोबर घेऊन आपल्या राजधानीला जावयास निघाला. **मृगावती** त्या आश्रमांत फार दिवस राहिली

होती. तिचें मन सदय व उदार होतें; ह्मणून तेथील सर्व प्राणिमात्र तिच्यावर प्रीती करीत असत. ऋषी, त्यांच्या स्त्रिया, पुत्र, शिष्य, व हरीण, पक्षी इत्यादि श्वापदें देखील **मृगावती**च्या जाण्याचें वर्तमान ऐकून दुःखित झालीं. तसाच **उदयना**चाही त्यांना फार लळा लागला होता. त्याच्या बरोबर खेळणारे ऋषिपुत्र फारच दुःखित झाले. "तूं कसा झालास तरी राजाचा पुत्र आहेस. आम्ही अरण्यांत राहणारे गरीब ब्राह्मणाचे मुलगे. इतके दिवस कांहीं एका निमित्तानें तूं येथें होतास; नाहीं-तर असल्या जंगलांत तूं कशाला येशील ? आणि आतां आपल्या बापाबरो-बर गेलास म्हणजे तुला आमचें स्मरण तरी कशानें होणार आहे." असें बोलून ते डोळ्यांतून टपटपा अश्रू टाकित होते. ऋषिपत्नी इत्यादिकांनीं त्यांच्या प्रयाणकालीं मंगलकारक जें कांहीं कृत्य करावयाचें होतें तें केलें. **मृगावती**ला न्हाऊं घालून ओंटी भरणें वगैरे शिष्टाचार करून पुत्रासह-वर्तमान तिच्यावर आशीर्वादांची वृष्टी केली. राजा **सहस्रानीक**, **जमदग्नी** व इतर ऋषी यांला नमस्कार करून त्यांच्या आज्ञेनें **उदयन** व **मृगावती** यांला पुढें करून रथावर बसला. **जमदग्नि**प्रमुख सर्व ऋषी त्याला पोहोंचवून परत आपल्या आश्रमांत गेले. त्यादिवशीं सर्व आश्रम अगदीं शून्य झाल्यासारखा वाटला. **मृगावती**च्या स्नेहपाशानें बद्ध झालेले हरीण देखील अश्रुपात करीत तिला पोंहचविण्यास गेले होते.

इकडे **सहस्रानीक** मोठ्या आनंदानें प्रियेसह मार्ग क्रमण करूं लागला. **मृगावती**ची आश्रमांतच भेट झाली होती, परंतु तेथें, मन मोकळें करून गोष्टी बोलण्यास उभयतांलाही सवड मिळाली नव्हती. मार्गांत परस्परांच्या विशेष गोष्टी झाल्या. **मृगावती**नें **कौशांबी**नगरींतून गेल्यापासून हावेळपर्यंत झालेलें सर्व वर्तमान राजाला सांगितलें. राजानेंही तिचा विरह झाल्यापासून काय काय सुखदुःखाच्या गोष्टी झाल्या त्या सर्व तिला सांगितल्या. जातेवेळीं **सहस्रानीका**ला तो मार्ग सरतां सरेनासा झाला होता; पण यावेळची स्थिती तशी नव्हती. मार्ग केव्हां सरला हें त्याला समजलें देखील नाहीं.

इकडे, आपला राजा स्त्री व पुत्राला घेऊन येतो आहे हें वर्तमान ऐकून, कौशांबीनगरवासी लोकांना मोठा आनंद झाला. शहरांत जिकडे तिकडे ध्वज, पताका इत्यादि उत्सवदर्शक चिन्हें उभारलीं होतीं. मार्गावर चंदनाचा सडा घालून सुंदर रांगोळ्या घातल्या होत्या. ठिकठिकाणीं तोरणें बांधलीं होतीं. राजा जवळ येऊन पोंहचला तेव्हां सर्व लोक, प्रधान, सेनापती इत्यादिकांला पुढें करून त्याला सामोरे गेले. आणि मोठ्या समारंभानें आपल्या राजाला नगरांत आणिला. सहस्रानीकावर सर्व प्रजा अनुरक्त होत्या. मृगावतीचा वियोग झाल्यापासून त्याच्या दुःखकारक स्थितीविषयीं प्रजा फार हळहळत होती. नाहींशी झालेली मृगावती पुत्रासहवर्तमान पुनः मिळून सहस्रानीकाची काळजी नाहींशी झाली, हें पाहून लोकांना फार संतोष झाला. नगरवासी जन त्या उदार राजाची आनंदित मुद्रा आपल्या डोळ्यांनीं जणुं काय पीत आहेत असें वाटत होतें. सहस्रानीक राजवाड्यांत जाऊन मृगावती व उदयन यांसहवर्तमान घरांतील सर्व गुरुजन व आप्त इष्ट मित्र, यांनां भेटला. दुसऱ्या दिवशीं नगरवासी जन व प्रधान वगैरे यांचा मोठा समाज जमवून उदयन व मृगावती यांच्या संबंधाची सर्व हकीकत राजानें त्यांला सांगितली. उदयनाचें वर्तन, पराक्रम, व गुण इत्यादिकांनीं, लौकरच तो सर्वांचा आवडता झाला. प्रधानादिक कामदारलोक व नगरांतलि इतर संभावित लोक या सर्वांचा त्याच्याविषयीं फार चांगला ग्रह झाला. यौवराज्याचा त्याला अभिषेक करावा ह्मणून लोकांनीं फार आग्रह केल्यावरून सहस्रानीकानें उदयनाला युवराज केला. आणि आपल्या मुख्य प्रधानाचा पुत्र यौगंधरायण व सेनापतीचा पुत्र रुमण्वान् आणि खुष्मस्क्याचा मुलगा वसंतक यांना त्याचे साह्यकारी व सल्लामसलत देणारे केले. याप्रमाणें त्या तिघांकडे निरनिराळ्या कामांची योजना करतेवेळीं यौगंधरायणाच्या संबंधानें राजाला उद्देशून—"ह्या प्रधानाच्या साह्यानें तुझा पुत्र समुद्रवलयांकित पृथ्वीचा उपभोग करील."—अशी उत्तर दिशेकडून आकाशवाणी होऊन पुष्पवृष्टी झाली !

**उदयन** अधिकारावर आरूढ होतांच हळुहळु सर्व कारभार उत्तमप्रकारें चालवूं लागला. हें पाहून **सहस्रानीकानें** क्रमाक्रमानें निरनिराळीं कामें त्याच्या हातीं सोंपवून, दिवसेंदिवस राज्यकारभारांतलें आपलें लक्ष्य कमी केलें. याप्रमाणें राणी **मृगावती** व भाग्यशाली **उदयन** यांसहवर्तमान सुखाचा उपभोग घेत असतां राजा **सहस्रानीकाचें** वय उतार झालें. दिवसेंदिवस परलोकसाधनाकडे त्याचें लक्ष्य जाऊं लागलें. **मृगावतीही** वृद्ध झाली, अशा समयांत शांतीची दूती जी जरा ( ह्मातारपण ) तिणें राजाच्या कानाजवळ येऊन कांहीं कुजबुजल्यासारखें केलें. हें पाहून विषयेच्छेला तत्काल मोठा राग आला ह्मणूनच कीं काय? ती, त्याला सोडून चालती झाली. नंतर, ज्याच्यावर सर्व प्रजा अनुरक्त आहेत अशा **उदयनाला**—जगाचा उदय व्हावा ह्मणूनच कीं काय—राज्याभिषेक करून राजा **सहस्रानीक** विरक्त होत्साता, आपल्या बरोबरीचे प्रधान व सेवक इत्यादिकांला समागमें घेऊन **मृगावती**-सहवर्तमान **हिमाचलावर** तप करण्याकरितां निघून गेला. **उदयन** त्यांला निरोप देत नव्हता, परंतु वृद्धपणीं परलोकसाधन करण्याच्या कामांत अंतराय होऊंनये ह्मणून निरुपायास्तव त्याणें आपली सम्मती दिली. नंतर **हिमाचलावर** बहुत दिवस उग्र तप करून राजर्षी **सहस्रानीक** आपली प्रिया जी मृगावती तिच्यासहवर्तमान इंद्राचा अतिथी होऊन दिव्य सुखाचा उपभोग करिता आला.

इकडे आईबापांच्या वियोगानें दुःखित झालेल्या **उदयनराजाचें** **यौगंधरायणादिक** प्रधान व इतर लोकांनी अनेक प्रकारें सांत्वन केलें. तेव्हां मन स्थीर करून तो राज्यकारभार पाहूं लागला. तो स्वतः सर्व कामांत निपुण होता व मुख्यप्रधान **यौगंधरायण** आणि सेनापती **रुमण्वान्** हे दोघेही निस्सीम राजभक्त होते. ते आपल्या यजमानाचें कोणत्याही रीतीनें न्यून पडूं देत नसत. **उदयनही** त्यांच्याशीं चांगला वागत होता. पिता **सहस्रानीक** तपोवनाला गेल्यावर **उदयन** थोडेदिवस राज्यकार-

भार उत्तमप्रकारें पाहत होता; पण त्यापासून फार श्रम झाले म्हणूनच कीं काय, विश्रांती घेण्याकरितां त्याणें सर्व भार त्या दोघां प्रधानांवरच टाकला. तारुण्याच्या ऐन बहरांत आल्यामुळें उदयनाचें लक्ष्य विषयसुखाकडे ओढ घेऊं लागलें, परंतु मनाला आनंद देणारी अनुरूप स्त्री हावेळपर्यंत त्याला प्राप्त झाली नव्हती, ह्मणून त्याला घरांत करमेनासें झालें. कशीतरी मनाची रमवणूक करावी म्हणून, पूर्वी वासुकीनें दिलेली घोषवती नांवाची वीणा तो रात्रंदिवस वाजवीत असे. त्याला मृगयेचा फारच नाद लागला. तो अरण्यांत जाऊन वीणेच्या नादानें मोहित झालेले जंगली हत्ती वारंवार धरून आणीत असे. त्याच्या वीणेचा नाद हा एक मोहन अथवा वशीकरण करण्याचा मंत्रच झाला होता! भगवान् कृष्णाच्या मुरलीचा शब्द ऐकून गोपिका जशा मोहित होत असत, तद्वत् याच्या वीणेच्या आवाजानें नगरांतील स्त्रिया फार मोहित होत असत. आधींच स्वरूपानें अत्यंत सुंदर, तशांतून तारुण्याच्या बहरांत आलेला, राजलक्ष्मीच्या तेजानें दैदीप्यमान् असून मोठा रंगेला, अशा उदयनाला पाहून कोण बरें मोहित होणार नाहीं? यावेळीं त्याच्या मनाला रमवील अशा प्रकारची पत्नी पाहिजे होती; पण तसा योग न आल्याकारणानें त्याला सहजच वेश्यांचा नाद लागला! द्रव्याच्या इच्छेनें पाहिजे त्या पुरुषावर—आपण फार प्रीति करीत आहों, असें वेश्या दाखवितात; पण ह्या रंगेल्या पुरुषानें उलट त्यांनाच वेड लावलें होतें! रात्रंदिवस मोहन मंत्रानें भारल्याप्रमाणें त्या राजाच्या आसमंतात् बसल्या रहात. त्या विश्वयोषितांबरोबरच सुरादेवीनेंही त्याला वरलें. मद्याला 'वीरपान' म्हणतात. फार प्राचीनकाळापासून क्षत्रिय त्याचें सेवन करीत असत. पण त्याला कांहीं मर्यादा असणें अवश्य आहे. वेश्या,—ज्यांत आपल्या मुखाचें प्रतिबिंब पडलें आहे, अशा—मद्याचे प्याले वरचेवर भरून देत व उदयन वारंवार पीत असे. अशा प्रकारची राजाची स्थिती पाहून प्रधानांच्या तोंडावरचेंही पाणी हळुहळू उतरत चाललें. हा कसा ताळ्यावर येईल?

याची त्यांना मोठी काळजी लागली होती. उत्तम स्त्री मिळाल्यावांचून याची स्थिती सुधारणार नाहीं, असा त्यांचा पुरा निश्चय झाला; **पण** त्याच्या योग्य राजकन्या कोठें आढळली नाहीं. बहुत शोध करतां करतां उज्जयिनीचा राजा **चंडमहासेन** याची **वासवदत्ता**नांवाची कन्या सर्व गुणांनीं अनुरूप आहे, असें समजल्यावरून त्यांणीं हें वर्तमान **उदयनाला** सांगितलें. त्यालाही ती गोष्ट मान्य झाली. पण **वासवदत्तेची** प्राप्ती कशी होईल ? याची मोठी चिंता पडली.

इकडे **चंडमहासेन**ही आपल्या कन्येला योग्य वर पहातच होता. त्याला, **वत्सदेशाचा** राजा **उदयन** यावांचून साऱ्या पृथ्वींत आपल्या कन्येला योग्य वर दुसरा कोणी आढळला नाहीं; पण हा विवाहाचा योग आणावा कसा ? याविषयीं मात्र तो विचार करित होता. क्षत्रियांत कन्या मागण्याचा अथवा सांगून देण्याचा सांप्रदाय होता. परंतु **वत्सराज** आणि उज्जयिनीचा राजा यांचें पिढीजादें हाडवैर होतें; ह्मणून दोघांलाही मोठें संकट पडलें होतें. शेवटीं **चंडमहासेनानें** विचार करून एक उपाय शोधून काढिला. तो असा कीं, **उदयनाला** मृगयेचें, व्यसन फार आहे, तो हत्तींला पकडण्याकरतां त्यांच्या मागें एकटाच फिरत असतो. तेव्हां अशा संधींत त्याला गांठून पकडून आपल्या घरीं आणावा. नंतर, गायन, नृत्य इत्यादिकांत तो फार निपूण आहे. तेव्हां **वासवदत्तेला** संगीत शिकण्याकरितां म्हणून त्याची तिला शिष्यीण करावी. याप्रमाणें दोघांचा एकत्र वास झाला म्हणजे **वासवदत्तेवर** निःसंशय त्याचें मन बसेल. आणि असें झालें म्हणजे त्याला आपला जांवई करून वत्सदेशाला रवाना करावा. असें केलें म्हणजे राजकीय संबंधांतही तो आपल्याशीं कधींही वांकडा होणार नाहीं व आपण होऊन प्रार्थना केल्यावांचून, **वासवदत्तेला** मनाजोक्ता नवराही मिळेल. तेव्हां यावांचून **उदयनाला** वश करण्याविषयीं दुसरा कोणताही उपाय नाहीं. असा विचार करून आपल्या मनांतील इच्छित कार्य सिद्ध होण्याकरितां

देवीची पूजा करून त्याणें तिला नवस केला. त्यावेळीं, "राजा, हा तुझा मनोरथ लौकरच सिद्ध होईल." अशा अर्थाची आकाशवाणी त्याच्या कानीं पडली. तेव्हां संतुष्ट होऊन बुद्धिदत्त नांवाच्या आपल्या प्रधानासह राजा चंडमहासेन त्याच गोष्टीचा विचार करूं लागला. शेवटीं—'मोठा मानी असून निर्लोभी सेवकजन ज्याच्यावर प्रेम करित आहेत असा वत्सराज सामदानादि उपायांनीं अनुकूल होण्यासारखा नाहीं; तथापि एकवेळ त्याच्याशीं साम करून पहावें. कदाचित् न साध्य झाला तर पूर्वी योजून ठेवलेला उपाय आहेच.'—असा विचार करून त्याणें एका चतुर दूताला निरोप सांगून वत्सराजाकडे पाठविला. तो कौशांबींत येऊन प्रथम यौगंधरायणाला भेटला. राजा उदयन तर सार्वकाळ चैनींतच निमग्न झालेला होता. त्याला आपल्या अथवा परकीय राज्यांत काय उलाढाली होत आहेत, त्यांची मुळींच खबर देखील नव्हती. उज्जयिनीहून आलेल्या दूताला यौगंधरायणानें—"तुझ्या राजाचा काय निरोप आहे तो सांग."—ह्मणून फार आग्रह केला; पण—"तुमचे महाराज व सर्व प्रधानादिक सभेंत बसतील, त्यावेळीं काय तो निरोप सांगेन. माझ्या यजमानाचा मला असाच सक्त हुकूम आहे."—असें त्याणें सांगितलें. तेव्हां यौगंधरायणानें हें सर्व वर्तमान राजा उदयनाला कळविलें. चंडमहासेनाचें हाडवैर असून त्याणें दूत पाठविला व तो कांहीं निरोप सांगणार आहे, हें ऐकून प्रधानादिकांला मोठेंच गूढ पडलें होतें. कोणाला वाटलें कीं, त्याणें वासवदत्तेशीं विवाह करण्याविषयीं निरोप पाठविला असेल. कोणी ह्मणाले,—राजा व्यसनाधीन झाला आहे, असें पाहून लढाई करण्याबद्दल निरोप पाठविला असेल.—असे अनेकांनीं अनेक तर्क काढले; परंतु खास गोष्ट अमुकच आहे, असें कोणाच्यानेंही सांगवलें नाहीं. चण्डमहासेनाचा कांहींतरी उद्दामपणाचा निरोप असावा असें यौगंधरायणाच्या मनांत मात्र आलें होतें. त्याणें मोठी सभा करवून तेथें दूताला आणवून विचारलें,

तेव्हां त्याणें आपल्या राजाचा निरोप सांगितला. तो ह्मणाला, "महाराज, आमच्या यजमानांनीं माझ्या मुखानें अशी विनंती केली आहे कीं,—माझी कन्या **वासवदत्ता** ही आतां उपवर झाली आहे. ती इतर सर्व कलांत प्रवीण आहे, परंतु तिला संगिताचें ज्ञान नाहीं. कोणी तरी योग्य शिक्षक मिळेल ह्मणून पुष्कळ शोध केला; पण अद्याप कोणी मिळाला नाहीं. आपण गांधर्वविद्येंत फारच प्रवीण आहां. ह्मणून माझी मुलगी आपली शिष्यीण होण्याची इच्छा करीत आहे. आपला व आमचा पिढिजादा स्नेहसंबंध आहे. जर त्याप्रमाणेंच आपलीही आमच्यावर मेहरबानी असेल, तर कृपाकरून एकवेळ आह्मास येथें दर्शन देऊन **वासवदत्तेचा** हेतू पूर्ण करावा." याप्रमाणें दूतानें निरोप सांगितला; तो ऐकून सर्व सभासद व **वत्सराज** यांनां फारच आश्चर्य वाटलें. भलत्याच रितीचा निरोप पाठविला म्हणून **वत्सराज** रागानें लाल झाला. परंतु त्यानें तो आपला क्रोध विशेष व्यक्त करून न दाखवितां दूताला सांगितलें कीं,—"याचें उत्तर आम्हीं आपल्या दूताबरोबर कळवूं, असें तूं आपल्या राजाला जाऊन सांग."

याप्रमाणें त्या दूताला सत्कारपूर्वक निरोप देऊन **यौगंधरायण, रुमण्वान्**, व **वसंतक** यांसहवर्तमान राजा एकांतीं मसलत करण्याला बसला. राजा **यौगंधरायणाला** ह्मणाला, "त्या दांडग्या **चंडमहासेनानें** मला असा कां निरोप पाठविला, हें समजत नाहीं. बरें, त्या दुष्टाचा अभिप्राय तरी काय असेल ? त्याणें माझी थट्टा तर केली नाहींना ? यासंबंधानें तुमचें काय मत आहे, तें मला ऐकावयाचें आहे." **यौगंधरायणाला** राजाचें वर्तन मूळपासून आवडत नव्हतें. मद्याच्या धुंदींत रात्रंदिवस मृगया, गाणेंबजावणें, यांत राजा वेळ घालवीत होता. याबद्दल त्याची चांगली कानउघाडणी करावी म्हणून तो समयच पहात होता. कारण, दुर्व्यसनाच्या नादांत गुंग झालेले पुरुष कांहीं प्रसंग आल्याशिवाय दुसऱ्याचें भाषण हितकारक असलें तरी, ऐकून सुद्धां

घेत नाहींत. तशांतून उदयन हा तर प्रत्यक्ष राजाच. कांहीं झालें तरी यौगंधरायणाचें त्याच्याजवळ सेवकाचें नातें. तेव्हां वेळ काळ पाहून दोन गोष्टी सांगाव्या असें त्याच्या मनांत होतें. यावेळीं तो समय आपोआप घडून आला. वत्सराज अगदीं संतापला होता. चंडमहासेनानें आपला अपमान केला याबद्दल त्याला मोठा पश्चात्ताप झाला होता. असें पाहून यौगंधरायण म्हणाला, " महाराज, मला काय विचारतां? चंडमहासेनाच्या मनांत काय आलें असेल याचा आपणच कां विचार करानां? राज्य हें केवळ चैनीचें साधन आहे, अशी ज्यांची समजूत असेल, ते पुरुष असूनही अविवेकी पशू असें म्हटलें पाहिजे. तरवारीच्या धारेवर बसणें व राजगादीवर बसणें, हीं दोन्हीं समानच आहेत. राजानें प्रथम कामक्रोधादिक आभ्यंतर शत्रू जिंकले पाहिजेत. तसें केलें तरच बाह्य शत्रूंचा जय करण्यास तो समर्थ होतो. आपले वडील गादीवर होते त्यावेळीं त्यांनीं अनेक राजांशीं लढाया वगैरे करून त्यांस आपले मांडलिक केले. ते केवळ संतोषानें या गादीचे ताबेदार झाले असें नाहीं. कोणताही मनुष्य आपल्या इच्छेवांचून दुसऱ्याच्या आज्ञेत वागण्यास मनापासून तयार होत नाहीं. तर केवळ निरुपाय झाला ह्मणजेच त्याला तसें करावें लागतें. याप्रमाणें जे राजे मांडलिक होऊन या गादीचा हुकूम मानूं लागले, ते केवळ आपला बचाव होण्याकरितांच तसें करित आहेत. चंडमहासेनाचा थोरल्या महाराजांनीं कित्येक वेळ पराभव केला, तेव्हां तो त्यांची आज्ञा मानूं लागला. तेव्हां अशा स्थितींत आपण कसें वागलें पाहिजे होतें, हें मीं सांगावें असें नाहीं. आपण रात्रंदिवस गाणेंबजावणें, शिकार, इत्यादिकांच्या नादांत निमग्न झालां आहां. लोक आपणास चैनी असें समजूं लागले आहेत. त्या [illegible] जो लौकिक चोहोंकडे पसरला आहे, त्याचेंच हें फल आहे! तो चंडमहासेन, आपण विषयी आहां असें समजून कन्येचा लोभ दाखवून आपणाला तिकडे बंधन करून ठेवण्याची इच्छा करीत आहे. खरोखर त्यानें जो निरोप पाठविला, तो एखाद्य

नटाला मात्र चांगला वाटेल. परंतु शूरपुरुषाला कधींही सहन होणार नाहीं; पण उपाय काय ! आपली स्थितीच तशी झाली आहे. त्याणें आपलें वजन ओळखलें म्हणून हा असा निरोप पाठविला. एकटा **चंडमहासे-नच** आपल्यास भीत नाहीं असें नाहीं. तर दुसरेही मांडलिक राजे आपली सत्ता झुगारून देण्याविषयीं प्रयत्न करीत आहेत. याकरितां मी विनंती करितों कीं, महाराज, अजून तरी डोळे उघडा ! हीं व्यसनें सोडून द्या. व्यसनी झालेल्या राजाला शत्रू—खळग्यांत पडलेल्या हत्ती-प्रमाणें—सहज बंधन करूं शकतात. आम्ही पाहिजे तितका प्रयत्न केला तरी जोंपर्यंत आपण तिकडे लक्ष्य देणार नाहीं, तोंपर्यंत कांहीं व्हावयाचें नाहीं. मी विशेष स्पष्टरीतीनें बोललों याची क्षमा करा. मनापासून वाईट वाटेल, तेव्हांच असे कठोर शब्द तोंडावाटे निघतात !" हें **यौगंधरायणाचें** भाषण **वत्सराजाला** मान्य झालें. तो म्हणाला, " मी अगदीं बहकलों आहें असें नाहीं. तुम्हा सर्वांवर माझा पूर्ण विश्वास आहे व तुम्हीं सर्व कार्यें करण्यास समर्थ आहां असें समजून मी दोन दिवस चैन करित होतों; पण जर तुम्हाला त्याचा परिणाम वाईट आहे असें वाटत अ-सेल तर मी तिकडे विशेष लक्ष्य देणार नाहीं. तूं मला जो आतां बोध केलास त्यांत माझेंच हित आहे. आजपर्यंत जें झालें तें झालें; पण यापुढें मी फार व्यसनासक्त होणार नाहीं." इत्यादि प्रकारचें भाषण करून त्याणें **यौगं-धरायणाचें** समाधान केलें. आणि त्याच्या सम्मतीनें, दूतमुखानें **चंडम-हासेनाला** असें उत्तर पाठविलें कीं,—" जर तुमच्या कन्येच्या मनांत माझें शिष्यत्व करावयाचें असेल, तर आपण तिलाच इकडे पाठवून द्यावी व तिणें माझी सेवा करावी." याप्रमाणें निरोप सांगून दूताला उज्जयिनीस पाठविला. **वत्सराजाला** फारच राग आला होता. त्याच्या मनांत **चंडम-हासेनावर** स्वारी करावयाची होती; ह्मणून तो **यौगंधरायणाला** ह्मणाला, " बाकी कांहींतरी असो. पण माझ्या मनांत स्वारी करून त्या दुष्टाची खोड मोडावी असें आलें आहे." तें ऐकून **यौगंधरायण** म्हणाला,

"तसें करणें कांहीं वाईट नाहीं; पण त्याचा हा समय नव्हे. यावेळीं आपला पक्ष किंचित् कमी आहे. चंडमहासेनाजवळ मोठी फौज आहे, किंवा तो फार बलाढ्य आहे, असें नाहीं; परंतु आपला जो दुर्लौकिक झाला, त्यामुळें आसपासचे पुष्कळ राजे त्याला अनुकूळ झाले आहेत. याशिवाय त्याची विशेषप्रकारची कांहीं हकीकत मला कळली आहे तीही सांगतों."

"उज्जयिनीनगरी ही केवळ पृथ्वीचें एक भूषणच असून फार शोभायमान आहे. चंद्रकिरणासारख्या सफेत व उंच बंगल्यांनीं जी, इन्द्राच्या अमरावतीची थट्टाच करीत आहे कीं काय? असें वाटतें. कैलासपर्वतावर राहण्याचा कंटाळा आला म्हणूनच कीं काय, भगवान् शंकर महाकाळरूपानें जींत वास करित आहे. या प्रकारची चंडमहासेनाची राजधानी जी उज्जयनी तेथेंच पूर्वी महेंद्रवर्मानांवाचा राजा होता. त्याला त्याच्याच सारखा महापराक्रमी जयसेननांवाचा पुत्र झाला. महाराज, आपला वैरी जो चंडमहासेन त्याचा हा पिता होय. त्या जयसेनाला अप्रातिमबलाढ्य हा पुत्र झाला. चंडमहासेन हें नांव त्याला नंतर प्राप्त झालें. मूळचें 'महासेन' एवढेंच त्याचें नांव होतें. बापाच्या पश्चात् आपल्या राज्याचें उत्तमप्रकारें हा रक्षण करीत होता. याला लहानपणापासून तरवारीनें लढाई करण्याचा मोठा नाद होता. परंतु त्याच्या मनासारखी तरवार मिळाली नाहीं. सामान्य तलवारी त्याच्याजवळ फारवेळ टिकत नसत. एकेदिवशीं त्याच्या मनांत असें आलें कीं,—'आपल्याला पाहिजे तसा खड्ग, नाहीं. व मनाजोक्ती भार्याही नाहीं. तर देवीचें आराधन करून ह्या दोनही वस्तु संपादन कराव्या.' असा विचार करून तो चंडिकादेवीच्या मंदिरांत उपोषित बसून तिचें आराधन करूं लागला. अनुष्ठानाच्या सांगतेकरतां शेवटीं आपल्या अंगचें मांस काढून त्यानें होम केला. तेणेंकरून देवी तत्काल प्रसन्न होऊन म्हणाली, "पुत्रा" मी तुझ्यावर प्रसन्न झालें आहें. हा माझाच खड्ग तुला मी देतें. याच्या प्रभावानें तूं सर्व शत्रूंला अजिंक्य होशील. आणि अंगारकनां-

वाच्या दैत्याची त्रैलोक्यांत अप्रतिम सुंदर अशी जी अंगारवतीनामक कन्या ती तुझी स्त्री होईल. व तूं आपलें मांस मला अर्पण केलेंस, हें अत्यंत चंड ( भयंकर ) कर्म केलेंस ह्मणून तुला आजपासून **चंडमहासेन** असें लोक ह्मणतील." याप्रमाणें वर देऊन तलवार राजाच्या हातांत दिली आणि देवी तेथेंच गुप्त झाली. **चंडमहासेना**चा मनोरथ पूर्ण झाल्यामुळें त्याला मोठा संतोष झाला. याप्रमाणें देवीनें दिलेली तलवार व **नडागिरि** नांवाचा एक मोठा हत्ती हीं दोन त्याच्या जवळ—जशीं इंद्राजवळ वज्र आणि ऐरावत—तशीं उत्तम रत्नें आहेत, त्या दोहोंच्या प्रभावानें तो मोठा सुखी झाला.

नंतर एकेदिवशीं तो शिकारीकरतां मोठ्या अरण्यांत गेला, तेथें फिरतां फिरतां फारच भयंकर असा एक रानडुकर त्याणें पाहिला. रात्रीचा सर्व अंधार अवेळीं एकत्र झाल्याप्रमाणें अगदीं काळाकुट्ट अशा त्या डुकराला पाहून, राजानें मोठ्या त्वरेनें आपल्या अंगांतलें सर्व सामर्थ्य खर्चकरून त्याच्यावर बाण मारले; परंतु त्या डुकरानें राजाच्या रथाला धक्का मारून, एका मोठ्या बिळांत प्रवेश केला. आपल्या बाणांनीं तो अगदीं चित होईल अशी त्याची खातरी होती; पण तसें कांहीं झालें नाहीं, हें पाहून **चंडमहासेना**ला फार आश्चर्य वाटलें. तथापि, तो कांहीं वेळानें तरी मरेल, असें वाटल्यावरून **चंडमहासेन** त्याच्या पाठोपाठ एकटाच बिळांत शिरला. यावेळीं फक्त धनुष्य मात्र त्याच्याजवळ होतें. बराच दूर गेल्यावर तेथें एक सुंदर नगर त्याच्या दृष्टीस पडलें. तें पाहून आश्चर्ययुक्त होत्साता विश्रांति घेण्याकरितां राजा तेथल्याच एका सुंदर तळीच्या कांठावर जाऊन बसला. तेथूनच चहूंकडची शोभा पहात होता. बराच वेळ गेल्यावर एक सुंदर कन्या बरोबरच्या शंभर सख्यांसहवर्तमान खेळत खेळत संचार करणारी, **चंडमहासेन** जेथें बसला होता, तिकडेच येत आहे असें त्यानें पाहिलें. ती जवळ आली तेव्हां, धैर्याचा नाश करणारी ही **कामदेवाची** बाणलताच आहे, असें त्याला वाटलें. तीही, प्रेमरसाची वृष्टि करणाऱ्या डोळ्यांनीं वारंवार त्याला स्नान घालीत होत्साती हकुहकु त्याच्या जवळ येऊन

पोहोंचली. बराच वेळ उभयतांही एकमेकांकडे पहात होतीं, परंतु कांहीं भाषण झालें नाहीं. नंतर हळुच ती कन्या ह्मणाली," हे भाग्यशाली पुरुषा, तुला पाहून मला फार आनंद होतो. परंतु जीं अक्षरें तुझ्या नांवांत समाविष्ट होऊन उत्तम झालीं असतील, तीं ऐकण्याची इच्छा आहे. व कोणत्या सदय उद्देशानें ह्या गुहेला आपण धन्य केलें हेंही ऐकावें असें वाटतें. परिचय नसून प्रश्न केला, ह्या माझ्या अल्लडपणाची क्षमा करावी." याप्रमाणें तिणें प्रश्न केल्यावरून **चंडमहासेना**नें आपली खरी हकीकत होती ती सर्व तिला सांगितली. ती ऐकून त्या कन्येच्या, प्रेमानें भरलेल्या डोळ्यांतून अश्रुधारा आणि हृदयापासून धैर्य हीं दोन्ही एकदम बाहेर निघोन गेलीं! तिची तशी स्थिती पाहून **चंडमहासेना**ला प्रीती व दया यांणीं एकाचवेळीं आवृत केलें. तो तिला ह्मणाला, "तूं कोण आहेस, आणि येथें कां रडतेस? माझ्या हातून तुझ्या दुःखाचें निवारण होण्यासारखें असेल तर सांगशील काय? मी आपले प्राण संकटांत घालून देखील तुझें दुःख निवारण करीन." हें भाषण ऐकून **कामदेवा**च्या आज्ञेला अनुसरणारी ती कन्या पदरानें डोळे पुसून ह्मणाली, "काय सांगूं? माझ्यानें कांहीं बोलवत नाहीं; पण मेलें मन उगीच रहात नाहीं. पुढें येणाऱ्या भयंकर परिणामाची त्याला काळजी वाटते. मनांतली गोष्ट दुसऱ्याला सांगावी तरी कशी! पण त्यानें परकीपणा मुळींच ठेवला नाहीं. डोळ्यांनीं जेव्हां हें रूप पाहिलें, तेव्हांच मनानें त्याला विषय केलें. मग आतां चोरून तरी ठेवावें कोणाजवळ! असो. महाराज, आपण जो या गुहेंत आलेला वराह पाहिला, तो खरोखरीचा डुकर नसून **अंगारक**नांवाचा दैत्य आहे. मी त्याची कन्या होय. माझें नांव **अंगारवती**. हा दैत्य मोठा पराक्रमी असून वज्रासारखा बलाढ्य आहे. ह्या माझ्याबरोबर ज्या इतर कन्या आहेत, त्या निरनिराळ्या देशांतल्या मोठमोठ्या राजांच्या मुली होत. त्यांना जिंकून आमच्या बापानें ह्यांना येथें आणून माझ्या दासी केल्या आहेत. शापाच्या दोषानें तो **अंगारक** सांप्रत राक्षस झाला आहे. परमेश्वरानें

मजवर मोठी कृपा केली ह्मणून आपण जिवंत दृष्टीं पडलां. नाहीं तर त्याच्या सपाट्यांत सांपडलेला कोणीही मनुष्य जिवंत राहावयाचा नाहीं. त्याला त्या-वेळीं फार ताहान लागली होती, व श्रमही झाले होते ह्मणून तो आपल्याला सोडून आला. यावेळीं वराहाच्या रूपाचा त्याग करून तो स्वस्थ विश्रांति घेत आहे. निजून उठल्यावर तो खरोखर आपल्याविषयीं कांहीं तरी वाईट गोष्ट करील यांत संशय नाहीं; ह्मणून मला फार चिंता लागली आहे. कोणत्याही रीतीनें आपला बचाव होण्याचा मार्ग दिसत नाहीं; यामुळें मला जो संताप झाला आहे, त्याणें कढलेले हे अश्रुबिंदू नव्हत तर माझे प्राणच नेत्रांवाटे बाहेर पडत आहेत." असें बोलून ती पुनः रडूं लागली. तें तिचें कळकळीचें भाषण ऐकून राजा तिचें समाधान करून ह्मणाला, "हे सुंदरि, तूं ह्मणतेस त्याप्रमाणें जर खरीच तुझी माझ्यावर प्रीती असेल तर मी सांगतों तसें कर. तुझा बाप जागा झाला ह्मणजे तूं त्याच्याजवळ जाऊन मोठ्यानीं रडूं लाग. ह्मणजे रडण्याचें कारण तो खचीत तुला विचारील. तेव्हां असें सांग कीं—'बाबा, तुमचा जर कोणी नाश करील, तर माझी गती काय होईल? ही मला चिंता लागली आहे व ह्मणूनच मी रडतें—असें तूं त्याला सांगितलेंस ह्मणजे पुढची तजवीज मी करीन. तूं याप्रमाणें करशील, तर तुझें आणि माझें दोघांचेंही कल्याण होईल." हें ऐकून **अंगारवतीनें** तसें करण्याचें कबूल करून आपला बाप जेथें निजला होता, तेथें जवळच एका गुप्त ठिकाणीं **चंडमहासेनाला** बसवून ती बापाजवळ गेली. **काम**देवाच्या सत्तेचा काय तरी प्र-भाव हा! लहानपणापासून ज्यानें पालन पोषण केलें, त्या प्रत्यक्ष आपल्या जन्मदात्या पित्याचा घात करण्याला ही कन्या प्रवृत्त झाली आहे! हा दुसऱ्या कोणाचा प्रभाव बरें? एका अगदीं अनोळखी मनु-ष्याचा क्षणभर परिचय झाला, तेवढ्यावरून त्याचें कल्याण होण्याकरतां, आजन्म ज्याचा सहवास घडला, त्या प्रेमळ बापाचा प्रत्यक्ष मुलीनें नाश करण्याला प्रवृत्त व्हावें, यापरतें दुसरें साहस तें काय? धिक्कार असो

त्या मदनाला. ज्याच्या नादानें स्त्रिया व पुरुष देखील,—विश्वास पावलेले आई, बाप, भाऊ, नवरा, किंवा कोण पाहिजे तो कां असेना—सर्वांला मारण्याला प्रवृत्त होतात! वस्तुतः अंगारवतीनें फार चांगलाच विचार केला होता. ती बापाविषयीं निर्दय झाली नव्हती. त्याच्या राक्षसदेहाचा अंत झाल्यावांचून त्याचा शाप सरणार नाहीं ह्मणूनच तिनें हा प्रयत्न केला होता; तरी पण स्वसुखाभिलाष या कृत्यांत मुख्य प्रवर्तक होता. असो.

इकडे अंगारक दैत्य थोड्या वेळानें जागा झाला. तेव्हां पूर्वसंकेताप्रमाणें अंगारवती त्याच्या गळ्याला मिठी घालून मोठ्यानें रडूं लागली. त्याच्या मनांत कांहीं पाप नव्हतें. तो मुलगी रडते म्हणून व्याकूळ झाला आणि तिला आपल्या मांडीवर घेऊन कुरवाळून म्हणाला, "अग माझे लाडके, उगीच कां रडतेस? तुला काय पाहिजे आहे तें सांग? मी जिवंत असतां तुला कोणतें दुःख आहे सांग बरें? उगीच रडूं नको." असें म्हणून त्यानें तिचे डोळे पुसले. तेव्हां साखरेंत घोळलेल्या सुरीप्रमाणें वर मधुर असून आंत कठोर अशी, त्याच्या आयुष्याचा क्षय करणारी अंगारवती रडत रडत म्हणाली, "बाबा, तुमच्या योगानें मला काय कमी आहे? सर्व कांहीं मिळत आहे. दुसरें कसलेंही दुःख नाहीं, पण एका गोष्टीची आठवण झाली म्हणजे मात्र मोठें दुःख होतें. इडा पिडा टळो. तसें कधींही न होवो. पण बाबा, कदाचित् तुमच्यावर वाईट प्रसंग आला तर माझी अवस्था काय होईल! याची मला काळजी लागली आहे. ही भयंकर अरण्यांतली गुहा. येथें त्या बिचाऱ्या गरीब दासींवांचून दुसरें कोणीही नाहीं. त्या तरी काय करणार. आज तुमच्या पराक्रमानें कोणी आम्हांकडे वांकडा डोळा करून देखील पाहूं शकणार नाहीं, पण मग आमचें कोण साह्य करील? हे विचार मनांत येऊन दुःख वाटल्यामुळें रडूं येतें." असें बोलून ती मायावी कन्या पुनः रडूं लागली. भोळ्या अंगारकाला तें रडणें खरेंच वाटलें, ह्मणून तो तिचें समाधान करून म्हणाला, "छेः, वेडी पोर कुठली, भलत्याच गोष्टीची काळजी करण्याचें कारण काय? मला मार-

ण्याची कोणाची प्राज्ञा आहे ? माझें सर्व शरीर वज्रमय आहे. काय तीं माझ्या डाव्या हातांत गोम आहे. पण तेथें मी धनुष्य धरतों. तेव्हां माझ्या शरीराच्या कोणत्याही भागांत हवीं तितकीं शस्त्रें लागलीं तरी मुळींच काळजी नाहीं समजलीस ? चल ऊठ. आतां माझ्या मरणाविषयीं अगदीं बिनघोर रहा." हें भाषण ऐकून तिनें आनंद झाल्यासारखें करून दाखविलें. इकडे दडून बसलेल्या राजानें तें सर्व ऐकून—याचा मृत्यू डाव्या हातांत आहे अशी आपल्या मनांत गांठ बांधली!

याप्रमाणें आपली कन्या अंगारवती इचें समाधान करून त्याची नित्य नियमाची वेळ झाली म्हणून, अंगारक स्नान करण्यास गेला. ह्या संधींत पुनः अंगारवती चंडमहासेनाला भेटली. तेव्हां,—"काम झालें. आतां लौकरच पुढची तजवीज करतों."—असें सांगून त्याणें तिच्या मनाची खातरी केली. अंगारकदैत्य स्नान करून मौन धारण करून एकाग्र अंतःकरणानें महादेवाची पूजा करावयास बसला. तत्काळ त्याच्यापुढें जाऊन आकर्णपर्यंत धनुष्य ओढून रागानें चंडमहासेन त्याला लढाईस बोलावूं लागला. यावेळीं अंगारक प्राणायाम करीत होता. उजवा हात तिकडे गुंतल्यामुळें डाव्या हातानें, अम्मळ थांब ह्मणून राजाला त्याणें इषारा केला. राजाचा हात मोठा चपळ होता. दैवयोगानें अंगारकाचें वर्मच मिळालें, तेव्हां तत्काल राजानें मोठ्या जोरानें एक बाण त्याच्या डाव्या हातांत मारला. तेव्हां वर्मावर घाव झाल्यामुळें व्याकूळ होऊन मोठ्यानें ओरडून तो तत्काल भूमीवर पडला. आणि प्राण सोडतां सोडतां ह्मणाला, " मला तहान लागली आहे. अशावेळीं ज्यानें मला मारिलें, तो प्रतिवर्षी मला जर उदकदान (श्राद्धतर्पण वगैरे) न करील तर त्याचे पांच मंत्री मरतील." असें बोलून त्या दैत्यानें प्राण सोडले.

तें पाहून अंगारवती क्षणमात्र दुःखित झाली, पण चंडमहासेनानें तिचें समाधान केल्यावरून तिणें त्याच्याशीं विवाह करून घेण्याचा निश्चय केला. अंगारकानें पुष्कळ संपत्ति जमवून ठेवली होती.

ती सर्व घेऊन त्या शंभर राजकन्यांसह अंगारवती चंडमहासेनाबरोबर उज्जयिनीस आली. मग उत्तम मुहूर्त पाहून राजानें मोठ्या समारंभानें तिच्याशीं विवाह केला. तिला पालक आणि गोपालक असे दोन पुत्र झाले. त्यांच्या जन्मकालीं राजानें मोठा उत्सव केला. आपल्याला एक तरी कन्या असावी, अशी त्या उभयतांचीही इच्छा होती. त्यांच्या कुळांत इंद्राची भक्ति करण्याचा संप्रदाय होता. त्याप्रमाणें, चंडमहासेनही विषेश प्रकारचे नियम धारण करून कन्याप्राप्तीकरतां इंद्राची पूजा करित होता. राजाच्या मनांतील हेतू जाणून एकेदिवशीं स्वप्नांत त्याला दर्शन देऊन इंद्र ह्मणाला, " मी प्रसन्न झालों आहें. तुझा मनोरथ पूर्ण होईल. माझ्या प्रसादानें अप्रतिम सुंदर अशी लौकरच तुला कन्या होईल." असें सांगून इंद्र गुप्त झाला. जागा झाल्यावर राजानें हें वर्तमान अंगारवतीला सांगितलें, तेव्हां तिलाही फार आनंद झाला. कांहीं दिवसांनीं अंगारवती गरोदर झाली व इंद्राच्या वचनाप्रमाणें तिला एक सुंदर कन्या झाली. तिचें रूप पाहून ब्रह्मदेवानें चंद्रिकेचीच ही दुसरी पुतळी घडविली असावी, असें लोक ह्मणूं लागले. तिच्या जन्मकालीं,—"इच्यापासून कामदेवाचा अवतार व विद्याधरांचा अधिपती असा पुत्र उत्पन्न होईल."—अशी आकाशवाणी झाली. त्या मुलीचें नामकरण करण्याच्या वेळीं—मला ही वासवानें—(इंद्रानें) प्रसन्न होऊन दिली आहे, ह्मणून हिला वासवदत्ता हें नांव ठेवावें—असें चंडमहासेनानें सांगितलें. मंथन करण्यापूर्वीं समुद्राच्या कुशींत जशी लक्ष्मी गुप्त होती, तशी ती वासवदत्ता आपल्या बापाच्या घरीं आहे. सांप्रत ती उपवर झाली असून कोणाला तरी द्यावयाची आहे." अशी कथा सांगून यौगंधरायण म्हणाला, "महाराज, त्या चंडमहासेनराजाचा प्रभाव असा आहे. तो मजबूत किल्ल्यांत राहतो, त्याच्या अवळ सैन्यही पुष्कळ आहे. नडागिरी हत्ती व देवीनें दिलेला खड्ग हीं त्याच्याजवळ दोन रत्नें आहेत तेव्हां त्याचा सहज पराभव करतां येईल असें नाहीं. आणखीं असें

आहे कीं, त्याच्या मनांत **वासवदत्ता** आपणासच द्यावयाची आहे; परंतु तो मोठा अभिमानी आहे, म्हणून—कसें तरी करून आह्माला पदरांत ध्या—असें ह्मणण्यास त्याला लाज वाटते. यास्तव आपल्या पक्षाचें महत्व राखून आपणाला जांवई करून घेण्याविषयीं तो प्रयत्न करीत आहे. आणि मला खास असें वाटतें कीं, त्या **वासवदत्तेशीं** आपणच विवाह करून घ्यावा. दुसरा कोणीही राजपुत्र तिच्या योग्य नाहीं." **यौगंधरायणाचें** हें भाषण ऐकून **वत्सराजाला** फार आनंद झाला. व **वासवदत्तेनें** त्याचें मन हरण केल्यामुळें तो तिच्या प्राप्तीविषयीं विचार करूं लागला.

इकडे **वत्सराजानें** पाठविलेला दूत **उज्जयिनीस** पोंहचून त्यानें **चंडमहासेनाला** प्रतिनिरोप सांगितला. तो ऐकून **चंडमहासेन** मनांत विचार करूं लागला कीं,—**वत्सराज** मोठा मानी आहे. तो येथें येईल असें पूर्वीं देखील वाटलें नव्हतेंच. तरी एक युक्ती करून पहावी, ह्मणून त्याला निरोप पाठविला. आतां तर तो येत नाहीं, अशी पूर्ण खातरीच झाली. पण कन्येलाही तिकडे पाठवितां येत नाहीं; कारण तसें केलें तर आपला हलकेपणा होणार आहे. तेव्हां आतां दुसरा कांहीं उपाय नाहीं. पूर्वीं विचार केल्याप्रमाणें युक्तीनें त्याला पकडून आणावा हेंच योग्य वाटतें—असा निश्चय करून **वत्सराजाला** धरून आणण्याविषयीं कशी काय युक्ती करावी याचा प्रधानादिकांच्या सल्यानें विचार ठरवून त्याणें एक मोठा कळसूत्री लांकडाचा हत्ती तयार करवून, त्याच्या पोटांत गुप्तपणें हत्यारबंद शूर शिपाई बसवून तो हत्ती **विंध्याटवींत** नेऊन सोडला. आणि त्याच्या आसपास गुप्तपणें संचार करणारे हेर ठेवले.

**वत्सराजाला** हत्ती पकडण्याचा नाद फार होता, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. हत्ती आल्याची बातमी कळविण्याकरितां त्याचे पुष्कळ सेवक **विंध्याटवींत** फिरत होते. **चंडमहासेनानें** तेथें सोडलेला यंत्रमयहत्ती त्यांच्या दृष्टीस पडतांच धांवत जाऊन त्यांणीं हें वर्तमान **वत्सराजाला** सांगितलें. ते ह्मणाले, "सरकार, **विंध्याटवींत** आतांशीं फिरत असलेला

एक हत्ती आह्मी पाहिला. त्याच्यासारखा हत्ती एवढ्या साऱ्या भूमंडळांत कोठेंही नसेल. महाराज, तो केवढा तरी मोठा आहे, ह्मणून सांगावें. इंद्राचा **ऐरावत** आह्मी कांहीं पाहिला नाहीं; पण लोक त्याची तारीफ सांगतात. कदाचित् तो याच्यासारखा असेल तर कोणास ठाऊक ? **उज्जयिनीच्या** राजाचा **नडागिरी** मोठा ह्मणतात; पण यापुढें त्याचा कांहीं पाड नाहीं. फार काय सांगावें ? महाराज, त्याला पाहिलें ह्मणजे आह्माला तर तो पायानें चालणारा **विंध्याद्री** असावा असेंच वाटतें ! तर कसेंही करून तो महाराजांच्या पिलखान्यांत असावा, अशी आमची विनंती आहे; यावर सरकारची मर्जी.'' हें त्यांचें भाषण ऐकून **वत्सराजाला** फारच आनंद झाला. असें मोठें अप्रतीम **गजरत्न** धरल्याशिवाय कधींही सोडावयाचें नाहीं—असा निश्चय करून ती आनंदकारक बातमी सांगणाऱ्या **शिकारीलोकांला** मोठें बक्षीस दिलें. आणि प्रातःकालीं **विंध्याटवींत** शिकारीस जाण्याची तयारी करण्याविषयीं सेवकांस त्याणें हुकूम केला. त्या रात्रींत राजाला झोंप कशी ती मुळींच लागली नाहीं. **यौगंधरायणानें** **वासवदत्तेचें** वर्णन केलें, तें ऐकल्या वेळेपासून त्याला तिचा ध्यास लागला होता; पण तिची प्राप्ती होण्याचा मार्ग न सुचल्यामुळें तो कांहींसा उदास झाला होता. ह्या हत्तीचें वर्तमान ऐकलें तेव्हां तो मनांत ह्मणाला,—ईश्वरकृपेनें जर तो हत्ती मिळेल, तर आपलें मोठें काम होईल. **नडागिरी** आपल्याजवळ आहे ह्मणून **चंडमहासेनाला** मोठा गर्व झाला आहे व ह्मणूनच तो आपल्याला अजिंक्य मानतो; पण **विंध्याटवींत** आलेला हा हत्ती रानकाऱ्यांनीं सांगितलें त्याप्रमाणेंच असेल आणि तो आपल्या हातीं येईल तर मग **चंडमहासेनाची** शेखी उतरण्याला फार वेळ लागणार नाहीं ! आपल्याजवळ मोठी उणीव काय ती हत्तीचीच आहे. **नडागिरीचा** प्रतिस्पर्धी आपल्याजवळ आला ह्मणजे **चंडमहासेन** खचित वश होईल. आणि तसें झालें ह्मणजे **वासवदत्तेला** तो आपणच मला आणून देईल.—अशाप्रकारचे मनोरथ करीत करीत कशी

तरी त्यानें ती रात्र घालविली. प्रातःकालीं विंध्याटवींत जाण्याला निघतेवेळीं यौगंधरायणादिक प्रधानांला, मागें नीट व्यवस्था ठेवण्याला सांगून त्यांचा निरोप घेऊन राजानें प्रस्थान केलें. हें वर्तमान पूर्वदिवशींच यौगंधरायणांदिकांला समजलें होतें. राजानें जाऊंनये, असें त्यांच्या मनांत होतें; पण उपाय काय, ज्योतिष्यांनीं प्रयाणाचें लग्न वर्तवून पाहिलें त्यावरून, "या लग्नावर गेलें असतां कन्येचा लाभ होईल; पण कांहीं दिवस बंधनांत रहावें लागेल." असें त्यांणीं फळ सांगितलें व यौगंधरायणादिकांनीं न जाण्याविषयीं पुष्कळ आग्रह केला; पण त्यांचें ऐकतो कोण ? प्रधानादिक सर्वलोक आणि तो यंत्रमय हत्ती हे दोघेही राजाच्या मनाला दोहोंकडून ओढीत होते. त्यांत शेवटीं—बलाढ्य असल्यामुळेंच कीं काय? हत्तीचीच सरशी झाली. मायामृगानें जसा रामाला ओढून नेला, तसा त्या यंत्रमयहत्तीनें वत्सराजाला ओढून नेलें. तो विंध्याटवीच्या जवळ जाऊन पोंहचला तेव्हां–सैन्य बरोबर असलें तर कदाचित् त्याच्या गडबडीनें हत्ती खवळेल, ह्मणून बरोबरची सर्व फौज विंध्यपर्वताच्या पायथ्याशीं ठेवून रानकाळ्यांला मात्र बरोबर घेऊन राजा एकटाच पुढें गेला !

"पुढें जसें होणार असेल तदनुसार मनुष्य उद्योग करण्याला प्रवृत्त होतो, त्या कामीं साह्य करणारेही तसलेच भेटतात, व बुद्धी देखील तदनुसारच उत्पन्न होते !" असें जें ह्मणतात तें अगदीं खरें आहे. वत्सराजाला, यावेळीं जाऊंनका ह्मणून लोक सांगत असतां—जाण्याची बुद्धी झाली. प्रोत्साहन करणारे शिकारीलोक तसलेच भेटले. बरें यावेळीं फौज बरोबर न घेण्याचीही बुद्धि सुचली ! ह्या सर्व गोष्टी,—पुढें जो त्याच्यावर अनर्थ गुजरणार आहे, त्याला साह्य करणाऱ्या झाल्या होत्या. असो.

राजा पर्वतावर चढला तेव्हां पारध्यांनीं दाखविलेल्या,—आपल्यावर येणारें संकट जींत पसरलें आहे अशा विस्तीर्ण झाडींत प्रवेश करून—राजा हत्तीच्या ठिकाणावर येऊन पोंहचला. पर्वताच्या दक्षिणभागांत संचार करणारा हत्ती रानकाळ्यांनीं दुरून राजाला दाखविला.

यद्यपि तो केवळ आभासमात्र होता, तथापि कारागिरांनीं त्यांत आपल्या कसबाची कमाल करून हुबेहुब हत्तीसारखा दिसेल अशा रितीनें तयार केला होता. जंगली लोकांनीं दुरून पाहिल्यावरून त्यांना तो खरा वाटला यांत फारसें आश्चर्य नाहीं. परंतु त्या चतुर राजाला जवळ जाऊन देखील त्याची परीक्षा झाली नाहीं, हें मोठेंच आश्चर्य! पण त्यांत तरी काय विशेष आहे? भवितव्यता इतकी जबरदस्त आहे कीं, ती प्रत्यक्ष बृहस्पतीला देखील भुरळ पाडण्यास समर्थ होते. वत्सराजाला हत्तीला पाहून जो आनंद झाला, त्याचें कोणाच्यानेंही वर्णन करवणार नाहीं. तो आपली घोषवती वीणा वाजवीत वाजवीत हत्तीच्या जवळ जवळ गेला. त्याला लुब्ध करावा म्हणून राजा मधुर गायन करीत होता. हत्तीच्या पोटांत बसलेले लोक आपला मतलब साधण्याकरितां वत्सराज अगदींच जवळ आला असें पाहून आपला हत्ती दूर दूर हटवूं लागले. कारण त्यांला नियमीत ठिकाणीं जाऊन पुढचा . साधावयाचा होता. ही वेळ संध्याकाळची होती. गायनाकडे राज - सर्व लय लागला होता. संध्याकाळचा किंचित् अंधकारही पडला हे । राजा हत्तीच्या अगदीं जवळ गेला तरी त्याला तो खरोखरीचा जंग । हत्ती आ पेंच वाटत होतें! आपले कान ताठ करून गाण्य । आपण लुब्ध झालों आहें असें हत्ती वरचेवर दाखवीत होता. राजाच । अगदीं हातांत आल्यासारखें करून तो पुनः दूर पळून जाई. याप्रमा । करीत करीत उज्जयिनीकडच्या बाजूला बराच दूर त्याणें राजाला नेल . चंडमहासेनानें ठिकठिकाणीं आपले गुप्त हेर ठेवले होते व टप्या टप्याव । फौजही ठेवली होती. इषाऱ्याबरोबर सर्वांनीं एकत्र व्हावें असा संकेत करून, अमुक ठिकाणीं हत्ती पोंहचला म्हणजे वत्सराजावर छापा घालावा, असें त्यांणीं पूर्वींच ठरविलें होतें. त्याप्रमाणें नियमित ठिकाणीं हत्ती व त्याच्यामागून, दैवानें प्रेरणा केलेला वत्सराज, येऊन पोंहचतां एकाएकीं, हत्तीच्या पोटांतून हत्यारबंद शिपाई बाहेर निघून त्यांनं

राजाला वेढा दिला. त्यांला पाहून उदयनाला मोठा राग आला. त्याचें धैर्य वर्णनीय होतें, ह्मणून, शत्रूंनीं वेढलें तरी तो डगमगला नाहीं; पण करतो काय, यावेळीं त्याच्याजवळ धनुष्य देखील नव्हतें. कंबरेला एक मोठा सुरा होता, तो घेऊन समोरून आलेल्या शत्रूंबरोबर तो लढत होता. त्यांचा संकेत पूर्वींच ठरला होता, त्याप्रमाणें क्षणमात्रांत आणखी पुष्कळ सैन्य जमा झालें. त्यांणीं मागच्या बाजूनें अकस्मात् येऊन वत्सराजाला धरलें. तो त्यांच्यावर पुष्कळ दांतओंठ खात होता, परंतु शेवटीं निरुपायास्तव मुकाट्यानें त्याला त्यांच्या स्वाधीन व्हावें लागलें.

याप्रमाणें आपल्या धन्यानें सांगितलेली कामगिरी बजाऊन आनंदित झालेले सर्व सैनिक, व्यसनाच्या नादाला लागून फसलेल्या वत्सराजाला घेऊन नाचत बागडत उज्जयिनीला येऊन पोंहचले. चंडमहासेनाला वरचेवर इकडचें वर्तमान समजतच होतें. यावेळीं वत्सराजाला कैद करून आणला आहे व त्याच्याशीं आपलें वैर आहे, हें चंडमहासेनानें मनांत आणलें नाहीं. कारण, त्याचा हेतू फार चांगला होता, व पुढें त्याला आपला जांवई करून घ्यावयाचें होतें. सामान्यतः थोर पुरुष, आपला शत्रू असला तरी तो आपल्या घरीं आल्यास कोणत्याही प्रकारें त्याच्या मानापानांत उणें पडूं देत नाहींत; ह्मणून चंडमहासेन मोठ्या थाटानें आपल्या पुत्रांसह वत्सराजाला नगराबाहेर सामोरा गेला, आणि नडागिरीवर रत्नखचित अंबारींत बसवून, त्याला पुढें करून शहरांतून मिरवीत मिरवीत राजवाड्यांत घेऊन आला. अपमानरूप कलंकानें दूषित झाला होता, तरी नवीन उदय पावलेला वत्सराजचंद्र नगरवासीजनांच्या नेत्रांला फारच आनंदकारक झाला. शहरांत जिकडे तिकडे उदयनाला पाहण्याची एकच गर्दी उडाली. स्त्रीपुरुष त्याला पाहून आपआपल्यांत अनेक प्रकारें बोलूं लागले. कोणी ह्मणाले, "कां? कसा आहे आमचा राजा! शूर तो शूरच. वत्सराज येत नाहीं ह्मणत होताना? पण त्याला आणला किं नाहीं? आमच्या माहाराजांजवळ कोणाचाही अहंपणा चालावयाचा नाहीं. ते

कसलाही पटाईत लढवय्या असला तरी त्याला हारविल्यावांचून राहणार नाहींत." दुसरे ह्मणाले, "आमचे महाराज सर्वगुणसंपन्न आहेत हें खरें आहे; तरी पण या कामांत त्यांची फारशी तारीफ करवत नाहीं. हा **वत्सराज** ह्मणजे कांहीं सामान्य पुरुष नाहीं. तो समरांगणांत इंद्राला देखील हार जाणार नाहीं. सिंहाला फसवून सापळ्यांत घालावा, त्याप्रमाणें याला फसवून आणला आहे. तेव्हां यांत मोठासा पुरुषार्थ तो कसला?" स्त्रिया तर एकमेकींवर उड्या घेऊन **वत्सराजाला** पहात होत्या. कित्येक त्या **मदनाच्या** पुतळ्याला पाहून कामबाणांनीं मूर्छित झाल्या! त्या एकमेकींला म्हणाल्या, "अहा! किती तरी सुंदर रूप हें! जी माउली या रत्नाला प्रसवली असेल तिचा कुसवा धन्य आहे बाई! आमच्या **वासवदत्ता**बाईला हा नवरा न मिळेल तर, **ब्रह्मदेवाला** तारतम्य म्हणून कांहींच नाहीं असें म्हटलें पाहिजे." असो. याप्रमाणें आपापल्या हेतूनुरूप लोकांत चर्चा चालली होती. **उदयनाला** मोठ्या थाटानें शहरांत आणलें यांत **चंडमहासेनाचे** अनेक हेतू होते. **वत्सराज** एवढा मोठा मानी व पराक्रमी आहे, तरी आपण त्याला पकडून आणला. व **वासवदत्तेला**, आपला अभिमान न जाऊं देतां—योजलेला उत्तम वर मिळवून दिला. इत्यादि गोष्टी लोकांला दाखवावयाच्या होत्या. ते सर्वही त्याचे हेतू पूर्ण झाले. राजवाड्यांत पोंहचल्यावर **वासवदत्ता** ज्या माहालांत रहात होती, तेथेंच **वत्सराजाला** सत्कारपूर्वक ठेविला. खरोखर, व्यसनासक्त झालेल्या पुरुषांची अशीच दशा होत असते. जो **वत्सराज**, आपल्या दृष्टीतरी पडेल काय? ह्मणून **चंडमहासेन** काळजी करीत होता व ज्यांची परस्परांत मोठी स्पर्धा होती, त्याच्याच घरीं कैदखान्यांत राहून, तंबुरा वाजवीत त्याच्या मुलीला गाणें नाचणें शिकवून दिवस काढणें ही किती लाजिरवाणी गोष्ट आहे! ह्या सर्व अनर्थाला कारण कोण? तर व्यसन. तस्मात् जे पुरुष व्यसनी होतात ते मानसन्मान, प्रतिष्ठा ह्या सर्वांला मुकतात यांत संशय नाहीं.

**चंडमहासेनानें वत्सराजाला** धरून आणला यांतील खरा हेतू काय ? हें उज्जयिनींतील सर्व लोकांना कळलें नव्हतें. या दोघांचेंही पिढिजादें हाडवैर आहे हें मात्र सर्वांला माहित होतें. तेव्हां त्याला धरून आणला आहे तो मारण्याकरितांच आणला असेल अशी पुष्कळांची समजूत झाली होती. **वत्सराज** मोठा गुणी व रंगेला असून दयाळू आहे, अशी त्याची सर्वत्र ख्याती होती. आणि लोकांनीं त्याला समक्ष जेव्हां पाहिला तेव्हां त्याची ती मनोहर मूर्ती पाहून त्यांचें त्याच्यावर विलक्षण प्रेम बसलें. ते सर्व एकठिकाणीं जमून—**वत्सराजाला** न मारण्याविषयीं आपल्या राजाला विनंती करावी. त्यानें मान्य केलें तर बरें झालें. नाहीं तर त्याच्या बरोबर आपण सुद्धां मरावें—असा निश्चय करून **चंडमहासेना**जवळ प्रार्थना करावयाला गेले. लोकांचा जमाव पाहून राजा **चंडमहासेन** घाबरला. आणि, "तुमची काय इच्छा आहे ?" ह्मणून विचारिलें. त्यांनीं आपला हेतू कळविला तेव्हां त्यांचें समाधान करून—मी **वत्सराजाला** मारण्याकरतां आणला नाहीं, तर त्याच्याशीं मला सख्य करावयाचें आहे.— असें सांगून त्यांची राजानें खातरी केली. **वासवदत्तेला** गायन, नृत्य इत्यादि शिकविण्याविषयीं **वत्सराजाची** प्रार्थना करून **चंडमहासेनानें** तिला त्याच्या हातांत दिली. **वत्सराज**, गारुड्याच्या हातांत सांपडलेल्या सर्पासारखा वारंवार फुसकारे टाकित होता, त्याचा राग कांहीं केल्या शांत झाला नाहीं; पण जेव्हां **वासवदत्ता** त्याच्या मनाप्रमाणें सेवा करूं लागली, तेव्हां तो अम्मळ शांत झाला. असें पाहून एकेदिवशीं **चंडमहासेन** ह्मणाला, "महाराज, आपण मोठे पराक्रमी आहां. अजाणतेपणीं आमच्या हातांत सांपडलां. आपल्या पराक्रमाविषयीं कोणालाही शंका नाहीं. आपण कृपाकरून येथें आलां, याचा मला फार आनंद झाला आहे. आतां ही **वासवदत्ता** तुमची शिष्यीण आहे. हिला संगिताचें शिक्षण आपण द्यावें अशी माझी प्रार्थना आहे. यापासून उभयतांचेंही कल्याण होण्याचा संभव आहे."

वत्सराजाला वासवदत्तेला पाहून जसा आनंद झाला, तसा तिलाही ह्याच्या दर्शनानें मोठा हर्ष झाला. तिचे डोळे आणि मन हीं दोनही एकदम वत्सराजाकडे गेलीं. त्यांतून लाजेनें अधीर होऊन, डोळे मात्र मागें फिरले; पण मन कांहीं केल्या निवृत्त झालें नाहीं. हळुहळू राजा उदयन त्या आपल्या शिष्यिणीला गाणें, नाचणें, वाद्यें वाजविणें, इत्यादि शिकवूं लागला. तो रात्रंदिवस संगीत शाळेंत राहून वासवदत्तेला शिक्षण देत होता. प्रथम प्रथम कांहीं दिवस मागची आठवण होऊन, प्राप्त झालेल्या स्थितीविषयीं त्याला फार दुःख वाटत असे. पण थोडक्याच दिवसांत त्याचें अगदीं विस्मरण झालें. मांडीवर ती सुंदर घोषवती वीणा, गळ्यांत गायनाची तान आणि पुढें मन आणि डोळ्यांना रमविणारी वासवदत्ता हीं तीनहीं साधनें रात्रंदिवस त्याच्याजवळ होतीं. मग यांच्या पुढें मागचें विस्मरण झालें तर त्यांत काय आश्चर्य? रंगेल्या पुरुषांची बहुतकरून अशीच स्थिती असते. ते पाहिजे त्या ठिकाणीं चैनींत असतात. त्यांच्या आवडत्या वस्तू जवळ असल्या म्हणजे झालें. मग त्यांना आपला मानपान, कीर्ति अपकीर्ती, इत्यादिकांची शुद्धीदेखील नसते. यावरून आमच्या ह्या रंगेल्या वत्सराजाचीही स्थिती तशीच होती असें कोणास वाटेल, परंतु खरा प्रकार मात्र फार निराळा होता, वासवदत्तेला हरण करून त्यापासून पुढें मोठें कार्य साधावयाचें हें मुख्य होतें म्हणूनच तो स्वस्थ होता. एवढा मोठा राजा असून शत्रूनें प्रतिबंधांत ठेवून आपल्या मुलीचा शिक्षक केला आहे, ही गोष्ट केवढी लज्जास्पद? पण वत्सराजाला त्याचें कांहींच वाटत नव्हतें! वासवदत्ता त्याची एकाग्र मनानें,—जशी विष्णूची लक्ष्मीनें सेवा करावी तद्वत्—सेवा करीत होती. हळुहळू एकमेकांचें प्रेम परस्परांवर इतकें जडलें कीं, क्षणमात्र देखील एकमेकांचा वियोग त्यांला सहन होईनासा झाला.

इकडे वत्सराजाबरोबर विंध्याटवींत गेलेले लोक त्याचा सर्वत्र शोध करून निराश होऊन परत कौशांबीला आले. चंडमहासेनानें वत्स-

राजाला युक्तीनें धरून नेला, हें वर्तमान यौगंधरायणादिक प्रधानांला त्यांनीं सांगितलें. हळुहळू ही बातमी सर्व राज्यांत पसरली. वत्सराज व्यसनी होता तरी त्याच्या गुणाला मोहित होऊन प्रजा त्याच्यावर फारच अनुराग करीत असत. त्यांना हें वर्तमान ऐकून चंडमहासेनाचा फार राग आला. ते एकदम खवळून गेले; आणि उज्जयिनीवर जाऊन चंडमहासेनाचें पारिपत्य करण्याची तयारी करूं लागले. यावेळीं प्रधानमंडळीला मोठी काळजी पडली होती. कारण वत्सराज गेला तेव्हां आतां कदाचित् बंडावा उत्पन्न होईल कीं काय ? असेंही त्यांना वाटत होतें. पण प्रजेची निस्सीम राजभक्ती पाहून त्यांचें समाधान झालें. सेनापती रुमण्वान् यानें सर्वांचें समाधान केलें. तो ह्मणाला, "तुह्मी आपल्या राजाला सोडवून शत्रूची खोड मोडावी अशाविषयीं प्रयत्न करीत आहां ही गोष्ट फारच अभिनंदनीय आहे. पण यारितीनें तुमचा हेतू सिद्ध होईल असें वाटत नाहीं. कारण, चंडमहासेन मोठा बलाढ्य आहे. त्याची सर्व प्रकारची तयारी चांगली आहे. तो लढाई करून वश होणार नाहीं. तुम्ही सर्वही पराक्रमीच आहां. एक जुटीनें लढलां तर त्याचा कदाचित् पराभव कराल यांत संशय नाहीं. पण आपले महाराज त्याच्या हातांत सांपडले आहेत. तेव्हां राग येऊन त्यानें भलतेंच कांहीं केलें तर मग आपलें काय चालेल ! याकरितां युक्तीनें कांहींतरी तजवीज करून प्रथम महाराजांला आपल्या हस्तगत करून घेऊन मग पाहिजे तर त्याची खोड मोडावी, हें मला बरें वाटतें. तर तुह्मी सर्व शांत होऊन अंमळ दम धरा. आह्मी सांप्रत या गोष्टीचा विचार करीत आहों. कांहींतरी अचाट युक्ती काढून आधीं महाराजांची सुटका करून घेतों. मग तुमच्या इच्छेप्रमाणें स्वारीची तयारी करूं, त्यावेळीं तुम्हीं साह्य करा, म्हणजे आपला सर्वांचा हेतू सिद्ध होईल." असें सांगून त्याणें सर्व लोकांला शांत करून वाटेस लाविलें.

इकडे प्रधानमंडळींत वत्सराजाला सोडवून आणण्याविषयीं काय

उपाय करावा? याचा विचार चालत होता. निरनिराळ्या प्रधानांनीं आपणास योग्य वाटले तसे अनेक उपाय सुचविले. परंतु कांहीं निश्चय झाला नाहीं. प्रतिदिवशीं त्यांचें खलबत चालतच होतें. शेवटीं एके-दिवशीं यौगंधरायण म्हणाला, "आम्ही पुष्कळ विचार केला, पण अद्याप कांहीं निश्चय होत नाहीं; तर आतां माझ्या मनांत जी युक्ती आली आहे, ती मी करून पाहतों. सर्व प्रजा आपल्या महा-राजांवर अनुरक्त आहेत, याविषयीं तर आतां कांहीं संदेह राहिलाच नाहीं. तेव्हां राज्यांत कांहीं धांदल होण्याची मुळींच भीति नाहीं. कदा-चित् कोणी शत्रू हल्ला करतील तर आपली फौज मोठी असून अगदीं तयार आहे. ह्या महापराक्रमी व बुद्धिमान् रुमण्वानासारखा सेनापती असतां परचक्राची भीती बाळगावयास नको. तर आतां सर्व तुम्ही मला निरोप द्या. वसंतकाला बरोबर घेऊन मी उज्जयिनीस जातों. आपल्या बुद्धीच्या प्रभावानें साधेल ती युक्ती करून महाराजांला खचित घेऊन येतों. पुढें मी काय तजवीज करणार, हें ऐकावें असें तुमच्या मनांत आलें असेल व तें सांगण्यालाही कांहीं प्रत्यवाय नाहीं, पण येथें बसून पुढें अमुकरीतीनें कार्य करणार असा निश्चय करून उपयोगीं नाहीं. पुढें जसा प्रसंग पडेल, तशी कल्पना लढविली पाहिजे. पाण्याचें घर्षण झालें म्हणजे जशी वीज चमकते, तशी आपत्ती प्राप्त झाल्यावर ज्याची बुद्धी स्फुरण पावते, त्यालाच धीर व बुद्धिवान् असें म्हणतात. तात्पर्य, एव्हांशीं तुम्हाला सांगण्यासारखें कांहीं नाहीं. पुढें योग्य वाटेल ती तजवीज करून कार्य साधून येतों. तुम्ही सर्व स्वामिकार्या-विषयीं तत्परच आहां. तेव्हां मीं कांहीं विशेष सांगितलें पाहिजे असें नाहीं. एकमतानें राज्याचा उत्तम बंदोबस्त करा म्हणजे झालें. मी आजपासून आपला सर्व अधिकार रुमण्वानाच्या हातीं सोंपवितों. तुम्ही सर्वांनीं त्याला योग्य साह्य करून कारभार चालवावा." असें बोलून सर्व अधिकार रुमण्वानाच्या हातांत देऊन म्हणाला, "तुला मी

विशेष कांहीं सांगावयास नको. ह्या वेळेपासून वत्सराजाचें हें सर्व राज्य मी परत येईपर्यंत तुझ्या हातांत दिलें आहे. योग्य वाटेल त्याप्रमाणें व्यवस्था करून रक्षण कर." असें सांगून सर्वांचा निरोप घेऊन वसंतकासह यौगंधरायण कौशांबीनगरींतून निघाला.

हळूहळू मार्ग क्रमण करित करित आपल्या बुद्धीसारखी सत्वाढ्य व आपल्या शहाणपणासारखी दुर्गम, अशा विंध्याटवींत त्यानें प्रवेश केला. त्या झाडींत पुलिंदक नांवाचा भिल्लांचा राजा रहात होता. वत्सराजाशीं त्याची फार मैत्री होती. तो विंध्याटवीच्या मार्गानें कोणी शत्रु वत्सराजावर येईल तर त्याच्याशीं सामना करण्याच्या तयारींत असे. वसंतकासह यौगंधरायण त्याच्या घरीं गेला. तेव्हां त्याला पाहून पुलिंदकाला फार आनंद झाला. त्याणें या प्रधानाचा मोठा सत्कार करून "अशारीतीनें येण्याचें कारण काय?" ह्मणून विचारलें; तेव्हां यौगंधरायणानें त्याला सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून पुलिंदक ह्मणाला, "असें असेल तर मलाही कांहीं तरी कामगिरी सांगा. मी सांगाल तें करण्यास तयार आहें." यौगंधरायण म्हणाला, "वाः! तुझें तर आम्हाला साह्य पाहिजेच आहे. आणि म्हणूनच मी मुद्दाम येथें आलों. वत्सराजाला आम्ही युक्तीनें उज्जयिनींतून या वाटेनें रवाना करून देऊं. तूं आपली फौज अगदीं तयार ठेव. येथून वत्सराजाला कौशांबीपर्यंत सुरक्षित पोंचाविणें हें काम तुझ्याकडे सोंपवतों. कदाचित् कोणी पाठलाग करण्यास आले, तर त्यांनां आडवून धरण्याचें कामही त्वांच केलें पाहिजे." हें ऐकून पुलिंदक म्हणाला, "इतकें कशाला, पाहिजे तर मी आतांच स्वतः तुमच्या बरोबर येतों. अथवा लागेल ती फौज देतों. पाहिजे तसल्या बिकट जाग्यांतून जाण्याविषयीं माझे भिल्ल लोक मोठे कुशल आहेत." तेव्हां यौगंधरायण म्हणाला, "तूं म्हणतोस हें सारें खरें आहे. पण माझा विचार निराळा आहे. आम्हीं अगदीं गुप्तपणें जाऊन काम करणार आहों. बरोबर विशेष लोक असले तर मसलत फसेल.

याशिवाय तुझे लोक चंडमहासेनाच्या माहितीचे असले पाहिजेत. त्यांची निराळी टोळी करून जरी आम्ही नेली, तरी शत्रूला कळल्यावांचून राहणार नाहीं. व तशा रीतीनें तो तुझ्याशीं उघडपणें शत्रुत्व करूं लागेल. तसें झालें तरी कांहीं पर्वा नाहीं; पण तें यावेळीं उपयोगाचें नाहीं, याकरितां मी सांगतों असेंच कर. पुढची तयारी ठेव म्हणजे काम फत्ते होईल."

याप्रमाणें, पुलिंदकाला तयारी करण्यास सांगून यौगंधरायण वसंतकाला घेऊन पुढें जाण्यास निघाला. तो लौकरच उज्जयिनच्या जवळ जवळ जाऊन पोंहचला. तेथें एका झाडाखालीं बसून, नगरांत कोणत्या रितीनें जावें याचा विचार करीत होता. तों तेथेंच त्याला अगदीं संध्याकाळ झाला. तें स्थल ह्मणजे महाकालाचें स्मशान होतें. रात्र झाली तशी तेथें अनेक भूतप्रेतांच्या झुंडीच्या झुंडी जमून एकच कल्होळ सुरू झाला. तीं अक्राळविक्राळ भूतें भयंकर गर्जना करीत असत. कूष्मांड, वेताल, मारीच, ब्रह्मराक्षस, इत्यादि भूतगणांचीं तीं भयंकर रूपें व कानठाळ्या बसणारे त्यांचे शब्द ऐकून वसंतक अगदीं घाबरून गेला. तो यौगंधरायणाच्या गळ्याला मिठी मारून रडूं लागला. तेव्हां त्याचें समाधान करून यौगंधरायणानें त्याला धीर दिला. इकडे कित्येक भूतें नृत्य करूं लागलीं. जिकडे तिकडे कुजलेल्या हाडांमासांचा दुर्गंध येतच होता. शेंकडों चिता जळत होत्या. त्यांच्या धुरानें व अंधकारानें नक्षत्रें देखील दिसत नव्हतीं.

थोडक्याच वेळांत अनेक भूतें ह्या दोघांच्या भोंवतीं येऊन घिरट्या घालूं लागलीं. कांहीं म्हणत, " अरे आपल्याला हा आज चांगला खाऊ आला आहे. आधीं या दोघांला मटकावून टाकावें हें बरें." दुसरे म्हणाले, " अरे, हा एक ( यौगंधरायण ) तर मोठा तेजस्वी दिसतो. कदाचित् मांत्रिक असला तर कोणास ठाऊक! मी मांत्रिकाबिंत्रिकाला दाद

१–उज्जयिनी अथवा उज्जैन येथें 'महाकालेश्वर' नांवाचें स्वयंभू शिवलिंग असल्याचें सर्वत्र प्रसिद्ध आहे.

देणारा नाहीं. पण आमचा तो गुरू योगेश्वर, त्याला विचारल्यावांचून ह्यांच्यावर चाल करूं नये हें बरें वाटतें." इतक्यांत योगेश्वर, नांवाचा ब्रह्मराक्षस तेथें आला. त्याला पाहतांच सर्व भूतांनीं ह्या दोघांला मारून टाकण्याविषयीं त्याला विनंती केली. तेव्हां तो ब्रह्मराक्षस यौगंधरायणाजवळ येऊन त्याला नीट रेखून पाहूं लागला. भुतांची अशी गडबड चालली होती तरी यौगंधरायण हूंकिंचूं कांहीं न करितां निर्भयपणें स्वस्थ बसला होता. तो ब्रह्मराक्षस बराच वेळ याच्याकडे पाहत होता. त्याला याचें धैर्य व तेजस्वी मुद्रा पाहून संतोष झाला. तो म्हणाला, "हे धीरपुरुषा, तूं कोण आहेस हें समजून घेण्याची मी इच्छा करतों. आज शेंकडों वर्षे आम्ही या स्मशानांत राहतों; पण येथें सहसा कोणीही मनुष्य रात्रीं येत नाहीं. कदाचित् न समजून कोणी आलाच तर तो जीवंत राहिलेला माझ्या पाहण्यांत आलेला नाहीं. मीं अथवा आमचे वेताळमहाराज इत्यादि मोठ्या मंडळीपर्यंत त्याची दाद देखील पोंहचत नाहीं. ह्या भूतांला पाहिलें कीं तो आपोआपच मरून जातो. किंवा हीं त्याला खाऊन टाकतात. तूं हा वेळपर्यंत जीवंत राहिलास इतकेंच नव्हे, तर हीं सर्व भूतें तुझ्यावर चाल करण्याला देखील समर्थ होत नाहींत! त्यांची गोष्ट घटकाभर असो; पण प्रत्यक्ष मी बराच वेळ तुझ्याकडे पहात आहें, तरी माझ्यानें देखील तुझ्यावर हात टाकवत नाहीं. तेव्हां असा तूं कोण पुरुष आहेस? हें सांग. तुझें धैर्य पाहून मी तर फारच संतुष्ट झालों आहें."

ब्रह्मराक्षस योगेश्वर, याचें हें भाषण ऐकून यौगंधरायण मोठ्या गंभीरपणानें ह्मणाला, "जसा तूं मला पाहून संतुष्ट झालास तसा मीही तुला पाहून फार संतुष्ट झालों आहें." असें बोलून, त्यानें ब्रह्मराक्षसाला जवळ बसवून घेऊन आपली सर्व हकीकत त्याला सांगितली. आणखी बराचवेळ एकमेकांचा संवाद झाल्यावर उभयतांची पक्की मैत्री झाली. ब्रह्मराक्षसानें त्याला पाहिजे तें साह्य करण्याचें वचन दिलें. तेव्हां यौगंधरायणानें, आपलें रूप बदलून खुजा मनुष्यासारखा आपला आकार करण्याविषयीं त्याची

प्रार्थना केली. ब्रह्मराक्षसानें पाहिजे त्यावेळीं रूपांतर करण्याची विद्याच यौगंधरायणाला सांगितली. त्या उभयतांचें सख्य झालें. मग—"प्रसंगविशेषीं स्मरण करशील तर मी तुझें कार्य करीन."—असें सांगून ब्रह्मराक्षस निघून गेला. इकडे भूतांची गडबड अम्मळ शांत झाली, तेव्हां वसंतकाच्या जिवांत जीव आला. हें पाहून यौगंधरायण ह्मणाला, "गड्या, तूं इतका भ्यालास याचें मला आश्चर्य वाटतें. प्रथम तूं मला येथें बसूंच नको ह्मणत होतास; पण येथें बसल्यापासून काय फायदा झाला तो बघितलास ना? आपल्याला पुढें किती जोखमाचें काम करावयाचें आहे? ह्याच वेषानें आपण उज्जयिनींत गेलों असतों तर, कदाचित् लोकांना कळण्याची भीती होती. ब्रह्मराक्षसाची भेट झाल्यामुळें एक मोठें काम झालें. आतां आपल्याला—आपण होऊन ओळख दिल्यावांचून—कोणीही ओळखूं शकणार नाहीं." याप्रमाणें कांहीं गोष्टी बोलत बोलत त्या दोघांनीं पुढची योजना करण्यांत ती रात्र तेथेंच घालविली. पहाट झाली तेव्हां यौगंधरायणानें, ब्रह्मराक्षसानें सांगितल्याप्रमाणें मंत्राचा जप केला, तेव्हां तत्काल त्याचें रूप बदललें. तो अतिशय वृद्ध, खुजा, डोक्यावर टकल पडलेला, हात पाय वांकडे असून फारच मोठे, असा पाहणाऱ्यांस हसूं येईल अशा प्रकारचा चमत्कारिक झाला. तसाच त्यानें वसंतकाचाही वेष बदलला. त्याचे पुढचे दांत लांब होऊन बाहेर दिसूं लागले. चेहरा फारच कुरूप दिसूं लागला. मानेच्या शिरा ताठ बाहेर दिसत असून पोट अतिशय मोठें झालें अशा प्रकारें वसंतकाचेंही रूप बदललें.

याप्रमाणें रूपें बदलून दोघेही उज्जयिनींत प्रवेश करिते झाले. यौगंधरायणानें वसंतकाला पुढें राजवाड्याकडे पाठविला. मागून आपण एकटाच चोहोंकडे पहात पहात चालला होता. याचें चमत्कारिक रूप पाहून शेंकडो पोरें त्याच्या भोंवतीं जमा झालीं. कोणी त्याला नाचावयाला लावीत, कोणी गाववीत, याप्रमाणें वेड्यासारखा तो हवेते चाळे करीत असे. पोरांचा घोळंका त्याच्याबरोबर चाललाच होता. याप्रमाणें फिरतां फिरतां

यौगंधरायण राजवाड्यासमोर आला. वसंतक पूर्वींच तेथें पोंहचला होता. राजवाड्यांतले लोक त्याच्या भोंवतीं वेढा देऊन त्याच्या चेष्टा करीत होते. इतक्यांत यौगंधरायणही तेथें येऊन पोहचला तेव्हां लोकांना फारच गम्मत वाटली. राजवाड्यांतील व इतर लोकांस या दोघांचेंही मोठें कौतुक वाटलें. क्रमाक्रमानें हें वर्तमान राजाच्या अंतःपुरांत पोंहचून वासवदत्तेलाही कळलें. तेव्हां तिणें दासींला पाठवून तत्काल त्यांला गांधर्वशालेंत आणविलें. पोरपणांत थट्टा मस्करीची फारच आवड असते. वासवदत्तेला त्यांचें रूप व चेष्टा पाहून मोठी मौज वाटली; पण इकडे उन्मत्तासारखा वेष धारण करणाऱ्या यौगंधरायणाला, प्रतिबंधांत असणाऱ्या वत्सराजाला पाहून फारच दुःख झालें. त्याच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. वत्सराजाची दृष्टी आपल्याकडे आहे, असें पाहून यौगंधरायणानें खूण केली, ती समजून गुप्त वेषानें आपला मुख्य प्रधान आला आहे, अशी राजाची खातरी झाली. बराच वेळ तेथें वेडेंवाकडें नाचणें, गाणें, इत्यादि चेष्टा करून त्याणें वासवदत्ता व तिच्या दासी वगैरेंचें मन रमविलें. आणि ब्रह्मराक्षसानें दिलेल्या विद्येच्या सामर्थ्यानें अकस्मात् तो वत्सराजावांचून दुसऱ्या कोणालाही दिसेनासा झाला! हा चमत्कार पाहून सर्व मुली आश्चर्ययुक्त होऊन ह्मणाल्या,—"हा बाई मोठाच चमत्कार! तो वेडा अत्तां येथें होता. आणि इतक्यांतल्या इतक्यांत कोठें नाहींसा झाला कोणास ठाऊक." हें मुलींचें भाषण ऐकून आपल्यासमोर यौगंधरायण दिसत आहे असें असून, विद्येच्या प्रभावानें हा इतरांला अदृश्य झाला आहे असें समजून, वत्सराज वासवदत्तेला ह्मणाला, "माझे प्रिय शिष्यिणी, आज तुला सरस्वतीची पूजा करावयाची आहेना? मग तूं अजून कांहीं तयारी कां केली नाहींस बरें? जा तर आतां, स्नान वगैरे करून उत्तम वस्त्रालंकारादिक धारण कर. आणि सर्व सख्यांसह पुजेचें साहित्य घेऊन ये." ही गुरूची आज्ञा मान्य करून—लवकर येतें बरें—

ह्मणून सख्यांसह ती निघून गेली. आतां अगदीं एकांत झाला, असें पाहून यौगंधरायण वत्सराजाशीं जें काय बोलावयाचें होतें तें बोलला. आणि बेडी वगैरे तोडण्याच्या सर्व युक्ती त्याणें त्याला सांगितल्या. व याशिवाय वशीकरण, मोहन, इत्यादिकांचे मंत्रही सांगून,—"महाराज, वसंतकही येथें आला आहे. तो आपलें रूपांतर करून दरवाज्यांत उभा आहे. त्याला आपण शागिर्द ह्मणून आपल्याजवळ ठेवा. वासवदत्ता आतांच आपल्यावर अनुरक्त झाली असेल असें वाटतें. परंतु तिला अद्याप पुरता विश्वास कदाचित् नसेल. तरी आणखीं कांहीं दिवसांनीं तिचा तुमच्यावर पूर्ण विश्वास बसेल, तेव्हां काय सांगावयाची ती युक्ती मी सांगेन. तोंपर्यंत आपण असेच रहा." असें सांगून यौगंधरायण झटकन् तेथून निघून गेला. इतक्यांत वासवदत्ताही पुजेचें साहित्य घेऊन आली. तिला वत्सराज ह्मणाला, "दर्वाजाबाहेर कोणी ब्राह्मण आला आहे असें वाटतें. तर सरस्वतीची पूजा सांगण्याला त्याला बोलाव, आणि दक्षिणा दे." हें ऐकून वासवदत्तेनें—विरूप आकार धारण करणाऱ्या—वसंतकाला बोलावून आणला. पायांत बेडी घातलेल्या वत्सराजाला पाहून वसंतकाला दुःखाचा उमाळा आला, त्याबरोबर तो मोठ्यानें रडूं लागला. कदाचित् मसलत फुटेल ह्मणून—वत्सराज त्याला ह्मणाला, "ब्राह्मणा रडूं नकोस. आपलें रूप वाईट झालें ह्मणून तुला दुःख वाटतें, पण कांहीं काळजी करूं नको. मला त्याचा उपाय माहीत आहे. तूं आतां येथेंच माझ्याजवळ रहा. लवकरच तुझें स्वरूप चांगलें होईल." हें राजाचें भाषण ऐकून वसंतक कायतें समजला, आणि—"असें होईल तर मोठाच अनुग्रह होईल महाराज"—असें ह्मणून वेडेंवाकडें तोंड करून नाचूं लागला. त्याचें तें विलक्षण रूप पाहून राजाला फार हसूं आलें. तेव्हां त्याच्या मनांतला अभिप्राय जाणून वसंतक फारच हसून अधिक वेडेवेडेचार करूं लागला. तो तसा हंसणारा व नाचणारा वसंतक वासवदत्तेला एखाद्या खेळवण्यासारखा वाटला ह्मणून ती याच्यावर संतुष्ट

झाली. तिला त्याची दशा पाहून फार दया आली आहे असें पाहून **वत्सराज** ह्मणाला, "गरीब बिचारा, काय याच्यावर दैवानें संकट आणलें आहे तें पहा. ह्याला औषधउपचार करण्याकारितां येथेंच ठेवून घ्यावा. कर्मणुकीला हें एक चांगलें साधन होईल! कां तुला कसें वाटतें?" हें ऐकून **वासवदत्ता** ह्मणाली, "हो हो, असें झालें तर मला मोठा आनंद होईल. संगीतशालेवर आपलाच अधिकार आहे. याला ठेवून घेतलें ह्मणून कांहीं अडचण नाहीं. तशांतून पाहिजे तर मी आमच्या बाबांना देखील सांगेन. ते तरी कांहीं नको ह्मणायचे नाहींत."

शेवटीं **वसंतकाला** तेथें ठेवून घ्यावाच असा निश्चय ठरला. कांहीं वेळ विनोद झाल्यावर **वसंतकानें वासवदत्तेला सरस्वतीची** पूजा सांगितली. ती आटोपल्यावर—"आतां गुरुपूजा करा."—म्हणून सांगून तिच्याकरवीं **वत्सराजाची** पूजा करविली आणि शेवटीं—हाच तुला पति मिळो— म्हणून आर्शिवाद दिला. तेव्हां **वासवदत्ता** लाजून ह्मणाली, " हा मेल्या भट्या, भलतेंच कांहीं तरी बोलतोस!" असें म्हणून ठणकारा मारीत ती तेथून एका बाजूला गेली. हें पाहून तिच्या सर्व सख्या मोठ्यानें हसूं लागल्या. त्याबरोबर **वसंतकही** नाचूं लागला; पण त्याच्या वेडामुळें तें कोणाच्याच कांहीं मनांत आलें नाहीं. नंतर जेवणखाण आटोपल्यावर **वत्सराज, वसंतक, वासवदत्ता,** व तिच्या सख्या, हीं सर्व कांहीं गोष्टी बोलत बसलीं. तेव्हां हंसत हंसत **वासवदत्ता वसंतकाला** म्हणाली, " भटजीबुवा, तुमची विद्याविद्या तर फारच दिसते. मघां पूजा तर फार चांगली सांगितली. तेव्हां भटपणांत तुम्ही प्रवीण असालच; पण याशिवाय दुसऱ्या विद्या कला वगैरे तुह्माला काय काय येत असतील त्या अंमळ सांगा पाहूं." हें ऐकून मान हालवून खोंकत खोंकत पोटावर हात फिरवून **वसंतक** म्हणाला, " बाईसाहेब, विद्या आणि कला किती तरी मला येतात म्हणून सांगूं! सहा वेद, चार पुराणें, अठरा शास्त्रें, हीं सारीं करतलामलकवत् आहेत. अस्मादिकांची गोष्ट कांहीं सामान्य

नाहीं. पण तें बाकी सगळें कशाला. तुमच्यासारख्या तरुण मुलींना वेद आणि शास्त्रें काय करावयाचीं आहेत. मला मनोरंजक गोष्टी चांगल्या सांगतां येतात. त्या किती तरी चांगल्या आहेत म्हणून सांगूं. त्या दुसऱ्या कुणाकुणाला देखील माहीत नसतील." हें ऐकून **वासवदत्ता** म्हणाली, "बरें, सांगा तर पाहूं एक कथा. तुमचें कसें काय चातुर्य आहे तें तरी पाहूं?" हें तिचें भाषण ऐकून मिटक्या मारून वेड्यावांकड्या माना हालवून तिचें मन रंजवीत होत्साता **वसंतक** विचित्र हास्यरसयुक्त, अशी कथा सांगण्यास प्रारंभ करिता झाला. तो ह्मणाला,

"ह्या विस्तीर्ण पृथ्वीवर अनेक मोठमोठालीं शहरें आहेत. यांत येथून जवळच **यमुना** नदीच्या कांठीं भगवान् कृष्णाची जन्मभूमी, **मथुरा** नांवाची एक प्रसिद्ध नगरी आहे. तींत **रूपणिका** नांवाची एक नामांकित वेश्या होती. आणि **मकरदंष्ट्रा**—हें तिचें नांव अन्वर्थ होतें. सुसरीसारखेच तिचे दांत बाहेर आलेले होते—नांवाची म्हातारी कुंटिणपण करणारी तिची आई होती. ज्या तरुण पुरुषांचें रूपणिकेला पाहून मन आकर्षित होई, त्यांच्या दृष्टीला ही केवळ विषाच्या छटे ( बिंदू ) सारखी वाटत असे. वेश्या बहुतकरून म्हाताऱ्या झाल्या म्हणजे त्या कुंटिणपणा करतात. मग तरुण पोरीबाळी जर एखाद्या गुलजार मनुष्यावर आसक्त झाल्या असतील, तर तें त्यांला खपत नाहीं. हरप्रयत्न करून दोन पैसे काढण्याविषयीं त्या त्यांना उपदेश करित असतात. **रूपणिकेच्या** आईचीही अशीच स्थिति होती. विश्वयोषितांच्या सांप्रदायाप्रमाणें **रूपणिका** नेहमीं यात्रा, समाज, मोठमोठालीं देवस्थानें, इत्यादि ठिकाणीं नटून थटून जात असे. त्याप्रमाणें एकेदिवशीं ती कृष्णाच्या देवालयांत कांहीं विशेष उत्सव होता, ह्मणून गेली होती. तेथें हजारों लोक उत्सव पाहण्यास येत जात असत. त्यांत दूरच्या एका ओट्यावर बसलेल्या एका सुंदर पुरुषाला पाहून **रूपणिकेचें** मन त्याच्यावर जडलें. आपण होऊन कधीं कोणावर मोहित होऊं नये. कपटभाव दाख-

वून लोकांना मोहित करावें.—इत्यादि अनेक प्रकारानें आईनें तिला शिकविलें होतें; पण यावेळीं तें कांहींच तिच्या मनांत राहिलें नाहीं. बरोबर दासी होती, तिला म्हणाली, " मी सांगतें तें कर. तो त्या ठिकाणीं जो पुरुष बसला आहे; त्याला सांग कीं,—कृपा करून आज आपण माझ्या घरीं याल तर मजवर फार उपकार होतील. संध्याकाळीं मी आपली वाट पहात बसतें.—असें सांगून तो काय म्हणतो, तें मला परत सांग. कदाचित् पैशाच्या अडचणीनें तो संकोच मानूं लागला तर—मला त्याची कांहीं गरज नाहीं—असें त्याला सांग. जा. एवढें माझें काम करून ये कशी! तोंपर्यंत मी येथेंच बसतें." ही आपल्या यजमानिणीची आज्ञा ऐकून दासीनें त्या पुरुषाजवळ जाऊन मोठ्या नम्रतेनें त्याला रूपणिकेचा निरोप सांगितला. तो ऐकून थोडासा विचार करून तो गृहस्थ तिला म्हणाला, " अग, तूं सांगतेस हें मला कांहीं खरें वाटत नाहीं. वेश्या कधीं तरी कोणाला अशा रितीनें बोलावितात काय? तेव्हां यांत कांहीं तरी मतलब असावा असें मला वाटतें. बरें तें एक असो. तुझ्या यजमानिणीनें मला खरोखरच बोलाविलें असेल. कारण, ती मोठी प्रतिष्ठित आहे. तेव्हां ती उगीच खोटा निरोप पाठवील असें वाटत नाहीं. तथापि मीं तिच्या घरीं येऊन उपयोग काय? वेश्येचें घर ह्मणजे शुद्ध दुकान आहे. हातांत पैसे असल्यावांचून जशी दुकानांतली कांहीं चीज मिळत नाहीं, तसेंच वेश्येच्या घरीं पैशावांचून नुसतें, या बसा, देखील कोणी म्हणावयाचें नाहीं. तशांतून ती तर मोठी श्रीमान्. तिच्या घरीं आमच्यासारख्याची गणना तरी आहे काय? मी आपला गरीब ब्राह्मण आहें. लोहजंघ माझें नांव. अठराविश्वे दरिद्र माझ्या पाठीस लागलें आहे. मग तुझ्या यजमानिणीच्या घरीं येऊन आपली फजीति कोणी करून घ्यावी."

हें त्याचें उदासीनपणाचें भाषण ऐकून दासी म्हणाली, " महाराज, आपण असें काय बोलतां हें? आमच्या बाईसाहेबांच्या घरीं पैशाला कांहीं कमी लागलें आहे काय? त्यांना तुमच्या पैशाअडक्याची कांहीं

गरज नाहीं. उलट त्याच आपल्याला पाहिजे तर कांहीं देतील. केवळ त्यांचें मन बसलें आहे, ह्मणून त्या आपल्याला बोलवीत आहेत. तर मनांत कसलीही शंका न धरतां आपण बेलाशक त्यांच्या घरीं या. आतां विशेष कांहीं सांगत नाहीं. तेथें आल्यावर आपलीच खातरी होईल." हें तिचें भाषण मनःपूर्वक आहे, असें समजून लोहजंघानें येण्याचें कबूल केलें. तेव्हां परत जाऊन दासीनें रूपणिकेला ही हकीकत सांगितली, ती ऐकून फार संतुष्ट होत्साती ती वेश्या आपल्या घरीं गेली. सायंकालीं उत्तम अलंकार वगैरे धारण करून दरवाज्यांत लोहजंघाची वाट पहात बसली. इतक्यांत तोही तेथें आला. मकरदंष्ट्रा त्याच्याकडे टवकारून पाहून—हा कुठला कोण ? म्हणून विचारूं लागली. पण रूपणिकेनें तिला कांहीं उत्तर दिलें नाहीं. ती आपल्या प्रियाला सामोरी जाऊन हाताला धरून त्याला आपल्या महालांत घेऊन गेली. फारच आतूर झाल्यामुळें कामबाणांनीं व्याकूळ झालेल्या रूपणिकेला वाटेंत ठेंचा देखील लागल्या. महालांत पोंहचतांच ती त्याच्या गळ्याला मिठी घालून म्हणाली, " प्राणप्रिया, आजपासून हें माझें शरीर व जें कांहीं माझें ह्मणून या जगांत असेल, त्या सर्वांचा धनी तूं आहेस. त्याची पाहिजे तशी व्यवस्था कर. आणि मनांत कांहीं शंका न बाळगतां सुखानें माझ्याकडून सेवाचाकरी करून घे." इत्यादिप्रकारें भाषण करून तीं उभयतां रममाण झालीं. लोहजंघ रूपगुणादिकांनीं फारच अप्रातिम होता. त्याच्या त्या गुणसंपत्तीनें वश झालेल्या रूपणिकेला त्याच्या समागमावांचून दुसरें कांहीं आपलें सार्थक आहे, असें वाटलें नाहीं ?

याप्रमाणें लोहजंघब्राह्मणाला मोहित होऊन रात्रंदिवस त्याच्याशीं रूपणिका अनेक प्रकारचे विलास करूं लागली. दुसऱ्या पुरुषांचें मुखावलोकन देखील तिला असह्य झालें. लोहजंघही आपल्यावर प्रेम करणाऱ्या त्या सुंदरीवर आसक्त होऊन तिच्याच घरीं राहूं लागला. रूपणिकेची आई मकरदंष्ट्रा, ह्या नव्या गृहस्थानें काय काय दिलें

म्हणून वरचेवर चौकशी करीत होती. रूपणिकेला आपल्या आईचा स्वभाव माहीत होता, म्हणून ती कांहीं तरी दागिने, वस्त्रें, इत्यादिक आणवून, आज हें दिलें, उद्यां तें दिलें असें तिला सांगत असे. त्यावरून मकरदंष्ट्रा संतुष्ट होती. पण कांहीं दिवसांनीं, हें सर्व कपट आहे असें तिच्या लक्षांत आलें. घरांतल्या दासीकडून कांहीं गुणगुण समजल्यावरून हे राजश्री अगदीं कफल्लक आहेत, अशी तिच्या मनाची खातरी झाली. तेव्हां एकांतीं रूपणिकेला बोलावून फार दुःखित होऊन ह्मणाली, " बाळे, रूपणिके, तूं आतां प्रौढ आहेस. तुला मी कांहीं सांगावयाचें राहिलें आहे असें नाहीं. तूं वेश्यांचा धर्म जाणतच आहेस. आपण कोणच्याही नादाला लागून कांहीं उपयोग नाहीं. जर त्याच्याजवळ द्रव्य असेल, तर कोणाही पुरुषाच्या संगतींत रहावें. नाहींतर निर्धन पुरुषांच्या नादीं लागणें हें फार वाईट आहे. मी आज किती दिवस पाहतें, हा कोणी तुझा आवडता पुरुष असावा असें वाटतें. मी सांगतें याचा राग मानूं नको. याच्याजवळ द्रव्य मुळींच नाहीं असें दिसतें. आह्मी वेश्यांनीं प्रेताला देखील आलिंगन द्यावें; पण निर्धन पुरुषाला कधीं शिवूंही नये. असें असून तूं या दरिद्र्याच्या संगतीनें राहतेस याला काय ह्मणावें ? कोठें प्रेम आणि कोठें वेश्यापण ? या दोहोंची कधीं तरी संगती होते काय ? मला वाटतें कीं, तूं आपलें वेश्यापण विसरलीस. मुली, अनुरागवती वारवधू सायंकालच्या आकाशाच्या रंगाप्रमाणें फार दिवस टिकत नाहीं. जशीं नाटकांत वेष घेऊन आलेलीं स्त्रीपुरुषें एकमेकांवर प्रेम दाखवितात, तसें वेश्येनें पैसा काढण्याकारितां प्रेम दाखवावें; पण त्यांत खरेपणा मुळींच असतां कामा नये. बरें. असो. आजपर्यंत झालें तें झालें. आतां तरी तूं या कर्मदरिद्र्याला सोडून दे. मी तुझ्या हिताची गोष्ट सांगत आहें ती ऐक. व्यर्थ आपला नाश करून घेऊं नकोस."

हें आईचें भाषण ऐकून रूपणिकेला मनापासून अतिशय राग आला व फार दुःखही झालें. ती आईला ह्मणाली, " तूं सांगतेस तें

कदाचित् खरें असेल; पण मला त्याचा कांहीं उपयोग नाहीं. प्रेम हा मनोविकार आहे. तो अमुक ठिकाणीं बैस ह्मटल्यानें बसत नाहीं व नको ह्मटल्यानें जात नाहीं. दोन भिन्न वस्तूंचें प्रीतीनें एकीकरण होतें. त्याला रूप, द्रव्य, विद्या, इत्यादि बाह्यकारणांची अपेक्षा लागत नाहीं. कांहीं अवर्णनीय अंतस्थ कारणांनीं एकमेकांवर प्रीति बसते आणि एकवेळ ती बसली ह्मणजे तसेंच कांहीं कारण झाल्यावांचून—दुसऱ्यानें हवें तितकें सांगितलें तरी—ती नाहींशी होत नाहीं. व तिला चोरूनही ठेवतां येत नाहीं. वेश्यांनीं कसें प्रेम करावें ? हें जें तूं सांगितलेंस तें खरें आहे व ज्याच्यावर खरें प्रेम नसेल, त्याच्याशीं आपल्या मतलबाकरितां तसें वागतांही येईल. पण एकदां खरें प्रेम जडल्यावर मग कांहीं इलाज नाहीं. तूं सांगितल्याप्रमाणें ज्या वेश्या प्रीतीचा ओघ आंवरून कपटवर्तन करीत असतील, त्या मोठ्याच धन्य ह्मणावयाच्या ! मला तें मेलें कपट मुळींच नको. हा लोहजंघ दरिद्री असो, अथवा कसलाही असो. मला तो प्राणापेक्षांही प्रिय आहे. त्याच्यावांचून मी कोणा मेल्याचें कधीं तोंड देखील पाहणार नाहीं. तूं ह्मणतेस कीं द्रव्य मिळणार नाहीं, तर मला त्याची मुळींच पर्वा नाहीं. आज मला कांहीं कमी नाहीं. घरांत पुष्कळ द्रव्य भरलें आहे. व्यवस्थेनें चाललें तर सात पिढ्यांपर्यंत दुसरी कांहीं कमाई न केली तरी अडचण पडणार नाहीं. तर आई, मी तुला हात जोडून सांगतें कीं, इतःपर मला असल्या भलभलत्या गोष्टी सांगून विनाकारण त्रास देऊं नकोस.” मुलीचें हें भाषण श्रवण करून थेरड्या मकरदंष्ट्रेला फार राग आला. पण आतां बोलून कांहीं उपयोग नाहीं, ह्मणून ती उगीच बसली. एकुलत्या एका मुलीला सोडून दुसरीकडे राहवेना. नाहींतर, आपल्या वेळचें काय होतें तें घेऊन ती कदाचित् निराळी झाली असती. तथापि लोहजंघाला पाहिला ह्मणजे तिच्या पायांची आग मस्तकापर्यंत जात होती. त्याला युक्तीप्रयुक्तीनें कसातरी काढून लावावा, असा तिनें आपल्या मनांत पक्का निश्चय केला. वस्तुतः ह्या ह्मातारीला इतका खटा-

टोप करण्याचें कांहीं कारण नव्हतें. संसार काय तो तिच्या पोरीचा. हिचें काय ? मिळेल तें खाऊन कांहीं परलोकाचें साधन करावें; पण असले विचार त्या चांडाळणीच्या मनांत कोठून येणार ? लहानपणापासून जें करित आली, त्याचे संस्कार जावेत कसे ? असो. लोहजंघाला काढून लावण्याविषयीं ती कांहींतरी तजवीज पाहत होती.

मकरदंष्ट्रा एकेदिवशीं दरवाजांत उभी होती, इतक्यांत एक मोठ्या सरदाराचा तरूण मुलगा त्या वाटेनें जात असलेला तिच्या दृष्टीस पडला. त्याच्याबरोबर पुष्कळसे हत्यारबंद शिपाई होते. तो कांहीं कामाकरितां दूरच्या राजधानीहून आला असून पुढें कोठें जाणार होता. वाटेंत बरोबरची खर्ची सरल्यामुळें त्याच्या चेहऱ्यावर कांहीं काळजीची झांक मारीत होती. हा आपलें काम करील, असें समजून म्हातारी कुंटिण धांवत धांवत त्याच्यापुढें जाऊन हात जोडून ह्मणाली, " महाराज, आपली ओळख नाहीं, तरी आपण कोणी मोठे राजपुत्र आहां असें मला वाटतें. फार दुरून आल्यामुळें आपणाला मार्गाचे श्रम झाले असतील. तर अंमळ येथें विश्रांती घेतली असतां फार चांगलें होईल. मलाही एक विनंती करावयाची आहे. जर ती आपणाला मान्य झाली, तर त्यांत आपलेंच सर्व प्रकारें हित होणार आहे. जरा एकीकडे येण्याचे श्रम घ्याल तर कायतें कळवीन. " हें तिचें भाषण ऐकून त्या सरदाराच्या, प्रथम कांहींच लक्षांत आलें नाहीं. पण ही म्हातारी काय सांगते, तें एक-वेळ ऐकून तरी घ्यावें. मग आपल्याला योग्य वाटलें तर करावें, नाहीं तर आपला मार्ग आहेच. असा विचार करून तो तिच्याबरोबर रस्त्याच्या आड एकाठिकाणीं गेला. तेव्हां सर्व हकीकत सांगून ती ह्मणाली, " एक मेला दरिद्री कामुक पुरूष येऊन माझें सारें घर बळका-ऊन बसला आहे. घरांतल्या अपरिमित संपत्तीचा तो दांडगा खुशाल उपभोग घेत आहे. तर आपण कृपा करून आतां माझ्या घरीं या, आणि पाहिजे त्या उपायानें त्या बोकडाला एकदांचा घरांतून बाहेर काढा,

ह्मणजे मी सुखी होईन. सर्व घर तुमचेंच आहे. माझी नक्षत्रासारखी सुंदर मुलगी आहे तीही तुह्मी घ्या. तुमच्यासारख्या भाग्यशाली पुरुषाच्या हातीं सारें गेलें तर मला त्याचा संतोष होईल. पण त्या दरिद्र्याच्या हातीं मात्र पडूं नये, असें माझ्या मनापासून आहे. माझी मुलगी जरा कोठें त्याच्याकडे प्रेमानें पाहते, तेवढ्यावरून तो इतका शिरजोर झाला आहे कीं, सगळ्याचा मालक आपणच: असें तो समजतो. तर कृपाकरून एवढी माझी विनंती आपण ऐका. एरव्हीं तो दुष्ट कधींही नाहींसा होणार नाहीं." हें तिचें भाषण ऐकून सरदार मनांत ह्मणाला, ईश्वरकृपेनें हें आयतेंच संधान आलें आहे. हिचा वाडा मोठा टोलेजंग दिसतो आहे. तेंव्हां आंत पैसा पुष्कळ असेल. पुढें कसें कां होईना. तूर्त आपण हिच्या ह्मणण्याप्रमाणें करून दोन दिवस चैनींत विश्रांति घ्यावी. आणि काय मिळेल तें घेऊन पुढच्या वाटेला लागावें, ह्मणजे खर्चाची तरी एक अडचण भागेल.'— असा विचार करून त्यानें तिची विनंती मान्य केली. आणि तो आपल्या शिपायांसह तिच्या वाड्यांत गेला. यावेळीं लोहजंघ कांहीं कामाकरितां बाहेर गेला होता. व रूपणिका श्रीकृष्णाच्या देवळांत पूजेला गेली होती. क्षणमात्रानें लोहजंघ परत आला. आणि नित्याप्रमाणें निःशंकपणें घरांत जाऊं लागला. सरदाराचे शिपाई चहूंकडे त्याची वाट पहात बसलेच होते. ह्मातारीनें इषारा करण्याबरोबर त्यांणीं लोहजंघाचा हात धरून त्याची लाथाबुक्यांनीं यथेच्छ कणिक मऊ केली. आणि तो अगदीं मरणोन्मुख झाला, असें पाहून जवळच्या गटारांत त्याला फेंकून दिला. त्याच्या आयुष्याची दोरी बळकट होती म्हणून प्राण मात्र गेला नाहीं. व कांहीं वेळानें सावध होऊन, कोणाच्या दृष्टी न पडतां तो हळुहळू तेथून निघून गेला.

नंतर ती सुंदर वेशा रूपणिका कांहीं वेळानें, देवपूजा वगैरे आटपून परत आपल्या घरीं आली. तेंव्हां हें सर्व वर्तमान ऐकून तिला फार दुःख झालें. ती मोठ्यानें रडूं लागली. कांहीं केल्या तिचें रडें

आवरेना. लोहजंघाचा तिणें चहूंकडे शोध केला; पण तो कांहीं कोठें मिळाला नाहीं. असें पाहून त्या सरदारालाही फार वाईट वाटलें. त्याला म्रातारीचा फार राग आला. तिच्या दुष्ट बुद्धीला लागून आपण विनाकारण एका भल्या स्त्रीचा छळ केला ह्मणून त्याला मोठा पश्चात्ताप झाला. तिचें खरें प्रेम पाहून त्याच्या मनाला फार चटका लागला, ह्मणून तो पुष्कळ प्रकारें तिचें समाधान करून झालेली सर्व हकीकत सांगूं लागला. रूपणिकेला, हें सर्व आपल्या आईचें कर्म आहे, असें पूर्वींच समजलें होतें. ह्मणून ती सरदाराला ह्मणाली, "महाराज, आपण उगीच आपल्या जिवाला पश्चात्ताप कां करून घेतां? झाल्या गोष्टीबद्दल मी काडीभर देखील आपल्याला बोल लावणार नाहीं. माझेंच कपाळ फुटकें आहे. तेथें दुसऱ्याला काय ह्मणायचें? असो जर माझा त्याचा (लोहजंघाचा) योग असेल, व ईश्वरकृपेनें तो कोठेंतरी जिवंत असेल, तर कधितरी मला भेट देईल. मीच त्याला येथें आणून अशा संकटांत पाडलें. तेव्हां ह्या सर्व अनर्थाला कारण मीच आहें." हें तिचें बोलणें ऐकून सरदारानें तिची क्षमा मागून निरोप घेतला. त्यावेळीं रूपणिका फार दुःखित होती, व त्या दुःखाला कारण हा सरदारच होता. तरी त्याची अडचण आहे, असें पाहून रूपणिकेनें वाटखर्चीकरतां ह्मणून बरेंच द्रव्य देऊन त्याला जाण्यास निरोप दिला. आणि तो गेल्यावर ती पुनः रडूं लागली. तिची दुष्ट आई आपण केलेली युक्ती साधली, ह्मणून मनांत फार संतुष्ट झाली होती. तरी हें आपलें कौटिल्य मुलीला समजलें, ह्मणून लाजेनें बराच वेळ एका बाजूला बसली होती. नंतर झालेल्या गोष्टींत आपलें कांहीं अंग नाहीं, अशी मुलीची खात्री करण्याकरतां दुःखित झाल्यासारखें करून डोळे पुशीत पुशीत मुलीजवळ येऊन तिला समजुतीच्या गोष्टी सांगूं लागली.

रूपणिका गुडघ्यांत तोंड घालून रडत होती. ती आईनें पुष्कळ सांगितलें तरी कांहीं एक बोलली नाहीं. तिचें तें मायावी भाषण रूपणिकेला दुःखावर डाग दिल्यासरखें वाटत होतें, ह्मणून ती संतापून ह्मणाली, "परमेश्वरानें

तुझ्या पोटीं जन्म दिलें आहे. तेव्हां मी तुला कांहीं वाईट बोलावें हें योग्य नाहीं. आतां मला ब्रह्मज्ञान तें कसलें सांगतेस? तुझ्या मनांत जें काय करावयाचें होतें तें केलेंसना? ज्या सुंदर पुरुषाला पाहून तुझ्या अंगाची लाही होत होती, त्याचा सूड घेतलास. आतां तरी तुझा संतोष झाला किं नाहीं? किं आणखी कांहीं करायचें आहे? पण तूं इतकें केलेंस तरी तुझ्या मनांतला हेतू कांहीं सिद्ध व्हायचा नाहीं. ही रूपणिका अशितशी नाहीं. एकवेळ मी ज्या पुरुषाला हें माझें शरीर अर्पण केलें आहे, त्याच्यावांचून दुसऱ्या कोणालाही हें उपभोग घेण्याला मिळावयाचें नाहीं. तो माझा प्राणविसावा जर कोठें जीवंत असला, तर तोच पुनः याचा उपभोग घेईल. नाहीं तर निर्जन अरण्यांतल्या फुलाप्रमाणें हें शरीर [illegible] गळून जाईल. मग तूं जें इतकें केलेंस त्याचा उपयोग काय? पूर्वजन्मींचा माझा कांहीं दावा साधावयाचा होता, ह्मणून प्राण जाईपर्यंत मला दुःखसमुद्रांत लोटून दिलेंस; यापरतें दुसरें कांहीं नाहीं. हा हा रे देवा! काय मी चंडाळीण दुष्ट पहा! पण प्रत्यक्ष आपली आईच वैरीण आहे हें मला तरी काय ठाऊक? नाहीं तर मी त्या सज्जनपुरुषाला प्राणसंकटांत कां घातलें असतें? देवा नारायणा! जर कांहीं माझें सुकृत असलें, तर त्यानें किंवा माझ्या सर्व आयुष्यानें त्याला—तो जेथें असेल तेथें—सुखरूप राख. पुनः त्याचें दर्शन होणें तर दुर्लभच आहे. आतां, तो होऊन माझ्या ह्या जळक्या तोंडावर कशाला नजर घालील? पण कोठेंही सुखरूप असो ह्मणजे झालें." असें बोलून आपल्या प्रियाचे गुण आठवून ती परोपरीनें विलाप करूं लागली.

इकडे लोहजंघ त्या खंदकांतून कसातरी वांचून बाहेर निघाला, तो एका अरण्यांत पोहोंचला. ह्मातारीच्या कुटणीनें बलात्कारानें त्याचा फार अपमान केल्यामुळें तो अतिशय दुःखित झाला होता. तीर्थयात्रेला जाऊन कोठेंतरी प्राणत्याग करावा, असाच त्याचा यावेळीं संकल्प झाला. जी त्याला प्राणापेक्षांही प्रिय, त्या रूपणिकेचा वियोग होऊन एवढ्या

मोठ्या संपत्तीचा मनास वाटेल त्याप्रमाणें उपभोग घ्यायला मिळत होता, तो स्वप्नांतल्या राज्याप्रमाणें क्षणांत नाहींसा झाला. ह्मातारीनें मोठा अपमान केला, असह्य मार खावा लागला, घाणेरड्या गटारांत नरकवास भोगावा लागला, इत्यादि दुःखें एकाच वेळीं भोगावीं लागल्यामुळें त्याचें मन अगदीं उदास झालें होतें. त्याचें सर्वांग दुखत होतें, तरी कुटणीनें ज्यांच्याकडून आपणाला मारविलें त्यांच्याकडून कदाचित् ती पाठलाग करवील या भीतीनें तो तसाच हळूहळू पुढें चालला होता. कांहींवेळ मार्गक्रमण केल्यावर तो एका मोठ्या मैदानांत येऊन पोहोंचला. ते दिवस ग्रीष्मऋतूचे असून भर दोनप्रहर झाले होते. त्या दिवशीं खायाला अथवा प्यायला कांहींच मिळालें नव्हतें. उन्हाच्या त्रासानें कंठ अगदीं सुकून गेला होता. वरचेवर त्याच्या डोळ्यापुढें अंधारी येऊं लागली. कोठेंतरी सावलींत बसून विश्रांति घ्यावी, असें त्याच्या मनांत होतें, पण त्या माळरानांत आसपास कोठें झाडझुडूप कांहींच नव्हतें, ह्मणून तो तसाच हळूहळू पुढें चालला होता. तों जवळच एक हत्तीचें सुकलेलें प्रेत त्याच्या दृष्टीस पडलें. मागच्या बाजूनें आंत प्रवेश करून कोल्ह्यांनीं त्यांतलें सर्व मांस खाऊन फक्त सुकलेला कातड्याचा फुगारा मात्र राहिला होता. लोहजंघ कोठेंतरी सावली मिळेल ह्मणून पाहतच होता. त्यानें निरुपायास्तव त्या फुगाऱ्यांत घटकाभर विश्रांति घ्यावी ह्मणून आंत प्रवेश केला. हत्तीचें कातडें अतिशय जाड असल्यामुळें आंत उन्हाचा त्रास फारसा होत नव्हता व त्याच्या छिद्रांतून वाऱ्याची झुळूकही येत होती. त्या श्रमलेल्या लोहजंघाला विश्रांतिस्थल चांगलें मिळाल्या कारणानें लौकरच निद्रा लागली. ते दिवस वादळाचेच होते, थोडक्याच वेळांत आकाश जिकडे तिकडे मेघाच्छादित होऊन मोठा पाऊस पडला. सुकलेल्या कातड्यावर पाणी पडल्याकारणानें तें भिजून संकुचित झालें. अर्थात् ज्या पश्चिमद्वारानें लोहजंघ गेला होता, तें अगदीं संकुचित होऊन बाहेर निघण्याचा मार्ग बंद झाला. फार गारठा झाल्यामुळें कांहीं वेळानें लोह-

जंघ जागा होऊन पाहतो तों, आंतून बाहेर निघण्याला मुळींच मार्ग नाहीं. तें पाहून—"हा एक दैवाचा उपकारच आहे!"—असें ह्मणून **लोहजंघ** निरुपायास्तव आंतच चिंता करित बसला. पाऊस एकसारखा पडतच होता, डोंगरावरच्या पाण्याचा एक मोठा लोट येऊन तें हत्तीचें कातडें त्याच्या वेगानें ढकलीत ढकलीत एका मोठ्या नदींत जाऊन पडलें. तेथून नदीच्या प्रवाहाबरोबर वाहतां वाहतां समुद्रांत येऊन पोंहचलें. तेथें समुद्राच्या पाण्यावर तरंगत असतां वरून फिरणाऱ्या एका मोठ्या गरूड पक्ष्याला, तो मांसाचा गोळा आहे, असें वाटल्यावरून त्यानें तें आपल्या नखांनीं उचलून समुद्राच्या पलिकडच्या कांठावर नेऊन फोडून पाहिलें. तों आंत मांस वगैरे कांहीं नसून हा दुर्दैवी लोहजंघ दृष्टीस पडला. हा मनुष्य कदाचित् आपल्याला मारील ह्मणून, **लोहजंघाच्या** आयुष्यानें निवारण केलेला तो पक्षी दूर उडून गेला. दैवाची गती फार विचित्रच! अशीं मोठीं एकावर एक संकटें आलीं तरी लोहजंघ जिवंत राहिला! गरुडपक्ष्यानें देखील त्याला भ्यावें हा मोठाच चमत्कार.

त्या पक्ष्यानें आपल्या चोंचीनें कातड्याला जें भोंक पाडलें होतें त्याच वाटेनें **लोहजंघ** बाहेर येऊन पाहतो तों समुद्राच्या पलिकडच्या तीरावर आपण आहें, असें त्याला समजलें. पण येथें कसा येऊन पोंचलों, हें मात्र त्याला कांहींच माहीत नव्हतें ह्मणून आश्चर्यानें, निद्रेवांचून मोठ्या स्वप्नांतला हा चमत्कार आहे, असें त्यास वाटलें. ज्याठिकाणीं तो होता, ती सर्व **राक्षसांची** भूमी होती. बराचवेळ तटस्थ उभा राहून सृष्टीचा चमत्कार पहात होता. इतक्यांत दोघे **राक्षस** त्याणें पाहिले. त्यांचें भयंकर स्वरूप पाहून जसें **लोहजंघाला** मोठें भय वाटलें, तसेंच तेही, पूर्वीं कधीं न पाहिलेल्या ह्या मनुष्याला पाहून चकित झाले. पूर्वीं **राम**नांवाचा कोणी मनुष्य समुद्र तरून आला आणि त्यानें **रावणाला** मारलें, इत्यादि गोष्टी त्यांला ऐकून ठाऊक होत्या. ह्मणून हाही मनुष्य तशाच हेतूनें आला असेल, असें त्यांस

वाटलें. त्यांनीं हें वर्तमान आपला राजा जो बिभीषण त्याला सांगितलें. रामाचा पराक्रम बिभीषणाला माहीत होता म्हणून तोही मनुष्याला भीत होता. हा आलेला मनुष्य कांहींतरी उपद्रव करील, असें समजून तो एका राक्षसाला म्हणाला, "माझ्या आज्ञेनें त्या मनुष्याजवळ जा. आणि— आपण आमच्या घरीं येऊन अनुग्रह करावा—अशी माझी प्रार्थना कळवून त्याला सत्कारपूर्वक इकडे घेऊन ये." राजा बिभीषणाचें हें भाषण ऐकून त्या राक्षसाला मोठा आचंबा वाटला. कारण, लोहजंघाची लहानशी मूर्ती त्यानें पाहिली होती, तेव्हां यःकश्चित् मनुष्याला एवढा पराक्रमी आपला राजा इतका भितो, याचें त्याला फार नवल वाटलें. तरी राजाची आज्ञा मान्य करून तो लोहजंघाजवळ गेला. आणि त्याला त्याची विनंती कळवून लंकेंत येण्याविषयीं आग्रह करूं लागला. तें पाहून लोहजंघ मनांत म्हणाला,—हा एक मोठा चमत्कारच आहे. या राक्षसांला पाहिल्यापासून मला आपल्या जिवाचीच काळजी पडली होती. माझें शरीर आणि सामर्थ्य तें कितीसें? मघांच यांणीं मला उचलून तोंडांत टाकलें असतें तर, एखाद्या लहानशा पेढ्यासारखा मी यांच्या दांतांला देखील लागलों नसतों. पण काय असेल तें असो. हे मला पाहून भितात, यांत कांहीं संशय नाहीं! तर यावेळीं आपणही अंमळ थाटानेंच वागावें, म्हणजे यांच्या सपाट्यांतून सुटलों तर सुटेन. असा विचार करून तो बिभीषणाची विनंती मान्य करून त्या राक्षसाबरोबर लंकेत गेला. त्या नगरीची शोभा काय वर्णन करावी? प्रत्यक्ष लंकाच ती. जिकडे पहावें तिकडे घरें दारें सर्व सोन्याचीं. लोहजंघ वेशीच्या आंत गेला तेव्हां त्याला ती शोभा पाहून फारच आश्चर्य वाटलें. तो हळूहळू चोंहोंकडे पहात पहात राजवाड्यांत येऊन पोंहचला. तेव्हां बिभीषण सामोरा येऊन त्यानें मोठ्या सत्कारानें त्याचें आतिथ्य करून—"ब्राह्मणा, तूं ह्या प्रदेशांत कसा आलास?" म्हणून त्यानें प्रश्न केला. लोहजंघ मोठा धूर्त होता. तो म्हणाला, "महाराज,

मी मथुरेंत राहणारा लोहजंघ नांवाचा ब्राह्मण आहें. दरिद्रानें फारच पीडा दिली ह्मणून निश्चय करून नारायणाचें आराधन केलें. त्याणें प्रसन्न होऊन स्वप्नांत दृष्टांत दिला कीं, " लंकेंत बिभीषण राजा राज्य करीत आहे. तो माझा प्रिय भक्त आहे. तूं त्याच्याजवळ जाऊन माग, ह्मणजे तो हवें तितकें द्रव्य तुला देईल." ही परमेश्वराची आज्ञा ऐकून मी विनंती केली कीं,—कोठें बिभीषण आणि कोठें मी? समुद्राच्या पलीकडे असणाऱ्या बिभीषणाचें दर्शन मला होईल तरी कसें? हें ऐकून दयाळू भगवान् ह्मणाला,—तूं त्याची काळजी करूं नकोस; आजच जा, ह्मणजे झालें. तो तुला भेटेल. हें ऐकून मी तत्काल जागा होऊन पाहतों तों समुद्राच्या ह्या पारीं आहें असें मला समजलें. मी येथें कसा किंवा कोणच्या वाटेनें आलों, इत्यादि गोष्टी विचाराल तर मला कांहीं माहीत नाहीं. येथें आलों एवढें मात्र खरें." लोहजंघाचें हें भाषण ऐकून, हा कोणी तरी मोठा समर्थ पुरुष आहे असें बिभीषणाला वाटलें. तो मनांत ह्मणाला,—ही लंका समुद्रांत चारशें कोस अंतरावर आहे. येथें इतर कोणत्याही साधनानें येतां येणार नाहीं. असें असून हा आला, तेव्हां हा ईश्वरी चमत्कारच आहे, यांत कांहीं संशय नाहीं. असा विचार करून बिभीषण लोहजंघाला ह्मणाला, " बरें आहे. कांहीं चिंता नाहीं. ईश्वरानें मजवर हा मोठा अनुग्रहच केला. आपल्याला पाहिजे तितकें द्रव्य मिळेल. थोडे दिवस येथें विश्रांती घेऊन मग आपण परत जावें." असें सांगून त्यानें लोहजंघाला ठेवून घेतला आणि कदाचित् राक्षस त्याला उपद्रव देतील ह्मणून सर्वांला सक्त ताकीद देऊन स्वतः आपल्याच दृष्टीखालीं त्याला राहण्यास सांगितलें. त्या लंकेंत स्वर्णमूल नांवाचा एक मोठा सोन्याचा पर्वत आहे, त्यावर गरुडपक्षी राहतात. त्यांतील एका गरुडपक्ष्याला आणवून त्याला लोहजंघाच्या संवईचा केला. जेव्हां लोहजंघ मथुरेला जाण्यास निघेल तेव्हां हाच पक्षी त्याचें वाहन होईल असा बिभीषणाच्या मनांतला विचार

होता. लोहजंघ नेहमीं त्या पक्ष्यावर बसून लंकेंत यथेच्छ संचार करूं लागला. एकेसमयीं मोठ्या कौतुकानें त्यानें बिभीषणाला विचारिलें कीं,—"महाराज, ही आपली नगरी जिकडे पाहावी तिकडे सर्व सोन्याची आहे. हिऱ्यामाणकांची तर गणनाच नाहीं! बाकी सर्व प्रदेश असा असून केवळ जमीन मात्र लांकडाची आहे, याचें कारण काय ?" हा त्याचा प्रश्न ऐकून बिभीषण ह्मणाला "ब्राह्मणा, जर तुला ऐकण्याचें कौतुक वाटत असेल तर याविषयीं एक ऐतिहासिक गोष्ट सांगतों ती ऐक. ह्मणजे तुझ्या प्रश्नाचें उत्तर मिळाल्यासारखें होईल.

पूर्वी ब्रह्मदेवाचा नातू आणि मरीचिऋषीचा पुत्र भगवान् कश्यपनामक ऋषी होता. त्याच्या पुष्कळ स्त्रिया होत्या; त्यांत नागाची आई कद्रू आणि गरुडाची आई विनता या नांवाच्या दोघी स्त्रिया होत्या. ह्या उभयतां सख्या बहिणी असूनही सवतिमत्सर करीत असत. कांहीं कारणामुळें दोघींत पैज पडली. तींत विनता हरल्यामुळें ती सवतीचें दास्य करित होती. पुढें गरुड उत्पन्न झाला, तेव्हां आईला दासीभावापासून मुक्त करण्याविषयीं त्यानें नागांची प्रार्थना केली, आणि त्यांच्या ह्मणण्याप्रमाणें देवलोकापासून अमृत आणण्याविषयीं तो निघाला. त्याला वाटेंत भूक लागली ह्मणून आपल्या बापाजवळ, (कश्यपाजवळ) कांहीं खाण्याला मागूं लागला. तेव्हां त्यानें सांगितलें, कीं, "पुत्रा, समुद्रांत एक हत्ती आणि कांसव असे दोन मोठे प्राणी आहेत. शापानें त्यांना तें देह प्राप्त झाले आहेत; तर तूं त्या दोघांनाही भक्षण करून शापमुक्त कर." बापाची आज्ञा ऐकून गरुडानें एका पायाच्या नखांत हत्ती व एकांत कांसव धरून दोघांसही वर काढले, आणि कोठें तरी चांगल्याशा ठिकाणीं बसून त्यांचा फराळ करावा ह्मणून तो मोठ्या कल्पवृक्षाच्या एका खांदीवर जाऊन बसला. तेव्हां तत्काळ त्याच्या भारानें ती खांदी मोडून खालीं पडूं लागली. पडतां पडतां गरुडानें खालीं पाहिलें तों—तिला गळ घेऊन साठ हजार वालखिल्य

ऋषी तप करीत होते, ते त्याच्या दृष्टीस पडले. तेव्हां ती खांदी खालीं पडेल तर ऋषींचा कदाचित् नाश होईल, व तसें झालें तर ते शाप देतील, आणि तिच्या भारानें खालचे लोकही नाश पावतील, म्हणून गरुडानें ती आपल्या चोंचींत धरून बापाजवळ घेऊन आला ! आणि त्याच्या आज्ञेनें ती खांदी येथें निर्जन अरण्यांत आणून ठेविली. ही लंकानगरी त्या फांदीवरच वसली आहे. ह्मणून हिच्यांतली सर्व जमीन लांकडाची आहे !"

ही कथा ऐकून लोहजंघाला फार आश्चर्य वाटलें. तेथें राहून बरेच दिवस त्यानें सुखाचा उपभोग घेतला, तरी ह्माताऱ्या कुटणीनें अपमान केला त्याचें त्याला विस्मरण झालें नव्हतें. व रूपणिकेवर त्याचें मन आसक्त होतें, ह्मणून त्याला तेथें फारसें सुख वाटलें नाहीं. नंतर एकेदिवशीं बिभीषणाचा निरोप घेऊन लोहजंघ मथुरेस जाण्यास निघाला. तेव्हां बिभीषणानें अमूल्य रत्नें व पुष्कळ सुवर्ण त्याला दिलें आणि मथुरेंतिल कृष्णाच्या मूर्तीला अर्पण करण्याकरितां म्हणून सोन्याचीं रत्नखचित —शंख, चक्र, गदा, आणि पद्म, हीं चार विष्णूचीं आयुधें दिलीं. तो गरुड पक्षी लोहजंघाच्या संवईचा झालाच होता. लोहजंघाला मथुरेंत नेऊन पोंहोंचविण्याविषयीं बिभीषणानें त्यालाच आज्ञा केली. तेव्हां सर्व हिरे, माणकें, सोनें वगैरे जें कांहीं बिभीषणानें दिलें होतें, तें घेऊन गरुडावर बसून लोहजंघ परत मथुरेंत सुखरूप येऊन पोंहचला. तेथें गांवाबाहेर एका ओसाड विहारांत ( बौद्ध लोकांच्या मठांत ) येऊन उतरला. त्या पक्ष्याला तेथेंच बांधून ठेवून बरोबर आणलेला सर्व विषय त्याच्याच गळ्यांत बांधून ठेवला आणि त्यांतलें एक रत्न बरोबर घेऊन बाजारांत गेला. त्याला त्याची पुष्कळ किम्मत आली. तींतून उंचीउंचीं वस्त्रें घेऊन, भोजनाचे पदार्थ, अंगाला लावण्याची उटी, तांबूल इत्यादि सर्व विकत घेऊन पुनः त्या विहारांत आला. तेथें स्नान वगैरे केलें व आपण भोजन करून त्या पक्ष्यालाही खावयास दिलें.

नंतर वस्त्रें, अलंकार, फुलें, अंगराग, इत्यादिकांनीं आपलें शरीर विभूषित करून शंखचक्रादि आयुधें हातांत घेऊन गरुडपक्ष्यावर बसून सायंकाळीं रूपणिकेच्या घराजवळ,—ज्या महालांत ती रहात होती, त्याच्या खिडकीच्या समोर—आकाशांत उभा राहिला. आणि मोठ्या गंभीर शब्दानें त्यानें आपल्या प्रियेला इषारा केला. तो शब्द ऐकून रूपणिका खिडकीजवळ येऊन पाहते तों रत्नांच्या प्रकाशानें शोभणारा व शंखचक्रादि आयुधांनीं व गरुड वाहन असल्या कारणानें साक्षात् नारायणासारखा दिसणारा प्रियकर लोहजंघ तिच्या दृष्टीस पडला. आपल्याला तिनें ओळखलें नाहीं, असें पाहून लोहजंघ ह्मणाला, "मी साक्षात् विष्णु आहें. तुझ्यावर माझें मन बसलें आहे ह्मणून तुजवर अनुग्रह करण्याकरितां येथें आलों."

हें ऐकून रूपणिका त्याला नमस्कार करून ह्मणाली, "आज माझें भाग्य उदयाला आलें, ह्मणूनच प्रभूचें येणें झालें; तर आतां अनुग्रह करून या दासीचा उद्धार करावा." हें त्या वेश्येचें भाषण ऐकून हा ढोंगी नारायण गरुडावरून तेथें उतरला आणि पक्ष्याला बाहेरच बांधून ठेवून कांतेसह शयनगृहांत गेला. तेव्हां रूपणिकेनें त्याला पुरतेपणीं ओळखल्यावरून तिला फारच आनंद झाला. तिला रात्रंदिवस लोहजंघाचा निदिध्यास लागलाच होता. बहुत दिवस कोठें कांहीं वर्तमान नव्हतें ह्मणून, जीवंत तरी असेल किंवा काय? याविषयीं शंका येऊन ती फारच दुःख करीत होती. तों अकस्मात् मोठ्या वैभवानिशीं तो सुखरूप परत येऊन भेटला यामुळें तिला फारच आनंद झाला. नंतर, वियोग झाल्यादिवसापासून हावेळपर्यंत उभयतांनीं परस्परांचा वृत्तांत सांगण्यास प्रारंभ केला. तो समाप्त होण्यापूर्वींच रात्र सरत आली, तेव्हां लोहजंघानें पुढें कोणत्याप्रकारें वागावयाचें तें सांगून प्रियेचा निरोप घेऊन तो गरुडपक्ष्यावर बसून आकाशमार्गें निघून गेला. रूपणिकेला लोहजंघाची पुर्ती ओळख पटली होती; तरी तो मोठ्या पुण्यकर्मानें साक्षात् विष्णुरूपीच झाला आहे अशी तिची समजूत होती.

इकडे रूपणिकेनें पूर्वसंकेताप्रमाणें दुसऱ्या दिवशीं मौन धारण करून एकांतवास स्वीकारला. घरांतलीं माणसें, "ही कां बोलत नाहीं?" ह्मणून विचार करूं लागलीं. तेव्हां मकरदंष्ट्रा तिच्याजवळ जाऊन ह्मणाली, "मुली, तूं अगदीं बोलत नाहींस; एकांतवासांत बसली आहेस, याचें कारण काय तें सांग." बराच वेळ रूपणिका कांहींच बोलली नाहीं. परंतु आईनें फारच आग्रह केला, तेव्हां मध्यें पडदा सोडून आईला रात्रीं घडलेली गोष्ट सांगून ह्मणाली, "मी आतां देवता झालें आहें. साक्षात् विष्णूची स्त्री आहें ह्मणून मी आतां मनुष्यांशीं मुळींच बोलणार नाहीं." हें तिचें भाषण ऐकून ह्मातार्‍या कुटणीला हें सर्व ढोंग आहे, असें वाटलें व याचा प्रत्यक्ष अनुभव पाहण्याकरितां रात्रीं लोहजंघ येण्याच्या वाटेंत ती दडून बसली. तेव्हां गरुड पक्ष्यावर बसून येणाऱ्या लोहजंघाला प्रत्यक्ष पाहून—हा खरात्र विष्णु आहे,—अशी तिच्या मनाची खातरी झाली! वस्तुतः ती मोठी धूर्त होती, तरी अशिक्षित असल्याकारणानें विष्णूच्या स्वरूपाचें ग्रंथांतरांत जें वर्णन केलें आहे, त्याचें देखील तिला पुरतेंसें ज्ञान नव्हतें. मग त्याच्या येण्याविषयीं असंभवाची कल्पना तरी तिच्या मनांत कोठून येणार? असो.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं पडद्यांत बसलेल्या रूपणिकेजवळ येऊन मोठ्या नम्रतेनें मकरदंष्ट्रेनें तिची प्रार्थना केली. "मुलि, देवाच्या कृपेनें तूं मनुष्यलोकांत असतांनाच देवी झालीस हें फार चांगलें झालें! पण कशी झाली तरी, मी मनुष्यजन्मांतली तुझी आई आहें. तर तुझ्यासारख्या देवीच्या आईला मुलीपासून कांहींतरी फल प्राप्त व्हावें किंवा नाहीं? मी ह्मातारी झालें आहें. मला आतां फारशी कांहीं इच्छा नाहीं. केवळ स्वर्गाला जावें असें वाटतें. तर देवानें जसें तुला मनुष्यपणांतच देवी केलें, तसें याच देहानें मला स्वर्गांत जाण्याची इच्छा आहे! तेव्हां तूं याविषयीं देवाची प्रार्थना करून मला स्वर्गाला नेण्याविषयीं त्याला विनंती कर." हें आईचें भाषण ऐकून

रूपणिकेनें—बरें आहे. आज रात्रीं ते आल्यावर तुझ्याबद्दल मी प्रार्थना करीन—असें सांगून आईचें समाधान केलें. आणि रात्रीं हा कपटी विष्णु आला तेव्हां आईच्या ह्मणण्याप्रमाणें त्याच्या जवळ तिनें विनंती केली. तेव्हां देवाचा वेष धारण करणारा लोहजंघ म्हणाला, "प्रिये, तूं म्हणतेस खरें; पण तुझी आई फार पापिणी आहे. तिला स्वर्गांत नेणें योग्य नाहीं, तथापि तुझी भीड मोडवत नाहीं. एकादशीच्या दिवशीं सकाळीं स्वर्गाचा दरवाजा उघडतात. त्यावेळीं महादेवाच्या गणाच्या झुंडीच्या झुंडी आंत जातात. त्यांतून तुझ्या आईला पाठवितां येईल; पण तिनें महादेवाच्या गणासारखाच वेष घेतला पाहिजे. नाहीं-पेक्षां आंत प्रवेश होणार नाहीं. तर तूं तिला पंचचूड कर ( पांच पाट काढ ), गळ्यांत हाडांची माळ घाल. पाठीला काजळ लावून पुढच्या बाजूला शेंदूर लाव, आणि नग्न कर; ह्मणजे मी तिला सहज स्वर्गांत नेईन." याप्रमाणें प्रियेचें समाधान करून रात्रभर तेथेंच विलास करून तो पाहाटे निघून गेला. प्रातःकाल झाल्यावर रूपणिकेनें रात्रीचा सर्व वृत्तांत आईला सांगून तिचे पांचपाट वगैरे काढून तिला नागवी करून स्वर्गाकडे तोंड करून उभी केली! सायंकाल होतांच नित्याप्रमाणें लोहजंघ आला. तेव्हां रूपणिकेनें प्रार्थना करून आपली आई त्याच्या स्वाधीन केली. तेव्हां—आतां आपलें काम झालें—असें मनांत ह्मणून त्या थेरडीला गरुडावर घेऊन लोहजंघ तेथून निघाला. आणि एका मोठ्या देवळासमोर अतिशय उंच असा एक दगडी खांब होता, त्या खांबावर एक चक्र फिरत होतें. त्यावर ह्या ह्मातारीला नेऊन बसविली. आणि क्षणभर, आपल्याला तिनें जो त्रास दिला होता, त्याच्या प्रतीकाराची पताकाच कीं काय अशा—त्या कुट्टीणीला लोहजंघ ह्मणाला, "ह्मातारे अंमळ येथें बैस, मी जवळच खालीं जाऊन लोकांवर अनुग्रह करून पुनः येतों." असें सांगून लोहजंघ तिच्या दृष्टीच्या आड झाला. त्या दिवशीं त्या देवळांत कांहीं उत्सव होता. हजारों लोक तेथें जमा

झाले होते. त्यांला उद्देशून—कोणाच्या दृष्टीस न पडतां—लोहजंघ मोठ्यानें ह्मणाला, "लोक हो, तुह्मी ईश्वरभक्त आहां. आज तुमच्यावर मोठें संकट येणार आहे. कांहीं वेळानें आकाशांतून एक भयंकर वेष धारण करणारी साक्षात् महामारी खालीं पडेल. तर तुह्मी आतांपासून या अरिष्टाचें निवारण होण्यासारखा कांहीं उपाय करा. देवाला शरण जाल तर या अरिष्टाचें निवारण होईल." ही आकाशवाणी ऐकून मथुरेंतील सर्व लोक भ्याले. आणि ते देवळांत जाऊन कांहीं पूजा अर्चा वगैरे करूं लागले. नंतर देवाचा वेष टाकून आकाशांतून खालीं येऊन लोहजंघही त्या लोकांत मिळाला. इकडे ती ह्मातारी मकरदंष्ट्रा त्या चक्रावर तशीच फिरत होती. "अजून देव कसा आला नाहीं व मला स्वर्गालाही नेलें नाहीं." ह्मणून ती काळजी करीत होती. नंतर फारवेळ वर राहण्यास असमर्थ होऊन, "हां, हां मी आतां खालीं पडतें."—ह्मणून भिऊन मोठ्यानें ओरडूं लागली. तें ऐकून—हीच महामारी खालीं पडत आहे असें समजून—भयभीत झालेले लोक मोठ्यानें ह्मणाले, "देवि, आई पडूं नको, पडूं नको." ती सारी रात्रभर तेथें असाच घोळंकार चालला होता. वरचेवर ती 'पडतें' ह्मणून ओरडत होती व लोक नको ह्मणत होते. ही महामारी कदाचित् खालीं पडेल, असें सर्व लोकांना विलक्षण भय पडलें होतें. सूर्योदय झाल्यावर सर्व लोकांनीं लक्षपूर्वक खांबावर पाहिलें, तेव्हां पांचपाट काढलेली व नागवी ती वृद्ध कुट्टिणी त्यांच्या दृष्टीस पडली! व त्यांनीं तिला ओळखली. तेव्हां सर्वांचें भय जाऊन लोक पोट धरधरून हसूं लागले. परंपरेनें हें वर्तमान रूपणिकेलाही समजलें, तेव्हां ती तेथें येऊन आपल्या आईची विलक्षण स्थिती पाहून फार दुःखित झाली. व तेथल्याच एक दोन असामींला खांबावर चढवून तिला खालीं उतरविलें. हा सर्व प्रकार कसा झाला? याचें लोकांला मोठें कौतुक वाटत होतें. ह्मणून त्यांनीं ह्मातारीला प्रश्न केला, तेव्हां कुट्टिणीनें आपल्या कडची झालेली सर्व हकीकत सांगितली. मथुरेंतील सर्व लोकांला ही

ह्यातारी द्वाड आहे हें माहीतच होतें. लोहजंघाप्रमाणेंच तिनें दुसऱ्याही कित्येक तरुण पुरुषांना, रूपणिकेच्या संबंधानें फार त्रास दिला होता. त्यांला तिची ती अवस्था पाहून फार संतोष झाला, व ते हा कांहीं तरी सिद्धीचा चमत्कार आहे—असें समजले. नंतर तेथें जमलेले सर्व लोक हात जोडून प्रार्थना करून ह्मणाले, "ज्या पुरुषानें हा सर्व चमत्कार केला, आणि अनेक भोळ्या कामिलोकांना फसविणाऱ्या ह्या दुष्ट कुटणीची फजीती केली, त्यानें प्रकट होऊन आह्माला दर्शन द्यावें. त्याचा आह्मी मोठा सत्कार करूं." हें ऐकून लोहजंघ पुढें आला व लोकांनीं विचारल्यावरून त्यानें मुळापासून सर्व हकीकत सांगितली आणि सर्वांसमक्ष बिभीषणानें पाठविलेलीं शंखचक्रादिक आयुधें देवाला अर्पण केलीं. नंतर मथुरेंतील सर्व लोकांनीं आनंदित होऊन त्याला मोठी पदवी देऊन राजाच्या आज्ञेनें रूपणिका प्रसिद्धपणें त्याच्या स्वाधीन केली. याप्रमाणें ह्यातार्‍या कुटणीनें केलेल्या अपमानाचें उसणें फेडल्यामुळें ज्याचा राग शांत झाला होता, असा तो लोहजंघ, बिभीषणानें दिलेलीं रत्नें अलंकार इत्यादिकांनीं मोठा धनाढ्य झालेला असून त्याची प्रिया रूपणिका इचीही प्राप्ती होऊन मोठ्या आनंदानें तिच्यासह सुखानें वास्तव्य करूं लागला." याप्रमाणें वेषांतर केलेल्या वसंतकाच्या मुखांतून ही अपूर्व कथा ऐकून वत्सराजाच्या जवळ बसलेल्या वासवदत्तेला फारच आनंद झाला.

वर सांगितल्याप्रमाणें वसंतकानें कथा सांगितली, ती केवळ करमणुकीकरतांच सांगितली असें नाहीं. तर त्याच्या मनांत वासवदत्तेला व वत्सराजालाही कांहीं सूचना करावयाच्या होत्या, त्या ह्या कथेच्या निमित्तानें केल्या. याप्रकारच्या अनेक कथा वसंतक वासवदत्तेला सांगत असे. तरुण मुलीचें मन वळविण्याची युक्ती त्याला उत्तमप्रकारें माहीत होती. स्त्रीपुरुषांचीं मनें परस्परांवर आसक्त होण्याला केवळ कामवासनाच पुरेशी होत नाहीं. फक्त कामशांतीकरितांच जीं दोघें एकत्र होतात व प्रसंगविशेषीं प्रीतिही करितात, ती क्षणिक असते.

तेवढी वेळ गेल्यावर मग एकमेकांचें स्मरणदेखील त्यांनां होत नाहीं. पण जिला प्राचीन रसिक कवींनीं " भावनिबंधना रती " असें म्हटलें आहे, ती एकाएकीं होत नाहीं. सहवास, प्रसंगविशेषीं परस्परांला उपयोगी पडणें, अलौकिक साहस, तसेंच विशेष प्रकारचे गुण, गायनादिक कला, मनोरंजक गोष्टी व मुख्यत्वें परस्परांच्या मनांतला हेतू समजून तदनुरूप वागणें, इत्यादि अनेक प्रकारचें साह्य घेऊन प्रवृत्त झालेल्या कामवासनेपासून तशाप्रकारचें दृढ प्रेम उत्पन्न होतें. वर सांगितल्यापैकीं बहुतेक साधनें **वासवदत्ता** व **वत्सराज** या दोघांलाही अनुकूल होतीं. त्यांतून **वसंतका**च्या गोष्टींनीं **वत्सराजा**चें बरेंच साह्य केलें. ह्या व इतर कारणांनीं हळुहळू **वासवदत्ते**ची **उदयन**राजावर प्रीती दृढ बसूं लागली. जसजसें तिचें मन **वत्सराजा**कडे ओढ घेऊं लागलें, तसतशी बापाच्या पक्षाकडची तिची ओढ ढिली पडत गेली. **वत्सराजा**ला विनाकारण प्रतिबंधांत ठेवून त्याच्या पायांत बेडी घातली, याबद्दल तिला बापाचा रागही येऊं लागला व आपल्याला यामुळें फार दुःख होतें, असें ती अनेक रितीनें व्यक्त करून दाखवूं लागली. या संधींत पुनः **यौगंधरायण** आला. ब्रह्मराक्षसानें त्याला जी सिद्धी दिली होती, तिच्या योगानें जवळ कितीही मनुष्य असले तरी त्यांच्या दृष्टीस न पडतां, फक्त **वत्सराजा**ची भेट घेण्याला त्याला कांहीं अडचण पडत नव्हती. तरी तो वरचेवर राजाची भेट घेत नसे. या खेपेस तो आला, त्यावेळीं फक्त **वसंतका**वांचून दुसरें कोणी जवळ नव्हतें. ही संधी पाहून **यौगंधरायण** ह्मणाला, " राजा, आतां कांहीं तरी लौकर तजवीज केली पाहिजे. कारण, **चंडमहासेन** तुला आपली मुलगी देऊन गौरव करून लौकरच येथून रवाना करणार आहे. पण तशारीतीनें **वासवदत्ते**ची प्राप्ती झाली तरी त्यांत आपला फारच अपमान होणार आहे. त्याणें तुला प्रतिबंधांत ठेविलें, यांत तितका कमीपणा नाहीं. कारण, तें सर्व कृत्य कपटानें केलें, अशी सर्व लोकांत प्रसिद्धी झाली आहे. या-

शिवाय केवढाही शूर असला तरी प्रसंगविशेषीं त्याला शत्रूच्या हातीं सांपडण्याची वेळ येते. ह्मणून त्याबद्दल मोठीशी खंती नाहीं. पण **चंडमहासेनानें** सत्कारपूर्वक आपल्याला **वासवदत्ता** दिली, तर त्यांत मात्र खरोखर मोठा अपमान होईल. आपण तिला गाणें बजावणें शिकविलें याबद्दल,—तिला देऊन आपली संभावना केली असें लोक ह्मणतील. **वासवदत्ता** आपल्याला किती जरी प्रिय असली, तरी अशा रीतीनें तिची प्राप्ती करून घेण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तर यावेळीं आपण स्वस्थ बसतां कामा नये. कांहीं तरी युक्ती काढून पुढें येणारा अपमानाचा प्रसंग टाळला पाहिजे. माझ्या मनांत असें आलें आहे कीं, **वासवदत्ता** अनुकूळ असेल तर तिला घेऊन युक्तीनें आपण येथून निघून जाऊन **चंडमहासेनाला** फसवावा. असें केलें तर अंमळ त्याचा गर्व हरण केला, असें होऊन त्यानें तुह्माला कपटानें धरून प्रतिबंधांत ठेवलें, याचाही सूड घेतल्यासारखें होईल. आतां हें काम कशा रीतीनें पार पाडावें, हेंही मी योजून ठेविलें आहे. **वासवदत्तेला चंडमहासेनानें भद्रवती** नांवाची एक हत्तीण दिली आहे व ती नेहमीं तिच्याच तैनातींत असते. मजल मारण्याच्या कामांत त्या हत्तिणीची बरोबरी दुसऱ्या कोणाच्यानेंही करवणार नाहीं. ती फारच त्वरित चालते. **नडागिरी** हत्ती कदाचित् तिच्या बरोबर चालेल; पण त्याची तिच्यावर फारच प्रीती असल्या कारणानें, तो **भद्रवती** हत्तीणीचा कधींही साम्ना करीत नाहीं. म्हणून कोणीं पाठलाग करील, याचें फारसें भय बाळगावयास नको. त्या हत्तिणीचा **आषाढक** नांवाचा महात आहे, त्याला पुष्कळ द्रव्य देऊन मी अगदीं भारून ठेवला आहे. पाहिजे तेव्हां तो आपल्याला साह्य करण्यास तयार आहे. तर अपरात्रीच्या वेळीं गुप्तपणें **वासवदत्तेला** बरोबर घेऊन हत्यारबंद होऊन आपण उभयतांनीं त्या हत्तिणीवर बसून येथून निघून जावें, हें मला बरें वाटतें. **नडागिरीवर** बसून कदाचित् **चंडमहासेन** अथवा त्याचे मुलगे पाठलाग करतील, तर त्यांला

एक विघ्न करून ठेवावें. तें असें कीं, नडागिरीचा बलाक नांवाचा महात आहे. फक्त तोच त्याच्या संवईचा असून नडागिरी त्याच्या कहेंत आहे. दुसऱ्या कोणत्याहि महाताच्यानें त्या हत्तीला चालववत नाहीं. तर त्या बलाकाला जाण्याच्या दिवशीं येथें जेवणाला बोलावून अतिशय दारू पाजवावी. तो मोठा अट्टल दारुबाज आहे. उलटी होई तों पोटांत राहील तितकी दारु पिण्यास तो मागें पुढें पहात नाहीं ! व तो तशा रीतीनें बेफाम झाला कीं आपलें काम झालें. मग चंडमहासेनाच्यानें मुळींच पाठलाग करवणार नाहीं. इतकेंही असून कदाचित् प्रसंग आलाच तर, विंध्यपर्वताच्या तोंडाशीं आपला मित्र भिल्लांचा राजा पुलिंदक याला मी पूर्वींच तयार करून ठेविला आहे. आणि माझ्या मनांत आतां तिकडेच जावयाचें आहे. मी त्याला भेटून विंध्याच्या बारीच्या तोंडाशीं कडेकोट तयारी करून बसतों. आपण कसें तरी करून आमच्या तळाला वलांडून गेलां, ह्मणजे कांहीं काळजी नाहीं. पाठलाग करण्याला हवे तितके लोक आले तरी आह्मी त्यांचा समाचार घेऊं. वसंतकाला येथेंच असूं द्या. हा तुमच्याबरोबर प्रसंगीं उपयोगी पडेल." याप्रमाणें यौगंधरायणानें सर्व मसलत सांगितली, ती वत्सराजाला फारच पसंत पडली. तेव्हां "वासवदत्ता अनुकूळ आहे, व ती ह्या गोष्टीला राजी होईल. तेव्हां तूं सांगितलेली युक्ती करून मी येथून निघून येतों," असें वत्सराजानें कबूल केल्यावर सर्व संकेत ठरवून यौगंधरायण, राजाचा निरोप घेऊन पुढें निघून गेला.

यौगंधरायण तेथून निघून गेला, इतक्यांत भोजनाची वेळ झाली होती, ह्मणून वाढून तयार केलेलें सोन्याचें ताट स्वतः आपल्या हातांत घेऊन दासीसहवर्तमान वासवदत्ता तेथें आली. तेव्हां वत्सराज भोजन करण्याला बसला. वासवदत्ता बहुतकरून वत्सराजाबरोबरच जेवणाला बसत असे. पण अलीकडे वसंतक केव्हां तरी तिची थट्टा करी; ह्मणून लाजेनें त्याच्या देखत ती वत्सराजाबरोबर जेवणाला बसत नसे. थोड्या वेळापूर्वी यौगंधरायणानें सांगितलेली मसलत

लौकरच पार पाडावी, असें वत्सराजाच्या मनांत होतें ह्मणून तिच्याजवळ आजच गोष्ट काढावी, असा विचार करून वत्सराजानें त्या दिवशीं तिला आपल्याबरोबर जेवणाला बसण्याविषयीं आग्रह केला. वसंतकाला आधीं सूचना करून ठेवली होती, ह्मणून तो तर एकसारखा तिच्या पाठीसच लागला. प्रत्येक सुखाची गोष्ट आपल्या जिवलग पुरुषाबरोबर करण्याविषयीं स्त्रियांला फार हौस असते. त्याप्रमाणें जेवणें खाणें, बसणें उठणें इत्यादि सर्व, प्रिय वत्सराजाबरोबरच व्हावींत हें वासवदत्तेला मनापासून आवडत होतें. तरी तिचा वत्सराजावर आतांशीं कांहीं विलक्षण प्रकारचा भाव बसला होता. आपला प्रियपती व प्राणांचा विसावा काय तो हाच आहे, अशी तिच्या मनानें पक्की गांठ बांधली होती, ह्मणून तिला फार लाज वाटत असे. स्त्रीपुरुषांचें प्रेम फारच विलक्षण तऱ्हेचें आहे. ज्याच्यावर स्त्रीचें मन बसलें असेल, त्याची भेट होण्याविषयीं तिला एकसारखा ध्यास लागलेला असतो व तो भेटेल त्यावेळीं आपण अमुक अमुक तऱ्हेनें त्याच्याशीं वागेन अथवा बोलेन, इत्यादि अनेक प्रकारचे ती नेहमीं आपल्या मनांत अगदीं घट्ट संकल्प करून ठेवते; पण जेव्हां त्याची गांठ पडते, तेव्हां प्रेमानें व लज्जेनें तिचें मन व्याकूळ होऊन पूर्वीं केलेले संकल्प सर्व फुकट जातात. तिच्यानें एक शब्द देखील बोलवत नाहीं व सात्विक भावाचा उदय होऊन गळा दाटून येतो, अंगावर रोमांच उभे राहतात, इत्यादि प्रकारें अनवस्थित झाल्या कारणानें तिच्यानें कांहींच होत नाहीं. वासवदत्तेचीही अशीच स्थिती झाली होती. पूर्वीं बरेच दिवस ती वत्सराजाशीं प्रियशिष्यिणीच्या नात्यानें वागत होती, तेव्हां लडिवाळपणानें पाहिजे तें बोले व केव्हां हट्ट धरून—वत्सराज नाहीं ह्मणत असतांही—आपल्या मनाप्रमाणें त्याच्याकडून करवीत असे; पण आलीकडे थोड्या दिवसांपासून ती केवळ बायकोच्या नात्यानें वागूं लागली. व यामुळें पूर्वींप्रमाणें तिच्यानें विशेष धीटपणानें कोणतीच गोष्ट करवेनासें झालें होतें.

वसंतकानें अतिशय आग्रह करून—आपण थट्टामस्करी वगैरे कांहीं करणार नाहीं—असें शपथ घेऊन सांगितल्यावर वासवदत्ता राजाजवळ जेवणाला बसली. वसंतकाची तिच्याशीं फारच सलामेळकी झाली होती. त्याणें कांहीं थट्टा केली तर, ती बाह्यात्कारें मात्र राग आलासें करून दाखवी; पण मनापासून ती तिला फारच आवडत होती. वासवदत्तेनें प्रथम वत्सराजापुढें आपण आणलेलें ताट ठेवलें व तिच्या सखीनें आणलेलें दुसरें ताट वसंतकापुढें ठेवलें. आणि एक ताट स्वतः आपण घेऊन बसली. पण हें वसंतकाला आवडलें नाहीं. तो तिला राजाच्या ताटांत बसविण्याचा प्रयत्न करूं लागला. त्यानें दासींला युक्तीनें तेथून घालविल्या. आणि दाराचा बंदोबस्त करून, "आपण तिघेंजणच जेवावयास बसूं" असें सांगितलें. नंतर युक्तिप्रयुक्तीनें हळूच तिच्या पुढचें ताट उचलून घेऊन आपण जेऊं लागला. तेव्हां अर्थात् ती अंमळ रागावल्यासारखी झाली. वत्सराजानें समाधान करून तिला आपल्या मांडीवर घेऊन जेवणाला प्रारंभ केला. वासवदत्तेच्या मनांत होती तीच गोष्ट झाली, ह्मणून तिला फार आनंद झाला. तेव्हां वसंतक वेड्यावांकड्या माना करून हर्षानें नाचत होत्साता पुढें येऊन ह्मणाला, "कां बाईसाहेब, आतां कसें झालें? मनापासून आवडलें कीं नाहीं? मला गरिबाला मात्र उगाच शिव्या खाव्या लागल्या. हो, जोडा तर बुवा असाच असावा. आतां काय भटानीं मंत्राक्षता मात्र टाकावयाच्या राहिल्या आहेत. मी तर खरोखर मोठा विद्वान् ब्राह्मण आहें. आमच्या सात पिढ्यांत गायत्री मंत्रावांचून बाकी सगळे वेद अगदीं पाठ सपाट येत होते! तेव्हां ह्मणाल तर, 'शुभमंगल सावधान.' मीच ह्मणेन, पण तुह्मी रागावूं मात्र नका." हें ऐकून वासवदत्ता रागानें ह्मणाली, "बाई बाई! यानें तर माझी पाठच पुरवली. मेल्या उगाच बैस कसा. चावट कुठला! काय बोलावें आणि काय नाहीं याचा कांहीं सुमार तरी?" यावर वसंतक हंसत हंसत ह्मणाला, "काय? मी काय खोटें बोललों? आतां आणखी

बाकी तें काय राहिलें ? मी तर आजपासून आपल्याला आमच्या राणीसाहेब असें ह्मणणार. आणि खरोखर जानव्याशपथ, सांगतों हा जोडा किती सुंदर शोभत आहे, ह्मणून सांगूं. रोहिणीनक्षत्रासह चंद्रमा देखील याच्या पुढें फिका दिसेल. परमेश्वरकृपेनें आमच्या महाराजांचे मनोरथ पूर्ण झाले, हें पाहून मला फार आनंद वाटतो. वत्सदेशाच्या सिंहासनावर असेंच दोघेंही विराजमान होऊन प्रजेच्या डोळ्यांचें पारणें फेडण्याचा सुदिन आला म्हणजे फार आनंद होईल." यावेळीं खरोखरच वासवदत्तेच्या मनांत सात्विक भावाचा पूर्ण उदय झाला होता. तिच्या सर्वांगाला घाम सुटला होता, रोमांच उभे राहिले व गळा दाटून आला. ती मोठा सुस्कारा टाकून खालीं मान घालून हळुच म्हणाली, "तो पुढचा दिवस कधीं येईल तो खरा. पण आज मात्र माझ्या डोळ्यांनीं पाहावत नाहीं, अशी जी ही स्थिती दिसत आहे, ती पाहून माझ्या शरीराचा दाह होतो ! अशा सुकुमार पायांत (बेडीला हात लावून )ही असावी ना ? आणि हें सर्व दुःख भोगण्याला कारण कोण ? तर आमच्या बाबांचा हट्ट. मीं कीतीदां सांगितलें कीं, आतां बेडी ठेवण्याचें कांहीं कारण नाहीं. येऊन जाऊन कायती पळून जाण्याची भीति, पण आतां मला सोडून जाणें व्हायचें नाहीं. तेव्हां उगीच बेडीचा त्रास कशाला हवा ? असें पुष्कळ वेळां सांगितलें, पण त्यांची म्हणून कांहीं केल्या समजूतच होत नाहीं. तेव्हां याला काय म्हणावें. मला मेलीला येथें जवळ येण्याला देखील लाज वाटते. पायांत बेडी घालणाऱ्याच्या मुलीनें कितीही सेवा चाकरी केली तरी त्याचें कोणाला बरें वाटेल ! पण करूं काय ? कांहीं उपाय कळेल तर मी अत्तां करीन. नाहीं तर आणखी किती दिवस ही अशी स्थिती पाहण्याचें माझ्या कपाळीं असेल कोणास ठाऊक ?" असें बोलत असतां तिच्या डोळ्यांतून टपटपां अश्रू वाहूं लागले. आणि ती वत्सराजाच्या गळ्याला मिठी घालून रडूं लागली. वत्सराजही सद्गदित झाला, व आपण जिची वाट पहात होतों

ती हीच संधी, असें समजून तिला म्हणाला, " प्रिय वासवदत्ते, उगीच कां रडतेस? मला ही स्थिती माझ्या दैवानेंच दिली आहे; तेथें तुझ्या बापाचा अथवा दुसऱ्या कोणाचाही कांहीं अन्याय नाहीं. मी बंदिशाळेंत असलों तरी तुझ्या योगानें मला त्याचें कांहीं दुःख वाटत नाहीं. तूं ह्मणतेस तें खरें आहे. आपल्या शत्रूच्या घरीं प्रतिबंधांत राहून त्यानें घातलेला तुकडा खाऊन प्राण रक्षण करावे त्यापेक्षां ते गेले तरी पुरवलें. ह्या माझ्या स्थितीचा मला फार कंटाळा आला आहे. पण तुझ्याकरितां निरुपायास्तव आजपर्यंत मी येथें राहिलों. माझ्या पायांतली बेडी काढावी, असें तुझ्या मनांत असेल तर तें सर्व तुझ्याच हातीं आहे. तूं निश्चय करशील तर वत्सदेशाच्या सिंहासनावर जाऊन बसण्याला मला फार वेळ लागणार नाहीं. पण हें कृत्य तुझ्या साह्यावांचून होणार नाहीं. " हें ऐकून **वासवदत्ता** अम्मळ चकित झाल्या-सारखी होऊन ह्मणाली, " माझ्या हातून असें साह्य तें कसलें होणार? त्याकरितां काय पाहिजे तें करण्याला माझी अगदीं तयारी आहे. काय तें मला कळलें मात्र पाहिजे. " तेव्हां **वत्सराज** तिला अम्मळ दृढ आ-लिंगन देऊन ह्मणाला, " होय होय! आपलेंच साह्य पाहिजे बरें. त्या-वांचूनच सारें अडलें आहे. नाहीं तर **चंडमहासेनाच्या** हातावर केव्हांच तुरी देतां येतील." यावर **वासवदत्ता** ह्मणाली, " बाई, पण तें मला कळलें तर पाहिजेना? नुसतें सहाय सहाय ह्मटलें तर मेलं माणसानं काय समजावं." **वत्सराज** ह्मणाला, "सांगायला कांहीं हरकत नाहीं. आणि तें सां-गावयाची आतां वेळच आली आहे. पण बायकांचा स्वभाव मोठा भितरा असतो. त्यांना कांहीं सांगितलें तर तें घडून येईपर्यंत त्यांना दम नसतो. तशांतून माहेरचा पक्षपात फार. त्यांच्या विरुद्ध कोणी कांहीं सांगितलें तर त्यांना मुळींच आवडावयाचें नाहीं. मग उगीच सांगून तरी काय उपयोग?" हें ऐकून **वासवदत्तेला** थोडासा राग आला. जरी **वत्सराजाशीं** ती नवऱ्याप्रमाणें वागत होती, तरी लाडिकपणानें वा-

गण्याची तिची संवय गेली नव्हती. ह्मणून रागानें ह्मणाली, "बरें. अजून देखील माझ्याविषयीं संशयच आहेना ! कांहीं चिंता नाहीं. स्त्रिया भित्र्या असतात, हें कदाचित् खरें असेल; पण प्रसंगीं त्यांच्यासारखें साहस पुरुषांच्यानें देखील होत नाहीं. आणि मी, कसा झाला तरी आज इतके दिवस इकडचाच सहवास केला आहे. कांहीं भित्रेपणा असला तर तो सहवासानें अजून गेला नसेल का ? मला तर यांत कांहीं संशय वाटत नाहीं. माहेरच्या पक्षपाताविषयीं ह्मटलें तर तो बायकांना स्वभावतः असतो खरा; तरी पण प्रसंगीं त्या माहेरच्या लोकांच्या इच्छेविरुद्ध जाण्याला भीत नाहींत. मला येरव्हीं सर्व प्रकारें माहेरच्या माणसांचें अगत्य आहे; पण इकडच्या कामाला मी आड येणार नाहीं." हें ऐकून वत्सराज ह्मणाला, "केवळ आड आलें नाहीं तर त्यांत कांहीं मोठेंसें नाहीं. प्रसंगीं तसें वागलें पाहिजे. पण तें बायकांच्यानें होणें कठीण. इतरांची गोष्ट असूंद्या. प्रत्यक्ष सतीचेंच उदाहरण घेतां येईल. महादेवावर किती तरी तिचें प्रेम ! बरें त्याचें तरी तिच्यावर कांहीं कमी होतें असें नाहीं. तिला फक्त—बापाच्या ( दक्षप्रजापतीच्या ) यज्ञांत जाऊं नकोस—इतकेंच शंकरानें सांगितलें. पण तें न ऐकतां दक्षाच्या यज्ञांत जाऊन तिनें केवढा अनर्थ करून घेतला ? प्रत्यक्ष सतीची अशी स्थिती आहे; तेव्हां दुसऱ्या स्त्रियांची कथा काय ? आतां तूं ह्मणतेस; पण प्रसंगीं तसें तुझ्या हातून वागवेल किंवा काय याची शंकाच आहे." हें ऐकून वासवदत्ता ह्मणाली, "होय सतीची गोष्ट तशी असेल खरी. पण त्या थोरांमोठ्यांचें उदाहरण आपल्याला कशास पाहिजे. ती केवळ माहेरच्या माणसांच्या ओढीनेंच गेली, किंवा तसें करण्यांत तिचा कांहीं दुसरा हेतू होता, हें तरी कोणाला ठाऊक ? माझा तर बाई पक्का निश्चय झाला आहे. इकडची आज्ञा होईल, त्याप्रमाणें मी करीन. नदी पर्वतापासून उत्पन्न होते व त्याची ती कन्या असते खरी; तथापि तिची ओढ समुद्राकडे असते. तिकडे जातांना मध्यें पाहिजे ते अडथळे आले तरी त्या सर्वांचा परिहार क-

रून,—मिळेल त्या वाटेनें ती समुद्राला भेटते. तशीच स्त्रियांचीही स्थिती आहे. निदान माझी तर आहे, हें मी अगदीं मनापासून सांगतें." हें ऐकून **वत्सराज** ह्मणाला, "हा निश्चय अगदीं खरा आहे ना? एकवेळ कोणत्याही गोष्टीला आरंभ करूं नये आणि जर केला, तर तो शेवटाला पोंहचविल्यावांचून राहूं नये. आतां तूं बोललीस हें जर निश्चयात्मक असेल, तर आह्मी कांहीं युक्ती योजली आहे. ती केली तर सर्व संकटांतून पार पडून तुझा व माझा दोघांचाही हेतू पूर्ण होऊन लोकांची काळजी दूर होईल. तर तूं आणखीं नीट विचार करून पहा, ह्मणजे पुढची काय ती तजवीज सांगेन." यावर **वासवदत्ता** ह्मणाली, " मला हें तें कांहीं समजत नाहीं. विचार तो कसला करावयाचा? मला दुसरें तिसरें कांहीं ठाऊक नाहीं. इकडची आज्ञा होईल, तसें वागावें एवढें मात्र मला समजतें. मीं काय करावयाचें, तें सांगितलें ह्मणजे झालें. माझ्याकडून मुळींच उशीर नाहीं." यावर **वत्सराज** म्हणाला, "असें असेल तर आमचा काय विचार ठरला आहे, तो सांगतों ऐक. आम्ही येथून निघून जावें, असा निश्चय केला आहे. तो त्यादिवशीं जो कुबडा आला होता व ज्याचें गाणें आणि नाचणें पाहून तुला मौज वाटली, तो खराखुरा कुबडा नसून **यौगंधरायण** नांवाचा माझा मित्र व मुख्य प्रधानही तोच आहे. तो गुप्तरूपानें माझी भेट घेण्याकरतां तसें वेषांतर करून येथें आला होता. त्याणें येथून जाण्याची सर्व मसलत सिद्ध करून ठेविली आहे. फक्त आमच्या निघण्याचीच कायती खोटी."

हें ऐकून हर्षानें **वासवदत्ता** म्हणाली, "ही खाशी युक्ती. असें झालें तर सगळीच कटकट आपोआप मिटेल. मी अत्तां पाहिजे तर निघण्याला तयार आहें. हें सगळें खरें; पण गडे तें होणार कसें? जर एकदां घरांतून निघालें तर पुनः बाबांच्या हाताला लागतां कामा नये. नाहीं तर सगळीच फजीती. म्हणून ही मसलत कशी पार पडेल, याची मला मोठी

काळजी वाटते. तशांतून आपण मोकळे असतां तर कांहीं साधतें. पण पायांत ही मेली बेडी आहे. ती निघणार कशी ? आधीं ह्याची कांहीं तजवीज काढली पाहिजे." हें ऐकून **वत्सराज** ह्मणाला, " त्याची तुला काय काळजी ? आम्ही मसलत करूं ती अशी तशी करणार नाहीं. पुढचा सर्व विचार आधींच करून ठेवला आहे. मला बेडी तोडणें, किल्ला फोडणें इत्यादि सर्व प्रकारच्या युक्ती माहित आहेत व त्या पाहिजे त्यावेळीं करतां येतील. तुला तुझ्या बापानें **भद्रवती** नांवाची हत्तिण दिली आहे नां ? आणि तिचा महात तूं सांगशील तें ऐकेल कीं नाहीं ?" **वासवदत्ता** म्हणाली, "होय ! होय ! मला बाबांनीं हत्तिण दिली आहे आणि ती माझी फार आवडती आहे. तिचा महात **आषाढक** तो माझ्या अगदीं अर्ध्या वचनांत आहे. मी कोठें पाहिजे तेथें चल म्हटलें, तर तो अगदीं ना म्हणणार नाहीं. पण मग त्याला काय सांगावयाचें आहे?" **वत्सराज** म्हणाला, "युक्तीनें आज मध्यरात्रीं तुझी हत्तीण त्याला तयार करावयास लाव. तूं, मी आणि **वसंतक** आम्ही तिघेंही कोणाला नकळत रात्रीं हत्तिणीवर बसून कांहीं तरी निमित्तानें येथून निघून कौशांबीची वाट धरूं. कदाचित् तुझा बाप पाठलाग करण्याला येईल तर, तो **यौगंधरायण** व माझा मित्र **पुलिंदक** हे दोघेही विंध्यपर्वताच्या खोऱ्यांत आमची वाट पहात बसले आहेत. तेथें आम्ही पोंहचलों म्हणजे झालें. मग आपल्या घरींच पोंहचल्यासारखें होईल. नगरवासी लोक बहुतकरून माझी कळकळ बाळगतात. व तुझ्यावरही सर्वांचा विशेष लोभ आहे. तेव्हां तुझ्या बापाच्या हातून कांहीं विशेष खटपट होईल असें वाटत नाहीं. तर मी सांगितलें याप्रमाणें आजच्या आज सर्व तजवीज कर. 'शुभस्य शीघ्रं' करावयाचें खरें. मग फुकट काळ दवडण्यांत कांहीं अर्थ नाहीं." हें ऐकून वासवदत्तेला फार उमेद वाटली. ती ह्मणाली, " आतां आपण कांहींच काळजी करूं नका, मी पुढची सर्व तजवीज करतें." असें ह्मणून

ती तयारीला लागली. तिनें आपल्याबरोबर आवडत्या म्हणून ज्या ज्या कांहीं जिनसा घ्यावयाच्या होत्या, त्या सर्व नीट व्यवस्थेनें बांधून सवरून त्यादिवशीं सायंकाळीं आषाढकाला व त्याच्या बरोबर नडागिरीच्या महाताला व त्यांच्या हाताखालच्या इतर सर्व लोकांना, देवीच्या पूजेचें निमित्त करून मिष्टान्न जेऊं घालून आकंठपर्यंत त्यांना दारू पाजविली. फक्त आषाढकाला मात्र फारच थोडी दारू दिली होती, ह्मणून तो सावध होता. पण बाकीचे महात वगैरे सर्व लोक दारूनें अगदीं बेहोष झाले होते. वासवदत्तेनें आपल्या आईबापांना, त्यादिवशीं रात्रीं गांवाबाहेर देवीच्या दर्शनाला आपण जाणार आहें असें सांगितलें होतें. व तिच्याविषयीं कोणाच्याच मनांत कांहीं शंका नव्हती. तसेंच वत्सराज प्रतिबंधांत आहे, व त्याच्या पायांत शृंखळा असून तो वासवदत्तेवर फारच लुब्ध झाला आहे, असें चंडमहासेन वगैरे लोक समजत होते; ह्मणून तो पळून जाईल असें वाटण्याचा संभव कोणालाही नव्हता.

वासवदत्तेनें आज्ञा केल्याप्रमाणें आषाढकानें हत्तीण तयार करून आणली. त्यावेळीं तिनें मोठी गर्जना केली, ती ऐकून वासवदत्तेनें सहज महाताला विचारिलें, “ अरे आषाढका, ही भद्रवती अशी कांरे ओरडली ?” महाताला हत्तीच्या शब्दाची परीक्षा होती. ह्मणूनच तो ह्मणाला, “ बाईसाहेब, ही ह्मणते, मी आज त्रेसष्ट योजनें ( २९२ कोस ) जाईन. ” हें त्यांचें भाषण दुसऱ्या महातानें ऐकलें; पण दारूच्या धुंदींत कोणाच्याच कांहीं लक्षांत राहिलें नाहीं. वासवदत्तेनें सर्व शस्त्रास्त्रें वत्सराजाला आणून दिलीं. वत्सराज, यौगंधरायणानें सांगितलेल्या युक्तीनें पायांतली बेडी तोडून टाकून उत्तम पोषाख करून सर्व शस्त्रास्त्रें घेऊन सिद्ध झाला. आणि वसंतकासहवर्तमान कोणाला नकळत हस्तिणीवरच्या अंबारींत जाऊन बसला. यावेळीं एकसारखा बारिक बारिक पाऊस पडत होता. रात्र काळोखी होती. आका-

श अभ्रांनीं आच्छादित झालें होतें. हत्तिणीला संगीतशाळेच्या दरवाज्याच्या आंत आणली होती. तेथें वासवदत्तेच्या दासींवांचून दुसरें कोणीच नव्हतें. व वत्सराज हत्तीच्या अंबारींत चढण्याच्या वेळीं अशी कांहीं योजना करून ठेवली होती कीं, त्यावेळीं दासी देखील जवळ नव्हत्या, यामुळें कोणाला कांहींच समजलें नाहीं. इकडे, वासवदत्तेची कांचनमाला नांवाची एक जिवलग सखी होती. ही नेहमीं तिच्या बरोबर रहात असे. वासवदत्तेनें पुढच्या तजविजीविषयीं तिला कांहीं सांगितलें होतें. तेव्हां तिणें देवीच्या पूजेचें साहित्य ह्मणून कांहीं सामान अंबारींत चढविलें. नंतर वासवदत्ता आपल्या सख्यांदेखत कांचनमालेला बरोबर घेऊन देवीच्या दर्शनाला जाण्याच्या निमित्तानें अंबारींत बसली. अंबारींत चढतेवेळीं—हें कार्य निर्विघ्नपणें सिद्धीस जावें ह्मणून तिनें देवी भवानीला शेंकडों नवस केले असतील! पाऊस पडत होता, ह्मणून अंबारीवर चोहोंकडून पडदे सोडले होते. आषाढकानें हत्तिणीला इषारा करितांच ती चालू झाली. याप्रमाणें वत्सराज,—वासवदत्ता, कांचनमाला, आणि वसंतक यांसहवर्तमान हत्तिणीवर बसून महातासुद्धां ते पांच असामी उज्जयिनीच्या दरवाज्यांत येऊन पोहोंचले.

तेथें वेशीवर, वीरबाहु आणि तालभटनांवाचे दोघे सरदार वेशीचें रक्षण करित होते. त्यांला आषाढकानें दरवाजा उघडण्यास सांगितलें, तरी त्यांणीं ऐकलें नाहीं; असें पाहून वत्सराजानें तत्काल दोघांच्याही छातींत बाण मारून त्यांस जमिनीवर पाडलें. आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्यांची ती दशा पाहून बाकीचे लोक भिऊन त्यांणीं तत्काल दरवाजा उघडून दिला. तेव्हां वत्सराजाची हत्तीण वेशीच्या बाहेर आली. ह्यावेळपर्यंत वत्सराजाच्या मनांत फार भय होतें. शहरांतल्या शहरांत कदाचित् मसलत फुटून कोणी आह्माला पकडील कीं काय? अशी त्यांना मोठी काळजी पडली होती. वेशीच्या बाहेर सुरक्षितपणें पोहोंचले तेव्हां वत्सराज वासवदत्तेला आलिंगन देऊन ह्मणाला, "प्रिये वास-

वदत्ते, आतां फारशी फिकर नाहीं. वेशीच्या बाहेर आलों हें मोठें काम झालें." वासवदत्ता म्हणाली, "आई जगदंबा सर्वप्रकारें आमचें साह्य करणारी आहे. मीं तिला कित्ती तरी नवस केले आहेत ! कौशांबींत सुखरूप पोंहचल्यावर मी तिची मोठी पूजा करणार." असें बोलून आषाढकाला ह्मणाली, "बाबा, तूं यावेळीं अम्मळ मनावर घे. ही माझी हत्तीण कसली गुणाची आहे. आणि ती माझ्या कामांत कधींही आढेवेढे घ्यायची नाहीं. तर तुझें काय कसब असेल, तें सर्व आज खर्च करून तिला एकसारखी झपाट्यानें चालीव म्हणजे झालें. आम्हाला लौकर कौशांबींत पोंहचविशील तर तुला पाहिजे तें देईन!" आषाढक म्हणाला, "बाईसाहेब, तुम्ही अगदीं काळजी करूं नका. खुशाल झोंप घ्या. मी होईल तितकी पराकाष्ठा करून लवकर चालवितों."

याप्रमाणें वत्सराजतर वासवदत्तेला घेऊन गेलाच. इकडे वेशींत पडलेले मुर्दे घेऊन तेथील शिपाई राजवाड्यांत गेले. राजा चंडमहासेन स्वस्थ निजला होता. तथापि सेवकांनीं हें वर्तमान त्याला कळविलें. तेव्हां तो घाबरून प्रथम संगीतशाळेंत येऊन चौकशी करूं लागला. तों वत्सराज वासवदत्तेला घेऊन गेला, हें वर्तमान त्याला कळलें, तेव्हां नगरांत एकच गडबड उडाली. चंडमहासेन दुःखित होऊन शोक करीत बसला. हें पाहून त्याचा वडील मुलगा युवराज पालक यानें बापाचें समाधान करून—वत्सराजाला जिंकून वासवदत्तेला परत घेऊन येतों—असें सांगून तो कांहीं विशेष विचार न करितां नडागिरीला तयार करण्याला सांगून आपण हातांत शस्त्रास्त्रें घेऊन सिद्ध झाला. नडागिरीचा मुख्य महात व इतरही महात दारूच्या कैफांत गुंग झाले होते. तरी त्यांतलाच एक महात अम्मळ सावध होता, त्याच्याकरवीं हत्ती कसवून पालक, वत्सराजाचा पाठलाग करण्याकरितां मोठ्या त्वरेनें निघाला. वत्सराजही झपाट्यानें चालला होता.

म्हणून बराचवेळ पालकाला त्याची भेट झाली नाहीं. उजेडतां उजेडतां दोघांची भेट झाली. तेव्हां वत्सराजाला मोठ्यानें हाक मारून, पालक म्हणाला, "थांब, थांब. अंमळ उभा रहा. माझ्या बहिणीला चोरून कोठें पळतोस? शूर पांडवांच्या कुलांत उत्पन्न होऊन असें चौर्य करणें याची तुला लाज वाटत नाहीं काय? तूं कितीही झपाट्यानें पळालास तरी माझ्या बाणाच्या वेगापुढें कोठें जाशील!" याप्रमाणें प्रथम वाग्बाणांनीं वत्सराजाला ताडण करून नंतर प्रत्यक्ष बाणांची वृष्टी करण्यास त्याणें सुरवात केली. तेव्हां वत्सराजानेंही त्याच्यावर बाणांची वृष्टी सुरू केली. उभयतांचें बरेंच निकरानें युद्ध चाललें होतें. पालकानें नडागिरीला तसाच पुढें रेंटून वत्सराजाच्या हत्तिणीशीं त्याला भिडविण्याचा प्रयत्न केला. नडागिरीला हत्तिणीवर घालून तिचा पराभव करून वत्सराज व वासवदत्ता यांला आपल्या अंबारींत ओढून घेऊन जावें, असा त्याचा इरादा होता, पण तो सिद्ध झाला नाहीं! कारण महातानें वरचेवर चालविला तरी, भद्रवती हत्तिणीला पाहून नडागिरी मागें हटूं लागला. तेव्हां पालकाचा अगदीं निरुपाय झाला.

इकडे चंडमहासेन बराच वेळ शोक करून अम्मळ शांत झाला. पालकाला वत्सराजाचा पाठलाग करण्यास त्याणें पाठविलें नव्हतें. तोच आपल्या आवेशांत येऊन निघाला होता. त्याला—दुःखाच्या बहरांत असल्यामुळें—चंडमहासेनानें त्यावेळीं नको ह्मटलें नाहीं. तरी मागाहून त्याला तें योग्य वाटलें नाहीं. यावेळीं राणी अंगारवतीही तेथेंच होती. पालक पाठलाग करण्याला गेला, हें तिला जेव्हां समजलें, तेव्हां ती चंडमहासेनाला ह्मणाली, "व्हायचें तें झालें. आतां हें दुसरें काय अरिष्ट! हा पालक गेला हें मला कांहीं बरें वाटत नाहीं. एक तर तो वत्सराज महा पराक्रमी आहे. त्याच्या पुढें याचें कांहीं चालायचें नाहीं व आपला पालकही मोठा साहसी आहे. तेव्हां एखादें भलतेंच कांहीं तरी होईल ह्मणून मला मोठी काळजी पडली आहे. तेंही असो; पण

आतां लढाई करायची कोणाबरोबर ? जांवयाला जिंकून पुरुषार्थ तो कोणाला दाखवायचा आहे ? एका अर्थीं झालें तें फार चांगलें झालें. कशी तरी पोर त्यालाच द्यावयाची होतीना ? मग तें काम आयतेंच झालें. येथें कार्य झालें असतें, ह्मणजे चार दिवस सोहाळे पाहाण्याला मिळते. तें साधलें नाहीं तरी त्याच्याबद्दल आतां दुःख करून उपयोग काय ? जशी धुरानें डोळे कोंदलेल्या अध्वर्यूच्या हातांतली आहुती नेमकीच यज्ञकुंडांत पडावी, तसें, जें स्थल पाहिलें होतें तेथेंच मुलगी गेली. तेव्हां झालेल्या गोष्टींत संतोष मानून घ्यावा हें फार चांगलें. आतां उगाच तंटे बखडे करण्यांत कांहीं अर्थ नाहीं." हें तिचें भाषण ऐकून **चंडमहासेन** ह्मणाला, "माझें देखील असेंच मत आहे. **पालक** गेला हें मलाही आवडलें नाहीं. आपल्या सर्वांच्या मनांत **वासवदत्ता** **वत्सराजा**लाच द्यावयाची होती व ह्मणूनच आपण इतकी खटपट केली. तें कार्य आमच्या हातून झालें असतें ह्मणजे त्यांत मोठा संतोष होता. पण तो **वत्सराज** कसला वस्ताद आहे ! आह्मीं कन्यादान केलें तर त्यांत आपल्याला कमीपणा येईल ह्मणून त्याणें आमच्या हातावर तुरी देऊन उसणें फेडलें. असें झालें आहे तथापि आतां आपण त्याचा पाठलाग वगैरे करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. झाल्या गोष्टीला आपलें अनुमत देऊन त्याच्याशीं सख्य करावें, हेंच उत्तम आहे." असा निश्चय करून त्यानें **गोपालक** नांवाच्या कनिष्ठ पुत्राला त्वरित रवाना करून **पालका**ला माघारां घेऊन येण्याविषयीं त्याला आग्रहपूर्वक सांगितलें. तो घाई घाईनें **वत्सराजा**कडे येत होता. त्याला दुरून पाहून हा, भावाला पाठबळ करण्याकरितां आला, असें समजून **वत्सराजा**नें त्याच्यावर बाण सोडण्याला आरंभ केला. पण **गोपालका**नें मुळींच शस्त्र उगारलें नाहीं. आणि जवळ येऊन मोठ्या नम्रतेनें **वत्सराजा**ला म्हणाला, "भावोजी, उगीच बाण कां खर्च करितां ? मी आपल्याशीं लढाई करण्याकरतां आलों नाहीं. **पालकदादा**ला बाबांनीं घेऊन येण्यास सांगितलें आहे म्हणून आलों." असें सांगून तो **पालका**ला ह्मणाला,

"दादा, तुझें धनुष्य आतां आवर. तूं जे बाण सोडतो आहेस हे कोणावर! प्रत्यक्ष आपल्या बहिणीला का शौर्य दाखवावयाचें आहे? चल. बाबांनीं तुला परत बोलाविलें आहे." नडागिरी पुढें चाल करिना, म्हणून पालक अगदीं जेरीस आलाच होता. उगीच अभिमानाकरितां म्हणून तो कसे तरी बाण सोडित होता. बापाच्या आज्ञेचें निमित्त मिळतांच धनुष्याची दोरी सोडून त्याणें नडागिरीला मागें फिरविला. गोपालकही आपला घोडा सोडून भावाजवळ हत्तीवर जाऊन बसला. दोघांनींही जातां जातां वत्सराजाच्या हात्तिणीजवळ आपला हत्ती नेला आणि वासवदत्तेकडे पाहून म्हणाले, "ताई, झाल्या गोष्टीचा राग मानूं नको हं. आतां बाबा तुझ्यावर प्रसन्न झाले आहेत. आईनें सांगितलें आहे कीं, सासरीं गेल्यावर नीट रीतीनें वागून वरचेवर समाचार कळवीत जा. आतां ये बरें! आम्हाला विसरूं मात्र नकोस. भावोजी, झाल्या गोष्टीची क्षमा करा. ह्या आमच्या ताईचें नीट रक्षण करा, म्हणजे झालें." असें बोलून,—ज्यांचें अंतःकरण सद्गदित झाल्यामुळें डोळ्यांवाटे टपटप अश्रू पडत होते, असे दोघेही बंधू वत्सराजाचा निरोप घेऊन मागें परतले. यावेळीं वासवदत्तेचाही गळा दाटून आला होता. तिच्यानें एक अक्षर देखील बोलवलें नाहीं. मुकाट्यानें खालीं मान घालून ती बंधूचें भाषण ऐकत होती. ते दोघेही मागें परतल्यावर वत्सराजानें आपली हत्तीण पुढें चालविली. हा प्रसंग होऊन गेल्यामुळें वत्सराजाच्या मनांतली शंका समूळ नाहींशी झाली. त्यानें आषाढकाला हत्तीण सावकास चालविण्यास सांगितलें, कारण, आतां कोणी पाठलाग करील, याची त्याला काळजी नव्हती. इतकें होईपर्यंत दिवस बराच वर आला होता. वाटेनें गोष्टी करीत करीत सावकासपणें दोनप्रहर होण्याच्या सुमारास विंध्याटवीच्या जवळ—म्हणजे सुमारें त्रेसष्ट योजनें हत्तीण आली. तिला फार श्रम झाले असें वाटल्यावरून वत्सराजानें तेथें अंमळ विश्रांती घेण्याचा विचार करून भद्रवतीला उभी करविली.

आणि वासवदत्ता, वसंतक व कांचनमाला यांसह वत्सराज खालीं उतरला. तेव्हां, फार श्रम झाल्याकारणानें भद्रवती अतिशय तान्हेली होती. जवळच सरोवर होतें, तेथें जाऊन ती एकसारखी पाणी पिऊं लागली. आषाढकानें हवा तितका प्रयत्न केला, तरी तिणें पाणी पिण्याचें सोडलें नाहीं. श्रमानें तिचीं गात्रें आधींच विगलित झालीं होतीं. पोटांत कांहींच गेलें नव्हतें. अशावेळीं पाणी फार प्याली तें काळजांत बसून ती तत्काल खालीं पडली, ती पुनः उठली नाहीं !

पुढें बराच मार्ग क्रमण करावयाचा असून मध्येंच हत्तीण मेली. हें पाहून वत्सराजाला फारच खेद झाला; तथापि मागाहून पाठलाग होण्याची आतां भीती नव्हती. वासवदत्तेचा त्या हत्तिणीवर फारच लोभ होता. लहानपणापासून तिच्या सवयीची हत्तीण एकाएकीं मेली, हें पाहून ती अतिशय शोक करूं लागली. इतक्यांत आकाशवाणी झाली. ती अशी कीं,—"राजा, माझ्याविषयीं शोक करूं नकोस. मी मायावती नांवाची विद्याधरी आहें. शापाच्या दोषानें मीं इतके दिवस हत्तीण झालें होतें. आज तुझ्यावर मोठा उपकार केला आहे. आणखी कधीं प्रसंग येईल त्यावेळीं मी तुझ्या पुत्रावरही उपकार करीन. ही तुझी स्त्री वासवदत्ता सामान्य स्त्री नसून साक्षात् देवी आहे. कांहीं कारणानें हिनें पृथ्वीवर अवतार धारण केला आहे. हिच्या योगानें तुझे सर्व मनोरथ पूर्ण होतील." याप्रमाणें वत्सराजाला सांगून वासवदत्तेला—"आजपर्यंत मी तुझी पुष्कळ सेवा केली. तूं माझ्यावर विशेष लोभ करीत होतीस, याचें मला कधींही विस्मरण होणार नाहीं. मीही तुझा हेतू पूर्ण होण्याच्या कामांत यथाशक्ति साह्य केलें आहे. आतां मी आपल्या पूर्वरूपाला प्राप्त होऊन यथेच्छ सुखोपभोग करीन, यास्तव मजविषयीं तूं शोक करूं नको. हा तुझा प्रियपती महानुभाव आहे. याच्या योगानें तुझे सर्व मनोरथ पूर्ण होतील."—असें सांगून दोघांचाही निरोप घेऊन ती विद्याधरी आपल्या लोकाला निघून गेली.

इकडे तिचें भाषण ऐकून वत्सराज व वासवदत्ता यांना फार संतोष झाला. वासवदत्ता म्हणाली, "माझी भद्रवती शापांतून मुक्त झाली, हें फार चांगलें झालें. मला वाटतच होतें, कीं, ही कोणी तरी दिव्य स्त्री असावी. कारण, आमच्या बाबांचा अगदीं आवडता एवढा मोठा नडागिरी हत्ती आहेना ? पण त्याला देखील इतकें शहाणपण नाहीं. ही भद्रवती म्हणजे एक चार पायांचें माणूसच होतें ! तिच्या किती तरी गोष्टी आठवाव्यात ! असो. मरतां मरतां देखील तिनें माझी कामगिरी बजाविली." हें बोलत असतां तिच्या डोळ्यांतून अश्रुपात होऊं लागले. ती भद्रवतीच्या प्रेताला वरचेवर कुरवाळूं लागली. तिच्या मनांत खळगा खणून त्यांत तिला पुरून टाकून पुढें जावें, असें होतें. पण जवळ मनुष्यें विशेष नसल्या कारणानें तो तिचा हेतू सिद्धीस गेला नाहीं. यावेळीं पुलिंदकाच्या ठाण्याजवळ हीं सर्व मनुष्यें आलीं होतीं. म्हणून वत्सराजानें त्याला कळविण्याकरितां वसंतकाला पुढें पाठविला, आणि वासवदत्तेचा हात धरून आषाढक महात व कांचनमाला यांला बरोबर घेऊन वत्सराज पुलिंदकाच्या तळाकडे जाण्यास निघाला. वत्सराज एवढा मोठा राजा होता, परंतु लहानपणीं बरींच वर्षें वनवास भोगल्या कारणानें त्याला ह्या प्रसंगाचें फारसें कठीण वाटलें नाहीं. पण वासवदत्तेला मात्र हा पहिलाच प्रसंग होता. हावेळपर्यंत तिचा कधीं जमिनीला देखील पाय लागला नव्हता, अशा सुकुमार राजकन्येला जंगलांतलि कांट्याकुट्यांतून पायांनीं कसें बरें चालतां येईल? पण वत्सराजाच्या प्रीतीस्तव या प्रसंगाचें तिला कांहींच कठीण वाटलें नाहीं. हत्तिणीच्या गोष्टी बोलत बोलत ती आपल्या प्रियपतीबरोबर हळूहळू आनंदानें चालत होती. इतक्यांत विंध्याटवींत राहणाऱ्या चोरांना हें वर्तमान लागल्यावरून त्यांणीं, वत्सराजावर हल्ला केला. चोरांची टोळी आपल्यावर येत आहे असें पाहून, वत्सराजानें वासवदत्तेला आपल्या पाठीमागें घेऊन कांचनमालेला तिच्या मागें व सर्वांच्या

मागून आषाढक यानें चालावें, अशी व्यवस्था करून हातांत सज्ज धनुष्य घेऊन तो सर्वांपुढें झाला.

वासवदत्ता ही वीरकन्या असून वीरपत्नी झाली होती. तिला चोरांनीं हल्ला केला, याचें फारसें भय वाटलें नाहीं. तरी आपल्याजवळ कांहीं वाहन नाहीं, ह्मणून ती काळजी करीत होती. वत्सराजानें आपल्या धनुष्याच्या दोरीचा शब्द करून एकावर एक बाण मारून हां हां ह्मणतां वासवदत्तेच्या देखत १०९ चोरांचे मुर्दे जमिनींवर पाडले. तेव्हां बाकीचे चोर भयभीत होऊन रानोमाळ पळत सुटले. स्त्रियांला पुरुष केवळ रंगेलाच असला ह्मणजे प्रिय होतो, असें नाहीं. तर त्याच्या अंगीं शौर्यही पाहिजे आहे. शूरपुरुषावर त्या फारच प्रीति करितात. वासवदत्तेला वत्सराजाचे इतर सर्व गुण प्रत्यक्ष अनुभवानें माहित झाले होते; परंतु शौर्याविषयीं तिला अनुभव घेण्याचा प्रसंग आला नव्हता. येतां येतां तिचा बंधू पालक याच्याशीं लढाई झाली, त्यावरून तिला बराच अनुभव आला होता. तथापि चोरांचे मुर्दे पाहून तिला खरोखर मोठा आनंद झाला. ती मोठ्या प्रीतीनें वत्सराजाला कडकडून भेटली. आणि त्याच्या तोंडावरचा घाम आपल्या पदरानें पुसून—"फार श्रम झाला, ह्मणून क्षणभर या झाडाखालीं विश्रांती घेऊन पुढें गेलें तर चालेल कीं नाहीं?" असें सांगत आहे, तों वत्सराजाचा मित्र पुलिंदक यौगंधरायणासह वसंतकाला पुढें करून येत असलेला त्यांच्या दृष्टीस पडला. वत्सराजानें एकवेळ चोरांना पळवून लाविलें होतें. तरी ते पुनः कडेकोट तयारी करून यांच्यावर हल्ला करण्याच्या विचारांत होते. पुलिंदकाला ही हालचाल समजली, तेव्हां त्याणें त्यांचें निवारण केलें. तो प्रेमानें धांवत धांवत पुढें आला आणि त्यानें वत्सराजाच्या पायांवर मस्तक ठेविला. जसा श्रीरामचंद्राचा मित्र गुह होता, तसाच वत्सराजाचाही हा पुलिंदक प्रिय मित्र होता.

याप्रमाणें यौगंधरायण, पुलिंदक, वसंतक इत्यादिकांच्या भेटी झा-

त्यावरून वत्सराजाला फारच आनंद झाला. पुलिंदकानें प्रार्थना करून मोठ्या प्रेमानें आपल्या घरीं सर्व मंडळीस नेलें. तेथें उत्तम प्रकारें सत्कार करून उभयतांसही झालेल्या श्रमांचा परिहार करविला. वत्सराज फार श्रमला होता. ह्मणून ती रात्र जंगली गवताच्या बिछान्यावर वासवदत्तेसह मोठ्या सौख्यांत त्याणें घालविली. यौगंधरायणानें पुढें दूत पाठवून सेनापती रुमण्वान् याला त्वरित फौज घेऊन येण्याविषयीं सूचना केली होती. त्याप्रमाणें सूर्य उदय होण्याच्या सुमारास मोठी फौज बरोबर घेऊन रुमण्वान् वत्सराजाला येऊन भेटला. चंडमहासेन मागाहून पाठलाग करील ह्मणून यौगंधरायणानें सेनापतीला बलाविला होता. व ह्मणून त्यानें एवढी मोठी फौज आणिली होती कीं, एखाद्या पिकलेल्या शेतावर टोळांचा समुदाय बसावा, त्याप्रमाणें विंध्यपर्वताचे सर्व प्रदेश त्या सैन्यानें अगदीं व्यापून गेले होते ! वत्सराज शौच मुख-मार्जनादी आटपून रुमण्वान्, यौगंधरायण आणि, पुलिंदक यांच्याशीं कांहीं गोष्टी बोलत होता. उज्जयिनीकडील कांहीं विशेष वर्तमान समजावें असें त्याच्या मनांत होतें. इतक्यांत उज्जयिनीहून आलेला एक वाणी—'मला वत्सराजाला भेटावयाचें आहे'—असें सांगून त्या फौजेच्या तळांत शिरला. हा यौगंधरायणाचा मित्र होता. ह्मणून कोणी त्याची विशेष चौकशी केली नाहीं. तो थेट वत्सराजाजवळ येऊन त्याच्या पायांला स्पर्श करून हात जोडून ह्मणाला, "महाराज, मला कांहीं विनंती करावयाची आहे. आपले श्वशुर चंडमहासेनमहाराज आपल्यावर प्रसन्न झाले आहेत. मुलीनें आणि जांवयांनीं जी युक्ती केली, ती आपणाला मान्य आहे, हें कळविण्याकरितां त्यांनीं आपला चोपदार पाठविला आहे. तो आणि मी बरोबरच निघालों. फार श्रम झाल्यामुळें तो अम्मळ मागें विसावा घेऊन येणार आहे. हे आपले मुख्य प्रधान यौगंधरायण यांचा माझ्यावर मोठा अनुग्रह आहे. उज्जयिनींत कांहीं कमीजास्ती झालें तर त्वरित कळविण्या-

विषयीं यांची मला आज्ञा झाली होती, ह्मणून विनंती करण्याकरितां मीं आलों." हें त्या वाण्याचें भाषण ऐकून वत्सराजाला फारच हर्ष झाला; त्याणें हें वर्तमान वासवदत्तेला समजावें ह्मणून तिच्या समक्ष वाण्याला पुनः सर्व हकीकत सांगण्यास आज्ञा केली. वासवदत्तेला, आपला बंधू गोपालक याच्या बोलण्यावरून बराच धीर आला होता. वत्सराजावर तिची अतिशय प्रीती होती, तरी तिला आईबाप नकोसे झाले नव्हते. त्यांच्यावर हिचा फारच लोभ होता. केवळ वत्सराजाच्या प्राप्तीविषयीं त्यांणीं कांहीं विघ्न केलें, तर मात्र त्यांचा तिला राग येई. पण तो तेवढ्या पुरताच. वाण्याच्या सांगण्यावरून आपल्या कृतीला आईबापांची पूर्ण सम्मती आहे, व ते प्रसन्न झाले आहेत, असें समजतांच, त्यांच्याविषयीं पूर्वीं तिला जो राग आला होता, तो अगदीं नाहींसा होऊन आप्तांच्या वियोगानें ती फार उत्कंठित झाली. विवाह लौकरच व्हावा ह्मणून तिची फार गडबड होती. आईबापांला फसवून आपण पळून आलें, याची तिला अतिशय लाजही वाटत होती, असे एकाच वेळीं निरनिराळे विकार उत्पन्न झाल्यामुळें तिचें मन फार अस्वस्थ झालें. ह्मणून घटकाभर करमणूक होण्याकरितां जवळ बसलेल्या वसंतकाला— 'माझ्या मनाची विश्रांती होईल, अशी एक चांगलीशी गोष्ट सांग'— असें ती ह्मणाली. वसंतकही मोठा चतुर होता. यावेळची तिच्या मनाची स्थिती लक्षांत आणून पतीवरचें प्रेम विशेष वाढविणारी अशी पुढील कथा सांगण्यास त्याणें प्रारंभ केला.

वसंतक ह्मणाला, "या भरतखंडांत ताम्रलिप्ती नांवाची एक प्रसिद्ध नगरी होती. तींत धनदत्त नांवाचा मोठा पैसेवाला एक वैश्य रहात होता. त्याला बाकी सर्व गोष्टी अनुकूळ होत्या, परंतु पुत्रमुखदर्शनाचा लाभ न झाल्यामुळें तो फार दुःखित होता. एकेदिवशीं बहुत विद्वान् ब्राह्मणांला बोलावून त्यानें मोठी सभा केली; आणि सर्वांला हात जोडून ह्मणाला, "आपण सर्वही समर्थ आहां. आपल्या कृपेनें

मला सर्व अनुकूळ असून एका पुत्रावांचून मीं फार कष्टी झालों आहें. तर माझ्या वंशाचा उच्छेद न होईल अशाविषयीं आपण कांहीं उपाय सांगा." ही त्याची विनंती ऐकून ब्राह्मण ह्मणाले, "शेटजी, ही तुमची विनंती फारशी दुष्कर आहे असें नाहीं. विद्वान् ब्राह्मण आपल्या वैदिक कर्माच्या साह्यानें तुझें पाहिजे तें कार्य सिद्ध करूं शकतील. याविषयीं एक अशी गोष्ट सांगतात कीं,—पूर्वीं **सोमक** नांवाचा सूर्यवंशी राजा होता. त्याला एकशें पांच बायका असून त्यांच्या पोटीं एकही पुत्र झाला नाहीं. तेव्हां ब्राह्मणांनीं त्याच्याकडून पुत्रकामेष्टी करविली. नंतर सर्व स्त्रियांच्या डोळ्यांला प्रतिपदेच्या चंद्राप्रमाणें आनंद देणारा जंतु नांवाचा एक पुत्र झाला. एकेदिवशीं तो रांगत असतां त्याच्या मांडीला एक मुंगी चावली. तेव्हां घाबरून त्यानें एकाएकीं किंकाळी फोडली. नवांनवसांनीं झालेला एकुलता एक पुत्र मुंगी चावली ह्मणून रडला, एवढ्यावरून केवळ राजवाड्यांतच नव्हे, तर सर्व शहरभर एकच गडबड झाली. प्रत्यक्ष राजा देखील अजाणत्यासारखा, "हे पुत्रा हे पुत्रा," ह्मणून ओरडूं लागला. क्षणमात्रानें मुंगीच्या दंशाची व्यथा कमी होऊन तो मुलगा शांत झाला तेव्हां सर्व मंडळी आनंदित झाली. नंतर—एक पुत्र असणें हें फार दुःखाला कारण आहे. शास्त्रकार देखील जिला एकच मुलगा असेल, तिला 'काकवंध्या' ह्मणतात. तेव्हां ही एकपुत्रता असूनही उपयोगाची नाहीं. पुत्र असले तर पुष्कळ असावेत. नाहीं तर मुळींच नसावा हें बरें, असें वाटल्यावरून—**सोमक**राजा फार दुःखित झाला. आणि "बहुत पुत्र होण्याचा कांहीं उपाय असेल तर सांगा;" असा त्याणें ब्राह्मणांला प्रश्न केला. तेव्हां ब्राह्मण म्हणाले, "राजन्, याविषयीं एकच उपाय आहे. तो असा कीं, या पुत्राला मारून त्याचें मांस अग्नींत हवन करावें. आणि तुझ्या सर्व स्त्रियांनीं त्या होमाचा वास घ्यावा, म्हणजे सर्वही स्त्रियांला पुत्र होतील!" हें ऐकून **सोमक** राजानें त्याणीं सांगितल्याप्रमाणें पुत्राचा यज्ञ केला! तेव्हां प्रत्येकीला एक एक याप्रमाणें त्याला एकशें पांच पुत्र झाले."

अशी कथा सांगून ब्राह्मण **धनदत्त** वैश्याला म्हणाले, "यज्ञानें पाहिजे ते मनोरथ सिद्ध होतात. अतएव तुझाही हेतू पूर्ण होण्याविषयां आम्हीं यत्न करूं." असें सांगून त्यांणीं त्या वैश्याकरवीं पुत्रकामेष्टी यज्ञ करविला. नंतर ईश्वरकृपेनें त्याची स्त्री गरोदर होऊन तिच्यापासून **धनदत्ता**ला आनंद देणारा असा एक पुत्र झाला. **धनदत्ता**नें पुत्रजन्माचा मोठा उत्सव करून बहुत दानधर्म केला. आणि त्याला **गुहसेन** असें नांव ठेवलें. क्रमानें तो पुत्र शुक्लपक्षींच्या चंद्राप्रमाणें प्रतिदिवशीं वाढत गेला. त्याचे उपनयनादिसंस्कार करून, चांगलीशी मुलगी पाहून विवाह करावा, असा **धनदत्ता**चा विचार होता. त्याणें आसपास पुष्कळ शोध केला, पण मनासारखी मुलगी कोठें मिळाली नाहीं. इतक्यांत, व्यापाराकरितां त्याला दूर देशीं जावयाचें कारण पडलें, तेव्हां कदाचित् तेथें चांगलीशी मुलगी मिळाली तर पाहावी, म्हणून त्यानें आपल्या पुत्राला मुद्दाम बरोबर घेतला. आणि आपल्या गांवापासून, म्हणजे **ताम्रलिप्तिका** नगरापासून बराच दूर **मद्र**देशांत जाऊन एका मोठ्या शहरांत उतरला. तेथें त्याणें व्यापाराच्या अनेक उलाढाली चालविल्या. त्यासंबंधानें पुष्कळ व्यापाऱ्यांशीं त्याची ओळखदेख झाली होती. त्यांत **धर्मगुप्त** नांवाचा एक कुलीन व सधन वैश्य होता. त्याची **देवस्मिता** नांवाची मुलगी होती. ती **धनदत्ता**च्या पसंतीस आली, तेव्हां त्याणें युक्ती प्रयुक्तीनें **धर्मगुप्ता**जवळ, त्याची मुलगी आपल्या मुलग्याला देण्याविषयीं बोलणें लाविलें. त्याला इतर सर्व गोष्टींनीं हें स्थल पसंत पडलें असतें; परंतु फार दूरचा संबंध आहे, म्हणून **धर्मगुप्ता**नें **धनदत्ता**चें मागणें नाकारलें. त्याची एकुलती एक मुलगी होती. तेव्हां इतक्या दूर दिली तर पुनः आपल्याला तिची भेट

---

१—ही कथा फारच किळसवाणी आहे. ही येथें मुळींच देऊं नये, असें मनांत होतें पण पूर्वकाळांत यज्ञविद्या किती प्रबळ झाली होती, त्याचें ही कथा एक उदाहरण आहे. महाभारत आदिपर्वांत ही कथा कांहीं भिन्न रितीनें विस्तारपूर्वक सांगितली आहे.

देखील होणें कठीण पडेल, हाच कायतो त्याच्या मनांत अडथळा आला होता; पण तो तसाच एका बाजूस राहिला. कारण देवस्मिता उपवर झाली होती. तिला आपल्याला अनुरूप अशा भर्त्याची निवड करून घेण्याइतकें शहाणपण होतें. म्हणून तिणें बापाच्या ह्मणण्याला अनुमोदन दिलें नाहीं. गुहसेनाच्या गुणांनीं तिचें मन ओढून घेतलें होतें. ह्मणून तिणें त्यालाच वरण्याचा निश्चय करून आईबापांच्या संमतीवांचून देखील त्याच्याबरोबर जाण्याचा संकेत केला. आणि आपल्या सखीच्या हातीं गुहसेनाला तशा अर्थाचा निरोप पाठविला. गुहसेनानें ती गोष्ट आपल्या बापाला कळविली. आणि त्याच्या संमतीनें संकेताची वेळ ठरविली. देवस्मिता संकेताप्रमाणें आपल्या घरांतून निघून भावी प्रिय पतीबरोबर ताम्रलिप्ती नगराला येऊन पोंहचली. तेथें आल्यावर शुभ मुहूर्त पाहून उभयतांचा विवाह झाला. दोघांचेंही मन परस्परांच्या प्रेमपाशानें बद्ध झालें होतें. कांहीं दिवसांनीं त्यांनां मुलेंही झालीं. इकडे धनदत्त म्हातारा होऊन परलोकाला गेला. तेव्हां घरचें व्यापारधंद्याचें सर्व काम गुहसेनाच्याच अंगावर पडलें. पुढें कांहीं दिवसांनीं कटाहद्वीपनामक दूर देशांत व्यापारसंबंधीं कांहीं कामाकरितां त्याला जाणें भाग पडल्यावरून गुहसेनानें जाण्याची तयारी केली. पण देवस्मितेला ती गोष्ट मान्य झाली नाहीं. तिणें तिकडे न जाण्याविषयीं फारच आग्रह केला, याचें कारण असें होतें कीं, गुहसेनाचा स्वभाव चैनी होता, तेव्हां आपला नवरा, कदाचित् तिकडे गेला तर जशी आपण पूर्वीं त्याला मिळालें, तशी आणखीही कोणी तरी स्त्री मिळेल! अशी तिच्या मनांत शंका होती. ह्मणून तिनें गुहसेनाला जाऊंद्यावयाचें नाहीं असा हट्ट धरला होता. बिचाऱ्या गुहसेनाची दोहोंकडून ओढाताण झाली. एकीकडे त्याचे आप्त इष्ट मित्र वगैरे जाण्याविषयीं फार आग्रह करीत होते. व दुसरीकडे बायको हट्ट धरून बसली होती. तेव्हां अशा अडचणींत पडल्यामुळें त्याला काय करावें हें सुचेनासें झालें. शेवटीं

कांहीं विचार करून तो एका देवळांत जाऊन निराहार करीत बसला. पुढें काय करावें तें प्रत्यक्ष देवानेंच मला सांगावें, असा त्याचा संकल्प होता. देवस्मिताही नवऱ्याबरोबर देवळांत उपोषणें करीत बसली. या दोघांचाही दृढ निश्चय पाहून देवानें स्वप्नांत दर्शन दिलें. आणि दोघांच्या हातांत दोन तांबडीं कमळें देऊन देव त्या दोघांलाही म्हणाला, " तुह्मी दोघेंही हीं कमळें आपल्या जवळ ठेवा. जेव्हां तुह्मां दोघांतून एकाच्या दृष्टीआड दुसरा भलतेंच कृत्य—उभयतांच्या संबंधाविरुद्ध कर्म, अर्थात् व्यभिचार—करिल, तेव्हां दुसऱ्याच्या हातांतलें कमल सुकून जाईल. व त्यावरून तुम्ही परस्परांनीं आपआपल्या कर्माची खूण समजावी. " असें सांगून देव गुप्त झाला. इकडे यांचेही डोळे उघडले. उभयतां जागीं होऊन पाहातात तों, जणुंकाय परस्परांचें हृदयच असें एकेकाच्या हातांत एकेक लाल कमळ दृष्टीस पडलें. तें पाहून उभयतांचेंही समाधान झालें. देवस्मितेच्या मनांत जी शंका होती तिचा खुलासा होण्याचें साधन मिळाल्यामुळें तिणें नवऱ्याला परदेशीं जाण्याला मोठ्या संतोषानें परवानगी दिली. तेव्हां गुहसेन कटाहद्विपांत व्यापार करण्याला निघून गेला. तें देवानें दिलेलें—नेहमीं टवटवीत राहणारें—कमळ तो आपल्या हातांत ठेवीत असे. तेथें धंद्याच्या संबंधानें पुष्कळ व्यापाऱ्यांशीं त्याची ओळख झाली होती. व कांहीं त्याच्या बरोबरीचे तरुण व्यापारी त्याचे मित्रही झाले होते. गुहसेनाच्या हातांतलें तें कमळ पाहून त्यांनां फार आश्चर्य वाटे. त्यांनीं पुष्कळ वेळां—हें कोमेजत कसें नाहीं ? म्हणून त्याला विचारलें. परंतु गुहसेनानें त्याचें कारण कांहीं सांगितलें नाहीं. परंतु शेवटीं त्यांतल्याच एकानें युक्तीनें त्या कमळाचा सर्व वृत्तांत समजून घेतला आणि तो आपल्या मित्रमंडळीस सांगितला. तेव्हां त्यांनां गुहसेनाच्या स्त्रीविषयीं मोठी ईर्ष्या उत्पन्न झाली. सामान्यतः लोकांचा स्वभाव मोठा वाईट असतो. अमकी एक स्त्री मोठी पतिव्रता आहे—इतकें ऐकलें कीं पुरे; त्यांनां एक-

प्रकारची ईर्ष्या उत्पन्न होऊन ते तिचा छळ करण्याला प्रवृत्त होतात ! गुहसेनाच्या स्त्रीचीही अशिच स्थिती झाली. त्यांला देवस्मितेविषयीं विलक्षण ईर्ष्या उत्पन्न होऊन पाहिजे त्या उपायानें तिला पातिव्रत्या-पासून भ्रष्ट करण्याचा त्यांणीं निश्चय केला !

गुहसेनाचा व्यापार त्या ठिकाणीं फारच फैलावला होता. म्हणून तो लौकर आपल्या घरीं जाणार नाहीं, असें अनुमान करून त्यांतले चौघे वैश्यपुत्र आपआपल्यांत निश्चय करून देवस्मितेला भ्रष्ट करण्याकरितां गुप्तपणें ताम्रलिप्ती नगरींत आले. आणि तेथें एका गरीब वाण्याच्या घरीं बिऱ्हाड करून त्यांणीं सर्व शहर पाहिलें. गुहसेनाच्या वाड्यांत प्रवेश करून देवस्मितेलाही पाहिली, परंतु त्यांच्या मनांतला हेतू सिद्ध होण्याला कांहीं उपाय सुचेना, ह्मणून कोणी तरी हें काम साधून देणारा मनुष्य मिळ-ण्याविषयीं ते प्रयत्न करूं लागले. शहरांत बारिक रितीनें तपास करीत फिरतां फिरतां बौद्धांच्या एका मंदिरांत त्यांणीं प्रवेश केला. तेथें योगकरंडिका नांवाची एक बुद्धतापसी एकटीच बसली होती. तिला नमस्कार करून तिच्याशीं इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलत बसले. ती परोपकार करणारी आहे असें पाहून हे वाणी तिला प्रीतिपूर्वक ह्मणाले, "भगवति, आमचें एक फार अगत्याचें काम आहे. आणि त्याच्याकरितांच आह्मी इतके दूर येथें आलों. परंतु तें सिद्ध करून देणारा मनुष्य हावेळपर्यंत कोणीच भेटत नाहीं, म्हणून मोठी काळजी लागली आहे. तुह्मी जर तेवढें साधून द्याल, तर आह्मावर मोठे उपकार होतील. मग तुमची पाहिजे ती सेवा करूं, व द्रव्यही पुष्कळ देऊं." हें ऐकून ती तापसी हंसत हंसत ह्मणाली, "तुमचें काम तें दुसरें काय असणार? तरुण पुरुषांचें स्त्रियांवर मन बसलेलें असतें. कोणच्या तरी स्त्रीवर तुमचें मन आसक्त झालें असेल ह्मणून तिची प्राप्ती करून देण्याविषयीं तुह्मी मला सांगत असाल. याशिवाय दुसरें कांहीं काम असेल असें वाटत नाहीं, पण कांहीं चिंता नाहीं. तुह्माला कोण

पाहिजे असेल, तिचा ठावठिकाण वगैरे सांगा ह्मणजे काम साधून देईन! मला द्रव्यादिकांचा कांहीं लोभ आहे असें नाहीं. सिद्धिकरीनांवाची मोठी हुषार माझी शिष्यिण आहे. तिच्या प्रभावानें मला असंख्य द्रव्य मिळालें आहे." हें तिचें भाषण ऐकून ते वैश्यपुत्र ह्मणाले, "शिष्यिणीच्या प्रभावानें पुष्कळ द्रव्य मिळालें, असें तुह्मी सांगितलें तें कसें? हें कृपा करून सांगा." याप्रमाणें त्यांणीं प्रश्न केला, तेव्हां बुद्धतापसी ह्मणाली, "ती गोष्ट इतकी गुप्त आहे असें नाहीं. तुह्मांला ऐकण्याचें कौतुक वाटत असेल तर मी सांगतें, ऐका."

ह्या शहरांत उत्तरदेशांतून कांहीं दिवसांपूर्वी एक मोठा सावकार व्यापाराकरितां आला होता. त्याच्याजवळ असंख्य द्रव्य होतें. तो येथें बिऱ्हाड करून बरेच दिवस व्यापाराकरितां राहिला होता. हें माझ्या सिद्धिकरीला समजल्यावरून त्याचें द्रव्य हरण करण्याचा तिनें निश्चय केला. आणि त्या सावकाराच्या घरांत प्रवेश होण्याविषयीं ती प्रयत्न करूं लागली. शोधाअंतीं त्या सावकाराला मोलकरणीची गरज आहे, असें समजल्यावरून, माझ्या शिष्यिणीनें आपला वेष बदलून मोलकरीण होऊन त्याच्याजवळ चाकरी धरली! ही फार हुषार असून, विश्वासानें कामकाज करीत आहे, असें पाहून त्या व्यापाऱ्यानें तिच्यावर पूर्ण विश्वास ठेविला. त्याच्या घरचीं मनुष्यें येथें कोणी नव्हतीं. ह्मणून माझी शिष्यिणच काय ती त्याच्याइथली कारभारीण झाली होती. याप्रमाणें विश्वास देऊन त्याच्या घरांतला सर्व भेद समजून घेऊन एके दिवशीं रात्रीं, तिणें त्याच्या घरांत मुख्य मुख्य ज्या कांहीं वस्तू होत्या, त्या सर्व घेतल्या आणि कोणाला नकळतां शहराच्या बाहेर पडून लौकर लौकर तें द्रव्य कोठें तरी जंगलांत पुरून ठेवण्याकरितां ती जात होती. इतक्यांत त्या वाटेनें ढोलकें गळ्यांत अडकविलेला एक डोंब येत होता, त्यानें हिला पाहिलें. ही मागें पुढें चहूंकडे पहात पहात साशंक होऊन चालली होती. ह्मणून त्याच्या मनांत तिच्याविषयीं

कांहीं संशय आला. तो बऱ्याच अंतरावर गेला होता. तरी सिद्धि-करीचा तपास करून कांहीं मिळेल तर पाहावें, अशा उद्देशानें परत तिच्याकडे येऊं लागला. माझी शिष्यिण मोठी पटाईत. ती आपल्याकडे येत आहे, असें पाहून ती जवळच्या एका झाडाखालीं उभी राहून मोठ्यानें रडूं लागली. आणि तो डोंब जवळ आला, तेव्हां काकुळती येऊन त्याला ह्मणाली, "बाबा, तुह्मीं आलां फार चांगलें झालें. मी आपल्या जिवाला अगदीं कंटाळलें आहें. दररोज भांडणें होऊं लागलीं तर माणसानं कुठवर सहन करावं बरं! आज आमच्या यजमानाशीं माझं फार कडाक्याचं भांडण झालं आहे. ह्या कटकटीचा एकदांचा शेवट लावावा, ह्मणून मी आज घरांतून बाहेर पडून येथें आलें आहें. मरण्याचा माझा अगदीं पक्का निश्चय झाला आहे. जर तूं मला या कामीं साह्य करशील, तर या दुःखांतून एकदांची सुटेन! दुसरें कांहीं नाहीं; फक्त माझ्या गळ्याला एवढा फांस बांध ह्मणजे झालें. परमेश्वर तुझें कल्याण करो." हें तिचें भाषण ऐकून डोंब मनांत ह्मणाला, 'मी हिला मारण्याकरितांच आलों होतों. मारल्यावांचून हिच्याजवळ काय आहे तें मिळावयाचें नाहीं. पण आतां कांहीं काळजी करायला नको. ही आपोआपच मरते आहे तेव्हां आपण उगाच स्त्रीहत्या कशाला करावी? तिच्या गळ्याला फांस तेव्हढा लावला ह्मणजे झालें.' असा विचार करून डोंबानें तिचें ह्मणणें मान्य केलें आणि फांसाची दोरी झाडाच्या खांदीला बांधण्याकरितां तो वर चढला. त्यानें फांस बांधून तयार केल्यावर सिद्धिकरी मोठ्या काकुळतीनें त्याला ह्मणाली, "भल्या गृहस्था, मजवर तुमचे फार उपकार झाले. आतां फास कसा बांधून घ्यावा, हें मला मुळींच माहित नाहीं. जर तुह्मी अम्मळ दाखवाल तर मोठे आभार होतील!" हें तिचें लडिवाळपणाचें बोलणें ऐकून डोंबाच्या मनांत कांहीं शंका आली नाहीं. तो, खरोखरच फांस कसा लावून घ्यावा हें तिला दाखविण्याकरितां आपलें ढोलकें खालीं ठेवून त्यावर उभा राहिला.

आणि गळ्याला फांस अडकवून—'असा लावून घ्यावा बरें,' ह्मणून तिला दाखवूं लागला. फासाची गांठ त्यानें आपल्या गळ्याला लाविली आहे असें पाहून सिद्धिकरीनें ढोलक्यावर एक असा धक्का मारला कीं, तें सपाट्यासरसें डोंबाच्या पायांखालून निसटून गेलें. अर्थात् डोंबाच्या मानेला ओढ लागून लौकरच त्याचे प्राण निघून गेले ! याप्रमाणें युक्तीनें आपला नाश करण्याकरितां आलेल्या डोंबाचा नाश करून सिद्धिकरी तेथून पुढें जाण्याच्या विचारांत होती. इतक्यांत,—ज्याचा सर्व वित्तविषय तिनें नेला होता, तो सावकर तिचा शोध करित करित तिकडेच येत असलेला तिला दिसला. तेव्हां—याच्या तडाक्यांतून सुटण्याला दुसरा कांहीं उपाय नाहीं—असें पाहून आपल्या जवळचें बोचकें पाठीला बांधून सिद्धिकरी त्या वडाच्या झाडावर चढली. झाडाचीं पानें सघन होतीं. तशांतून तेथें तिला एक ढोलही मिळाली. त्या ढोलींत आपलें बोचकें दडवून ठेवून, ती त्याच झाडावरतीं दडून बसली. इतक्यांत पाठोपाठ तो सावकारही झाडाखालीं येऊन पोंहचला. त्याची दृष्टी चुकवून झाडाच्या दुसऱ्या बाजूनें ती वर चढली होती, ह्मणून ती कोठें गेली, हें त्याला मुळींच समजलें नाहीं. सावकाराला गळ्याला फांस लावून घेतलेला डोंब मात्र दृष्टीस पडला. सिद्धिकरीचा आसपास शोध केला, परंतु ती कोठें मिळाली नाहीं. तेव्हां पळून गेली असेल, असें समजून सावकार परत जाणार होता. इतक्यांत त्याच्या बरोबरचा एक चाकर म्हणाला, "कदाचित् ती झाडावर चढली नसेल ना ? अत्तां येथें दिसली होती. आणि इतक्यांत कशी पळून गेली असेल ! तर मी झाडावर चढून पाहतों." असें ह्मणून तो झाडावर चढून सिद्धिकरी जेथें दडून बसली होती, तेथें गेला. तो जवळ आला तेव्हां हंसत हंसत त्याला खुणा करून, सिद्धिकरी म्हणाली, "गड्या प्रियकरा, तूं आलास बरें झालें. माझी सगळी कायती प्रीती तुझ्यावर. तुझ्याबरोबर खुशाल चैनींत रहावें, म्हणून मीं एवढा उद्योग केला. तर माझ्याजवळ जें कांहीं आहे, तें सर्व तुझेंच. आतां ये. माझा स्वीकार

कर." असें बोलून आलिंगन देऊन वरचेवर त्याचे मुके घेऊन म्हणाली, "प्राणसख्या, अशानें माझी तृप्ती होत नाहीं. तुझी जीभ माझ्या तोंडांत घाल. आणि मी आपली तुझ्या तोंडांत घालतें. अशा रितीनें कांहं वेळ राहिलें ह्मणजे माझी तृप्ती होईल." सावकाराचे चाकराचीही बुद्धी फिरली होती. इतकें द्रव्य आणि सिद्धिकरीसारखी सुंदर बायको, या दोहोंचा लाभ सोडून तो धन्याच्या घरच्या चाकरीची कशाला आशा करील! त्यानें, तिचें बोलणें खरें मानून आपली जीभ तिच्या तोंडांत घातली. तेव्हां तत्क्षणीं सिद्धिकरीनें त्याच्या जिभेचे आपल्या दातांनीं दोन तुकडे करून युक्तीनें त्याला खालीं ढकलून दिला! एकाएकीं विव्हळ होऊन तो खालीं पडला, हें पाहून सावकार व त्याच्या बरोबरचे इतर सेवक फार घाबरले. उंचावरून खालीं पडल्यामुळें तो थोडावेळ बेशुद्ध झाला होता. सावकारानें सावध करवून त्याला विचारलें, तेव्हां जीभ नसल्यामुळें तो अळळळळ करूं लागला. तें त्याचें अस्पष्ट बोलणें ऐकून सावकार व त्याच्या बरोबरचे लोक यांची—झाडावर कुणी तरी जबरदस्त भूत असून त्यानें याला झपाटलें असेल—अशी समजूत झाली! आणि त्या चाकराला तसाच उचलून घेऊन ते आपल्या घराकडेस निघून गेले. नंतर, आलेलीं सर्व अरिष्टें टळलीं, असें पाहून सायंकालचा समय होईपर्यंत सिद्धिकरी आसपास दुसऱ्या एका पडक्या देवळांत राहून रात्रीं माझ्याजवळ आली. आणि मी तिची गुरु आहें, ह्मणून तें सर्व द्रव्य तिणें मला गुरुदक्षणा ह्मणून दिलें."

याप्रमाणें गोष्ट सांगून योगकरंडिका ह्मणाली, "समजलां? अशा प्रकारची ती माझी शिष्यीण मोठी चतुर आहे. तिच्या बुद्धिप्रभावानें मला पैशाला मुळींच तोटा नाहीं." तापसी असें बोलत आहे, इतक्यांत ती सिद्धिकरीही तेथें आली. तेव्हां तिला दाखवून तापसी ह्मणाली, "इतका वेळ जिचें चरित्र मी तुह्माला सांगत होतें, तीच ही माझी प्रिय शिष्यीण सिद्धिकरी. आतां बाबांनो, तुमचें काय काम असेल तें खुशाल

सांगा. कोणच्या स्त्रीची तुम्ही इच्छा करितां ? तें कळलें म्हणजे मी हरप्रयत्नानें तिला वशकरून देईन."

याप्रमाणें तिचें सर्व चरित्र ऐकून ह्या वैश्य पुत्रांला फारच आनंद झाला. आणि—आतां आपलें काम अगदीं फत्ते होईल—असें समजून त्यांणीं तिला मोठ्या नम्रतेनें सांगितलें कीं, "तापसीबाई, तुम्हाला हें सांगण्यासारखें नाहीं. पण तुम्हीं आमच्या मातुश्रीप्रमाणें आहां ! मुलांचा हेतू आईवांचून दुसरी कोण पूर्ण करणार आहे ? म्हणून सांगतों. ह्या तुमच्या शहरांत **गुहसेन** नांवाचा प्रख्यात व्यापारी आहे. त्याची हवेली मोतीचौकांत आहे, ती तुम्हाला माहीत असेलच." यावर बुद्धतापसी म्हणाली, "होय. तो आमच्या इथला नगरशेटच आहे. पण पुढें काय ?" वैश्यपुत्र म्हणाले, "तो आतां इथें नाहीं. व्यापाराकरितां कोठें द्वीपांतराला गेला आहे. त्याची **देवस्मिता** नांवाची मोठी सुंदर स्त्री आहे." बुद्धतापसी म्हणाली, "हां ! हां ! समजलें. पण मग काय ती तुम्हाला पाहिजे आहे ?" वैश्यपुत्र म्हणाले, "होय बाईसाहेब. ती मोठी पतिव्रता आहे, असें आम्ही ऐकतों. तरी पण तुम्हीं मनावर घ्याल तर कदाचित् आमचा मनोरथ पूर्ण होईल." बुद्धतापसी म्हणाली, "अं: त्याची कांहीं काळजी नको. पतिव्रता तीचशी काय ? समय मिळेपर्यंत सर्वच बायका पतिव्रता असतात. पण प्रसंगीं धैर्य न चळूं देणारी अशी या जगांत एक तरी आहे किंवा नाहीं, कोणास ठाऊक ? बरें, तें कांहीं तरी असो. ह्या आमच्या विहारांत तुम्ही खुशाल रहा. तुमचा मनोरथ पूर्ण होण्याविषयीं मी यत्न करून पहातें. पुढें काय होईल तें पाहूं." असें त्यांचें समाधान करून तापसी जेवणखाण आटपून तिसऱ्या प्रहराच्या सुमारास शिष्यिणीला बरोबर घेऊन गुहसेनाच्या घरीं गेली. बरोबर पुष्कळसे पदार्थ पसादाकरितां म्हणून तिणें घेतले होते. गुहसेनाच्या हवेलींत जाऊन बाहेरच्या चौकांत त्याचे मुनीम वगैरे बसले होते, त्यांना प्रसाद वगैरे देऊन शांत व गंभीरभाषणानें त्यांचें मन प्रसन्न केलें. आणि त्यांनीं दाखविलेल्या वाटेनें ती

शिष्यिणीसहवर्तमान आंतल्या चौकांत गेली. तेथें दारांतच एक कुत्री गळ्याला लांब सांखळ लावून बांधून ठेविलेली होती. ती ह्या अनोळखी बायांला पाहून एकसारखी भोंकूं लागली, ह्मणून ह्या दोघीही तेथेंच उभ्या राहिल्या. इतक्यांत—कुत्री एवढ्या मोठ्यानें भोंकते आहे, तेव्हां कोणीतरी परकी माणूस आलें असेल—असें समजून देवस्मिता माडीवरून पाहूं लागली. तिला पाहून या दोघींनींही "बुद्धमुनी तुझें कल्याण करो !" असा मोठ्यानें आशीर्वाद दिला. तेव्हां देवस्मितेनें दासीला "त्या बाया कशाकरितां आल्या आहेत पहा, त्यांला इकडे घेऊन ये," असें सांगितलें. मग दासी खालीं येऊन कुत्रीला आवरून ह्या दोघींलाही माडीवर घेऊन गेली. देवस्मितेनें त्यांचा मोठा सत्कार केला. आणि येण्याचें कारण विचारलें. तेव्हां ती दुष्ट योगकरंडिका म्हणाली, "बाई, वरचेवर तुला पाहावें असें वाटतें. आज तर तुला स्वप्नांतच मीं पाहिली. तेव्हां म्हटलें एकवेळ भेटून तरी यावें." हें ऐकून, देवस्मिता भोळ्या भावानें म्हणाली, "हा आपला मजवर मोठा अनुग्रह आहे. तुमच्यासारख्यांचें केवळ दर्शनच नव्हे, तर सहवास देखील घडावा, अशी माझी मनापासून इच्छा आहे." हें ऐकून तापसी ह्मणाली, "अर्हन्, अर्हन्. काय करूं बाई ! यायला फावत आहे कुठें? नित्यनेम करण्यांत माझा सारा वेळ जातो, यामुळें कोठें जाणें नाहीं आणि येणें नाहीं. तूं बुद्धोपासिका आहेस, तेव्हां म्हटलें घटकाभर तुझ्याशीं कांहीं गोष्टी कराव्या. पण आतांशीं तुझें मन अगदीं उदास असेल असें वाटलें. खरेंच आहे. अशा ऐन बहराच्या दिवसांत पतीचा वियोग तुला सहन करावा लागतो, हें पाहून मला तर फार वाईट वाटतें. सौंदर्य आणि तारुण्य यांचा उपभोग घेणारा प्रिय जवळ नसेल तर तीं अगदीं निष्फल होतात ! असो. बाई, तुझा पती प्रवासांतून सुखरूपपणीं घरीं येऊन तुला भेटो म्हणजे झालें." इत्यादि प्रकारचीं पुष्कळ गोड गोड भाषणें केलीं. आणि पुनः येण्याचें कबूल करून तिचा निरोप घेऊन ती ढोंगी तापसी परत आपल्या विहाराकडे गेली.

नंतर दुसऱ्या दिवशीं पुनः तसाच प्रसाद वगैरे बरोबर घेऊन मिरच्यांचा मसाला लावलेला एक मासाचा तुकडा हातांत घेऊन ती देवस्मितेच्या घरीं गेली. कालच्याप्रमाणें कुत्री आपल्याला अडवील ह्मणून तिनें दरवाजांत येतांच मासाचा तुकडा तिच्या पुढें टाकला. कुत्री मांस खाण्यांत गुंतली आहे, असें पाहून ही तापसी हळूच आंत शिरली. कुत्रीनें—पुष्कळ मिरच्यांची पूड लावलेला मांसाचा तुकडा खाल्ला, त्यामुळें तिच्या डोळ्यांतून सारखें पाणी वाहूं लागून वरचेवर शिंकाही येऊं लागल्या. इकडे तापसी देवस्मितेच्या जवळ जाऊन बसली. तेव्हां देवस्मिता तिचें आगतस्वागत करीत आहे, तों तापसी मोठ्यानें रडूं लागली, देवस्मिता चकित होऊन तिनें रडण्याचें कारण विचारलें, तेव्हां तापसी ह्मणाली, "दुसरें कांहीं नाहीं. खालीं जाऊन अम्मळ तूं त्या कुत्रीला पहा, कशी रडते आहे ती. देवस्मिता म्हणाली, "तें कां?" तापसी ह्मणाली, "तीही पूर्वजन्मांत माझी मैत्रीण होती. मला पाहून तिला त्याची आठवण झाली असेल ह्मणून रडूं लागली आहे. आणि ती माझी सखी तशा नीच योनींत जन्माला आली, हें पाहून दयेनें मलाही फार दुःख झालें म्हणून मींही रडूं लागलें." हें ऐकून देवस्मितेला मोठें आश्चर्य वाटलें. आणि तिनें खालीं जाऊन कुत्रीला पाहिलें. तों खरोखरच तिच्या डोळ्यांतून पाण्याच्या धारा वाहत होत्या. तेव्हां हा काय चमत्कार आहे? याचें तिला मोठें गूढ पडलें. इतक्यांत तिची तशी मुद्रा पाहून प्रव्राजिका ह्मणाली, "मुली, यांत कांहीं मोठेंसें गूढ नाहीं. पूर्वजन्मांत ही कुत्री आणि मी दोघीही एका मोठ्या विद्वान् ब्राह्मणाच्या बायका होतों. आमचा पती राजाजवळ वकील होता. नेहमी राजा त्याला दूर दूरच्या दरबारांत कामाकरितां पाठवीत होता. यामुळें त्याचें घरीं फारसें राहणें होत नसे. नवऱ्याची अशी स्थिती असल्यामुळें आह्मां दोघींलाही पतिवियोगांत वर्षांचीं वर्षें कंठावीं लागत असत! पती देशांतराला गेला ह्मणजे मी आपल्या इच्छेप्रमाणें वर्तन करून खुशाल मौज मारीत होतें. उप-

भोगावांचून मीं आपल्या इंद्रियांला कधींही तळमळूं दिलीं नाहींत! आणि खरें विचारशील तर हाच मुख्य धर्म आहे! कारण, जसा इतर प्राणिमात्राला दुःख देणें हा अधर्म होतो, तसाच विषयोपभोगावांचून आपल्या इंद्रियांला सुकत ठेवणें हाही अधर्मच आहे. आपलीं इंद्रियें आणि इतर प्राणिमात्र यांचा संतोष करणें हाच सर्वांला मान्य असा मुख्य धर्म आहे. आणि मी त्या धर्मानें वागलें ह्मणूनच मला पूर्वजन्मांतलें यच्चयावत् स्मरण आहे. ह्या कुत्रीनें वर सांगितलेल्या उत्तम धर्माचा स्वीकार न करतां अज्ञानानें केवळ आपलें शील मात्र रक्षण केलें, ह्मणूनच हिला सांप्रत श्वानाचें जन्म प्राप्त झालें! तथापि कांहीं पूर्वार्जित पुण्याच्या योगानें हिला पूर्वजन्मींचें स्मरण आहे." हें तिचें दुष्ट भाषण ऐकून देवस्मितेला तिचा मनांत फार राग आला व तापसीबाईचा आपल्याकडे येण्याचा मुख्य हेतू काय आहे तेंही तिला समजलें. देवस्मिता सुशील, धर्मावर पूर्ण विश्वास ठेवणारी व दयाळू होती, तरी मोठी चतुर व कावेबाज होती. तापसीच्या त्या कपटी भाषणाचा अर्थ समजून तिची पुर्ती फजीती करावी ह्मणून बाह्यात्कारें तिच्या म्हणण्याला अनुमोदन दिल्यासारखें करून देवस्मिता म्हणाली, "तापसीबाई, आज हा तुह्मी मजवर मोठाच उपकार केलात. खरोखर असा उत्तम धर्म असून तो, हा वेळपर्यंत मला मुळींच माहीत नव्हता, ह्मणूनच मीं विनाकारण दुःख भोगलें! आमच्या घरांतही प्रवासाला जाऊन किती दिवस झाले, हें तुह्माला माहीतच आहे. अजून तरी कधीं येणें होणार याचा कांहीं नेम नाहीं. इतके दिवस अज्ञानानें मी आपल्या इंद्रियांला विनाकारण सुकत ठेवलें. पण झालें त्याला रडून कांहीं उपाय नाहीं. आतां मात्र तुह्मीं कृपा करून कोणत्या तरी एका चांगल्या पुरुषाशीं माझी गांठ घालून द्या. एरव्हीं मी अशीच राहिलें असतें, पण पुढें कदाचित् कुत्रीच्या जन्माला जावें लागेल, याचें मला फार भय पडलें आहे. ह्मणून मी तुह्मी सांगितलेल्या धर्माचें यथेच्छ आचरण करणार." हें तिचें भाषण ऐकून त्या दुष्ट प्रव्राजिकेला

आपली मसलत सिद्ध झाली, असें वाटून फार आनंद झाला. ती म्हणाली, " शाबास. याचें नांव शहाणपण. कोणी कांहीं चांगली गोष्ट सांगितली आणि ती घेतली तर बरें वाटतें. नाहीं तर एखाद्या मूर्खा-पुढें कंठशोष केला तरी काय उपयोग? तुझ्या मनांत त्या धर्माचें आचरण करावयाचें असेल, तर पुरुषांला काय कमी गेलें आहे. जर तुला येथील लोकांची भीती असेल, तर सर्व काम अगदीं गुपचुप करावें ह्मणजे झालें. तुला पाहिजे असेल तर या गांवांतील देखील पुरुष नको. द्वीपांतराहून माझ्या धरीं चार तरुण वैश्यपुत्र आले आहेत. हवा तर त्यांच्याशीं तुझा परिचय करून देईन. आणि ते तुझ्यावर फार आसक्तही आहेत! " हें तिचें भाषण ऐकून देवस्मितेनें—"फार चांगलें. कृपाकरून आपण एवढें काम करा." असें म्हटल्यावर प्रव्राजिका संतुष्ट होऊन आपल्या विहाराकडे गेली. इकडे देवस्मिता आपल्या विश्वासुक दासीसह बराचवेळ विचार करित बसली होती. द्वीपांतराहून वैश्यपुत्र आले असून ते ह्या दुष्ट तापसी कुटणीच्या येथें राहिले आहेत; ह्या गोष्टीचा विचार करतां करतां तिला असा बळकट संशय आला कीं,—कदाचित् ते कटाहद्वीपाहूनच आले असतील. दुष्ट प्रव्राजिकेनें माझ्यावरच मुद्दाम रोंख धरिला आहे, तेव्हां कदाचित् माझ्या प्रियपतीशीं पैज मारून ते आले नसतील कशावरून? असेंही तिला वाटलें. कारण कधींही न कोमेजणारें कमल त्याच्याजवळ आहे, त्यावरून कांहीं तरी चर्चा झाल्यावांचून राहणार नाहीं. स्त्रियांच्या पातिव्रत्यावर सामान्यतः सर्व लोकांचा कटाक्ष असतो—इत्यादि गोष्टी मनांत आल्यावरून ते वैश्यपुत्र मुद्दाम आपल्याला भ्रष्ट करण्याकरितांच आले असावेत, असा तिचा पक्का समज झाला. तेव्हां तिनें आपल्या दासीला सांगितलें कीं, " पिण्याच्या मद्यांत धोतरा घालून तें आज तयार करून ठेव. तसाच लोखंडी एक कुत्र्याचा पाय तयार करावा. आणि आज रात्रीं अथवा उद्यां जेव्हां मीं सांगेन तेव्हां तें मद्य, येणाऱ्या

मनुष्याला पाजून कुत्र्याचा लोखंडी पाय तापवून त्याच्या डोक्यावर डाग द्यावा." याप्रमाणें व्यवस्था करावयास सांगून ती आपल्या कामास गेली. इकडे दासींनीं देवस्मितेनें सांगितल्याप्रमाणें सर्व तयारी करून ठेवली.

प्रव्राजिका देवस्मितेचा निरोप घेऊन आपल्या मठांत जाऊन पोंहचते तों ते चौघेही वैश्यपुत्र दरवजांत तिची वाट पाहातच बसले होते. ती दरवाजांत पोंहचतांच त्यांना ह्मणाली, " बाबानो, चला आज तुमचें काम झालें. जरी तुमच्याकरितां फारच श्रम करावे लागले; तरी शेवटीं सफल झाल्यामुळें मला मोठा आनंद झाला. त्या तुमच्या आवडतीनें कबूल केलें आहे. आजरात्रीं माझ्याबरोबर शिष्यिणीचा वेष घेऊन तुमच्यापैकीं एक असामी कोणी तरी या. म्हणजे सर्व काम होईल." हें तिचें भाषण ऐकून वैश्यपुत्रांला फारच आनंद झाला. पण चौघांतून प्रथम कोणी जावें यासंबंधानें त्यांच्यांत कलह उपस्थित झाला. जो तो म्हणें मी प्रथम जाणार. शेवटीं त्यांनीं आपसांत तोड काढली कीं, तापसीबाई ज्याला बोलावील त्यानें जावें. रात्र पडतांच प्रव्राजिकेनें चौघांतून एकाला बोलवून त्याला आपल्या शिष्यिणीचा वेष दिला. आणि त्याला बरोबर घेऊन देवस्मितेच्या घरीं गेली. तो आंत पोंहचला तेव्हां कोणाला नकळत प्रव्राजिका बाहेर निघून गेली. इकडे देवस्मितेनें सांगितल्याप्रमाणें एका दासीनें आपणच देवस्मिता असें सांगून त्याला एकांतांत नेलें. वैश्यपुत्राला देवस्मितेची मुळींच ओळख नव्हती, ह्मणून त्याला कांहीं संशय आला नाहीं. त्या प्रसंगाला अनुसरून बऱ्याच इकडच्या तिकडच्या गोष्टी करून दासीनें, धोतरा घातलेलें मद्य त्याला यथेच्छ पाजलें. आणि कांहीं वेळानें तो बेसावध झाला आहे, असें पाहून तापलेल्या कुत्र्याच्या पायाचा डोक्यावर डाग देऊन त्याला एका घाणेरड्या गटारांत नेऊन टाकला. तेथें बराच वेळ हे चैनी गृहस्थ हवा खात पडले होते, ते पहाटेच्या सुमारास शुद्धीवर येऊन आपल्याला पाहूं लागले. तेव्हां—आपल्या पापानें

प्राप्त होणारा अविची नांवाच्या नरकाचा अनुभव ह्या गटाराच्या रूपानें या जन्मांतच आपणास प्राप्त झाला आहे कीं काय,—असें त्याला वाटलें. नंतर गटारांतून निघून हळुहळू जवळच्या एका तलावांत जाऊन त्याणें स्नान केलें. तेव्हां त्याला बरिच हुषारी वाटली. अंगावरचा बाकी सगळा मळ गेला, पण डोक्याचा डाग गेला नाहीं. मग तसाच नागव्यानें लाजत लाजत तो प्रव्राजिकेच्या मठांत येऊन पोंहचला. झालेला खरा प्रकार सांगितला तर बाकिचे तिघे उलट आपलीच थट्टा करतील, म्हणून त्याणें त्यांतलें कांहींच वर्तमान सांगितलें नाहीं. आणि देवस्मितेची व तिनें केलेल्या सत्काराची फारच तारीफ करून अपरात्रीं आपण एकटाच येत होतों, तेव्हां वाटेंत भामट्यानें माझे सर्व कपडे वगैरे काढून घेतले—असें त्याणें सांगितलें. तेव्हां बाकीच्या तिघांला देवस्मितेकडे जाण्याची फारच चटपट लागली. डोक्यावरचा डाग न दिसावा म्हणून,—आपण रात्रीं फार जागरण केलें, मद्यही पुष्कळ प्यालों यामुळें माझें डोकें अतिशय दुखत आहे—असें सांगून, या पहिल्या गृहस्थानें वस्त्रानें डोकें बांधून आपल्या पापाची खूण आपल्या मित्रांस दिसूं दिली नाहीं !

सायंकाल होतांच गेल्या रात्रीप्रमाणें दुसऱ्या वैश्यपुत्राला वेष देऊन प्रव्राजिकेनें देवस्मितेच्या घरीं नेऊन पोंहचविला. त्याचाही पहिल्या दिवशींच्या प्रमाणेंच सर्व सत्कार झाला. परंतु त्याणेंही बाकीच्या दोघांला व तापसीलाही खरें वर्तमान सांगितलें नाहीं. म्हणून अनुक्रमानें चौघांलाही तो लाभ झाला. तेव्हां ते समदुःखसुखी होऊन एकमेकां-जवळ आपआपल्या अनुभवाच्या गोष्टी बोलूं लागले. तरी प्रव्राजिकेला त्यांतील कांहींच त्यांणीं समजूं दिलें नाहीं. आणि मुकाट्यानें तिचा निरोप घेऊन ते चौघेही तेथून निघून गेले. त्यांच्या मनांत—ह्या थेरडीनें कदाचित् मुद्दाम आपली फजीती करविली असेल, तिचा सूड उगावा किंवा तिच्या

१.—यमलोकांत अनेक नरक आहेत. त्यांत परस्त्रीचा अभिलाष करणारास जो नरक प्राप्त होतो त्याचें नांव 'अवीची,' असें आहे.

मूर्खपणानें जर आपल्याला असें दुःख भोगावें लागलें असेल तर तिलाही त्यांतला कांहीं अनुभव यावा, असें होतें. नंतर पांचव्या दिवशीं, आपण देवस्मितेचा हेतू पूर्ण केला याबद्दल तिच्याकडून आपली पूजा होईल, असें समजून मोठ्या खुषीनें शिष्यिणीला बरोबर घेऊन प्रव्राजिका देवस्मितेच्या घरीं कांहीं कामाचें निमित्त करून गेली. आतां ही कशाकरितां आली?—हें देवस्मितेच्या लक्षांत आलेंच होतें. जसें त्या चौघांला त्यांच्या दुष्ट हेतूचें फल भोगण्यास लाविलें, तसें हिलाही हिच्या वाईट बुद्धीचें फळ द्यावें, असें देवस्मितेच्या मनांत होतें. ह्मणून ती आपल्या मनांतील भाव कांहीं एक न दाखवितां तिचा मोठा सत्कार करून प्रेमानें ह्मणाली, "बाई, आपण मजवर मोठे उपकार केले. त्यादिवशीं आपण जो परम गुह्य धर्म सांगितला, तो जर मला कळला नसता, तर गेल्या चार दिवसांत जो मला सुखाचा लाभ झाला, तो कधींही झाला नसता. तुमचे उपकार माझ्या हातून कशानें फिटणार! व अशी तुमची माझ्या हातून सेवा तरी काय घडणार आहे. तुह्माला मुळीं कसली गरजच नाहीं. केवळ आमच्या सारख्या संसारी मनुष्यांचें कल्याण करण्याकरितांच तुह्मीं असें खडतर तप करून देह झिजवीत आहां." इत्यादि प्रकारचें भाषण करून तिणें तिला फार संतुष्ट केली. आणि धोत्रा घालून तयार केलेलें मद्य तिला व तिच्या शिष्यिणीलाही यथेच्छ पाजलें. तेव्हां थोडक्याच वेळांत दोघीही कैफानें अस्वस्थ झाल्या आहेत, असें पाहून त्यांच्या कानाचे व नाकाचे शेंडे देवस्मितेनें कापून घेतले. आणि त्या चौघां वैश्यपुत्रांला ज्या गटारांत टाकलें होतें, तेथेंच या दोघींलाही नेऊन पोंहचविलें!

याप्रमाणें त्या महापतिव्रता देवस्मितेनें आपल्याला भ्रष्ट करण्याकरितां आलेल्या चौघां वैश्यपुत्रांची व त्यांला साह्य करणाऱ्या दुष्ट प्रव्राजिकेची व्यवस्था लावली, तरी दुसरी एक तिला मोठी काळजी उत्पन्न झाली होती. ती अशी कीं,—हे चौघेही वैश्यपुत्र परत स्वदेशाला गेले असतील, असें

प्रव्राजिकेनें तिला सांगितलें होतें. आणि ते आपल्या पतीशीं पैज बांधून आले असून त्यांची आपण यथास्थित फजीती केली. तेव्हां ते आपला सूड घेण्याकरितां द्वेषानें कदाचित् पतीचा घातही करण्याला मागें पुढें पाहणार नाहींत! कामी पुरुष एखाद्या स्त्रीवर डोळा ठेवूं लागले, आणि त्यांचा हेतू पूर्ण झाला तर बरें; नाहींपेक्षां ते तिचा कोणत्या रीतीनें सूड उगवतील याचा कांहीं नेम नाहीं. दुसऱ्या कोणीही पाहिजे तसा अपमान केला तरी तो कदाचित् त्यांना सहन होतो. पण ज्यांच्यावर त्यांची आसक्ती बसली असेल, त्या स्त्रियांनीं अपमान केला तर पुरुषाला कधींही सहन होत नाहीं—हे विचार तिच्या मनांत घोळूं लागल्यामुळें ती फारच घाबरी झाली. तिणें हा सर्व वृत्तांत आपल्या सासूला कळविला. तेव्हां सुनेची पातिव्रत्याविषयीं निष्ठा व चातुर्य वगैरे पाहून सास्वेला फार आनंद झाला. ती ह्मणाली, "मुलि, तूं फार चांगलें केलेंस. आजन्मपर्यंत असाच तुझा दृढ निश्चय राहो. तूं त्या दुष्टांची युक्तीनें फजीती केलीस. याचा मनापासून मला फार संतोष झाला; पण झालेल्या कृत्यापासून कदाचित् माझ्या पुत्राचें अहित होईल, याचें मला फारच भय वाटतें." हें ऐकून देवस्मिता ह्मणाली, "सासुबाई, माझ्याही मनांत हीच गोष्ट आली आहे; पण त्याची आपण कांहीं काळजी करूं नका. पूर्वी शक्तिमतीनें जसें आपल्या पतीचें रक्षण केलें, तसें मीही बुद्धीच्या प्रभावानें आपल्या पतीचें रक्षण करीन." हें ऐकून सासू ह्मणाली, "मुली, शक्तिमती ती कोण? व तिनें आपल्या पतीचें रक्षण कसें केलें? तें मला सांग."

हा सास्वेचा प्रश्न ऐकून देवस्मिता ह्मणाली, "माझ्या माहेरच्या देशांत मणिभद्र नांवाचा एक मोठा यक्ष सर्वत्र प्रसिद्ध आहे. तो लोकांच्या नवसास पावतो अशी प्रख्याती आहे. ह्मणून बहुत लोक त्याला आपआपल्या इच्छेप्रमाणें अनेक नवस करितात. परस्परांवर आसक्त झालेले स्त्रीपुरुष त्या यक्षाला नेहमीं अनेकप्रकारचे नवस करीत, व तशा प्रकारचीं अनेक जोडपीं त्या यक्षाजवळ नेहमीं येत असत. हा

अनाचार तेथील राजाच्या कानांवर गेला तेव्हां त्याणें तेथें असा एक नियम केला होता कीं, रात्रीच्या वेळीं कोणीही पुरुष—मग ती त्याची बायको असो; अथवा परक्याची असो,—स्त्रीला बरोबर घेऊन गेला तर तेथील पुजाऱ्यांनीं त्याला देवळाच्या गाभाऱ्यांत कोंडून ठेवून सकाळीं त्या दोघांलाही राजसभेंत नेऊन हजर करावीं. तेथें त्यांचा कांहीं गुप्त संबंध असेल तो उघड करून तीं अपराधी असल्यास त्यांला योग्य शिक्षाही होत असत. तशा ठिकाणीं रात्रीच्या वेळीं बहुतकरून यक्षाला कांहीं नवस अथवा पूजा करण्याच्या निमित्तानें आपुकमापुकांच्याच जोड्या जात असत! कारण, जो मनुष्य स्वतःच्या स्त्रीला घेऊन जाणार त्याला दिवसा जाण्याला काय हरकत आहे? तेथें एकदां अशी गोष्ट झाली कीं, **समुद्रदत्त** नांवाचा एक मोठा संभावीत व्यापारी तेथें राहात होता. त्याची दुसऱ्या एका स्त्रीवर प्रीती जडली होती. त्या उभयतांनीं—जोड्यानें यक्षाची पूजा करण्याचा नवस केला होता. त्याप्रमाणें एकेदिवशीं रात्रीं त्या स्त्रीला बरोबर घेऊन **समुद्रदत्त** यक्षाच्या मंदिराकडे चालला होता, त्याला शहरच्या कोतवालानें पाहिला. आणि तो देवळांत पोंहचल्यावर त्याला रात्रभर तेथें तसाच कोंडून ठेविला. इकडे त्याची स्त्री **शक्तिमती** ही मोठी पतिव्रता होती. तिला हें वर्तमान समजलें, तेव्हां आपल्या नवऱ्याची फजीती न व्हावी म्हणून तिनें दुसऱ्या स्त्रीचा वेष घेतला, आणि सर्व साहित्य आपल्या दासीच्या हातीं देऊन पुजेच्या निमित्तानें ती दासीला बरोबर घेऊन यक्षाच्या देवळांत गेली. यावेळीं गाभाऱ्याचीं कवाडें बंद केलीं होतीं. तरी पुजाऱ्याला पुष्कळ दक्षिणा मिळण्याची आशा दाखविल्यावरून त्यानें हळूंच दार उघडलें. आंत जाऊन पाहाते तों आपला पती दुसऱ्याच्या बायकोला घेऊन लाज्जित होत्साता तेथें बसला होता तो तिच्या दृष्टीस पडला. **शक्तिमतीनें** दुसऱ्या स्त्रीचा वेष घेतला होता, तरी **समुद्रदत्तानें** तिला ओळखलें, तेव्हां तर तो फारच खजील झाला. पुजाऱ्यानें **शक्तिमतीला** आंत सोडून—पूजा

झाल्यावर पुनः दार उघडीन—असें सांगून दार लावून घेतलें होतें. ही संधी पाहून **शक्तिमतीनें** **समुद्रदत्ता**बरोबर आलेल्या स्त्रीला आपला वेष दिला. आणि आपल्या दासीलाहीं तिच्या बरोबर जाण्यास सांगून, तिणें पूजा समाप्त झाल्याचा इषारा केला. तेव्हां पुजाऱ्यानें दार उघडतांच त्या दोघीहि निर्भयपणें बाहेर निघून गेल्या. **शक्तिमती** तेथेंच राहिली. प्रातःकाल झाल्यावर कोतवाल येऊन तपास करूं लागला; तों **समुद्रदत्त** प्रत्यक्ष आपल्या बायकोलाच बरोबर घेऊन आला आहे, असें सर्वांच्या दृष्टीस पडलें. विनाकारण **समुद्रदत्ता**ला रात्रभर कोंडून ठेविला हें वर्तमान राजाला समजल्यावरून त्यानें कोतवालाला शिक्षा करून **समुद्रदत्त** आणि **शक्तिमती** यांना सत्कारपूर्वक आपल्या घरीं पाठविलें.

याप्रमाणें महासाध्वी **शक्तिमती** हिनें आपल्या चातुर्यानें भर्त्याचें रक्षण केलें. तसेंच मीहि **कटाहद्वीपाला** जाऊन प्रिय पतीचें रक्षण करीन. असें सांगून **देवस्मितेनें** घरची सर्व व्यवस्था सासुबाईच्या हातीं दिली आणि तिचा निरोप घेतला. नंतर व्यापाऱ्याचा वेष घेऊन दोघी दासींसह-वर्तमान जाहाजांत बसून ती **कटाहद्वीपाला** गेली. तेथें भाड्यानें एक जागा घेऊन आपल्या बिऱ्हाडाची वगैरे व्यवस्था लावली आणि व्यापाऱ्यांच्या अड्ड्यांत गेली. तेथें शेंकडों व्यापारी अनेक प्रकारची देवघेव करीत होते. **देवस्मितेचा** पती **गुहसेन** हाहीं त्यांतच बसला होता. **देवस्मितेनें** पुरुषाचा वेष इतका हुबेहुब केला होता कीं, लक्षपूर्वक पाहाणाराला देखील त्याविषयीं कांहीं संशय आला नाहीं. **देवस्मितेला** पाहून—देशांतराहून हा कोणी नवीन सावकार आला आहे—अशी तेथें जमलेल्या व्यापारी लोकांत चर्चा झाली. तेव्हां **गुहसेन**ही **देवस्मितेकडे** पाहूं लागला. त्याला तिचा चेहरा फार मोहक व आपल्या परिचयाचा असावा असें वाटलें. म्हणून तो मनांत म्हणाला, 'माझ्या प्रियेसारखा हा कोण गृहस्थ आहे ?' **देवस्मितेलाही**, आपल्या पतीला पाहून फार आनंद झाला. ती कांहींवेळ तेथें घालवून राजवाड्यांत गेली. तेथें राजाला मोठा नजराणा देऊन व थोडक्यांत

आपली हकीकत सांगून—"शहरांतील सर्व लोकांस एकत्र जमवाल तर मला कांहीं विनंती करावयाची आहे. व ती सर्व लोकांदेखतच मी करीन."—अशी तिनें राजाची प्रार्थना करून विनंती केली. तेव्हां तिचें ह्मणणें मान्य करून राजानें दुसऱ्या दिवशीं शहरांतील सर्व लोकांस राजवाड्यांत जमविलें. आणि "तुझी विनंती काय आहे ती सांग," ह्मणून राजानें हुकूम केला. तेव्हां देवस्मिता म्हणाली, "महाराज, माझ्या घरचे चार गुलाम येथें पळून आले आहेत, ते माझे मला परत मिळावे, इतकीच माझी सरकाराजवळ विनंती आहे." हें ऐकून राजा म्हणाला, "माझ्या नगरांत जितके म्हणून पुरुष आहेत, ते सर्वही आज येथें हजर झाले आहेत. तुझे गुलाम येथें आले असले तर ते यांतच असले पाहिजेत. त्यांना तूं पाहिजे तर ओळखून घे." देवस्मितेनें ज्यांच्या डोक्यांवर डाग दिले होते, ते चौघेही वैश्यपुत्र यावेळीं त्याच समाजांत होते. आणि देवस्मिता तेथें आल्यापासून लक्षपूर्वक सर्वांकडे पहात होती. तिनें त्यांला यापूर्वींच न्याहाळून ठेविलें होतें. राजाचा हुकूम होतांच तिणें पुढें होऊन त्या चौघांनाही दाखवून दिलें. आणि "हेच माझे गुलाम" म्हणून राजाला सांगितलें. तेव्हां तेथें जमलेले इतर लोक तक्रार करूं लागले. ते म्हणाले, "महाराज, हे अमुक अमुक सावकाराचे मुलगे आहेत. आह्मी यांला पुरतेपणीं ओळखतों. हे ह्या परदेशी मनुष्याचे गुलाम कसे होतील ?" हें ऐकून राजा देवस्मितेला ह्मणाला, "जर खरोखरच हे तुझे गुलाम असतील, तर त्याबद्दल तूं विशेषप्रकारची खात्री केली पाहिजे, नाहीं तर केवळ तुझ्या एकट्याच्याच सांगण्यावर भरंवसा ठेवतां येत नाहीं." देवस्मिता ह्मणाली, "मी अगदीं खरें सांगत आहें; पण माझ्या सांगण्यावर जर लोकांचा विश्वास नसेल तर माझ्या विशेष खुणेवरून तरी त्यांनीं आपल्या मनाची खात्री करून घ्यावी. माझ्या गुलामांला पाहिजे तेव्हां ओळखतां यावें ह्मणून मी त्यांच्या डोक्यावर कुत्र्याच्या पावलाच्या आकाराचा डाग देऊन ठेविला आहे. जर ह्या चौघांच्याही डोक्यांवर तो डाग असेल, तर हे

माझे गुलाम खरे; नाहीं तर खोटे." ही गोष्ट राजाला व इतर सर्व लोकांना मान्य झाली. आणि त्या चवघांच्याही डोक्याचीं पागोटीं काढून पाहतात तों देवस्मितेनें सांगितल्याप्रमाणें कुत्र्याच्या पावलाच्या आकाराचे डाग त्यांच्या डोक्यावर दिसले! तेव्हां सर्वही वाणी फार लज्जित झाले. राजाला त्या गोष्टीचें फारच आश्चर्य वाटल्यावरून त्यानें देवस्मितेला प्रश्न केला, तेव्हां तिनें मुळापासून झालेली सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून सर्व लोक खदखदां हसूं लागले. राजा ह्मणाला, "बाई, खरोखरच हे तुझे गुलाम आहेत. आतां तूं त्यांची पाहिजे तशी व्यवस्था कर. माझ्याकडून कांहीं हरकत नाहीं." असें सांगून त्यानें त्या चौघांलाही देवस्मितेच्या आज्ञेंत राहाण्याचा हुकूम केला. तेव्हां इतर वाणीमंडळींत मोठी गडबड उडाली. त्या चौघांचीही मुक्तता होण्याविषयीं त्यांणीं राजाची पुष्कळप्रकारें प्रार्थना केली; पण "आतां माझ्या हातीं कांहीं नाहीं. देवस्मिता त्यांची मालक आहे. ती सोडील तर माझ्याकडून हरकत नाहीं." असें राजानें सांगितलें. तेव्हां त्यांणीं देवस्मितेला त्यांच्या मुक्ततेकरितां पुष्कळ द्रव्य दिलें व राजानें केलेला दंडही भरला आणि मोठ्या प्रयत्नानें गुलामगिरींतून त्या चौघांनां सोडविलें. राजानें व इतर सर्व लोकांनीं देवस्मितेचा मोठा सत्कार केला. याप्रमाणें देवस्मितेनें आपलें पातिव्रत्य उत्तम प्रकारें रक्षण करून दुष्टांची फजिती केली. आणि पतीचें संरक्षण करून पुष्कळ द्रव्य व अमोलिक यश संपादन केलें. नंतर देवस्मिता आपला प्रियपती गुहसेन यासहवर्तमान पुनः ताम्रलिप्ती नगरीला जाऊन तेथें बहुत दिवस सुखाचा उपभोग घेत राहिली. व पुनः त्या उभयतांचा आजन्म कधींही वियोग झाला नाहीं."

अशी कथा सांगून वसंतक वासवदत्तेला ह्मणाला, "राणीसाहेब, मोठ्या कुलांत उत्पन्न झालेल्या पतिव्रता स्त्रिया शुद्ध असून, विलक्षण धैर्याचीं अशीं अनेक कृत्यें करून एकनिष्ठपणानें नेहमीं आपल्या

पतीची उपासना करितात. साध्वी स्त्रियांला पतीवांचून दुसरें कोणतेंही दैवत नाहीं." याप्रमाणें **वसंतकाच्या** तोंडांतून वर सांगितलेली अत्यंत उदार कथा ऐकून **वासवदत्तेचें** मन—तिणें प्रथमच माहेर सोडलें होतें तरी सर्वस्वीं तिकडचा ओढा सोडून—आपला प्रियपती **वत्सराज** याच्यावर, पूर्वीच दृढ प्रेमानें बांधलेलें होतें, तरी पुनः एकनिष्ठभक्तीचें दुसरें एक बंधन त्याच्यावरून कसलें गेलें.

यावेळीं **वत्सराज** विंध्यपर्वतांतच होता. पुढें जाण्याची तयारी चालली होती, इतक्यांत **उज्जयिनीच्या** वाण्यानें सांगितल्याप्रमाणें **चंडमहासेनाचा** द्वारपाल **सत्यवसु वत्सराजाजवळ** येऊन पोंहचला. **यौगंधरायणानें** त्याला राजाच्या पुढें आणिला. तेव्हां नमस्कार करून मोठ्या नम्रतेनें तो म्हणाला, "महाराज, आमचे यजमान, महाराज **चंडमहासेन** यांणीं आपल्याला निरोप सांगितला आहे. ते ह्मणाले, आह्मीं दिल्यावांचून आपणच **वासवदत्तेचें** हरण केलें, ही गोष्ट आम्हाला सर्वप्रकारें मान्य आहे. याकरितांच मी आपल्याला **उज्जयिनींत** आणलें होतें. येथें प्रतिबंधांत असतांनांच मी **वासवदत्तेचें** यथाविधी आपणाला दान केलें असतें; पण तशा रितीनें तिची प्राप्ती झाली तरी आमच्यावर आपली प्रीती बसणार नाहीं, अशी शंका आल्यामुळें आह्मी विवाह लाविला नाहीं. आतां आमचें एवढेंच मागणें आहे कीं, त्या माझ्या मुलीशीं आपण अशास्त्र रीतीनें मात्र विवाह करून घेऊं नका. तिचें यथाविधी लग्न लाऊन देण्याकरितां मीं लौकरच **गोपालक** नांवाच्या आपल्या पुत्राला तुम्हाकडे पाठविणार आहें. तो आपल्या कनिष्ठ बहिणीचा यथाशास्त्र विवाह करून देईल. तो येईपर्यंत आपण वाट पहावी. इतकीच आमची विनंती आहे."— याप्रमाणें चोपदारानें **वत्सराजाला** व **वासवदत्तेलाही** निरोप सांगितला. तो ऐकून दोघांलाही फार संतोष झाला. आणि **गोपालक** येईपर्यंत आपण वाट पहावी, एव्हांशींच लग्नाची घाई करूं नये, असा त्यांनीं निश्चय केला. व त्याप्रमाणें उत्तर सांगून चोपदाराची खात्री केली. आणि

वत्सराजानें आपली राजधानी कौशांबीनगरी हिला जाण्याची तयारी केली. जातेवेळीं आपला मित्र पुलिंदक आणि चंडमहासेनाचा चोपदार सत्त्ववसु या दोघांलाही, गोपालक येईपर्यंत तेथें राहून त्याला घेऊन कौशांबीला येण्याविषयीं सांगितलें, आणि वत्सराज सर्व मंडळीसह तेथून निघाला.

यावेळीं वत्सराजाबरोबर फारच मोठें सैन्य होतें. मोठमोठाले हत्ती आपल्या गंडस्थलांतून वाहणाऱ्या मदाच्या झऱ्यांनीं,—वत्सराजाच्या प्रेमपाशानें बद्ध होऊन, जणूं काय विंध्यपर्वताचीं जंगम शिखरेंच त्याच्याबरोबर चाललीं आहेत, असें प्रेक्षकांस वाटत होतें. फौजेंतल्या घोड्यांच्या खुरांचे शब्द ऐकून भाटांनीं राजाचें स्तवन केल्यासारखें वाटत होतें. त्या सैन्याचा धुरळा पर्वताच्या शिखरांवरून आकाशापर्यंत जाऊन पोंहचला होता. त्यामुळें पंखधारण करणारे पर्वत पुनः उत्पन्न झाले कीं काय, अशी इंद्राला शंका उत्पन्न झाली.

अशा मोठ्या सैन्यासहवर्तमान वासवदत्तेला बरोबर घेऊन वत्सराजानें सकाळींच प्रयाण केलें होतें, तो तिसरे दिवशीं कौशांबीनगरीच्या आलीकडे—आपला मुख्य सेनापती रुमण्वान् याच्या स्वतःच्या जहागिरीच्या गांवांत येऊन पोहोंचला. ती रात्र रुमण्वानाच्या घरांत मोठ्या आनंदानें घालवून दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं कौशांबीराजधानींत प्रविष्ट झाला. वत्सराज, स्वतः राज्यसंबंधी कामकाज वगैरे फारसें पहात नव्हता. तरी त्याचे प्रधान यथान्याय वर्तन करीत होते, यामुळें प्रजा फार सुखी होती. आणि त्याच्या अत्यंत दयाळू स्वभावाला व अनुपम गुणांला लुब्ध होऊन प्रजा त्याच्यावर फारच प्रीती करीत होत्या. त्यांना,

---

१.—पूर्वीं पर्वतांस पंख होते अशी पौराणिकांची समजूत आहे. असें सांगतात कीं, ते पर्वत हवे तिकडे उडून जात असत व केव्हां केव्हां त्यांच्या बसण्यानें देशाचे देश उध्वस्त होत असत, म्हणून इंद्रानें त्यांचे पंख तोडले. तेव्हांपासून पर्वत स्थिर झाले! म्हणूनच इंद्राला 'पर्वतपक्षशातन'—पर्वतांचे पंख तोडणारा, असें म्हणतात.

बहुत दिवसांनीं आपला राजा स्त्रीसहवर्तमान परत येत आहे, हें वर्तमान ऐकून अतिशय आनंद झाला होता. वाटेंत ठिकठिकाणीं त्या दैवशाली राजाला पाहण्याकरितां लोकांच्या झुंडीच्या झुंडी येत होत्या. कौशांबीनगरींत घरोघर आनंदप्रदर्शन चालू झालें होतें. कोणी आग्रह केल्यावांचून व राजाधिकाऱ्यांच्या सक्तीवांचून लोकांनीं आपण होऊनच उत्सव केला ! जिकडे तिकडे ध्वज, पताका, तोरणें इत्यादिकांनीं नगर सुशोभित केलें होतें. रस्त्यावर चंदनाचे सडे घालून ते रांगोळ्यांनीं भूषित केले होते. सर्व स्त्रीपुरुष उत्तम उत्तम वस्त्रालंकारादिक धारण करून राजदर्शनाला तयार झाले होते. तरुण मुली हातांत आरत्या, फुलें, लाह्या वगैरे द्रव्यें घेऊन वत्सराज येण्याच्या मार्गावर दोहोंबाजूंनीं सारख्या उभ्या राहिल्या होत्या. तसेंच राजरस्ताच्या दुतर्फा आपआपल्या घराच्या गच्चीवर बसलेल्या सुंदर स्त्रियांच्या मुखांनीं आकाशाला विलक्षण शोभा आली होती. स्वर्गांतून वाहणाऱ्या गंगेच्या दोहों किनाऱ्यांला प्रफुल्लित झालेलीं हीं कमलेंच आहेत कीं काय? असें प्रेक्षकांला वाटत होतें. बहुत दिवस प्रवासाला गेलेला पती परत आला ह्मणजे त्यादिवशीं जशी त्याची प्रेमळ स्त्री न्हाणमाखण व डागडागिने इत्यादिकांनीं सुशोभित होते, तशी कौशांबीनगरी आपल्या पतीच्या आगमनाच्या दिवशीं नटूनथटून तयार झाली होती. सर्व लोक उत्कंठित होऊन वत्सराजाच्या मार्गाकडे डोळे लावून बसले होते. इतक्यांत चंद्राप्रमाणें आनंद देणारा हा राजचंद्र त्यांच्या दृष्टीस पडला. वियोगरूप उन्हाळ्यानें संतप्त झालेल्या लोकांनीं विद्युल्लतेसह येणाऱ्या मेघाप्रमाणें वासवदत्तेसह आलेल्या वत्सराजाला पाहिला; तेव्हां,—इतके दिवस जी त्यांची आशा होती ती पूर्ण झाली. शहरांतील प्रमुख प्रमुख लोक सामोरे जाऊन त्यांनीं मोठ्या समारंभानें वत्सराजाला शहरांतून मिरवीत मिरवीत राजवाड्यांत पोंहचविला. राजा गेल्यापासून राजवाडा अगदीं शून्य दिसत होता. तो आज, घरांत निजलेलीं मनुष्यें जागीं झाल्यानें जसें घर भरलेलें

दिसतें, तद्वत् स्त्रीपुरुषांनीं गजबजलेला दिसूं लागला. हा समारंभ साजरा करण्याकरितां आसपासचे पुष्कळ मांडलिक राजे व सरदार वगैरे आले होते. **वत्सराज** राजवाड्यांत पोंहचल्यावर तेथें मोठा दरबार झाला. यांत नजर नजराणे होऊन सूत, मागध, बंदी राजाचें यश गाऊं लागले. याप्रमाणें **वत्सराजाच्या** आगमनाचा समारंभ मोठ्या थाटामाटानें झाला. तो अद्याप पुरा झाला नाहीं तोंच लग्नाचीही तयारी सुरू झाली.

चार दोन दिवसांच्या अंतरानें **वासवदत्तेचा** बंधू **गोपालक**, वाटेंत ठेवलेला **पुलिंदक** आणि चोपदार **सत्यवसू** यांना बरोबर घेऊन **कौशांबीला** आला. राजानें त्याला सामोरा जाऊन सत्कारपूर्वक आपल्या वाड्यांत नेला. **यौगंधरायणादिक** इतर सर्व मंडळीच्या भेटी व मानपान वगैरे झाल्यानंतर **गोपालक** आपल्या बहिणीच्या भेटीला गेला. त्याला पाहून—ज्याला नकळत आपण निघून आलें त्याला कसें पाहावें ह्मणून तिला संकोच उत्पन्न होईल; तो न व्हावा ह्मणूनच कीं काय, दोघांच्या मध्यें—**वासवदत्तेच्या** डोळ्यांतून प्रेमाश्रूंच्या धारा वाहूं लागल्या. **गोपालकानें** बहिणीचें समाधान करून आई, बाप व वडील बंधू यांच्या प्रसन्नतेचे निरोप सांगून तिचें मन संतुष्ट केलें. तेव्हां माहेरची मंडळी आपल्यावर प्रसन्न आहे, अशी खात्री झाल्यावरून **वासवदत्तेनें** आपल्याला कृतार्थ मानिलें. दुसऱ्याच दिवशीं लग्नाचा निश्चय ठरला होता, व त्याप्रमाणें बाकीची सर्व तयारी कडेकोट झाली होती. लग्नाच्या दिवशीं प्रातःकालीं **वत्सराज** आणि **वासवदत्ता** यांला मंगल स्नान वगैरे घालून अलंकृत करून त्या उभयतांला प्रमुख मंडळीनें लग्नमंडपांत आणिलीं. तेथें ब्राह्मणांनीं सांगितलेल्या विधीप्रमाणें **गोपालकानें वासवदत्ता वत्सराजाला** अर्पण केली. तेव्हां **वत्सराजानें** कामाची स्त्री जी रति तीच कोणी एक सुकुमार वेल, तिला नवीन फुटलेल्या पल्लवाप्रमाणें सुंदर—असा **वासवदत्तेचा** हस्त आपल्या हातानें ग्रहण केला. यावेळीं **वासवदत्तेच्या** अंगांत सात्विक भावाचा पूर्ण उदय झाला होता. प्रियाच्या हाताच्या स्पर्शापासून उत्पन्न झालेल्या आनंदानें तिचे डोळे मि-

टले. अंगांत कंप सुटून ती घामानें डवडवली. सर्वांगावर रोमांच उभे राहिले. मदनानें–सम्मोहन, वायव्य, वारुण इत्यादि आपल्या सर्व अस्त्रांचा यावेळीं एकदम प्रहार केला कीं काय असें तिला वाटलें. विवाहाग्नीला प्रदक्षिणा करतेवेळीं त्याच्या धुरानें लाल झालेल्या तिच्या डोळ्यांनीं, मदिरामदाच्या माधुर्याची झांक दाखविली. गोपालकानें यावेळीं रत्नें, वस्त्र, अलंकार, हत्ती, घोडे, दास, दासी, रथ इत्यादि अनेक वस्तू वधूवरांला आंदण दिल्या. तसेंच मांडलीक व इतर सर्व राजांनीं अमोलिक नजराणे व भेटी सादर केल्या. यावेळीं वत्सराजाचें वैभव अगदीं शिखरास जाऊन पोंहचलें होतें. सर्व लोकांनीं, खरोखर हा राजराज आहे असें ह्मणून त्याची स्तुती केली. याप्रमाणें विवाहविधी यथासांग पुरा झाला; तेव्हां आपल्या दर्शनानें सर्व लोकांच्या नेत्रांला संतुष्ट करून उभयतां वधुवरें अंतःपुरांत प्रवेश करितीं झालीं.

विवाहसमारंभाला आलेल्या सर्व लोकांचा सत्कार करण्याच्या कामावर यौगंधरायण व रुमण्वान् यांची योजना केलेली होती. त्याप्रमाणें त्यांणीं सर्वांची यथायोग्य व्यवस्था ठेविली. यौगंधरायण रुमण्वानाला ह्मणाला, “ मित्रा, आह्मी दोघांनींही राजाची मोठी कठिण कामगिरी पत्करली आहे. आमच्याकडून एवढा देखील प्रमाद होतां कामा नये. अमका श्रीमान् आहे, तर त्याचा सत्कार चांगला ठेविला पाहिजे; आणि अमका गरीब आहे, तर त्याच्याविषयीं काना डोळा केला तरी चालेल —असें मुळींच ह्मणतां येत नाहीं. कोणी कसाही असला तरी जे ह्मणून आपल्या घरीं आले असतील, त्यांचा योग्य सत्कार करून सर्वांलाही संतुष्ट केलें पाहिजे. एखाद्या पोराबाळाचा देखील असत्कार झाला तर आमचा दुर्लौकिक होईल ! ” हें ऐकून रुमण्वान् ह्मणाला, “ तूं ह्मणतोस हें खरें आहे. आह्मी आपल्याकडून तशी व्यवस्था ठेवितच आहों. तरी पण अगदीं पोरांबाळांकडे देखील कोठवर लक्ष पुरवावें ? एवढ्या मोठ्या समारंभांत पोरांबाळांचा समाचार कदचित् नाहीं घेतला ह्मणून त्यापासून

काय होणार आहे ?" यावर **यौगंधरायण** ह्मणाला, "छेः, असें ह्मणूं नको. तुला पोरांची ह्मणजे फारशी पर्वा वाटत नसेल, तर तसें नाहीं रे बाबा. जर त्यांचें समाधान झालें नाहीं तर **बालविनष्टका**प्रमाणें पोरें देखील मोठा अनर्थ करितात !" हें ऐकून **रुमण्वान्** ह्मणाला, "**बालविनष्टक** तो कोण ? आणि त्याणें अनर्थ कसला केला होता ?" **यौगंधरायण** म्हणाला, "याविषयींची मी तुला लहानशी एक गोष्ट सांगतों ती लक्षपूर्वक ऐक."

पूर्वी **पाटलिपुत्र** नगरांत **रुद्रशर्मा** नांवाचा एक ब्राह्मण रहात होता. त्याला दोघी स्त्रिया होत्या. त्यांतून एकीला एक पुत्र झाला आणि तो प्रौढ होण्यापूर्वींच ती स्त्री परलोकाला गेली. तेव्हां अर्थात् तिचा मुलगा सवतीच्या हातांत पडला. तो अगदीं लहान होता, त्यावेळीं त्याला कांहीं समजत नसल्यामुळें सावत्र आईनें पाहिजे तसें वागविलें तरी त्याला त्याचें कांहीं वाटत नव्हतें. पुढें तो जसजसा प्रौढ होत चालला, तसतसा सावत्र आईचा कावा त्याला समजूं लागला. ती आपल्या मुलांना चांगलें असेल तें खाऊं घालून त्या अनाथ मुलाला शिळेंपाकें, असलें कांहीं तरी रूक्ष अन्न खाण्याला देत होती. तो तें मनापासून खात नसे, ह्मणून दिवसेंदिवस कृश व रोगी दिसूं लागला. **रुद्रशर्म्याचें** प्रेम त्याच्यावर कमी होतें असें नाहीं; पण त्याला आंतल्या बारीक गोष्टी माहीत नव्हत्या. त्याच्या हातांपायांच्या काड्या झाल्या असून पोटाचा डेरका मात्र मोठा दिसत होता. अशी त्या मुलाची अवस्था पाहून एकेदिवशीं **रुद्रशर्मा** बायकोला ह्मणाला, "अग दुष्टे, आई नसलेल्या ह्या माझ्या लहान मुलग्याची तूं मुळींच काळजी घेतली नाहींस, ह्मणूनच याची अशी अवस्था झाली. हाय ! हाय ! तूं याचें चांगलें पालन पोषण करशील असें समजून इतके दिवस मी याच्याकडे दुर्लक्ष केलें ही मोठीच चूक झाली. तूं अशी कठोर आई आहेस हें मला माहीत नव्हतें." हें पतीचें भाषण ऐकून ती स्त्री ह्मणाली, "माझें

नशीबच फुटकें. मीं कांहीं केलें तरी यश ह्मणून मुळींच मिळायचें नाहीं. मेलें सावत्रपण हें फारच वाईट आहे. आपलें बदनाम होऊं नये ह्मणून मी माझ्या पोटच्या पोरांपेक्षां देखील त्याची अधीक जतन करतें. पण कांहीं केलें तरी दिवसेंदिवस तो जमिनींतच जात आहे, त्याला मी काय करावें? केवळ सावत्रपणाला धरून आपण माझ्यावर दोष ठेवाल, तर माझा कांहीं उपाय नाहीं!" हें तिचें भाषण ऐकून त्या भोळ्या ब्राह्मणाची अशी समजूत झाली कीं,—या मुलाची प्रकृतीच तशी अशक्त असेल, आणि ह्मगूनच हा असा झाला असावा! वस्तुतः त्या स्त्रीनें सर्व खोटेंच सांगितलें होतें. आवडत्या स्त्रियांचें भाषण फार मधुर असतें. तें कितीही खोटें असलें तरी त्यांच्या मोहकपणावरून ऐकणाराला तें तसें आहे असें वाटत नाहीं. असो.

याप्रमाणें **रुद्रशर्म्या**ची समजूत करून सावत्र आईनें आपला पूर्वीचा क्रम तसाच चालविला होता. तो मुलगा लहानपणींच नाश पावेल असें वाटत होतें, ह्मणूनच घरच्या मनुष्यांनीं त्याला **बालविनष्टक** असें नांव ठेविलें होतें. तो सुमारें पांच वर्षांच्या वयाचा झाला; तेव्हां त्याच्या मनांत असें येऊं लागलें कीं, आपल्या सावत्र आईची कांहीं तरी युक्तीप्रयुक्तीनें खोड मोडली पाहिजे. त्याचें वय अल्प होतें, तरी बुद्धी फार तीव्र होती. त्याणें मनांतल्या मनांत असा संकेत करून एके दिवशीं आपला बाप राजवाड्यांतून घरीं आला, तेव्हां आंगणांत जाऊन त्याला मिठी मारून बोबड्या शब्दांनीं 'बाबा, माझे दोन बाबा आहेत. तूं एकटाच नाहींस' असें त्यानें ह्मटलें. हे त्या मुलाचे शब्द ऐकून **रुद्रशर्म्या**च्या मनांत त्यादिवशीं मुळींच कांहीं शंका आली नाहीं. हें कांहीं तरी पोराचें बडबडणें आहे, असें तो समजला. पण **बालविनष्टका**चा हा क्रम प्रतिदिवशीं चालू झाला. सावत्र आई जवळ नाहीं, असें पाहून हळूच त्यानें पूर्वीं सांगितल्याप्रमाणें बोलत असावें. पांच चार दिवस असा क्रम चालल्यावरून **रुद्रशर्म्या**च्या मनांत, आपली स्त्री व्यभिचारिणी असावी,

व आपल्या पश्चात् इचा कोणी जार येत असेल, त्याला पाहून हा मुलगा असें ह्मणत असेल, असा संशय आला. बायकोवर त्याचा पूर्ण विश्वास व प्रीती होती, तरी हा संशय त्याच्या मनांत आल्या कारणानें त्याला तिचा तिरस्कार येऊं लागला. त्यानें उघडपणें तिला कांहींच विचारिलें नाहीं, तरी त्या दिवसापासून तो तिच्या अंगाला देखील स्पर्श करीनासा झाला. ही गोष्ट तिच्याही लक्षांत आली. ती सवतीच्या मुलाचा द्वेष करीत असे, तरी तिचें वर्तन फार पवित्र होतें. नवरा विनाकारण आपला तिरस्कार कां करतो? व याचें कारण काय? हें तिच्या ध्यानांत आलें नाहीं; तरी या बालविनष्टकानेंच कांहीं कुरापत लावली असेल, असें पुढें तिच्या मनांत आल्यावरून—एके दिवशीं त्या मुलाला मोठ्या प्रेमानें न्हाऊं घालून गोड गोड जेवायला घातलें आणि आपल्या मांडीवर घेऊन त्याचे मुके घेत घेत ती ह्मणाली, "बाळा, खरें सांग. तूं आपल्या बापाला माझ्यावर रागावण्याला लावलेंस याचें कारण काय बरें?" हें तिचें भाषण ऐकून बालविनष्टक हंसत हंसत ह्मणाला, "एवढ्यानें काय झालें? मला आणखीही पुष्कळ करायचें आहे. तूं आपल्या मुलांची मात्र नीट जतन करतेस आणि मला फार क्लेश देतेस ते कां? अजून तूं हा क्रम न सोडलास तर तुझ्याविषयीं मला आणखी काय करावयाचें आहे, तें कधींही केल्याशिवाय राहणार नाहीं." हें त्या मुलाचें भाषण ऐकून ती सावत्र आई फार भ्याली. आणि गळवज्ञां येऊन, आजपासून असें करणार नाहीं, ह्मणून शपथपूर्वक तिनें त्याची खात्री केली. तेव्हां त्या मुलाचें समाधान झाल्यामुळें तो तिला ह्मणाला, "जर तूं हा द्वाड स्वभाव खरोखरच टाकला असशील तर बाबांची समजूत मी अत्तां करतों. आज संध्याकाळीं ते राजवाड्यांतून येतील त्यावेळीं तुझ्या एका दासीला त्यांच्या समोर आरसा दाखविण्याला सांग ह्मणजे झालें. पुढें काय करावयाचें तें मी करीन." याप्रमाणें त्या बालविनष्टकानें आईल सांगितलें. तेव्हां सायंकाळीं रुद्रशर्मा घरीं येण्याच्या वेळीं दासीला त्याच्य

समोर आरसा धरावयास लाविलें. अर्थात् त्यांत त्याचें प्रतिबिंब पडलें, त्याच्याकडे बोट दाखवून बालविनष्टक नित्याप्रमाणें रुद्रशर्म्याला ह्मणाला, "बाबा एक हा ( आरशांतला ) आणि दुसरा तूं असे माझे दोन बाबा आहेत." हें ऐकतांक्षणींच रुद्रशर्म्याच्या मनांतली शंका नाहींशी होऊन हावेळपर्यंत आपण निष्कारण रागावलों होतों असें समजून तो आपल्या स्त्रीवर फारच प्रसन्न झाला."

ही कथा सांगून यौगंधरायण रुमण्वानाला ह्मणाला, "लहान मुलगा असला तरी तो जर अणिबाणीवर आला, तर बालविनष्टकाप्रमाणें अनर्थ करूं शकतो! तेव्हां आपण कोणालाही असंतुष्ट न करतां सर्वांचा यथायोग्य सत्कार केला पाहिजे." याप्रमाणें आस्थापूर्वक त्या समारंभाची व्यवस्था ठेवणारे यौगंधरायण आणि रुमण्वान् यांनीं सर्वांची यथायोग्य बर्दास्त ठेवली. सर्व लोक त्यांच्या सत्कारानें इतके खुष झाले कीं, जो तो–हे दोघे काय ते माझ्याच सेवेविषयीं तत्पर आहेत, असें आपआपल्या मनांत समजत असे. यावेळीं लागोपाठ दोन समारंभ झाले होते. बहुत दिवस प्रतिबंधांत राहून वत्सराज परत आपल्या नगरीला आला, हा एक व दुसरा विवाहसमारंभ. आपण शत्रूच्या प्रतिबंधांत होतों तरी ज्यांणीं आपल्याशीं मोठ्या नीतीचें वर्तन ठेविलें, व ज्यांनीं राज्याचा उत्तम बंदोबस्त ठेवून आपली सुटका होण्याविषयीं प्रयत्न केला, आणि प्रजाजनांनीं निस्सीम स्वामिभक्ती दाखविली, या सर्व गोष्टींबद्दल वत्सराज त्या लोकांचा अतिशय आभारी झाला होता, व या कृत्याच्या संबंधानें व विवाहसंबंधानें सर्वांचा सत्कार करावा, असा विचार ठरवून एकेदिवशीं त्यानें मोठा दरबार करून प्रमुख प्रमुख सरदार व इतर सर्व मंडळीला बोलाविलें. आणि सर्वांविषयीं आपली कृतज्ञताबुद्धी दाखवून त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें वस्त्रें, अलंकार, इनाम, जहागिरी इत्यादि देऊन सर्वांचें गौरव केलें. यौगंधरायण, रुमण्वान्, आणि वसंतक या तिघांनीं फारच परिश्रम

करून मोठी कामगिरी बजाविली, म्हणून कांहीं प्रांत त्यांना जहागीर करून दिले, आणि स्वतः आपल्या हातानें वस्त्रें, चंदन, अत्तर वगैरे सुगंधिक द्रव्यें आणि अलंकार देऊन त्यांचा सन्मान केला.

याप्रमाणें विवाहसमारंभ बरेच दिवस चालला होता, तो आतां समाप्त झाला. **चंडमहासेना**चा निरोप आल्यावरून **गोपालक, वत्सराज** आणि **वासवदत्ता** यांचा मोठ्या आर्जवानें निरोप घेऊन पुनः येण्याचें कबूल करून निघून गेला. त्याच्या मागून हळूहळू इतर राजे, सरदार, आप्त, इष्ट, मित्र इत्यादि जे लोक समारंभाला आले होते, ते संतुष्ट होत्साते आपापल्या घरीं निघून गेले. **वत्सराज**ही **वासदत्ते**चा समागम झाल्यामुळें आपला मनोरथवृक्ष सुफलित झाला, असें मानता झाला. तरुण स्त्रीपुरुषांचें एकमेकांवर अतिशय प्रेम असणें हें अगदीं साहजिकच आहे. तथापि **वत्सराज** आणि **वासवदत्ता** यांचा संबंध फारच निराळ्या तऱ्हेचा होता. याची घटना कोणत्याप्रकारें घडून आली होती, याचा विचार केला म्हणजे प्राचीन इतिहासांत याला देण्यायोग्य अशी उपमाच मिळत नाहीं. प्रथम **वत्सराजा**चे गुण व शौर्य वगैरे ऐकून **चंडमहासेना**च्या मनांत,—**वासवदत्ता** दिली तर **वत्सराजा**लाच द्यावयाची असा पक्का निश्चय झाला. तेव्हां परस्पर गुणानुवादश्रवणानें **वत्सराजा**ला **वासवदत्ते**विषयीं व **वासवदत्ते**ला **वत्सराजा**विषयीं अभिलाष उत्पन्न झाला. पुढें बापानें **वत्सराजा**ला पाठविलेला निरोप त्याला अमान्य झाला असून अभिमानामुळें उभयतांचा योग घडून येण्याचा असंभव दिसल्याकारणानें दोघांलाही कांहींशी निराशा उत्पन्न झाली. नंतर युक्तीनें **वत्सराजा**ला आणून संगीतशाळेंत कैदेंत ठेविला. तेव्हां **वासवदत्ते**ला व **वत्सराजा**लाही कांहींशी आशा उत्पन्न झाली; पण बापानें आपला अभिप्राय स्पष्टपणें व्यक्त न केल्यावरून व उभयतांचा गुरुशिष्यसंबंध जडल्यावरून **वासवदत्ते**ची प्रीती कांहीं निराळ्याच तऱ्हेनें वाढत गेली. रात्रंदिवस एकठिकाणीं सहवास होऊन

परस्परांचे भाव परस्परांला अवगत झाल्यावरून त्या प्रीतीला आणखी एक रूपांतर प्राप्त झालें. **वत्सराज** तर बोलून चालून कैदेंतच होता. तो एकप्रकारें **वासवदत्तेचा** अंकित व तिच्या दयेला पात्र झाला होता. दुसऱ्या रीतीनें तो तिचा गुरू असल्यामुळें मोठा पूज्य होता. तिसऱ्या दृष्टीनें पाहिलें तर उभयतांच्या मनांत परस्परांला वरण्याची इच्छा होती; ह्मणून दोघांचाही कधींतरी स्त्रीपुरुष संबंध होणार, या दृष्टीनें उभयतांची अगदी बरोबरी होती. तरी **वासवदत्ता** आपल्या अधिकारावर असल्या कारणानें प्रसंगविशेषीं तिचा अधिक पगडा होता. ती **वत्सराजाची** स्त्री तर खरीच, पण उपकार करणारी अशा प्रकारची स्त्री होती. सारांश ह्या दंपत्याचा योग असा कांहीं चमत्कारिक रीतीनें घडून आला आहे कीं, त्यांत एकांत एक अशा अनेक संबंधांची गुंतागुंत झाली आहे. यामुळें त्याचें विशेष वर्णन देखील करणें कठीण आहे. **वत्सराज** मूळपासून फारच रंगेला. पण इतके दिवस त्याला अनुरूप जोडी नव्हती, म्हणून तो कधिं कधीं फार विरस होत असे. **वासवदत्तेचा** समागम झाल्यापासून रात्रंदिवस त्याचा सर्वकाळ चैनींतच जाऊं लागला. त्याचा स्वभाव फारच चपळ असून तो मोठा विषयी होता. **वासवदत्तेसारखी** स्त्री प्राप्त झाली तरी त्याचें मन दुसरीकडे गेलें नाहीं असें नाहीं !

त्याच्या जनानखान्यांत **विरचिता** नांवाची एक मोठी सुंदर दासी होती. **उज्जयिनीला** जाण्यापूर्वीच ह्या रंगेल्या राजानें तिच्यावर झडप घातली होती. आतां **वासवदत्तेच्या** भयानें राजाला उघडपणें त्या दासीची भेट घेण्याची सवड मिळत नसे. तथापि स्नेहसंबंध पूर्वींच दृढ झाला होता. ह्मणून **वत्सराज** लपून छपून कधीं कधीं तिची भेट घेत होता. एकेदिवशीं या उभयतांचा कांहीं संकेत ठरला होता, पण त्या नेमलेल्या वेळीं अकस्मात् **वासवदत्ताच** तेथें येऊन पोंचली. त्यामुळें दासीला सवड मिळाली नाहीं; अर्थात् **वत्सराजानें** संकेतांत ठरल्याप्रमाणें नीटसा विचार न करितां **विरचिताच** आली आहे असें समजून—"कोण ती माझी प्रिया **विर-**

चिंता काय? ये. येथें मी तुझीच वाट पहात बसलों आहें," असें ह्मटलेलें वासवदत्तेनें स्पष्टपणें ऐकलें. कांचनमाला या नांवाची वासवदत्तेच्या माहेरची असून तिच्या अत्यंत प्रीतींतली एक सखी होती हें पूर्वी आलेंच आहे. ती अंतःपुरांतल्या बारिकसारीक सर्व गोष्टी वासवदत्तेला वरचेवर कळवीत असे. यावेळीं विरचितेशीं झालेल्या संकेताची तिला प्रथमच गुणगुण समजली होती व ह्मणूनच ती वासवदत्ता) वत्सराजाचें वरील भाषण ऐकून फारच रागावली. तिचें समाधान करण्याविषयीं वत्सराजानें अनेक लटपटीच्या गोष्टी सांगितल्या. पण नाटीवर चोर मिळाल्यामुळें, त्यांचा उपयोग झाला नाहीं. शेवटीं नाइलाजास्तव पायांपडून वासवदत्तेजवळ माफी मागून तिचें समाधान करावें लागलें. विषयी पुरुष वरपंगी पाहिजे तशी शेखी मारतात; पण त्यांच्या स्वतःच्या स्त्रियांजवळ त्यांची फारच नापत असते! आणि तसें असल्यामुळें वरचेवर मुठींत नाक धरून हातापायां पडून नेम, आणा, शपथा, भाका इत्यादि अनेक उपाय करून बायकांला प्रसन्न ठेवण्याचें त्यांना भाग पडतें. तरी पण त्या केलेल्या आणाभाका मोडण्याला फारसा वेळ लागत नाहीं, व पुनः दुसऱ्याही करण्याला अवकाश नाहीं! तात्पर्य कामिपुरुषांची स्थिती फारच कांहीं चमत्कारिक असते. आमचे नायक वत्सराज हेही अशांतलेच पक्के रंगेले. एकवेळ विरचितेच्या संबंधानें आपल्या अश्रूंच्या प्रवाहांनीं वासवदत्तेच्या पायांला स्नान घालून— पुनः असें करणार नाहीं ह्मणून—तिची खात्री केली होती. पण तो नेम मोडण्याला यांना फार वेळ लागला नाहीं.

वासवदत्तेचा भाऊ गोपालक याला लुटींत बंधुमतीनांवाची एक सुंदर मुलगी मिळाली होती. ती त्याणें वासवदत्तेला नजर पाठविली. वासवदत्तेनें तिचें उत्तम प्रकारें रक्षण केलें होतें. एकेदिवशीं ती सहज ह्या राजश्रींच्या नजरेखालून गेल्यामुळें यांचें मन तत्काल तिच्यावर आसक्त झालें इतकेंच नव्हे; पण तिच्याशीं त्यांनीं गुप्तरीतीनें विवाह देखील लाविला! हें वर्तमान वासवदत्तेला समजून ती

फारच संतापली होती. परंतु वत्सराजानें अनेक युक्ति प्रयुक्तींनें तिचें समाधान केल्यामुळें वासवदत्तेनें राग सोडला. जसा वत्सराज अत्यंत विषयी व उदारमनाचा होता, तशीच वासवदत्ताही मोठी सदाचरणी, भोळी व उदार अंतःकरणाची होती. वत्सराज वरचेवर तिला सहन न होण्यासारख्या गोष्टी आचरण करी; तरी तिचें प्रेम एक रतिभर देखील कमी झालें नाहीं. ती त्याचे सर्व अन्याय सहन करित असे. खरोखर स्त्री स्वतः सदाचारी असून तिचा नवरा विषयी, व मनाचा चंचल असला आणि त्याणें केलेले अपराध उदारपणानें तिनें जर सहन केले तर तिचें नवऱ्यावर एक प्रकारचें फारच वजन बसतें. संयतेंद्रिय असणाऱ्या पुरुषावर बायकोची विशेषशी छाप बसत नाहीं. तो जेव्हां तिच्यावर प्रेम करील व ऐकेल, तेव्हांच तिचें कांहीं तरी चालतें. पण विषयीपुरुष तिचा अगदीं गुलाम बनतो ! आमच्या ह्या नायकनायिकांचीही अशीच स्थिती होती. वासवदत्ता उदारपणानें वत्सराजाचे अन्याय सहन करित होती, म्हणून तो तिचा अगदीं अंकित झाला होता. याप्रमाणें दोघांचाही समागम मोठ्या आनंदांत चालला असून गुप्तपणें झालेल्या विवाहाच्या संबंधानें वासवदत्तेला आलेला राग तिच्या मनांतून अद्याप पुरतासा गेला नव्हता. तों आणखी एक असाच प्रसंग घडून आला. तो असा:—

अंगदेशाचा राजा दृढवर्मा याला मंजुलिका नांवाची एक अत्यंत सुरूप कन्या होती. हिलाच प्रियदर्शिका असें ह्मणत. व तिचें हेंच नांव विशेष प्रसिद्ध होतें. ती अंमळ प्रौढ झाली तेव्हां निरनिराळ्या देशांतील तरुण राजपुत्रांनीं तिची मागणी केली. त्यांत कलिंगदेशच्या राजानें तिला वरण्याविषयीं फारच आग्रह धरिला होता; तथापि इतर सर्वांच्या मागण्या अमान्य करून दृढवर्म्यानें प्रियदर्शिका वत्सराजालाच देण्याचा निश्चय केला. हें ऐकून कलिंगराजाला फार राग येऊन त्यानें दृढवर्म्यावर स्वारी करून त्याला जिंकून कैदेंत ठेविला. दृढवर्म्याचा विनयवसु नामक एक विश्वासू वृद्ध चोपदार होता. त्याणें

आपल्या यजमानाचा अभिप्राय समजून प्रियदर्शिका कलिंग राजाच्या हाताला न लागावी ह्मणून तिला घेऊन तो त्या लढाईच्या धांदलींतून कोणाला न कळत निघून विंध्यपर्वताच्या खोऱ्यांत,—विंध्यकेतु नांवाचा भिल्लांचा एक राजा दृढवर्म्याचा मित्र होता, त्याच्या घरीं राहण्यास गेला. तेथें पोंहचल्यावर प्रियदर्शिकेला त्याच्या स्वाधीन करून तो स्वामिभक्त चोपदार बिनघोरपणें जवळच्या अगस्त्यतीर्थावर स्नानाला गेला होता. इकडे वत्सराजाला कांहीं विशेष कारणामुळें विंध्यकेतूचा फारच राग आला होता. ह्मणून त्याणें त्याचा पराभव करण्याकरितां मोठी फौज बरोबर देऊन विजयसेन नांवाचा एक पराक्रमी सरदार त्याच्यावर पाठविला होता. विनयवसू स्नानाला गेला, इतक्यांत मागाहून त्यांणीं विंध्यकेतूवर हल्ला करून त्याला मारला. तेव्हां सर्वांचा नाश झाल्यामुळें शोक करित बसलेली अनाथ प्रियदर्शिका त्यांच्या हातीं सांपडली. तिला घेऊन ते सरदार परत वत्सराजाकडे गेले. इकडे विनयवसू स्नानकरून परत येऊन पाहातो तों, विंध्यकेतूवर कोणी स्वारी करून त्याच्या वाड्याची राखरांगोळी करून टाकली आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें ! तेव्हां घाबरा होऊन त्याणें प्रियदर्शिकेचा विशेष शोध केला, पण तिचा कोठें कांहींच पत्ता लागला नाहीं. यजमानावर अनिवार संकट आलें आहे; तथापि प्रियदर्शिका वत्सराजाला देण्याचा त्याचा हेतू कोणत्या तरी रितीनें आपण पूर्ण करावा, असा त्या विनयवसूचा हेतू होता. पण दुर्दैवानें तोही आपल्या हातून योग्यरितीनें पूर्ण होत नाहीं; ह्मणून तो फार दुःखित झाला. आतां वत्सराजाकडे जावें तर प्रियदर्शिकेला घेतल्यावांचून त्याला तोंड दाखविणें योग्य नाहीं, असें समजून तो परत, आपला राजा दृढवर्मा कलिंगराज्याच्या येथें कैदेंत पडला होता, त्याच्याकडेसच निघून गेला.

इकडे वत्सराज एकेदिवशीं आपला खुषमस्कऱ्या वसंतक याच्याशीं उज्जयिनींत बंदिशाळेंत आपण होतों, त्या वेळच्या

कांहीं गोष्टी करित बसला होता. इतक्यात विंध्यकेतूचें पारपत्य करण्याकरितां त्याणें पाठविलेला विजयसेन नांवाचा सरदार तिकडून विजयी होऊन परत आला असून तो, मुख्य सेनापती रुमण्वान् याच्या बरोबर वत्सराजाला भेटण्यास आला. त्याणें मुळापासून तिकडील सर्व हकीकत सांगून विंध्यकेतूच्या शौर्याची फारच तारीफ केली. ती ऐकून वत्सराज संतुष्ट होऊन ह्मणाला, "विंध्यकेतूची शाबास खरी. बरें तो तर वीराला योग्य आशा गतीला गेलाच. तेव्हां त्याच्या शौर्याविषयीं मला जो आनंद झाला आहे, त्याचा प्रत्यक्ष त्यालाच कांहीं उपयोग करून देतां येणार नाहीं. पण त्याला कांहीं संतती असेल तर तिला त्याचा लाभ व्हावा अशी माझी फार इच्छा आहे." हें ऐकून विजयसेन ह्मणाला, "महाराज, विंध्यकेतू परलोकाला गेल्यावर त्याच्या स्त्रिया सती गेल्या. त्याच्या घराण्यापैकीं आतां कोणी राहिलें नाहीं. पण एक सुंदर मुलगी तेथें शोक करित बसली होती, ती विंध्यकेतूचीच मुलगी असावी, असें समजून आह्मीं तिला सरकारच्या पायांकडे आणिली आहे. हुकूम होईल त्याप्रमाणें व्यवस्था करूं." हें ऐकून वत्सराजानें त्या मुलीला वासवदत्तेकडे पाठवून, आपल्या बहिणीप्रमाणें इचें रक्षण करून उपवर झाली ह्मणजे मला कळवावें असें तिला सांगितलें.

दृढवर्म्याचा चोपदार विनयवसू बरोबर असता तर ह्या लुटींत सांपडलेल्या मुलीचा सर्व वृत्तांत समजला असता. पण तो नसल्यामुळें ती वत्सराजाच्या घरीं फार दिवस होती, तरी ती कोणाची कोण हें मुळींच कोणालाही माहित नव्हतें. अरण्यांत सांपडली, ह्मणून राजवाड्यांतील सर्व लोक तिला आरण्यका ह्मणत असत. विंध्यकेतूकडून तिला येथें आणली, त्यावेळीं ती वयानें लहान होती तरी आईबापांची वगैरे माहिती तिला सांगतां आली असती. पण एकावर एक दुःखाचे प्रसंग आल्यामुळें भयानें तिनें कोणासच कांहीं सांगितलें नाहीं. लढाईत जिंकून आणलेल्या स्त्रियांला दासी करण्याचा पूर्वीं संप्रदाय होता. तेव्हां

तिची दासींतच गणना होणार होती व ती ज्या वाईट स्थितींत होती त्या स्थितींत, तिला आपल्या आईबापांचीं नांवें सांगावीं हें मुळींच योग्य वाटलें नाहीं. कदाचित् लहानपणीं वियोग झाल्यामुळें हिला आईबापांचें स्मरणच राहिलें नसेल, असें समजून कोणी विशेष चवकशी केली नाहीं असो. ती **वासवदत्तेजवळ** गेल्यापासून सर्वप्रकारें सुखांत पडली होती. तिचें रूप, स्वभाव इत्यादि आवडल्याकारणानें **वासवदत्तेची** तिच्यावर फारच ममता जडली. तिनें प्रत्यक्ष आपल्या पाठच्या बहिणीप्रमाणें तिची उत्तम व्यवस्था ठेवून, राजकन्येला उचित अशा गायन, नृत्य, वाद्यवादन, लेखन, वाचन इत्यादि कलांचें उत्तम प्रकारें तिला शिक्षण देवविलें. ती इतर सर्व गुणांनीं त्या राजवाड्यांतील स्त्रियांस फार मान्य झाली होती; पण तिच्या कुळगोताचा कांहीं ठावठिकाण नव्हता ह्मणून लोक तिला दासींपैकींच ही एक आहे; असें मानीत असत व यामुळें तीही फार दुःखी होती.

एकेदिवशीं **वत्सराज** आपला मित्र **वसंतक** याला बरोबर घेऊन **धाराधरोद्यान** नांवाच्या बागेंत वनशोभा पहात पहात व हास्यविनोद करीत चैनींत फिरत असतां तेथल्याच एका सुंदर तळीच्या कांठीं शोक करित बसलेली ही **आरण्यका** त्याच्या दृष्टीस पडली. **विजयसेनानें** तिला आणली त्यावेळीं कायती तिला पाहिली होती; त्यापासून हावेळपर्यंत ती राजवाड्यांत होती तरी **वत्सराजाच्या** कधींही दृष्टीस पडली नव्हती. ह्मणून त्याला तिची मुळींच ओळख पटली नाहीं. ती मुलगी आपल्याशींच ह्मणाली, “ देवा! काय माझी ही दशा? मी **अंगदेशाच्या** राजाची आवडती कन्या असून सांप्रत येथें बटकीप्रमाणें दिवस कंठीत आहें. तस्मात् माझ्या दैवाची गती फारच विचित्र आहे. ” याप्रमाणें ती आपल्याशींच कांहींवेळ बोलत होती. तिला पाहून **वसंतकानें** तिची तारीफ करून दुरून ती राजाला दाखविली. **वत्सराजाला** आधींच स्त्रियांची फार आवड; तशांतून **प्रियदर्शिकेसारखी** सुंदर स्त्री मिळाल्यावर त्याच्या मनानें

कां बरें ओढ घेऊं नये ? तो तिच्याकडेस साभिलाष होऊन वरचेवर पहात होता. तरी वासवदत्तेच्या भयानें तिच्या जवळ गेला नाहीं. एका झाडाच्या आड दोघेही दडून बसून त्यांच्या गोष्टी ऐकत होते. प्रियदर्शिकेबरोबर त्यावेळीं तिची मैत्रीण इंदीवरिका नांवाची एक राजवाड्यांतील दासी होती. तिणें तिचें समाधान करून— " गडे, आरण्यके, बाई तूं आतां उगीच रडून अशी दुःख करूं नकोस. बाईसाहेब कालच तुझी गोष्ट बोलत होत्या. त्या लौकरच महाराजांला सांगून तुझें लग्न करून देणार आहेत. "—असें सांगून तिचें समाधान केलें. पण लग्नाची गोष्ट ऐकून राग आल्यासारखें करून ती तिला सोडून दुसरीकडे फुलें वेंचण्यास गेली. राजा ह्या दोघींचेंही बोलणें ऐकत होता. त्याला इंदीवरिकेचें बोलणें ऐकून—विजयसेनानें आणिलेली हीच मुलगी असावी—अशी ओळख पटली. इतक्यांत फुलांवर संचार करणारे पुष्कळ भ्रमर एकदम तिच्या तोंडाभोंवतीं घिरट्या घालूं लागले. त्यांच्या भयानें तोंडावर पदर घेऊन इंदीवरिकेला मोठ्यानें हाक मारून—ह्या दुष्ट भोंग्यांपासून मला सोडीव—असें ती काकुळतीं येऊन ह्मणाली. वत्सराज जवळच होता, त्याणें हें ऐकलें तेव्हां वसंतकाच्या सांगण्यावरून भ्रमरांना मारण्याकरितां ह्मणून तो तिच्या जवळ गेला. तेव्हां बावरी घुबरी होऊन, इंदीवरिकाच जवळ आली असें समजून आरण्यकेनें राजाच्या गळ्याला मिठी मारली. राजानें आपल्या शेल्याच्या पदरानें भ्रमरांचें निवारण करून हंसत हंसत—" अशी भिऊं नको. तुझ्या मुखकमलांतील मकरंदाच्या वासाला भुलून ह्या भ्रमरांनीं तुझ्यावर झडप घातली असेल. अशावेळीं तूं आपले डोळे चंचल करून कमलवनाची शोभा दाखविशील तर ते अधिकच तुझ्या पाठीस लागतील, " असें ह्मटलें. तेव्हां हें भाषण ऐकून हा कोणी तरी पुरुष आहे. इंदीवरिका नव्हे, असें समजून राजाला झिटकारून ती मागें सरली, आणि इंदीवरिकेला हाका मारूं लागली, तेव्हां हळूच वसंतक रागाव-

त्यासारखें करून ह्मणाला, "काय ? तूं इतकी भ्यालीस कां ? तुझें रक्षण करण्याला हा सर्व पृथ्वीचा राजा आणि ह्या **वसंतकाचा** प्रिय मित्र **वत्सराज** जवळ उभा असून त्या बटकीच्या पोरीला हाका मारतेस ! ती तुझें रक्षण करणार काय ?" असें ह्मणाला. **प्रियदर्शिका** यावेळीं वयांत आली होती. **कामराजानें** तिच्या शरीररूप वाड्यांत वास्तुविधी केला होता, ह्मणून तिला हा **मदनाचा** पुतळा **वत्सराज** फारच आनंदकारक वाटला. ल्हानपणीं तिचा बाप,—"तुला **वत्सराजाला** द्यावयाची" असें ह्मणत होता, त्याचें तिला स्मरण झालें. आाणि ती सस्पृह होऊन त्याच्याकडे पाहूं लागली. इतक्यांत—"भिऊं नको, भिऊं नको"—असें ह्मणत **इंदीवरिका** तेथें आली. तिला पाहून, ही कदाचित् **वासवदत्तेला** सांगेल, ह्मणून भिऊन **वसंतक** आणि **वत्सराज** जवळच्या कदलीगृहांत जाऊन लपाले. इकडे **इंदीवरिका** जवळ येऊन **प्रियदर्शिकेच्या** तोंडावरून हात फिरवून ह्मणाली, "गडे हे भ्रमर तुला त्रास देतात यांत त्यांचा कांहीं अन्याय नाहीं. हा तुझ्या मुखकमलाचाच दोष आहे. त्यानें त्यांला लोभविलें नसतें तर ते तरी कशाला जवळ आले असते !" अशी थट्टा करून ती तिला घेऊन घराकडे जावयास निघाली. **प्रियदर्शिकेच्या** मनांत राजाला पुनः पहावयाचें होतें. ह्मणून ती कदलिगृहाकडे डोळे लावून इंदीवरिकेला—"हळूहळू चाल" असें ह्मणाली. ती दिसेनाशी झाल्यावर उत्कंठित झालेल्या **वत्सराजानें** विरही पुरुषांला उचित असे विलाप करून सूर्यास्त झाल्यामुळें तो **वसंतकासह** घराकडे निघून गेला.

यादिवशींच्या भेटीपासून दोघांचेंही परस्परांवर मन आसक्त झालें होतें. राजाला, **वासवदत्तेला** नकळत व तिला राग न येतां **प्रियदर्शिकेची** भेट होण्याचा कांहीं उपाय सुचेना, ह्मणून तो नेहमीं तळमळत होता. आणि, प्रत्यक्ष **वत्सराजावर** आपलें प्रेम बसलें आहे, पण त्याची प्राप्ती होण्याचा संभव नाहीं; ह्मणून **प्रियदर्शिका** रात्रंदिवस तळमळत होती. कोणत्याही रितीनें तिच्या मनाची विश्रांती होईना,

व दुःख सोसवेना, ह्मणून प्राणत्याग करावा असा निश्चय करून ती वत्सराजाची जेथें भेट झाली होती त्याच बागेंत गेली. आणि त्या वेळच्या गोष्टीची आठवण करून ती फारच दुःखित झाली. मनोरमा-नांवाची एक तिची प्रिय मैत्रीण होती. दोघीही परस्परांला आपलें हितगुज सांगत असत. आपल्या मनांतली गुप्त गोष्ट मनोरमेला सांगावी असें प्रियदर्शिकेच्या मनांत येत होतें; पण लज्जेमुळें तिच्यानें कांहीं सांगवेना. नंतर—"खचितच मरणावांचून आतां माझ्या दुःखित जिवाला मुळींच स्वस्थता वाटावयाची नाहीं. यावेळीं दुसरें कोणी येथें नाहीं, ही संधी फार बरी आहे. तर आपण लौकर आतां आपला हेतू शेवटास न्यावा."—असें बोलून मरण्याला काय उपाय करावा याचा ती विचार करूं लागली. दैवयोगानें मनोरमाही यावेळीं तेथें जवळच होती. तिनें हिचें सर्व भाषण ऐकलें. आणि—वत्सराजासारख्या योग्य पुरुषावर आपल्या सखीचें मन जडलें आहे, हें पाहून तिला फार आनंद झाला व तिचे निराशेचे उद्गार ऐकून तिला कांहींसें दुःखही झालें. ह्मणून तिचें समाधान करण्याकरितां मनोरमा तिच्या जवळ जाऊन ह्मणाली, "वाहवा! आरण्यके, एकून तूं इतकी कपटी आहेस तर. आपल्या जिवलग मैत्रिणी-जवळ देखील कांहीं गोष्ट बोलायला तुला लाज वाटतेना?" हें तिचें भाषण ऐकून आपल्या सर्व गोष्टी तिनें ऐकल्या असें समजून प्रियदर्शिका लाज्जित होऊन खालीं पाहूं लागली. तेव्हां मनोरमा ह्मणाली, "तूं इतकी निराश होऊं नकोस. महाराजांची भेट झाली हें फार चांगलें झालें. तुला जशी हुरहुर लागली आहे तशी त्यांनाही लागली असेल. आणि ते तुझी भेट घेण्याचा प्रयत्नही करीत असतील." हें ऐकून प्रियदर्शिका ह्मणाली, "गडे मनोरमे, मला गोड वाटण्याकरतां हें तूं कांहीं तरी बोलत आहेस. मला पुरतें माहित आहे, महाराज बाईसाहेबांचे किती अंकित आहेत ते. त्यांचें माझ्यावर मन लागेल तरी कसें?" यावर मनो-रमा ह्मणाली, "तूं किं नाहीं, अगदीं अगदीं वेडी आहेस. तुला आपलीच

योग्यता काय आहे हें माहीत नाहीं. अग, भ्रमराचें कमलिनीवर कितीही प्रेम असलें तरी एखाद्या सुंदर मालतीला पाहून नवीन रसाची गोडी घेण्याकरितां त्याचें मन उत्कंठित झाल्यावांचून राहील काय?"

याप्रमाणें त्या दोघींचें भाषण चाललें असतां **प्रियदर्शिका** कामानें फार व्यथित होऊन तिच्या शरीराचा दाह होऊं लागला. तेव्हां तिच्या अंगावर कमलिनींचीं पानें घालून **मनोरमा** वारा घालित बसली होती. इतक्यांत **प्रियदर्शिकेच्या** अवलोकनानें कामपीडित झालेल्या **वत्सराजानें** पाठविलेला **वसंतक** तिचा शोध करीत करीत तेथें येऊन पोंहचला. **प्रियदर्शिकेची** कशी अवस्था झाली होती, तीं तर त्याणें प्रत्यक्षच पाहिली. आणि **मनोरमेनें** विचारल्यावरून—"महाराजांचीही अशीच अवस्था झाली आहे"—असें त्याणें सांगितलें, तेव्हां **प्रियदर्शिकेला** बराच धीर आला, व तिला आपला मनोरथ सिद्ध होण्याची कांहीं आशा उत्पन्न झाली. नंतर **वसंतक** आणि **मनोरमा** या उभयतांनीं **प्रियदर्शिकेचा वत्सराजाशीं** गुप्तपणें गांधर्व विवाह करून उभयतांचा समागम करून द्यावा असा संकेत ठरवून, **वासवदत्तेच्या** मनोरंजनार्थ एक नाटकाचा प्रयोग करून त्यांत वर सांगितलेला आपला बेत सिद्धीस न्यावा असा निश्चय केला. आणि हें वर्तमान **वत्सराजाला** कळवून त्याची सम्मती घेण्याकरितां **वसंतक** तिकडे निघून गेला. इकडे **प्रियदर्शिका** आणि **मनोरमा** बराच वेळ तेथें गोष्टी बोलत राहिल्या होत्या. **मनोरमेनें** पुढचा सर्व बेत सांगून कसकसें वागावयाचें तें सर्व तिला शिकविलें आणि दोघीही आपापल्या कामास गेल्या.

राजवाड्यांत वृद्ध असून मोठ्या चतुर व प्रसंगीं योग्य सल्ला मसलत देणाऱ्या बाया ठेवण्याचा पूर्वकाळीं परिपाठ होता. त्याप्रमाणें **वासवदत्तेजवळ सांकृत्यायनी** नांवाची एक वृद्ध तापसी बाई होती. **वासवदत्तेची** आई **अंगारवती** हिनें,—मुलगी सासरीं एकटी राहणार, तेव्हां तिला प्रसंगीं समजुतीच्या दोन गोष्टी सांगून तिचें समाधान करण्याकरितां

मुद्दाम **वासवदत्तेजवळ** ह्या बाईला ठेविली होती. ही मोठी विदुषी असून निस्पृह व चतुर होती. **वत्सराज** आणि **वासवदत्ता** दोघेंही तिला फार मान देत असत. ह्या विदुषीनें, **वत्सराजानें वासवदत्तेचें** हरण कसें केलें ? ह्या गोष्टीवर उभयतांच्या आग्रहावरून एक सुंदर नाटक रचून तयार केलें होतें. संगीतशालेंतील मुलींकडून त्याचा प्रयोग करवून आपण पहावा, अशी राजा आणि राणी या उभयतांचीही फार इच्छा होती. **वत्सराज** आणि **प्रियदर्शिका** या उभयतांचाही काय हेतू आहे, तो **वसंतकानें सांकृत्यायनीला** कळविला होता. ह्मणून तिच्या अनुमोदनानें त्या नाटकाचा प्रयोग करविण्याचा त्यांचा निश्चय झाला. त्यांत **मनोरमेनें वत्सराजाचें** व **प्रियदर्शिकेनें वासवदत्तेचें** सोंग घ्यावें; आणि आयतेवेळीं **मनोरमेनें** एका बाजूस होऊन प्रत्यक्ष **वत्सराजानेंच** रंगभूमीवर येऊन **प्रियदर्शिकेचें** पाणिग्रहण करावें, असा संकेत झाला. मग त्याप्रमाणें संगीतशालेंत सर्व तयारी करवून नाटकाच्या प्रयोगाला आरंभ झाला. आयतेवेळीं कांहीं निमित्त करून **वत्सराज** नाटक पाहण्याला आला नाहीं. **वासवदत्ता** आणि **सांकृत्यायनी** व इतर स्त्रिया नाटक पाहण्यास बसल्या होत्या. **वासवदत्तेनें प्रियदर्शिकेला** आपलें सोंग हुबेहुब घेतां यावें ह्मणून—माहेरीं असतांना वस्त्रें अलंकार इत्यादि जें ती धारण करित होती, तें सर्व तिला दिलें होतें. तसेंच **वत्सराजानेंही**—कैदेंत असतेवेळीं आपला जो पोषाख होता तो **वसंतकाच्या** हातीं देऊन **मनोरमेकडे** पाठविला, पण त्याणें तो तिला न देतां परत **वत्सराजाकडे** आणून त्यालाच तो पोषाख देऊन सिद्ध केला. पात्रांचा प्रवेश होण्याची सुरवात झाली. तेव्हां **वासवदत्ता** आणि **वत्सराज** हीं दोन पात्रें रंगभूमीवर आलीं. **प्रियदर्शिका** स्त्री असून तिणें दुसऱ्या स्त्रीचा ( **वासवदत्तेचा** ) वेष हुबेहुब घेतला होता ह्मणून त्याविषयीं प्रेक्षकांस फारसें कौतुक वाटलें नाहीं. पण **मनोरमा** ही स्त्री असून तिणें पुरुषाचा ( **वत्सराजाचा** ) वेष अगदीं हुबेहुब घेतला आहे, असें समजून

वासवदत्ता फारच खुष झाली. प्रत्यक्ष वत्सराजच रंगभूमीवर आला आहे हें तिला मुळींच माहीत नव्हतें! तिच्याशीं ठरलेल्या संकेताप्रमाणें ही मनोरमाच आहे असें समजून वासवदत्ता तारीफ करूं लागली. सांकृत्यायनीला आंतील सर्व गोष्टी माहित होत्या. तथापि पुढचा बेत सिद्धीस जावा, ह्मणून तिनेंही वासवदत्तेप्रमाणेंच त्या सोंगाची तारीफ चालविली. इकडे नाटक चालत असतां प्रियदर्शिका वासवदत्तेचें सर्व काम व अभिनय करित होती. प्रत्यक्ष वत्सराजच आपल्या बरोबर आला आहे हें तिलाही माहित नव्हतें! ही मनोरमा असें समजून ती निःशंकपणें त्याच्याशीं वागत होती. अनुक्रमानें इतर सर्व गोष्टी करतां करतां राजाच्या पायांत बेडी घालण्याचा समय जेव्हां आला तेव्हां राणीनें फुलांच्या हारानें तिच्याकडून त्याचे पाय बांधविले. पुढचा सर्व कथाभाग अनुक्रमानें झाला. वत्सराज बंदींतून मुक्त होऊन उभयतांचा गांधर्वविवाह देखील लागला. राजा अतिशय कामपीडित झाला होता, यामुळें त्याचा भाव तेव्हांच व्यक्त झाला. हावेळपर्यंत वासवदत्तेला कांहीं संशय आला नव्हता, पण विवाहाच्यावेळीं कांहीं फाजिलपणाच्या गोष्टी झाल्या, त्यावरून तिला संशय येऊन लक्षपूर्वक पाहिल्यावर—हा प्रत्यक्ष वत्सराजच आहे अशी वासवदत्तेच्या मनाची खात्री झाली. तेव्हां विरस होऊन रागानें ती तेथून निघून जाऊं लागली. सांकृत्यायनीनें पुष्कळ आग्रह केला; पण डोकें दुखण्याचें निमित्त करून ती तेथून उठली. तेव्हां सर्व मंडळींत बरीच गडबड उडाली. मनोरमेनें मुद्दाम आपल्याला फसविण्याकरितां हें कपट केलें आहे—असें समजून राणी तिच्यावर फार रागावली होती. पण पुष्कळ निर्वाळे देऊन—वसंतकानें आपल्याला फसवून असें घडवून आणलें—अशी वासवदत्तेची तिनें खात्री करून सर्व अपराध वसंतकाच्या डोक्यावर लादले. प्रियदर्शिकेवर तर राणीचा फारच राग होता. ह्मणून तिला आणि वसंतकाला निरनिराळ्या ठिकाणीं अंधारकोठडींत कोंडून ठेवण्याचा विचार

हें माझ्यानें कसें पाहवेल बरें ? माझ्यापेक्षां दासीच जर त्यांना अधिक आवडत असल्या, तर त्यांत माझी शोभा ती काय राहिली ? मला तर बाई त्या दिवसापासून तोंड दाखवायला देखील लाज वाटते. एकदां त्या विरचितेची गोष्ट कशितरी सहन केली. पुढें बंधुमतीचीही सहन केली. असो ह्मटलें, पुरुषांना कधीं कांहीं वाटत असलें तर आपण त्यांच्या आड कशाला यावें. पण दिवसेंदिवस ह्रा क्रम अधिकच वाढत चालला आहे. मी एकेक गोष्ट गिळूं लागलें तों तों माझी मुळिंच पर्वा नाहींशी झाली. मेलि ती आरण्यका कोणाची कोण कुणास ठाऊक ! भलत्या सलत्यांचा स्वीकार करणें याची तिकडे नाहीं तरी, मला मोठी लाज वाटते. कांहीं कुळशीळ पहावें किं नाहीं ? मला तर बाई कंटाळा आला." हें वासवदत्तेचें भाषण ऐकून सांकृत्यायनी हंसून ह्मणाली, "हा वेडे ! त्या मागच्या गोष्टी असोत. पण परवांचें हें तूं खरेंच ह्मणून का समजलीस ? कौमुदीमहोत्सवांत कांहीं तरी विनोद करून तुझी कर्मणूक करावी ह्मणून महाराजांनीं त्यादिवशीं तो खेळ करविला. त्यांना—तुझें हरण केलें,—ह्या आपल्या चरित्रांचें फारच कौतुक वाटतें. ह्मणून ते स्वतःच आपलया पात्राचें काम करण्याला रंगभूमीवर आले. त्यांणीं–प्रिये रागावूं नको,—असें ह्मटलें तें त्या भिकारड्या आरण्यकेला ह्मटलें नाहीं; तर तिणें तुझा वेष घेतला होता—ह्मणून त्या वेषालाच उद्देशून तसें ह्मटलें. व लग्न देखील तुझ्याच सोंगाशीं लाविलें. यांत महाराजांवर एवढें रागावायचें काय कारण हें मला समजत नाहीं ! आताशीं तुह्मा दोघांत अबोला आहे, हें मला माहित होतें, पण त्याचें कारण कांहीं समजलें नाहीं. मी ह्मटलें तुह्मी उभयतां प्रेमळ नवरा-बायको अहां. कांहीं तरी निमित्त झालें असेल ह्मणून बोलत नाहीं. पण त्याचें, हेंच निमित्त आहे असें मला आतां समजलें. हें असें असेल तर त्यांत कांहींच अर्थ नाहीं. तूं मन मोकळें करून 'दृढवर्म्याची सुटका करावी' असें सांग ह्मणजे सर्व काम होईल." सांकृत्यायनीचें हें भाषण ऐकून वासवदत्ता अम्मळ

याप्रमाणें इकडचा वृत्तांत झाल्यावर थोडक्याच दिवसांत **चंडमहासेनाची** स्त्री **अंगारवती** इणें एक पत्र देऊन **वासवदत्ते**कडे दूत पाठविला. त्यांत **वासवदत्ते**च्या मनाला वाईट वाटण्यासारखा मजकूर होता. **कलिंगराजानें** बंदिशाळेंत टाकलेला **अंगदेश**चा राजा **दृढवर्मा** याची स्त्री (**प्रियदर्शिके**ची आई) ही **अंगारवती**ची सख्खी बहीण; अर्थात् **वासवदत्ते**ची मावशी होती. ह्मणून,—" तुझा पती तसा समर्थ असून हावेळपर्यंत तूं त्याच्याकडून **दृढवर्म्या**ची सुटका होण्याचा यत्न केला नाहींस, हें तुला शोभतें काय ? "—असें **अंगारवती**नें लिहिलें होतें. हें पत्र वाचून **वासवदत्ते**ला फार दुःख झालें. व **दृढवर्म्या**ची सुटका करण्याविषयीं राजाची प्रार्थना करावी, असें तिच्या मनांत आलें. पण—आपण त्यांच्यावर रागावलें आहें, आणि त्यांच्या हेतुला सर्वस्वीं आड आलें तेव्हां आतां गोष्ट काढावी कशी ?—असें समजून ती फार ओशाळली होती. तिनें **सांकृत्यायनी**जवळ ही सर्व हकीकत सांगितली. **सांकृत्यायनी**ला ह्या नवराबायकोंचा अबोला काढून राजाचा हेतू सिद्ध करण्यास कांहीं तरी सवड पाहिजेच होती; त्याला—ही आयतीच चांगली संधी मिळाली, अशी मनांत गांठ घालून ती **वासवदत्ते**ला ह्मणाली, " अग, तूं अशी खिन्न होऊन कां बसलीस ? तुझ्या मावशीच्या नवऱ्याची ( **दृढवर्म्या**ची ) सुटका करण्याविषयीं महाराज कधींही आळस करणार नाहींत. " **वासवदत्ता** डोळ्यांत अश्रू आणून ह्मणाली, " आई, तुह्मीं अगदीं भोळ्या आहां. तिकडे माझीच मुळीं जर गरज नाहीं, तर मग माझ्या आप्तांची गरज कोठून असेल ! परवां नाटकशाळेंत खेळ करून तुमच्या समोरच माझा कसा पाणउतारा केला तो तुह्मी पाहिला नाहीं काय ? प्रत्यक्ष माझ्या समोर मला फसवून मेल्या बटकीशीं लग्न लावावयाचें आणि—प्रिये, रागावूं नकोस—असें ह्मणून तिच्या पायां पडावयाचें

१–हें नातें कसें तें जुळत नाहीं. पूर्वीं **अंगारवती**चा जो वृत्तान्त सांगितला आहे तेथें तिला बहीण असल्याचें वर्णन नाहीं.

हें माझ्यानें कसें पाहवेल बरें ? माझ्यापेक्षां दासीच जर त्यांना अधिक आवडत असल्या, तर त्यांत माझी शोभा ती काय राहिली ? मला तर बाई त्या दिवसापासून तोंड दाखवायला देखील लाज वाटते. एकदां त्या विरचितेची गोष्ट कशितरी सहन केली. पुढें बंधुमतीचीही सहन केली. असो ह्मटलें, पुरुषांना कधीं कांहीं वाटत असलें तर आपण त्यांच्या आड कशाला यावें. पण दिवसेंदिवस हा क्रम अधिकच वाढत चालला आहे. मी एकेक गोष्ट गिळूं लागलें तों तों माझी मुळींच पर्वा नाहींशी झाली. मेलि ती आरण्यका कोणाची कोण कुणास ठाऊक ! भलत्या सलत्यांचा स्वीकार करणें याची तिकडे नाहीं तरी, मला मोठी लाज वाटते. कांहीं कुळशीळ पहावें किं नाहीं ? मला तर बाई कंटाळा आला." हें वासवदत्तेचें भाषण ऐकून सांकृत्यायनी हंसून ह्मणाली, "हा वेडे ! त्या मागच्या गोष्टी असोत. पण परवांचें हें तूं खरेंच ह्मणून का समजलीस ? कौमुदीमहोत्सवांत कांहीं तरी विनोद करून तुझी कर्मणूक करावी ह्मणून महाराजांनीं त्यादिवशीं तो खेळ करविला. त्यांना—तुझें हरण केलें,—ह्या आपल्या चरित्रांचें फारच कौतुक वाटतें. ह्मणून ते स्वतःच आपल्या पात्राचें काम करण्याला रंगभूमीवर आले. त्यांणीं—प्रिये रागावूं नको,—असें ह्मटलें तें त्या भिकारड्या आरण्यकेला ह्मटलें नाहीं; तर तिणें तुझा वेष घेतला होता—ह्मणून त्या वेषालाच उद्देशून तसें ह्मटलें. व लग्न देखील तुझ्याच सोंगाशीं लाविलें. यांत महाराजांवर एवढें रागावायचें काय कारण हें मला समजत नाहीं ! आताशीं तुह्मा दोघांत अबोला आहे, हें मला माहित होतें, पण त्याचें कारण कांहीं समजलें नाहीं. मी ह्मटलें तुह्मी उभयतां प्रेमळ नवरा-बायको अहां. कांहीं तरी निमित्त झालें असेल ह्मणून बोलत नाहीं. पण त्याचें, हेंच निमित्त आहे असें मला आतां समजलें. हें असें असेल तर त्यांत कांहींच अर्थ नाहीं. तूं मन मोकळें करून 'दृढवर्म्याची सुटका करावी' असें सांग ह्मणजे सर्व काम होईल." सांकृत्यायनीचें हें भाषण ऐकून वासवदत्ता अम्मळ

लाजल्यासारखी झाली. तिला मनापासून फार संतोष झाला व आपण उगीच रागावलें असेंही वाटलें. ती ह्मणाली, "कांहीं तरी असो, मला तर बाई गोष्ट काढायला लाज वाटते. तुह्मीच माझ्याकरितां तिकडे सांगा." हें ऐकून **सांकृत्यायनीनें** तिचें समाधान करून **दृढवर्म्याची** मुक्तता करण्याविषयीं राजाला सांगावयाचें कबूल केलें.

इकडे **वसंतक** युक्तिप्रयुक्तीनें त्या अंधारकोठडींतून सुटून **वत्सराजाला** येऊन भेटला. आणि एकांतीं ते दोघेही **प्रियदर्शिकेला** सोडविण्याचा विचार करूं लागले. **वसंतक** ह्मणाला, "मित्रा, तूं तर मोठा शूर आहेस. शत्रूवर स्वारी करून त्याला वश करितोस; मग राणीची ती बिशाद काय ?आपली सर्व फौज घेऊन जनानखान्यावर स्वारी करून त्या गरीब **आरण्यकेची** सुटका कां करिनास ?" हें ऐकून **वत्सराज** हंसून म्हणाला, " मूर्खा, असें भलतेंच काय सांगतोस, यावेळीं तुझी थट्टा एकीकडे असूं दे. खरोखर त्या प्रियेची सुटका **वासवदत्तेला** प्रसन्न केल्यावांचून होईल असें वाटत नाहीं." **वसंतक** ह्मणाला, "असें असेल तर मग बसा खुशाल हाका मारीत. नाहींतर मला एक उपाय सुचला आहे तो करा. तूं एक महिनाभर कडकडीत उपोषणें करीत बैस. म्हणजे ती तुझी जोरावर बायको—( **वासवदत्ता** ) नाहिं नाहिं, **चंडिकादेवी**—प्रसन्न होईल, मग तिच्याजवळ **आरण्यकेला** सोडण्याचा वर माग ! हा उपाय मला बरा दिसतो." राजा हंसून म्हणाला, "पुरे. पुरे. बाबा तुझी थट्टा पुरे आतां. राणीला अडवून धरून प्रेमालिंगन देऊन गोड गोड शब्दांनीं समाधान करून कसें तरी तिचें मन वळविलें पाहिजे हेंच खरें." **वसंतक** म्हणाला, "तर मग घ्या मुठींत नाक ; आणि घाला त्या बाईसाहेबांच्या पायांवर लोटांगण ! गड्या, खरोखर हें तुझें तुलाच शोभतें. माझ्यावर असा प्रसंग आला असता तर मी कद्धिं कद्धिं तसें केलें नसतें. कायसेंसें झालें, ह्मणून एकदां आमची भटीण माझ्यावर फार फार रागावली होती. तेव्हां मी तिची मुळींच गोष्ट काढली नाहीं. मुकाट्यानें जेऊन चालता होत असें. एकेदिवशीं

रात्रीं घरांत ती एकटीच आहे असें पाहून भुताचें सोंग घेऊन मी हळूच आंत जाऊन तिला खूप भेवडावली. तेव्हां घाबरी होऊन मोठ्यानें मला हाका मारूं लागली. ती संधी पाहून भुताचा वेष टाकून अकस्मात् मी पुढें येऊन—काय काय ? ओरडायला काय झालें ?—असें ह्मटलें. तेव्हां घाबऱ्यां घाबऱ्यां माझ्या गळ्याला मिठी घालून तिनेंच उलट माझी क्षमा मागितली ! आणि भुतांपासून सोडविण्याविषयीं, माझीं आर्जवें करूं लागली. माझा तर क्रम असाच आहे. अस्मादिक अन्याय करून सवरून उलट बायकोलाच पायां पडावयाला लावणार ! तिच्या ह्मणून कधीं पायां पडावयाचें नाहीं.". वत्सराज ह्मणाला, "ती तुमची गोष्ट काय सांगावयाची आहे ? ती तुमची बायको ब्राह्मणी आणि तुह्मी तिचे नवरे महाब्राह्मण ! तो सगळा प्रकारच निराळा. मला आपली जी युक्ती सुचली आहे, ती करून पाहिली पाहिजे." वसंतक ह्मणाला, "बरें तर चला महाराज, बायकोकडून चांगलासा आशीर्वाद घ्या बरें." याप्रमाणें दोघांचा विनोद चालला आहे इतक्यांत सांकृत्यायनीचा निरोप घेऊन तिची शिष्यिण राजाकडे आली, आणि वासवदत्तेकडील सर्व हकीकत तिणें सांगितली. तेव्हां ही संधी आयतीच आली, असें समजून राजानें दृढवर्म्याला मुक्त करण्याविषयीं तावडतोब सैन्य रवाना केलें. विजयसेनाला त्या फौजेचें आधिपत्य दिलें होतें. यावेळीं वासवदत्तेला भेटावें असा राजाचा विचार होता. पण कलिंगराजाकडची कांहीं बातमी समजण्याची तो वाट पाहत होता. लवकरच—विजयसेनानें कलिंगाला जेरीस आणल्याचें वर्तमान आलें. तेव्हां राजा राणीच्या भेटीला गेला. यावेळीं वासदत्ता सांकृत्यायनीशीं कांहीं गोष्टी करीत बसली होती. वासवदत्ता रागावली होती, तरी वत्सराजाला पाहून तत्काल लाजून उभी राहिली. राजालाही तिची मनोहर मूर्ती पाहून प्रेमाची उकळी फुटल्यासारखें झालें. त्याच्या मनांत एकदम तिला आलिंगन द्यावयाचें होतें. पण सांकृत्यायनी जवळ होती ह्मणून तसें न करतां—"प्रिये, यावेळीं

मी उत्थापन देण्याला योग्य नाहीं. अपराधी मनुष्याचा कोणी सत्कार करीत नाहींत. मी तर महा अपराधी आहें. तेव्हां सत्कार करून मला उगीच लाजवूं नकोस. हें तुझें स्फुंदणें, हें दीर्घ श्वास टाकणें आणि खालीं मान घालून कांहीं न बोलतां उभें राहणें, इत्यादि लक्षणांवरून तुझा कोप—तूं जरी त्याला आवरून धरण्याचा प्रयत्न करीत आहेस तरी—व्यक्त दिसून मला अत्यंत पीडा करीत आहे. तर कांहीं अपराध झाला असेल त्याची क्षमा करून एकवेळ त्या तुझ्या मनोहर दृष्टीनें प्रेमपूर्वक माझ्याकडे पहा.'' अशा अनेक प्रकारांनीं **वत्सराजानें** तिच्या विनवण्या केल्या. तेव्हां **वासवदत्ता** ह्मणाली, ''मी कोणावर रागावूं? ज्याला आपली गरज असेल त्याच्यावर राग करतां येईल. पण ज्याला मुळीं गरजच नाहीं त्याच्यावर रागावण्याला मी इतकी कांहीं वेडी नाहीं. मी आपला राग असा कांहीं वाटेवर टाकला नाहीं. आपण ज्या सुखांत निमग्न आहां, तें सोडून माझ्या हतभाग्येच्या विनवण्या करून उगीच दुःखावर डाग देतां, हें आपल्याला बरें वाटतें काय? मी आपली नशीबाला हात लावून स्वस्थ बसलें आहें. मला राग नाहीं आणि लोभही नाहीं; आणि उगीच कोणी माझ्या पायांही पडायला नको आहे.'' हें दोघांचें बोलणें चाललें आहे, इतक्यांत **सांकृत्यायनी** ह्मणाली, ''महाराज, अशा बोलण्यानीं कांहीं व्हावयाचें नाहीं. तिला जें दुःख झालें आहे त्याचें कारण निराळेंच आहे. त्याचा आपण परिहार केला ह्मणजे झालें.'' असें बोलून तिनें आईकडून आलेल्या पत्रांतील सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून राजा ह्मणाला; ''हात्तेचा! एवढेंच ना? यांत मोठेंसें काय आहे? त्या **कलिंगाची** मला कांहीं विशाद वाटत नाहीं. तें पत्र प्रथम माझ्याच हातीं आलें होतें. त्यांतील मजकूर वाचून **दृढवर्म्याला** बंधमुक्त करण्याकरितां मी यापूर्वींच मोठी फौज देऊन **विजयसेनाला** तिकडे पाठविला आहे. आमच्या फौजेनें **कालिंगराजाचा** पराभव करून त्याची अगदीं वाताहत केली, इतकें वर्तमान तिकडून आलें आहे. आतां

लौकरच किल्ल्यांत प्रवेश करून **कलिंगाला** ठार मारल्याची किंवा कैद केल्याची बातमी आज उद्यां येईल." हें वर्तमान ऐकतांच **वासवदत्तेला** अत्यंत समाधान वाटलें. आणि ती प्रेमानें व अत्यंत कृतज्ञपणानें राजाकडे पहात आहे, इतक्यांत **विजयसेन** व **दृढवर्म्याचा** ह्मातारा चोपदार **विनयवसू** हे दोघेही बाहेर आल्याचें. वर्तमान द्वारपालिकेनें राजाला कळविलें. यजमानाची आज्ञा होतांच चोपदारीण त्या दोघांलाही आंत घेऊन आली. राजाला पाहून त्या उभयतांला फार आनंद झाला. **विजयसेन** विजयी होऊन आला होता व तो इमानी चोपदार आपल्या यजमानाची मुक्तता झाल्यामुळें फार संतुष्ट झाला होता, ह्मणून दोघांचींही मुखें प्रफुल्लित दिसत होतीं. त्यांणीं मुजरा केल्यावर राजानें त्यांस आलिंगन देऊन हकीकत विचारिली; तेव्हां **विनयवसू** म्हणाला, "आपला जयजयकार असो. महाराज, आपल्या ह्या शूर **सेनापतीनें** दुष्ट **कलिंगाला** मारून आमच्या **दृढवर्म**महाराजांना पुनः राज्यपदावर बसविलें." हे त्याच्या तोंडचे शब्द ऐकतांच **वासवदत्तेला** अतिशय आनंद झाला. आणि त्याच्या बहरांत मागचा राग वगैरे सगळा विसरून अत्यंत आभारी होऊन एकदम ती **वत्सराजाच्या** पायां पडूं लागली. राजानें तिचें निवारण करून प्रेमानें तिला आपल्या मांडीवर बसवून घेतलें.

इकडचें हें वर्तमान ऐकून **वसंतक** नाचत नाचत तेथें आला. तो प्रतिबंधांतून सुटला होता तरी हावेळपर्यंत **वासवदत्तेच्या** दृष्टीसमोर आला नव्हता. कदाचित् ती आपल्याला शिक्षा करील असें त्याला भय होतें. यावेळीं तो राणीच्या पुढें येऊन मोठ्यानें ह्मणाला, "उभयतां दंपत्याचा जयजयकार असो! ह्या राजवाड्यांत यावेळीं सर्वप्रकारें आनंदी आनंद झाला आहे. तेव्हां कांहीं गोष्टी अवश्य झाल्याच पाहिजेत. त्या कोणत्या ह्मणाल तर,—( राजाकडे बोट दाखवून ) पहिल्यानें गुरुपूजा; नंतर ( आपलें जानवें हातांत धरून ) ब्राह्मणाचा सत्कार; आणि शेवटीं गरीब कैद्याची ( **प्रियदर्शिकेची** ) मुक्तता; ह्या तीन गोष्टी अवश्य अवश्य

झाल्याच पाहिजेत." वासवदत्ता यावेळीं फार आनंदित झाली होती. ती वसंतकाचें भाषण ऐकून हंसून ह्मणाली, "लबाडानें युक्ती लढवून त्या आरण्यकेला सोडविण्याचा उपाय काढला खरा; असो. पण यावेळीं हें याचें बोलणें मी मान्य करतें." असें ह्मणून तिनें दासीकरवीं प्रियदर्शिकेला आपल्या समोर आणण्याचा हुकूम केला. तितक्यांत विनयवसू वत्सराजाला ह्मणाला, "महाराज, आमच्या यजमानांनीं आपली कन्या प्रियदर्शिका हिला आपणाला देण्याचा फार फार हेतू धरला होता. त्यांच्यावर संकट आलें होतें तरी मी त्या कन्येला आपल्याकडे घेऊन येत होतों, पण वाटेंत"—इतकें बोलून तो रडूं लागला. तेव्हां त्याचें समाधान करून वत्सराजानें पुढची हकीकत विचारली. ती तो सांगत आहे इतक्यांत वासवदत्तेला अतिशय दुःख होऊन आपली मावसबहीण प्रियदर्शिका नाहींशी झाली ह्मणून तीही रडूं लागली. विनयवसूनें विंध्यपर्वतांत विंध्यकेतूच्या घरीं प्रियदर्शिका नाहींशी झाल्याचें वर्तमान सांगितलें. तेव्हां राजानें विजयसेनाकडे साशंकमुद्रेनें पाहिलें. इतक्यांत अंधारकोठडींत राहिल्यामुळें व असह्य दुःखानें कृश व मलीन झालेल्या प्रियदर्शिकेला मनोरमा तेथें घेऊन आली. तेव्हां विनयवसूनें लक्ष्यपूर्वक पाहून तिला ओळखलें. आणि ही आपल्या महाराजांचीच कन्या आहे; असें समजून तो वासवदत्तेला ह्मणाला, "बाईसाहेब, ही मुलगी कोणाची आणि येथें कोठून आली?" तेव्हां वासवदत्ता म्हणाली, "ही विंध्यकेतूची मुलगी. त्याला मारून ह्या विजयसेनानें येथें आणली." हें ऐकतांच विनयवसूचा संशय अगदींच फिटला. त्यानें प्रियदर्शिकेची अवस्था पाहून आपल्या कपाळाला हात लावला. व फार कष्टी होऊन वासवदत्तेला ह्मणाला, "बाईसाहेब, ही विंध्यकेतूची मुलगी नव्हे. असलें रत्न त्या रानटी भिल्लाच्या पोटीं कोठून येईल? ही प्रत्यक्ष आपली मावसबहीण, आणि आमच्या यजमानांची कन्या प्रियदर्शिकाबाई ती हीच होय!" प्रियदर्शिकेला अंधारकोठडीं-

तून आणण्यापूर्वींच तिला सर्पदंश झाला होता. तरी तिला कांहीं माहित नव्हतें. **विनयवसू** तिची गोष्ट सांगत आहे, तों ती एकाएकीं धाडकन् जमिनीवर पडली. तिला वरचेवर विषाच्या ओढी येऊं लागल्या. **वासवदत्तेला** तिचें नातें समजलें होतें; ह्मणून ती फारच घाबरून,—"माझ्या बहिणीला वांचवा! माझ्या बहिणीला वांचवा!" म्हणून राजाच्या विनवण्या करूं लागली. **प्रियदर्शिकेची** अवस्था पाहून राजालाही फार दुःख झालें. त्याणें **वासवदत्तेचें** समाधान करून **मनोरमेकडुन**—"तूं शुद्धीवर आहेस का?" म्हणून **प्रियदर्शिकेला** विचारविलें. तेव्हां अडखळत अडखळत—"अशा अवस्थेंत देखील महाराजांची भेट झाली असती तर"—असें अर्धवट बोलून तिनें जमिनीवर अंग टाकलें. **वत्सराज** हे तिचे शब्द ऐकून फारच दुःखित झाला. **वासवदत्ता** तर रडत रडत तिच्या जवळ जाऊन म्हणाली, "माझे लाडके बहिणी, ऊठ लौकर, असें करूं नको. हे पहा महाराज देखील दुःखित होऊन जवळच बसले आहेत. न समजून माझ्या हातून तसा अन्याय झाला. तुझे पुष्कळ हाल झाले त्याची क्षमा कर. मला चांडाळणीला हें नातें पूर्वींच समजलें असतें तर असें कां झालें असतें! पण झाल्या गोष्टीला उपाय काय? देवा, असें मी काय पूर्वजन्मीं पातक केलें होतें; कीं माझी प्रिय बहीण कधीं नव्हतेली दृष्टीस पडली असून तिला अशा अवस्थेंत मीं पहावी काय?" **वासवदत्ता** याप्रमाणें विलाप करीत **प्रियदर्शिकेच्या** अंगावर पडली. **वत्सराजाला** विष उतरण्याची विद्या माहित होती. पण दुःखाच्या आवेशांत त्याला तिचें भान राहिलें नाहीं, आणि तोही शोक करूं लागला.

हा अणिबाणीचा प्रसंग पाहून **वसंतक** राजाला ह्मणाला, "मित्रा, रडत बसण्याची ही वेळ नव्हे. विषाचा अम्मल पुरता बसत चालला आहे. मला कांहीं माहीत नाहीं; पण तूंच सांगितलें होतेंस कीं लहानपणीं मला एका **नागाच्या** प्रसादानें विषविद्या प्राप्त झाली आहे ह्मणून. तर मग आतां ती बाहेर काढून हिला जीवंत कां करीत नाहींस?" याप्रमाणें **वसं**-

तकानें सुचविल्यावरूव राजाला स्मरण झालें. तेव्हां तत्काळ पाणी मंत्रून राजानें तिच्या अंगावर शिंपडतांच, झोंपेंतून उठल्याप्रमाणें **प्रियदर्शिका** जांभया देत उठून बसून उत्कंठेनें राजाकडे पाहून लाजली. आपली बहीण सावध झालेली पाहून **वासवदत्तेला** फारच आनंद झाला. तिनें राजाचे फार फार आभार मानले. तेव्हां **विनयवसू** पुढें येऊन **प्रियदर्शिकेला** ह्मणाला, "छोट्या बाईसाहेब, मला आपण ओळखलें काय? तुमचे वडील दृढवर्म्महाराज यांचा मी विश्वासू सेवक, व लहानपणीं तुम्हाला अंगाखांद्यावर घेऊन खेळविणारा **विनयवसू** तुम्हाला नमस्कार करतों." चोपदाराचे हे शब्द ऐकून प्रियदर्शिकेनें त्याला ओळखलें; तेव्हां मागच्या सर्व गोष्टींचें स्मरण झाल्यामुळें तिला एकदम रडूं कोसळलें; तिनें तें आवरण्याविषयीं पुष्कळ प्रयत्न केला; पण तें अनावर होऊन मोठा गळा काढून तिनें हंबरडा फोडला. आणि आपल्या आईबापांचीं नांवें घेऊन हाका मारूं लागली. तेव्हां तिचें समाधान करून **विनयवसू** ह्मणाला, "बाई, आतां कां रडतां? ते दुःखाचे दिवस गेले. **वत्सराजाच्या** कृपेनें आपले महाराज; राणी-साहेब वगैरे सर्व मंडळी मोठ्या आनंदांत आहेत. तुम्हालाही सुखाचे दिवस प्राप्त होऊन आतांपासून पुढें सर्व तुमचे हेतू ईश्वर पूर्ण करील असें वाटतें." **वासवदत्तेला** त्या बहिणीविषयीं फारच प्रेम वाटलें. ती सद्गदित होऊन ह्मणाली, "गडे बहिणी, एकून तूं फारच लबाड आहेस ह्मणावयाची. इतके दिवस आपलें नांव चोरून ठेवून मला कां बरें फसविलेंस? बरें. आतां तरी माझ्यावर तुझी किती माया आहे ती मला पाहूं दे." असें बोलून तिणें प्रियदर्शिकेला घट्ट मिठी मारली. आणि—"आतां बरीक माझा जीव थंड झाला"—असें म्हणाली. ही संधी पाहून **वसंतक** ह्मणाला, "बाईसाहेब, आपण आपल्या बहिणीच्या गळ्याला मिठी मारून आनंदसमुद्रांत डुंबत आहां हें चांगलेंच आहे. पण हे वैद्यबुवा ( **वत्सराज** ) इकडे तिष्ठत बसले आहेत. यांची कांहीं

संभावना कराल कीं नाहीं ?" **वासवदत्ता** ह्मणाली, "बाबा, जरा दम धर, मी तें विसरलें नाहीं. आधीं मला आपल्या बहिणीच्या भेटीचें सुख घेऊं दे. मग हें मिळावयाचें नाहीं." हें ऐकून **वसंतक** **वत्सराजा**कडे पाहून हंसून म्हणाला, "वैद्यबुवा, पाहतां काय ? खूप लाट आहे. पुढें हांत पसरा. तुम्हाला पाहिजे तीच संभावना मिळणार आहे. ह्या **प्रियदर्शिका**बाईचा हातच आपली संभावना होणार आहे !" **वत्सराज** ह्मणाला, "नकोरे बुवा. आह्माला तिचें पाणिग्रहण करून काय करावयाचें आहे ? ही आमची प्रिया (**वासवदत्ता**) रागावली होती, ती संतुष्ट झाली, इतकेंच आह्माला पुरे आहे." **वत्सराजा**ला **प्रियदर्शि-केचें** पाणिग्रहण किती इष्ट होतें, हें सांगावयास नकोच. तरी त्याणें वरकांती इच्छा नाहीं असें दाखविलें. हें **वासदवत्ते**लाही समजलें म्हणून तिनें, **प्रियदर्शिका** आपली बहीण असून ती राजाला फार आवडते तर तिच्याशीं त्याचा विवाह करून द्यावा, असें मनांत आणून—"हिच्या बापानें हिला पूर्वींच आपणांला देऊं केली होती, ह्मणून हिचा स्वीकार केलाच पाहिजे—असा आग्रह केला. व **वसंतका**नेंही प्रार्थना केली आणि **वासवदत्ते**नें **प्रियदर्शिके**चा हात **वत्सराजा**च्या हातांत देऊन उभयतांचा गांधर्वविवाह लावला. यावेळीं जिकडे तिकडे परम आनंद होऊन राजाचे मनोरथ पूर्ण झाले. नंतर **विनयवसू**चा सत्कार करून हें सर्व आनंदाचें वर्तमान **दृढवर्म्या**ला सांगण्याकरितां त्याला परत रवाना केलें.

याप्रमाणें **वत्सराजा**ला **प्रियदर्शिके**ची प्राप्ती होऊन **वासवदत्ता**ही प्रसन्न झाली व **वसंतक** बंधनांतून प्रसिद्धपणें मुक्त होऊन **वासवदत्ते**च्या कृपेला पात्र झाला. तेव्हां तो हंसत हंसत तिला ह्मणाला, "थोरल्या बाईसाहेब, मला आपण विनाकारण कां बरें प्रतिबंधांत ठेवलें होतें ? अपराध काय तो या तुमच्या यजमानांचा आणि बहिणीचा. मला गरिबाला उगीच दुःख भोगावें लागलें. चोराला सोडून संन्याशाला सुळीं देण्याची—तुमची रीत आहे असें वाटतें ! ह्या तुमच्या वर्तनावरून मला

रुरूची कथा आठवली." हें त्याचें बोलणें ऐकून **वासवदत्ता** ह्मणाली, "होय होय. आह्मी तसाच अन्याय करतों; पण तूं निरपराधी कसा ? कळीचा नारद काय तो तूंच आहेस. बरें झालें, तुझी खोड मोडली. पुनः अशा फंदांत पडशील का ? आणि तुला असें दुःख तें काय भोगावें लागलें ? कैदेंतून त्याच दिवशीं मोकळा झालास. माझ्या मात्र दृष्टीं पडत नव्हतास एवढेंच कायतें. बरें, झालें तें झालें. त्याची गोष्ट आतां कशाला ? तुला कोणची कथा आठवली ह्मणत होतास ती तेवढी सांग बरें पाहूं. मला कथा ऐकण्याची फार आवड आहे." हें ऐकून **वसंतकानें** पुष्कळ आढेवेढे घेतले. आणि शेवटीं—आतां तुझ्यावर कधींही रागावणार नाहीं—असें **वासवदत्तेचें** वचन घेऊन कथा सांगूं लागला.

तो ह्मणाला, "पूर्वीं **रुरू** नांवाचा एक तरुण ऋषिपुत्र होता. तो स्वेच्छेनें अरण्यांत फिरत असतां त्याला—विद्याधरापासून **मेनका** अप्सरेच्या पोटीं उत्पन्न झालेली, आणि **स्थूलकेश** नांवाच्या ऋषीनें वाढविलेली—**प्रमद्वरा** नांवाची कन्या सहज दृष्टीस पडली. उभयतांनींही परस्परांचीं मनें तत्काल हरण केलीं, तेव्हां **रुरूनें स्थूलकेशऋषीजवळ** जाऊन ती मुलगी आपणाला देण्याविषयीं प्रार्थना केली. त्याप्रमाणें ऋषीनें त्याचें वचन मान्य करून कन्या देण्याचा निश्चय करून विवाहाची तयारी केली. आयतेवेळीं एकाएकीं त्या कन्येला सर्पदंश होऊन ती भूमीवर पडली. तिला पाहून दुःखित होऊन **रुरू** मोठ्यानें शोक करूं लागला तेव्हां आकाशवाणी झाली. ती अशी कीं, "अरे, तूं रडूं नकोस. ह्या तुझ्या स्त्रीचें आयुष्य सरलें आहे. तूं आपलें अर्धें आयुष्य देशील तर मात्र ती उठेल." हें ऐकून **रुरूनें** तत्काल आपल्या आयुष्याच्या अर्धाचा संकल्प सोडला; तेव्हां तत्क्षणीं **रुरूच्या** नेत्रांला आणि मनाला आनंद देणारी ती सुंदरी उठून बसली ! मग त्याणें त्या **प्रमद्वरेशीं** विवाह करून घेतला. आणि त्या दिवसापासून—सर्प मिळेल तेथें त्याला मारावयाचा—असें व्रत घेतलें. हा त्याचा सर्प मारण्याचा क्रम बरेच दिवस सारखा चालला होता. मारतेवेळीं

—तो सर्प विषारी किंवा निर्विष, याचा तो मुळींच विचार करीत नव्हता. एके-दिवशीं डुंडुभ (मालुंड) जातीचा एक सर्प त्याच्या दृष्टीस पडला. त्याला पाहून रुरू नित्यक्रमाप्रमाणें त्याला मारण्याला प्रवृत्त झाला. तेव्हां तो दीन होऊन मनुष्यवाणीनें त्याला ह्मणाला, " ब्राह्मणा, तूं सर्पावर रागावून त्यानां मारतोस हें ठीक आहे. पण मला गरीबाला कां मारण्यास तयार झालास ? सर्पानें तुझ्या प्रियेला दंश केला; पण आह्मी मालुंडांनीं तुझा काय अन्याय केला आहे ? सर्प आणि डुंडुभ एक नव्हत. आह्मीं निर्विष असून कोणालाही दंश करीत नाहीं." हें त्याचें भाषण ऐकून रुरू चकित होऊन— तूं कोण आहेस?—म्हणून त्यानें त्याला प्रश्न केल्यावरून डुंडुभ म्हणाला, "मी पूर्व-जन्मींचा ऋषी असून शापानें मला ही योनी प्राप्त झाली आहे. तुझ्याशीं संवाद करीपर्यंतच शापाचा अवधी होता." असें बोलून रुरूचा निरोप घेऊन तो ऋषी निघून गेला." ही कथा सांगून वसंतक म्हणाला, " रुरू-प्रमाणें तुम्ही सर्पाच्या अपराधाबद्दल डुंडुभाला देखील मारणाऱ्या आहां!"

वसंतकापासून वरील कथा ऐकून वासवदत्ता फार संतुष्ट झाली. वत्सराज हंसत हंसत उभयतांचा संवाद ऐकत होता. याप्रमाणें नेहमीं वासवदत्तेचे अन्याय करून गोड गोड भाषणानें व वीणेच्या मधुर नादानें तिचें मन रंजवून तिला प्रसन्न करून घेत असावें, हा वत्सराजाचा नेहमींचा क्रमच चालला होता. वसंतक दोघांचेंही मनरंजन करून झगडे कलह मिटविण्याचा प्रयत्न करीत होता. वत्सराजाच्या गळ्यांत मदिरा, हातांत वीणा, आणि मांडीवर वासवदत्ता—अशा तिघी मोहि-नींनीं नेहमीं त्याला घेरलें होतें, म्हणून रात्रंदिवस त्यांच्या नादांत निमग्न होऊन तो आनंदांत राहूं लागला!

---

येथपर्यंत ह्या मोठ्या ग्रंथाचा पहिला भाग सामाप्त झाला. याच्यापुढें आणखी ९ भाग आहेत. पुढच्या भागांत एकाहून एक अधीक—अशा फारच सुरस कथा येतील. या भागाच्या शेवटीं जो वत्सराज

शृंगारसमुद्रांत निमग्न झाल्याचें वाचण्यांत आहे; तोच [illegible] [illegible]च्या पुढच्या म्हणजे दुसऱ्या भागांत समुद्रवलयांकित पृथ्वी जिंकून सार्वभौम राजा झाल्याचें दिसून येईल. दुसऱ्या भागांत मुख्यत्वें—वत्सराजाचा मुख्य प्रधान **यौगंधरायण** याचें चातुर्य व स्वामिकार्याविषयीं एकनिष्ठता, **वासवदत्तेचें** निःसीम पतिप्रेम, आणि **वत्सराजाचें** शौर्य यांचें प्रदर्शन करणारा असा सुरस कथाभाग येईल.

---